The Department of Public Instruction, Bombay.

# MARAṬHI FIFTH BOOK.

ORIGINALLY COMPILED BY

THE MARAṬHI TRANSLATOR, ED. D., AND HIS ASSISTANTS;

**RECAST AND REVISED**

BY

THE MARAṬHI TRANSLATOR, ED. D.

THIRD STEREOTYPED EDITION.

EIGHT THOUSAND COPIES.

*Registered for Copy-right under Government of India's Act XXV. of* 1867.

Bombay:

GOVERNMENT CENTRAL BOOK DEPÔT.

1874.



*Price Fourteen Annas.*

मुंबई इलाक्यांतील सरकारी विद्याशाळाखातें.

# मराठी पांचवें पुस्तक.

हें पूर्वी

मराठी ट्रान्स्लेतर आणि त्यांच्या हाताखालची मंडळी

ह्यांनीं केलें होतें, तें,

कायम ठशांनीं छापावयाकरितां

मराठी ट्रान्स्लेतर एजु० डि०

ह्यांनीं

शोधून, वाढवून, तयार केलें.

आवृत्ति तिसरी.

आठ हजार प्रती.



मुंबई.

गव्हर्नमेंत सेंत्रल बुक् डिपो.

सन १८७४ इसवी.



किंमत चौदा आणे.

# अनुक्रमणिका.

पांचव्या पुस्तकाची अनुक्रमणिका.

---

**सूचना**— ह्या अनुक्रमणिकेंत ज्या नांवापुढें* अशी फुली आहे त्या नांवाची गोष्ट अजम कृष्णशास्त्री चिपळूणकर ह्यांच्या बुकांतून घेतली आहे आणि ज्या नांवा पुढें + अशी फुली आहे त्या नांवाची गोष्ट अजम विनायक कोंडदेव ओक ह्यांच्या पुस्तकांतून घेतली आहे.

---

# पांचवें पुस्तक.



## प्रजाधर्म.

### स्वराजनिष्ठा.

जो जो मनुष्य ज्या ज्या राजाच्या अमलाखालीं ईश्वरी संकेतानें असतो तो तो त्या त्या राजाची एकनिष्ठपणें सेवा करीत असला, तर त्याला स्वराजनिष्ठ असें लोक म्हणतात. आपण सर्व महाराणी विक्टोरिया हिच्या अमलाखालीं ईश्वरी संकेतानें आहों, व तिच्या अमलांत हरएक जुलमापासून व अन्यायापासून आपलें रक्षण होतें, तर आपण सर्वांनीं त्या महाराणीवर निष्ठा ठेविली पाहिजे.

जे लोक सज्जन व समंजस असतात त्यांस जरी वाटत असलें कीं, आपल्या देशाच्या राज्यकारभारांत कांहीं गोष्टी उण्या आहेत, तरी ते स्वराजनिष्ठ असतातच; कारण कीं, प्रजा स्वराजनिष्ठ असल्यानें बंडें नाहींतशीं होऊन जिकडे तिकडे स्वस्थपणा होतो; चोरी, मारामारी, खून, वगैरे अनर्थाच्या गोष्टी बंद होतात; व्यापार व उदीम हीं वाढतात, व देशाची संपत्ति वाढते, व उत्तरोत्तर कायद्यांची अधिक सुधारणा होऊन लोकांचें अधिक अधिक कल्याण होत जातें, हें त्यांच्या लक्षांत असतें.

परंतु जे दुर्जन व असमंजस मनुष्य असतात ते बलिष्ठ होऊन आपल्या राजावर उठून बंड करूं लागले, तर प्रजांची दुर्दशा होते, गरीबगुरिबांवर जुलूम होतो, व त्यांची दाद कोठें लागत नाहींशी होते; लोखंडी रस्ते व सडकांचे रस्ते बांधणें, व तळीं बांधणें, शाळा घालणें, वगैरे जीं लोककल्याणाचीं कामें, ज्यांस स्वस्थपणा पाहिजे, त्या कामांस विघ्न होतें; उदीम व्यापार बंद होतात; आणि शेतकऱ्यांनीं जें बीं जमिनींत पेरिलें त्याचें फळ त्यांस मिळत नाहींसें होतें, व जिकडे तिकडे बंडाळी

व मारामारी चालते. मग पुढें सरकार आपली फौज त्यांवर पाठवून त्या दुर्जन मनुष्यांचें व जे मूर्ख लोक त्यांस मिळाले त्यांचें पारिपत्य करितें.

इसवी सन १८५७ ह्या वर्षी बंगाल खात्यांतील शिपायांनीं बंड केलें, त्यामुळें हिंदुस्थानांतील लोकांवर जे मोठमोठे अनर्थ गुदरले ते आपणा सर्वांस माहीत आहेतच. आम्ही ईश्वरापाशीं प्रार्थना करितों कीं, ब्रितिश सरकारच्या अमलांत अशी अनर्थाची गोष्ट फिरून कधींही घडूं नये. ब्रितिश सरकारच्या दयाळू अमलानें ज्याचें ज्याचें संरक्षण होतें त्यानें त्यानें कायद्याच्या अनुरोधानें वागून राणीवर निष्ठा ठेवावी, हा त्याचा धर्मच होय.

आपल्या राजावर प्रीति ठेवणें, त्याचा मान राखणें, व त्याचा हुकूम मानणें, अशी ग्रेतब्रितन देशांतील लोकांची चालच आहे. कांहीं वर्षांमागें तेथील एका कवीनें एक कविता केली आहे तींत ईश्वरापाशीं राजाचें कल्याण प्रजा मागतात असें आहे. ती कविता आबालवृद्ध सर्व लोक शिकतात, आणि आनंदानें गातात. ही कविता वाद्यविद्येंतील कोणी कुशल पुरुषानें तालसुरांत बसविली आहे. ती लष्करी बाजा कोठें वाजविला असतां शेवटीं वाजवितात. त्या कवितेचें भाषांतर,* शब्दास शब्द असें नव्हे परंतु अर्थ घेऊन कविताबद्ध केलेलें, खालीं लिहिलें आहे.

---

## राणीविषयीं देवास प्रार्थना.

### अभंग.

इंग्लंददेशांत लंदनराजधानी ॥ तेथील सिंहासनीं विराजीत ॥ १ ॥
तीच आहे आम्हां समस्तांची राणी ॥ महत्वाची खाणी विक्तोरिया ॥ २ ॥
देवा त्वांच तिला दिलें सिंहासन ॥ त्याचा अभिमान तुला असो ॥ ३ ॥
देवराया तुझे धरितों चरण ॥ राणीचें रक्षण करीं सदा ॥ ४ ॥
मायबाप तूंचि आहेस सर्वांसी ॥ सांभाळीं राणीसी कृपादृष्टी ॥ ५ ॥
दीर्घकाळ राहो आमची ही राणी ॥ आम्हांला शिराणी हेच आहे ॥ ६ ॥

---

* हें भाषांतर अजम परशुरामपंत गोडबोले ह्यांनीं केलें.

माता सुखी तरी बाळकासि सुख ॥ नाहींतरी दुःख सर्वकाळ ॥ ७ ॥
आमच्या राणीचें यश विस्तारावें ॥ विजयी करावें तिला देवा ॥ ८ ॥
आम्हांवर तिचें राज्य असो सदा ॥ तिच्या राज्यपदा ढळ नसो ॥९॥
पृथ्वीवरी तिचें राज्य चिरकाल ॥ राहिल्या सकळ सुख आम्हां ॥१०॥
लोकसुखासाठीं जे केले कायदे ॥ रक्षितां फायदे होती आम्हां ॥११॥
तिनें ते आमचे कायदे रक्षावे ॥ जना सुख द्यावें हेंच मागों ॥ १२ ॥
आम्ही सर्वलोक तिचीं गाऊं गाणीं ॥ ऐशी अमुची राणी कीर्ति करो॥१३॥
देवा विश्वंभरा विनवितों तुला ॥ आमच्या राणीला सांभाळावें ॥१४॥
शत्रूच्या सेनेची होवो दाणादाणी ॥ विक्टोरिया राणी जय पावो ॥१५॥
मोडवीं शत्रूचीं सर्वकारस्थानें ॥ राणीचीं संस्थानें सांभाळावीं ॥ १६ ॥
राणीच्या शत्रूचे मनांतील बेत ॥ कधीं न जाऊत सिद्धीस ते ॥ १७ ॥
देवा आम्हां आहे तुझाचि भरंवसा ॥ तुजवरी आशा ठेवीतसों ॥ १८ ॥
हेप्रभो उशीर लावूं नको क्षण ॥ करी संरक्षण आमचें तूं ॥ १९ ॥
सर्वशक्ति तूंच तूंच बा सर्वज्ञ ॥ तुजपुढें अज्ञ आम्ही सर्व ॥ २० ॥
आहेस दयाळू उदारांचा राणा ॥ करावी करुणा आम्हांवरी ॥२१ ॥

श्लोक.

सौख्याची पूर्णखाणी चिरसमय असो आमची मुख्यराणी ॥
आम्हांला हे शिराणी म्हणुनि निजमुखें लोक गाऊत गाणीं ।
जीचीं सर्वत्र ठाणीं सबळहि बघुनी जोडिती शत्रु पाणी ॥
विक्टोरीया निशाणी धरुनि चहुंकडे चालती शुद्ध नाणीं ॥

---

## राणीचा जाहीरनामा.

इसवी सन १८५८ पर्यंत हिंदुस्थानांतील ब्रिटिश सरकारच्या अमलांतील देश ह्यांजवर राज्य करण्याचा अधिकार आनराबल ईस्त इंदिया कंपनीच्या हातीं होता. ह्या कंपनीनें मोठा अफाट उदीम व्यापार चालविला, व एकामागून एक देश जिंकून राज्य मिळविलें, ह्या गोष्टी हिंदुस्थानाच्या इतिहासांत प्रसिद्ध आहेत. कंपनीनें हिंदुस्थानावर जें राज्य केलें तें स्वसत्तेनें केलें नाहीं; परंतु पार्लमेंतानें वेळोवेळीं सनद

देऊन अधिकार दिला त्या योगानें इंग्लंदच्या राजाच्या तर्फेनें राज्य केलें. इसवी सन १८५८ ह्या वर्षी पार्लमेंताच्या विचारास असें आलें कीं, ह्या पुढें हिंदुस्थानावरील राज्याचा अधिकार कंपनीच्या हातीं ठेवूं नये. म्हणून पार्लमेंतानें नवा आक्त करून ठरविलें कीं, ग्रेतब्रितन देशावर जसें राणी आपल्या नांवानें राज्य चालविते, तसें हिंदुस्थानावरही राणीनें आपल्या नांवानें राज्य चालवावें. त्याप्रमाणें ह्या देशाचें राज्य आपल्या हातीं घेतांना राणी साहेबांनीं एक जाहीरनामा प्रसिद्ध केला. तो जाहीरनामा सर्व हिंदुस्थानांत प्रांतोप्रांतीं राणीच्या हुकमावरून तिच्या कारभाऱ्यांनीं सर्वांस इंग्लिशभाषेंत व देशभाषेंत वाचून दाखविला, व त्याच्या प्रती हिंदुस्थानांतील राजांस व संस्थान्यांस पाठविल्या. तो जाहीरनामा येणेंप्रमाणें.

मुकाम अलाहाबाद, सोमवार, तारीख १ ली माहे नवेंबर सन १८५८ इसवी.

**मलिका माआझमा इंग्लिस्तान यांजकडून हिंदुस्थानांतील राजे रजवाडे, व सरदार, व इतर लोक यांस खालीं लिहिलेला मेहेरबानीचा जाहीरनामा प्रसिद्ध करण्याविषयीं नवाब गवरनर जनरल बाहादूर यांस हुकूम सादर झाला आहे.**

**हिंदुस्थानांतील राजे रजवाडे, व सरदार, व इतर लोक यांस मलिका माआझमा दर इजलास कौन्सिल यांजकडून जाहीरनामा.**

**विक्टोरीया**—ईश्वरकृपेनें **ग्रेटब्रिटन व अयरलंड** या संयुक्त राज्याची, व या राज्याच्या ताब्यांत **युरप, एशिया, आफ्रिका, अमेरिका,** आणि **आस्त्रेलेशिया** या खंडांमध्यें ज्या वसाहती व उपराज्यें आहेत त्या सर्वांची **मलिका माआझमा** व धर्मसंरक्षक.

आज पर्यंत हिंदुस्थानांतील मुलखांचा राज्यकारभार आमच्या वतीनें **आनराबल ईस्ट इंडिया कंपनी** चालवीत होती तो आपणच चालवावा, असें कितीएक महत्वाच्या कारणांवरून **पार्लमेंट** सभेंत जमलेले **स्पिरिच्युअल व टेंपरल लार्ड** आणि **कामन** यांच्या सल्यानें, व अनुमतानें आम्ही ठरविलें आहे.

यास्तव आम्ही आतां या जाहीरनाम्याच्या द्वारें कळवितों व प्रसिद्ध करतों कीं, वर लिहिल्याप्रमाणें सला व अनुमत घेऊन; सदर्हू राजकारभार आम्ही आपले हातीं घेतला आहे; आणि सदर्हू मुलखांतील आमच्या सर्व रयतेस फर्मावितों कीं, आमच्याशीं, आमच्या वारसांशीं आणि आमच्या जायनिशीनांशीं तुम्हीं इमानानें, व खरोखर रयतेच्या नात्यानें वागावें; आणि यापुढें सदर्हू मुलखांचा राज्यकारभार आमच्या नावें व तर्फे चालविण्यासाठीं, ज्या ज्या वेळीं ज्यांची ज्यांची नेमणूक आम्ही करूं त्या त्या अधिकाऱ्यांचा हुकूम तुम्ही मानीत जावा.

आमचे मोठे विश्वासू आणि फार प्रीतींतले मंत्री **नवाब चार्लस जान वैकौन्ट क्यानिंग साहेब** यांचें इमान, व योग्यता, व शाहाणपणा यांवर आम्ही पूर्ण विश्वास आणि भरंवसा ठेवून, त्यांस म्हणजे मशारनिल्हे **वैकौन्ट क्यानिंग साहेब** यांस सदर्हू मुलखांत आमचे पहिले **वैसराय** व **गवरनर जनरल** ठरवितों व नेमतों; आणि आमच्या नांवें सदर्हू मुलखांचा राज्यकारभार चालविण्यास, तसेंच एका मुख्य **स्टेट सेक्रेटारीच्या** मारफत जे जे हुकूम, व कायदे त्यांस वेळोवेळीं आम्हांकडून पोंचतील त्यांस अनुसरून, हरएक बाबतींत आमच्या नांवें, व तर्फे वहिवाट करण्यास, त्यांस अधिकार देतों.

**आनराबल ईस्ट इंडिया कंपनी** यांणीं हल्लीं ज्या ज्या मुलकी व लष्करी कामावर जे जे असामी नेमिलेले आहेत त्यां सर्वांस, त्या त्या कामावर आम्ही काईम करतों; पुढें जशी आमची मर्जी होईल, व जे कायदे व कानू आम्ही ठरवूं, त्याप्रमाणें फेरफार होतील.

हिंदुस्थानांतील राजे रजवाडे यांस आम्ही जाहीर करतों कीं, त्यां बरोबर **आनराबल ईस्ट इंडिया कंपनीनें** जे तहनामे, व करारनामे केले असतील, किंवा जे सदर्हू **कंपनीच्या** हुकमानें झाले असतील, ते सर्व आम्हांस मान्य आहेत, व आम्ही लक्षपूर्वक पाळूं; याचप्रमाणें राजे रजवाडे यांणींही आपआपले तर्फेनें ते तहनामे, व करारनामे, पाळले पाहिजेत.

आमचें जें हल्लींचें राज्य आहे तें वाढविण्याची आम्हांस अगदीं इच्छा नाहीं; आमचें राज्य, व राजाधिकार यांस धक्का पोंचविण्यास

कोणीं यत्न केला असतां आम्ही त्यास शिक्षा केल्यावांचून राहणार नाहीं; आणि त्याचप्रमाणें इतरांच्या मुलखांस व हक्कांस धक्का पोंचेल असी गोष्ट आम्ही कधीं मंजूर करणार नाहीं. ज्याप्रमाणें आम्ही आपला अधिकार, आपला दर्जा, व आपला मर्तबा राखतों त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतील राजे रजवाडे यांचा अधिकार, व दर्जा व मर्तबा आम्ही राखूं. राजे रजवाड्यांची, तशीच आमच्या रयतेची आबादानी, व बढती असावी असें आम्ही इच्छितों; व हें देशांत स्वस्थता, व चांगले प्रकारची राज्यव्यवस्था असेल, तरच घडेल.

आमच्या इतर सर्व रयतेविषयीं जे राजधर्म आम्ही अवश्य मानितों, तेच राजधर्म हिंदुस्थानांतील आमच्या मुलखांतल्या रयतेविषयीं आम्हांस पाळिले पाहिजेत असें आम्ही समजतों; आणि ईश्वराच्या कृपेनें ते सर्व वास्तविक रीतीनें व मनःपूर्वक पाळूं.

ख्रिस्ती धर्माच्या खरेपणावर आमचा पूर्ण विश्वास आहे, व धर्माच्या योगानें जें समाधान होतें तें स्मरून आम्ही ईश्वराचे उपकार मानितों असें आहे तरी, धर्मसंबंधी जे आमचे विचार आहेत ते आमच्या रयतेनें स्वीकारण्याविषयीं सक्ती करण्यास आम्हांस अधिकार नाहीं, व तशी इच्छाही नाहीं. धर्मसंबंधी विचाराच्या, किंवा आचरणाच्या सबबीनें कोणाची तरफदारी होऊं नये, व कोणास इजा होऊं नये, व कोणास दुःख होऊं नये, तसेंच कायद्यांचा आश्रय सर्वांस समान रीतीनें, व निःपक्षपातानें मिळावा अशी आमची आज्ञा आहे. आमच्या सर्व अधिकाऱ्यांस आमची सक्त ताकीद आहे कीं, आमच्या रयत लोकांची धर्मसंबंधी समजूत, किंवा भक्ति या प्रकरणीं त्यांणीं कोणतेही प्रकारें हात घालूं नये; घालतील तर त्यांवर आमची मोठी इतराजी होईल.

आणखी आमची अशी आज्ञा आहे कीं आमच्या रयतलोकांपैकीं जे कोणी विद्येनें, हुशारीनें, व प्रामाणिकपणानें जीं जीं सरकारी कामें यथास्थित चालविण्यास लायक असतील तीं तीं कामें, सवड असेल त्याप्रमाणें, बिनदिक्कत व निःपक्षपातानें त्या लोकांस ज्ञात, किंवा धर्म मनांत न आणितां द्यावीं.

वडिलोपासून चालत आलेल्या जमिनींवर हिंदुस्थानांतील लोकांची आसक्ति आहे ती आम्हांस माहित असून आमच्या लक्षांत आहे. सर-

कारचें वाजबी घेणें असेल तें घेऊन लोकांचे जमिनीसंबंधी जे जे हक्क असतील ते ते त्यांकडे सुरक्षित ठेवावे, व हरएक बाबतींत कायदे ठरवितांना, व ते अमलांत आणतांना, हिंदुस्थानांत जे प्राचीन हक्क, व वहिवाटी, व रिवाज चालत आले असतील त्यांवर योग्य नजर द्यावी, अशी आमची आज्ञा आहे.

राज्यलोभी मनुष्यांनीं स्वदेशीय लोकांस खोटे मजकूर समजावून फसविलें, आणि दंगा करण्यास प्रवृत्त केलें; अशा त्यांच्या कृत्यांनीं हिंदुस्थानांतील लोकांस इजा, आणि दुःखें प्राप्त झालीं येणेंकरून आम्हांस फार दुःख झालें आहे. दंगा करणारांचा पराजय करून दंग्याचा मोड केला यावरून आमचें सामर्थ्य सर्वांस जाहीर झालें आहे.

परंतु सदर्हूप्रमाणें फसलेल्या लोकांपैकीं जे पुनः योग्य रीतीनें चालूं इच्छितात त्यांवर दया करून, त्यांच्या अपराधांची क्षमा करावी अशी आमची मर्जी आहे.

अधिक रक्तस्राव न व्हावा व हिंदुस्थानांतील आमच्या मुलखांत स्वस्थता लवकर व्हावी या उद्देशानें एका प्रांतांत तर आमचे वैसराय व गवरनर जनरल यांणीं मागें जे दुःखकारक दंगे झाले त्यांत ज्या लोकांनीं सरकारच्या विरुद्ध गुन्हे केले त्या बहुतेक लोकांस, कांहीं अटी ठरवून अपराधांची क्षमा होईल अशी आशा दाखविली आहे; आणि ज्यांचे अपराध क्षमेस पात्र नाहींत अशा गुन्हेगारांस काय काय शिक्षा होईल हेंही त्यांणीं ठरविलें आहे. सदर्हू तजवीज आमचे वैसराय आणि गवरनर जनरल यांणीं केली ती आम्हास मंजूर व कबूल आहे; व याशिवाय आम्ही आणखी जाहीर करतों तें येणें प्रमाणें:—

इंग्रज सरकारच्या रयतेचे खून करण्यांत प्रत्यक्ष संबंध असल्याची ज्यांवर शाबिती झाली असेल, किंवा होईल त्या गुन्हेगारांवर दया करणें न्यायविरुद्ध आहे; परंतु त्यांखेरीज बाकीच्या सर्व गुन्हेगारांवर दया केली जाईल.

खुनी गुन्हेगारांस ज्या लोकांनीं समजून उमजून आश्रय दिला असेल, किंवा जे दंग्यास पुढारी अथवा प्रवर्तक झाले असतील त्यांस जीवदानाखेरीज दुसरें कांहीं आश्वासन देववत नाहीं. परंतु अशा मनुष्यांस

शिक्षा ठरवितांना, ते सरकाराशीं बेइमान होण्यास कोणत्या कारणावरून प्रवृत्त झाले, याचा पूर्ण विचार केला जाईल; आणि मतलबी मनुष्यांनीं उठविलेल्या खोट्या बातम्या केवळ अविचारानें खऱ्या समजून ज्या लोकांनीं गुन्हे केले असें दिसून येईल त्या लोकांविषयीं पुष्कळ मेहेरबानीची नजर ठेविली जाईल.

सदहू मनुष्यांखेरीज जे लोक दंग्यांत असून लढाई करीत असतील ते जर आपआपल्या घरास परत येऊन स्वस्थ आपआपले कामधंदे करूं लागतील तर त्यांणीं आमच्या विरुद्ध व आमच्या राज्याविरुद्ध, व आमच्या दर्जाविरुद्ध केलेले सर्व गुन्हे विसरून कोणतीही अट न लावतां त्यांस माफी, व क्षमा मिळेल असें आम्हीं या *जाहीरनाम्याच्या द्वारें आश्वासन देतों.

अपराधांची क्षमा, व मेहेरबानी करण्याप्रकरणीं जे नियम वर लिहिले आहेत त्यां अन्वयें पुढील जान्युआरी महिन्याच्या १ ले तारिखेपूर्वी जे वर्तणूक करतील त्या सर्वांस माफीचे, व मेहेरबानीचे सदहू ठराव लागू करावे अशी आमची आज्ञा आहे.

ईश्वरकृपेनें जेव्हां हिंदुस्थानांत स्वस्थता होईल तेव्हां त्या देशांतील व्यापारधंद्यांस उत्तेजन द्यावें, लोकोपयोगी आणि लोककल्याणाच्या कृत्यांची वृद्धि करावी, व त्या देशांत राहणाऱ्या आमच्या सर्व रयतेचें हित होईल अशा रीतीनें राज्यकारभार चालवावा, अशी आमची मनापासून इच्छा आहे. आमच्या रयतेची आबादानी तेंच आमचें सामर्थ्य, त्यांचा संतोष तीच आमच्या राज्याची मजबुती, व त्यांची कृतज्ञता तेंच आम्हास उत्तम फळ, असें आम्ही समजतों. रयतेच्या कल्याणाविषयीं आमच्या ज्या इच्छा आहेत त्या सिद्धीस नेण्यास सर्व शक्तिमान जो परमेश्वर तो आम्हास व आमच्या अधिकाऱ्यांस सामर्थ्य देवो अशी प्रार्थना आहे.*

---

* ह्या जाहीरनाम्याचा लेख मूळच्याप्रमाणें अक्षरशः ठेविला आहे.

# कविता.

## अभंग तुकारामाचे.

सत्यसंकल्पाचा दाता भगवान ॥ सर्व करी पूर्ण मनोरथ ॥ १ ॥
येथें अळंकार शोभती सकळ ॥ भावबळें फळ इच्छेचें तें ॥ २ ॥
अंतरींचें बीजें जाणे कळवळा ॥ व्यापक सकळां जगतांचा ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं चालत तांतडी ॥ प्राप्तकाळघडी झाल्यावीण ॥ ४ ॥

२

काय वाणूं आतां न पुरे हे वाणी ॥ मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥
थोरींव सांडीली आपुली परीसें ॥ नेणे शिवों कैसें लोखंडासी ॥ २ ॥
जगाच्या कल्याणां संतांच्या विभूती ॥ देह कष्टवीती उपकारें ॥ ३ ॥
भूतांची दया हें भांडवल संतां ॥ आपुल्या ममता नाहीं देहीं ॥ ४ ॥
तुका म्हणे सुख पराचिया सुखें ॥ अमृत हें मुखें स्रवतसे ॥ ५ ॥

३

धन्य तोचि प्राणी क्षमा ज्याचे आंगीं ॥ न भंगे प्रसंगीं धैर्य बळ ॥ १ ॥
न म्हणे कोणासी उत्तम वाईट ॥ महत्व वरिष्ठ नसे जेथें ॥ २ ॥
सबाह्य अंतर सारिखें निर्मळ ॥ हृदय कोमळ गंगारूप ॥ ३ ॥
तुका म्हणे कायी कुरवंडीन तया ॥ ठेवीन मी पायां मस्तक हें ॥ ४ ॥

४

निर्वासिया लोड टाकूनी बैससी ॥ दंड करीतोसी अनाथांतें ॥ १ ॥
अनाथांसी दुःख देसी सर्व काळ ॥ ऐशी[११] तुज वेळ पुढें आहे ॥ २ ॥
आहे कीं नाहीं हा न करिशी विचार ॥ काय तूं पामर जन्मलासी ॥ ३ ॥
तुका म्हणे धरीं एक भूतदया ॥ अहंता[२२] ते वाया न धरीं मनीं ॥ ४ ॥

५

सेवकासी आज्ञा स्वामीची प्रमाण ॥ जोंवरी हा प्राण जाय त्याचा ॥ १ ॥
आणीकाचा धाक न धरावा मनीं ॥ निरोपावचनीं ढळूं नये ॥ २ ॥
सांभाळीं समय आगळें उत्तर ॥ देतां भेदी वज्र तयापरी ॥ ३ ॥
तुका म्हणे तोची म्हणावा सेवक ॥ खादलें तें हक्कें अन्न होय ॥ ४ ॥

६

आपला दुर्गुण लाविती पराला ॥ नेणती आपुला गुण कांहीं ॥ १ ॥
आंधळ्यासी जन सारेची आंधळे ॥ आपणासी डोळे दृश्य नाहीं ॥२॥
रोगियासी विषतुल्य तें मिष्टान्न ॥ तोंडासी कारण चवी नाहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे शुद्ध नाहीं जो आपण ॥ तया त्रिभुवन अवघें खोटें[२६] ॥४॥

७

दुष्टाचीये संगें दुष्टची जाहला ॥ विसरूनी गेला आपणासी ॥ १ ॥
ढेंकुणाचे संगें हीरा जो भंगला ॥ कुसंगें नाडला साधु तैसा ॥ २ ॥
वोढाळाचे संगें सौंत्विक नाडलें ॥ क्षणांत नासलें समागमें ॥ ३ ॥
तुका म्हणे धरा सत्संग हा बरा ॥ चुकेल तो फेरा चौऱ्यांशींचा[२७] ॥ ४ ॥

८

सद्गुरूवांचोनी सांपडेना सोय ॥ धरावे ते पाय आधीं त्याचे ॥ १ ॥
आपणा सारीखे करीती तात्काळ ॥ नाहीं काळवेळ मग त्यांसी ॥ २ ॥
लोहपरीसाची न साहे उपमा ॥ सद्गुरुमहिमा अगोंधची[२९] ॥ ३ ॥
तुका म्हणे कैसे आंधळे हे जन ॥ गेले विसरून खऱ्या[३०] देवा ॥ ४ ॥

९

न मिळो खावया न वाढो संतान ॥ परि हा भगवान कृपा करो ॥ १ ॥
ऐशी माझी वाणी मज उपदेशी[३१] ॥ आणिका लोकांसी हेंची सांगे ॥२॥
विटंबो[३२] शरीर होऊ का विपत्ती ॥ परी राहो चित्तीं भगवान ॥ ३ ॥
तुका म्हणे नाशवंत देह साचा ॥ करा धांवा त्याचीं[३३] तेंची हित ॥४ ॥

१०

अंतरीं निर्मळ वाचेचा रसाळ ॥ त्याचे गळां माळ असो नसो ॥१ ॥
आत्मअनुभवीं[३४] चोखाळिल्या वाटा ॥ त्याचे माथां जटा असो नसो ॥२।
परस्त्रीचेठायीं जो का नपुंसक ॥ त्याचे आंगा राख असो नसो ॥ ३ ॥
परद्रव्या अंध निंदेसी जो मूका ॥ तोची संत देखा तुका म्हणे ॥ ४ ॥

११

देवाचिया दासा नाहीं भय चिंता ॥ दुःख निवारिता देव तोचि ॥ १ ॥
नलगे वाहणें संसारीं उद्योग ॥ जडोनेदी पांग[३५] देवराय ॥ २ ॥

असोंद्यावा धीर सदा समाधानें ॥ तेणें भगवान अवळी केला ॥ ३ ॥
तुका म्हणे माझें जाणे अंतरंग ॥ व्यापियेलें जग तेणें एकें ॥ ४ ॥

१२

भगवंतीं घडे जेणें अंतराय ॥ होका बापमाय त्यजावी ते ॥ १ ॥
येरीं प्रिया पुत्रा असे कोण लेखा ॥ करिती ते दुःखापात्र शत्रु ॥ २ ॥
प्रल्हादें जनक बिभीषणें बंधू ॥ तैशी माता निंदूं भरतें केली ॥ ३ ॥
तुका म्हणे सर्व धर्म देवपाय ॥ आणीक उपाय दुःखमूळ ॥ ४ ॥

१३

कांरे नाठवीसी कृपाळू देवासी ॥ पोषितो जगासी एकलाची ॥ १ ॥
फुटे तरुवर उष्णकाळमासीं ॥ जीवन तयासी कोण घाली ॥ २ ॥
कोणें केली बाळा दुग्धाची उत्पत्ती ॥ वाढवी श्रीपती सवें दोन्ही ॥ ३ ॥
तुका म्हणे त्याचें नाव विश्वंभर ॥ करा निरंतर ध्यान त्याचें ॥ ४ ॥

१४

नरदेहा यावें देवदास व्हावें ॥ तेणें चुकवावें जन्ममरण ॥ १ ॥
नाहीं तरी वायां शिणवीली माय ॥ नरकासी जाय दीर्घ काळ ॥ २ ॥
देवाचेंचि ध्यान देवाचें पूजन ॥ ऐसें हें साधन साधकाचें ॥ ३ ॥
तुका म्हणे मुखें म्हणे देवराय ॥ तया सुख होय नाहीं पार ॥ ४ ॥

१५

आलीयीं भोगासी असावें सादर ॥ देवावरी भार घालूनीयां ॥ १ ॥
तोचि कृपानिधी वारील सांकडें ॥ येर तें बापुडें काय रंक ॥ २ ॥
भवाचिया पाठीं दुःखाचिया राशी ॥ शरण देवासी जातां भलें ॥ ३ ॥
तुका म्हणे जया शरण गेलीया ॥ उपेक्षीना तया दीनबंधु ॥ ४ ॥

१६

आपुलीया बळें नाहीं बोलवत ॥ सखा भगवंत वाचा त्याची ॥ १ ॥
साळुंखी मंजूळ बोलतसे वाणी ॥ शिकवीता धणी वेगळाची ॥ २ ॥
काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें ॥ पारि त्या विश्वंभरें बोलवीलें ॥ ३ ॥
तुका म्हणे त्याची कोण जाणे कळा ॥ चागवी पांगुळा पायांवीण ॥ ४ ॥

१७

ऊंचनिच कांहीं नाहीं भगवंतीं ॥ तिष्ठे[४३] भावभक्ति देखोनीयां ॥ १ ॥
लाज वाटे पुढें तोंड दाखवीतां ॥ परी जाऊं आतां कोणापाशीं ॥ २ ॥
चुकल्या कामाचा मी मागें मुशारा ॥ लाज [४४]फंजितखोरा नाहीं मज ॥ ३ ॥
माय सोडोनीयां हिंडतें वांसरूं ॥ स्वामीसेवें[४५]चोरू होवोनीयां ॥ ४ ॥
तुका म्हणे मज पाहिजे दंडिलें ॥ पुन्हा हें घडलें न पाहिजे ॥ ५ ॥

---

## कविता.

### अभंग रामदासाचे.

ऐसें कैसें रे सोंवळें ॥ शिवतां होतसे ओंवळें ॥ १ ॥
स्नान संध्या टिळे माळा ॥ पोटीं क्रोधाचा [४६]उमाळा ॥ २ ॥
नित्य दंडितोसी देह ॥ परी फिटेना संदेह ॥ ३ ॥
नित्यनेम खटाटोप ॥ मनीं विषयाचा जप ॥ ४ ॥
बाह्य केली झळफळ ॥ देह[४७]बुद्धीचा विटाळ ॥ ५ ॥
दास म्हणे दृढभाव ॥ तयाविण सर्व [४८]वांव ॥ ६ ॥

२

देह विटाळाचा गोंळा ॥ कैसा होतोसी सोंवळा ॥ १ ॥
तुज कळेना विचारू ॥ ऐशियासि काय करूं ॥ २ ॥
दृढ केला अभिमानें[४९] ॥ तेणें जाहलें बंधन ॥ ३ ॥
रामदासस्वामी वीण ॥ केला तितुकाही शीण ॥ ४ ॥

३

ज्या जैशी संगती त्यासि तैशी गती ॥ संगतीनें रीती सर्व कांहीं ॥ १ ॥
सर्व कांहीं घडे संगतीच्या गुणें ॥ साधूंचीं लक्षणें साधुसंगें ॥ २ ॥
साधुसंगें साधु होईजे आपण ॥ रामदास खूण सांगतसे ॥ ३ ॥

४

वाजे पाऊल आपलें ॥ म्हणे मागें कोण आलें ॥ १ ॥
कोण धांवतसे आड ॥ पाहोंजातां झालें झाड ॥ २ ॥
[५०]भौंवीतसे अभ्यंतरीं[५१] ॥ कोण चाले बरोबरी ॥ ३ ॥
शब्द [५२]पडसाद ऊठला ॥ म्हणे कोणरे बोलला ॥ ४ ॥
रामी रामदास म्हणे ॥ संशयाचीं हीं लक्षणें ॥ ५ ॥

५

कांहीं दिसे अकस्मात ॥ तेथें वाटे आलें भूत ॥ १ ॥
वायां पडावें संदेहीं ॥ मुळीं तेथें कांहीं नाहीं ॥ २ ॥
झाडझुडूप देखिलें ॥ जिवीं वाटे कोणी आलें ॥ ३ ॥
रामदास सांगे खूण ॥ भितो आपणा आपण ॥ ४ ॥

६

छाया देखोनि आपली ॥ शंका अंतरीं वाटली ॥ १ ॥
ऐसें भ्रमाचें लक्षण ॥ भुले आपणा आपण ॥ २ ॥
मुखें बोलतां उँत्तर ॥ तेथें झालें प्रत्युत्तर ॥ ३ ॥
डोळां घालितां आंगोळी ॥ एकाचीं तीं दोन झालीं ॥ ४ ॥
पोटीं आपण कल्पिलें ॥ तेंचि आलेंसें वाटलें ॥ ५ ॥
दास म्हणे हे उपाधी ॥ शंका धरितां अधिक बाधी ॥ ६ ॥

७

नाहीं एक उपासना ॥ कैंची भक्तीची भावना ॥ १ ॥
नाहीं निश्चय अंतरीं ॥ मन फिरे दारोदारीं ॥ २ ॥
ज्यासि नाहीं एक देव ॥ सातां पांचां ठायीं भाव ॥ ३ ॥
नानाकार झालें मन ॥ कैंचें निष्ठेचें भजन ॥ ४ ॥
रामीं रामदास म्हणे ॥ निष्ठेवीण सर्व सुणें ॥ ५ ॥

८

काम क्रोध खवळला ॥ तेणें संनिपात झाला ॥ १ ॥
यासि औषध करावें ॥ पोटीं वैराग्य धरावें ॥ २ ॥
कुपथ्य अवघें जें झालें ॥ मग तें पुढें उफाळलें ॥ ३ ॥
रामदास सांगे भलें ॥ लोक म्हणती पिसाळलें ॥ ४ ॥

९

काळ जातो क्षण क्षण ॥ मूळ येईल मरण ॥ १ ॥
कांहीं धांवाधांव करीं ॥ जंव तो मृत्यु आहे दुरी ॥ २ ॥
देह आहे जांयजणें ॥ भुललासी कवण्या गुणें ॥ ३ ॥
मायाजाळीं गुंतलें मन ॥ तेंचि दुःखासी कारण ॥ ४ ॥
सत्य वाटतें सकळ ॥ परि हें जातां नाहीं वेळ ॥ ५ ॥
रामदासाचें वचन ॥ आतां होईं सावधान ॥ ६ ॥

१०

अंतकाळ येतो येतां ॥ तेथें नये चुकवितां ॥ १ ॥
अकस्मात लागे जावें ॥ कांहीं पुण्य आचरावें ॥ २ ॥
पुण्या विना जातां प्राणी ॥ घडे यमाची जाचेंणी ॥ ३ ॥
रामदास सांगे खुण ॥ धरा गुरूचे चरण ॥ ४ ॥

११

ज्ञाना वीण जी जी कळा ॥ ती ती जाणावी अवकळा ॥ १ ॥
ऐसें भगवंत बोलिला ॥ चित्त द्यावें त्याचे बोला ॥ २ ॥
एकें ज्ञानेंचि सार्थक ॥ सर्व कर्म निरर्थक ॥ ३ ॥
दास म्हणे ज्ञानावीण ॥ प्राणी जन्मला पाषाण ॥ ४ ॥

१२

बाळक जाणेना मातेसी ॥ तिचें चित्त बाळापासीं ॥ १ ॥
तैसा देव हा दयाळू ॥ करी भक्तांचा सांभाळू ॥ २ ॥
धेनु वत्साचेनी लागे ॥ धांवे त्याच्या मागें मागें ॥ ३ ॥
पक्षी घेतसे गगन ॥ पिलापाशीं त्याचें मन ॥ ४ ॥
मत्स्य आठवितां पाळी ॥ कूर्म दृष्टीनें सांभाळी ॥ ५ ॥
रामीं रामदास म्हणे ॥ मायाजाळाचीं लक्षणें ॥ ६ ॥

१३

घात करोनी आपला ॥ काय रडतोशी पुढिला ॥ १ ॥
बहुमोलाचें आयुष्य ॥ विषयलोभें केला नाश ॥ २ ॥
नाहीं ओळखिलें सत्या ॥ तेणें केली आत्महत्या ॥ ३ ॥
नरदेहाची संगती ॥ गेली गेली होतीहातीं ॥ ४ ॥
रामदास करी चिंता ॥ काय होइल गती आतां ॥ ५ ॥

१४

आतां कोठें धरूं भाव ॥ बहुसाळ झाले देव ॥ १ ॥
मुख्य पूजा परंपर ॥ एकाहूनी एक थोर ॥ २ ॥
माझे कुळींचीं दैवतें ॥ सांगों जातां असंख्यातें ॥ ३ ॥
रामदासीं देव एक ॥ येर सर्वही मायिक ॥ ४ ॥

१५

शरण जावें संतजना ॥ सत्य मानावें निर्गुणीं ॥ १ ॥
नानामतीं काय चाड ॥ करणें सत्याची निवड ॥ २ ॥
ज्ञान भक्तीनें शिणवावें ॥ भक्ति तियेसि म्हणावें ॥ ३ ॥
रामीं रामदास सांगे ॥ भक्ति घडे संतसंगें ॥ ४ ॥

१६

कर्ता देव एक तेणें केलें सर्व ॥ तया पाशीं गर्व कामा नये ॥ १ ॥
देता देववीता नेता नेववीता ॥ कर्ता करवीता देव एक ॥ २ ॥
निमित्ताचा धणी केला असे प्राणी ॥ पाहतां निर्वाणीं देव एक ॥ ३ ॥
दास म्हणे जना सावध असावें ॥ दुश्चित्त नसावें सर्व काळ ॥ ४ ॥

१७

गेला प्रपंच हातींचा ॥ लाभ नाहीं परमार्थाचा ॥ १ ॥
दोहींकडे अंतरला ॥ थोरपणें भांबावला ॥ २ ॥
गेली अवघी निस्पृहता ॥ नाहीं स्वार्थ ही पुरता ॥ ३ ॥
कामें गेला संतसंग ॥ लोभें जाहला विरंग ॥ ४ ॥
पूर्ण नाहीं झाली आशा ॥ इकडे बुडाला अभ्यासा ॥ ५ ॥
दास म्हणे क्रोधामुळें ॥ झालें स्वहिताचें वाटोळें ॥ ६ ॥

---

## दोन रुपयांची योग्यता.

पिंपळगांवीं नारोपंत म्हणून एक गृहस्थ राहत असे, तो खाऊन पिऊन सुखी होता; व त्याला रामा म्हणून एक मुलगा होता. रामा तेरा वर्षांचा झाल्यावर नारोपंतानें आपला मुलगा मोठा विद्वान् व्हावा ह्या हेतुनें, त्याच्या खाण्यापिण्याचा वगैरे नीट बंदोबस्त करून, त्यास पुणे शहरीं एका मोठ्या शाळेंत चांगल्या भल्या विद्वान् पंतोजीच्या हाताखालीं विद्याभ्यास करावयास ठेविलें.

रामा हा गुणांनीं फार चांगला होता; त्याचा गुरु त्यास जें जें सांगे तें तें तो जीव लावून शिके. त्यास खेळण्याचें किंवा दुसरें कशाचें व्यसन अगदीं नव्हतें. तरी रामा ज्या वर्गांत होता त्याच वर्गांत कांहीं मुलें होतीं त्यांस खाऊस किंवा त्यांस पाहिजे तो खर्च करण्यास घरून

दोन दोन रुपये दरमाहा मिळत असत, तें पाहून त्यांसारखे आपणा-सही दरमाहा दोन रुपये मिळावे, असें रामास वाटून त्यानें आपल्या बापास एक पत्र लिहिलें. त्यांत मला दोन रुपये पाहिजेत म्हणून उघड तर लिहिलें नव्हतें; परंतु माझ्या वर्गातील सोबत्यांस खासगत खर्चास दरमाहा दोन दोन रुपये मिळतात, इतका मात्र मजकूर त्यानें आणिला होता.

नारोपंत फार चाणाक्ष होता; तें पत्र पाहतांच त्यांतील अभिप्राय त्यास समजला. तरी त्यानें असा विचार केला कीं, नाहीं असें साफ लिहून मुलास खट्टू करणें, व त्याचें मन दुखविणें, हें नीट नव्हे, तर आतां पोरपणामुळें दोन रुपये म्हणजे काय हें पुरें न समजून, अज्ञानानें तो ते मागत आहे; त्याकरितां दरमाहा दोन रुपयांपासून खाऊ खाण्यापेक्षां दुसरे जे चांगले थोरथोर उपयोग बहुत घडतात, ते त्यास नीट समजावून कळवावे, म्हणजे तो शहाणा होऊन आपल्या आपणच दोन रुपये मागेनासा होईल, असा योग्य विचार करून नारोपंतानें रामास पुढील पत्र लिहिलें.

अनेक आशीर्वाद, विशेष, त्वां पाठविलेलें पत्र पाहून आम्हांस मोठा संतोष झाला. तुझ्या पत्राचा सर्व अभिप्राय समजून हें उत्तर लिहिलें आहे; त्यास हें त्वां चांगलें लक्ष देऊन वाचावें, म्हणजे तुला आमचा सर्व मानस कळेल.

पाऊण शेर पीठ व पाव शेर डाळ असली म्हणजे तेवढ्यानें एका पुरुषाचें पोट चांगलें भरून त्यास प्रकृति न बिघडतां दिवसभर धंदा करण्याची शक्ति असते, आणि तितक्या पिठास व तितक्या डाळीस मिळून रोजचे दोन आणे पडतात; तर ह्या प्रमाणें दोन रुपयांत एक मनुष्याचें पोट सोळा दिवस चांगलें भरेल.

आपल्या ह्या देशांत मजूरदारगड्यास दोन आणे रोज मिळतात, व लावणीकापणीच्या वगैरे चणचणीच्या दिवसांत त्यास कांहीं जास्ती मिळतें. तें सर्व एकत्र धरून वर्षाची सरासरी करून पाहतां त्यास चार रुपये दरमाहा पडतात. त्याचीं बायको मुलें कांहीं मोलमजुरी करून सुमारें एक रुपया दरमाहा काढितात, एकूण पांच रुपये झाले. तितक्यावर

नवरा बायको व तीन मुलें अशा पांच मनुष्यांस अन्नवस्त्र व राहण्यास जागा इतक्या गोष्टींची यथास्थित सोय होते. आणि ह्या मानानें दोन रुपये दरमाहा असले म्हणजे दोन मनुष्यांचा चांगला निर्वाह होईल.

ज्यांच्या पदरीं लहान लहान मुलें लेंकरें फार, व ज्यांच्या घरीं दरिद्र म्हटलें तर अठरा विश्वे, असे लोक ह्या आपल्या गांवांत बहुत आहेत. आतां आपण जर दोन रुपये खर्चून त्यांतून चोहोंस दरमाहा आठ आठ आण्याचे दाणे घेऊन दिले, तर ते लोक आपला मोठा उपकार मानितील; व तेवढ्या दाण्यांनीं त्यांच्या मुलांबाळांस सकाळची भाकर खायाला मिळेल. ह्या प्रमाणें आपण दोन रुपये खर्च केले, तर चार कुटुंबांतील माणसें रात्रंदिवस आपणांस दुवा देत जातील.

ज्यांस रहावयास सत्तेचें घर नाहीं, व ज्यांच्या कुटुंबाचीं माणसें पुष्कळ, असे गरीब लोक आपल्या गांवांत बहुत आहेत; त्यांस चार आण्यांखालीं साधारण देखील घर भाड्यानें रहावयास मिळत नाहीं. आणि आपण जर दरमाहा दोन आणे खर्चून तशीं सात आठ घरें भाड्यानें घेऊन तीं जर तशा लोकांस फुकट रहावयास दिलीं; तर ते लोक आपले केवढे उपकार मानितील, व ईश्वरापाशीं आपलें किती कल्याण चिंतितील बरें!

खेडेगांवांत वाचणें वगैरे साधारण विद्या शिकविण्याकरितां ज्या शाळा असतात त्यांत महिना एकेक मुलास दोन दोन आणे पडतात. आणि इकडे जर आपण दोन रुपये खर्चिले तर ज्यांच्या आईबापांस दरमाहा दोन आणे खर्चण्याचें सामर्थ्य नाहीं अशा सोळा मुलांचें चांगलें शिकणें होईल. आणि शहरांतल्या शाळांत ज्यांत वाचणें, लिहिणें, व हिशोब वगैरे व्यापारास उपयोगीं पडणाऱ्या विद्या शिकवितात, तेथें तरी दरमाहा चारच आणे पडतात. ह्याजकरितां तिकडे जरी दरमाहा दोन रुपये खर्चिले तरी तितक्यांत आठ मुलांचें चांगलें शिकणें होऊन त्यांस कोणताही धंदा करण्याचें ज्ञान येईल.

हे तुला प्रकार सांगितले इतक्या प्रकारांनीं दरमाहा दोन रुपये परोपकाराकडे लावितां येतात. आतां दरमाहा दोन रुपये खर्चून स्वहित करून घेण्याचे एक दोन प्रकार तुला सांगतों. मला ठाऊक

आहे कीं तुला नकाशे व परदेशांतील पांखरांचीं व जनावरांचीं चित्रें ह्यांची फार हौस आहे. आणि दरमाहा दोन रुपये ह्याप्रमाणें रुपये जमविले, तर वर्षाच्या कांठीं तुझ्या जवळ चोवीस रुपये जमून ते तुला ते नकाशे व तीं चित्रें पुष्कळ घ्यावयास सांपडतील.

तसाच तुला प्राचीन संस्कृत कविता वाचण्याचा भारी छंद आहे, व हल्लीं पुण्यांतील छापखान्यांत तसलीं बहुत नाटकें व चंपू छापीत आहेत; तर दोन रुपये दरमाहाचे दरमाहा जर पुस्तकें घेण्याच्या कामास त्वां लाविले, तर किती पुस्तकें तुझ्या संग्रहास पडतील बरें! आणि तसेंच हीं चित्रें व पुस्तकें तुझ्या जिवांत जींव आहे तोंपर्यंत तुझ्या, व तुला ईश्वरकृपेनें जर पुढें मुलें बाळें झालीं तर त्यांच्या, व तुझ्या मित्रांच्या, अशीं किती लोकांच्या उपयोगीं पडतील बरें! आणि दरमाहा त्वां जर दोन रुपयांचा खाऊ खाल्ला, तर खाशील तेव्हां मात्र घटका, अर्धघटका, त्या पदार्थाची गोडी तुझ्या गळ्यांत आहे तेथपर्यंत मात्र तुला सुख होईल; आणि ती गोडी गेली म्हणजे पुन्हा कांहीं नाहीं.

दोन रुपये दरमाहा खर्च करून स्वहित किंवा परहित करण्याचे असे आणखी बहुत प्रकार आहेत, ते सर्व सांगण्यास शंभर पत्रें देखील पुरणार नाहींत; असो, हे जे तुला दरमाहा दोन रुपये खर्चण्याचे कांहीं मार्ग लिहिले आहेत त्यांचें नीट चांगलें मनन कर. आणि ह्या गोष्टी जर तुला चांगल्या वाटल्या, तर तूं आपल्या मित्रांस त्या सांगून त्यांसही शहाणें कर. तुला दरमाहा दोन रुपये देण्यास माझा असंतोष आहे असें तूं समजूं नको; परंतु त्यांपासून असे चांगले उपयोग घडत असतां व्यर्थ खेळ घेण्यास, व मेवामिठाई खाण्यास, ते खर्चणें हें तुजसारिख्या समजूतदारास व विचाऱ्यास योग्य आहे, असें मला दिसत नाहीं. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

ज्यांतील अर्थ फार उघड आणि मनोरम, व जें त्यास थोरपणा देऊन त्याचे मनाचें हरण होईशा गोडगोड शब्दांनीं लिहिलेलें, असें हें पत्र पाहून रामास फार आनंद झाला, व आपणास दरमाहा दोन रुपये खाऊस असावे असें जें त्याच्या डोक्यांत वेड शिरलें होतें तें सर्व गेलें.

मग ह्या चांगल्या उपदेशाबद्दल त्यानें आपल्या बापाचे मोठे उपकार मानून, हें पत्र दाखवून त्यानें आपले मित्रही शहाणे केले.

सारांश, कांहीं प्रसंगीं आईबापांनीं मुलांस रागें भरलें पाहिजे, व त्यांस दटाविलें पाहिजे, परंतु सुगम उपायांनीं जर त्यांचें मन वळावयाजोगें आहे तर तेच उपाय सुज्ञांनीं पहिल्यानें बहुतकरून योजावे, हें चांगलें.

---

## विद्येची बढाई.

मुंबई नांवें राजधानी येथें मोरोपंत म्हणून एक गृहस्थ राहत असे. त्यास नारायण ह्या नांवाचा एक मुलगा होता; त्यानें अनेक शाळांत जाऊन विद्याभ्यास केला होता. वैशाख मासीं मुंबईतील शाळांस महिनाभर सुटी असते, त्या सुटीच्या दिवसांत एके वर्षी नारायणाचा मामा पुण्यांत राहत असे, त्याला भेटावयास तो पुण्यास गेला.

नारायणाच्या मामाचे घरांत मोठी अशी एकच खोली होती. तीच रोजची बैठकीची जागा, व मुलांस खेळण्याची जागा होत असे. ही खोली फार मोठी नव्हती, तरी तींत उपयोगी असे जिन्नस पुष्कळ होते. आणि चमत्काराचे व कांहीं शोभेचेही जिन्नस होते. मुलांचीं पुस्तकें ठेवण्याचें एक कपाट होतें; व त्यांच्या बापाचीं पुस्तकें ठेवण्याचें एक कपाट होतें; एक खगोल होता; एक भूगोल होता; कांहीं चित्रें होतीं; कांहीं पुतळे होते; विणा, सारंगी अशीं वाद्यें होतीं; एका फळीवर एक मोठें घड्याळ होतें; एक सूक्ष्मदर्शक यंत्र होतें; एक दुर्बीण होती; आणि दूर दूरचे मिळविलेले कांहीं चमत्कारिक पदार्थ होते. खोलीस खिडक्या पुष्कळ होत्या, म्हणून आंत चांगला प्रकाश पडत असे; आंत बसणाऱ्यांस सुख व्हावयाजोगी ती जागा होती; व तिच्या पुढें दाळिंब्या, नारिंग्या, पेरू, वगैरे नाना प्रकारच्या फळझाडांची बाग होती.

नारायणाचीं मामेभावंडें पांच सहा होतीं, तीं सुशील व सुशिक्षित होतीं. नारायणाचे वयास तेरा वर्षे होऊन गेलीं होतीं, आणि श्रीमंत लोकांचे मुलांबरोबर तो शिकला होता, म्हणून त्यास असा गर्व झाला असे

कीं, विद्याभ्यासांत माझीं मामेभावंडें माझी बरोबरी करणार नाहींत; त्यांहून मी फार अधिक आहें. हा आपल्या घरीं कांहीं दिवस रहावयास आला आहे, ह्यास्तव आपण ह्यास रंजविलें पाहिजे, ह्या बुद्धीनें त्याच्या भावंडांनीं त्यास रंजविण्याचा मोठा प्रयत्न केला; परंतु त्यांचा तो प्रयत्न सिद्धीस गेला नाहीं. एके दिवशीं तीं सारीं मुलें त्या खोलींत बसलीं असतां त्यांचें असें भाषण झालें.

**विष्णु**—(नारायणाचा मधला मामेभाऊ) नाना, चल, तुला दाखवितों, आमच्या गुरूनें आम्हांस पांखरांचीं काय चमत्कारिक चित्रें दिलीं आहेत तीं! अथवा बुदबळांचा खेळ तुला आवडत असला, तर आमच्या गोपाळास बुदबळें चांगलीं खेळतां येतात, तो तुजबरोबर खेळेल. तिकडे तुझें मन लागत नसलें तर आम्हांजवळ राजांच्या व राणींच्या तसबिरा क्रमानें काढलेल्या आहेत, व नकाशे आहेत, पाहिजे तर त्या तसबिरा व ते नकाशे पहा; कोणत्याही प्रकारानें आपण चार घटका करमणूक करूं.

**नारायण**—(गर्वानें) असले पोरखेळ मला आवडत नाहींत.

**जगू**—(धाकटा मामेभाऊ) पण, नाना, आमच्या गुरूचें म्हणणें असें आहे कीं, सुस्त होऊन रिकामें बसण्यापेक्षां कांहीं तरी करावें हें चांगलें; मग मोठें काम नसल्यांस पोरखेळ कां होईना? मागें बळवंतराव सुभेदार बाबास भेटावयास आले होते, ते येथें कांहीं दिवस राहिले होते, ते रिकामपणीं कधीं कधीं आमच्या धाकट्या गोदी बरोबर पोरींचा खेळ देखील खेळत असत. आणि आमच्या विष्णूनें चाकूनें लांकूड तासून एक लहानसें गलबत केलें होतें त्यास रावसाहेबांनीं दोरखंड करून दिलें.

**नारा०**— जगूभाऊ, मी म्हणजे उद्योग टाकून उगीच स्वस्थ बसलों असें नाहीं. गुरूजीनें जो दररोजचा धडा मला सुटीच्या दिवसांत करावयास सांगितला होता, तो मीं मघांच करून टाकिला. आतां मला आज करायाचें कांहींच राहिलें नाहीं. म्हणून मी उगीच बसलों आहें.

**मामा नारायणाचा**—(पलीकडे बसला होता तो नारायणाचें गर्वाचें बोलणें ऐकून जगूस विचारितो) काय जगू, नारायणास, स्वतां शिक-

ण्यास किंवा दुसऱ्यास शिकविण्यास, अथवा आपल्या सोबत्यांबरोबर चार घटका कर्मणूक करण्यास, कांहींच उरलें नाहीं काय ?

**नारायण**— नाहीं, मामा, कांहींच उरलें नाहीं; माझा धडा झाला; ह्या खोलींतलीं एकूण एक पुस्तकें म्यां वाचिलीं, आणि प्रत्येक चित्र पाहिलें; येथें जितक्या चिजा आहेत तितक्या झाडून मला ठाऊक झाल्या आहेत.

**मामा**— आमची ही खोली फार मोठी आहे असें नाहीं, सुमारें वीस फूट लांब व सोळा फूट रुंद अशी आहे; तरी, माझ्या लाडक्या नाना, ह्या चार भिंतींच्या आंत किती चमत्कारिक चिजा आहेत बरें! काय नाना, ह्या खोलींतील एकूणएक जिन्नस तुला ठाऊक आहेतना? (हें ऐकून नारायण कांहींसा लाजून खालीं पाहूं लागतो. )

**गोपाळ**—(बापाकडे वळून ) नानानें सारसंग्रहाचें पुस्तक तोंडपाठ केलें आहे; म्हणून त्याला पुष्कळ गोष्टी ठाऊक झाल्या आहेत. वायुभारमापक यंत्राची त्याला माहितगारी आहे; व मेघगर्जना म्हणजे काय आहे, व इंग्लंद देशाच्या राज्याची व्यवस्था कशी आहे, ह्या गोष्टी, आणि अशा दुसऱ्या शेंकडों गोष्टी, त्याला ठाऊक झाल्या आहेत. (मग नारायणास) नारायणराव, मेघगर्जना म्हणजे काय आहे, हें कृपा करून आम्हांस सांगाल काय?

**नारा०** —तोफ सुटतांना जसा मोठा अवाज होतो तसा मेघांतून वीज निघूं लागली म्हणजे जो मोठा अवाज होतो, त्याला, आणि मेघ व पृथ्वी ह्यांच्यामध्यें जो त्या अवाजाचा प्रतिध्वनि होतो त्याला, प्राकृत भाषेंत अभाळाचें गडगडणें, आणि संस्कृत भाषेंत मेघगर्जना, असें म्हणतात.

**मामा**—वायुभारमापक यंत्र म्हणजे काय बरें, नाना?

**नारा०**—पृथ्वीच्या भोंवतीं जें वायूचें आवरण असतें त्याचा भार किती आहे, हें समजण्याकरितां जें पाऱ्याचें यंत्र केलें असतें त्यास वायुभारमापक यंत्र म्हणतात.

**विष्णु** —(त्यास हटकून) वायूचा भार म्हणून तूं म्हणतोस; तो वायूचा भार म्हणजे काय आहे, बरें, नाना? हें सांगशील तर ऐकण्याची मोठी इच्छा आहे.

**नारा०**—( मामास तिऱ्हाईत करून ) मामा, मला तर खचीत वाटतें कीं म्यां उत्तर बरोबर दिलें. हें उत्तर सारसंग्रहाचे पुस्तकांतील पाठ केलेलें म्यां आपल्या बापापुढें शंभर वेळ दिलें आहे.

**गोपाळ**—( लावून बोलण्याच्या स्वरानें ) हें तुझें उत्तर ऐकून तुझ्या बापास ज्ञान झालें असेल, आम्हांला तर ज्ञान झालें नाहीं. (ह्यावर बाप गोपाळाकडे रागानें पाहतो. ) नारायणराव, इंग्लंददेशचा राज्यकारभार चालविण्याची रीत कशी आहे, हें कृपाकरून सांगा.

**नारा०**— तेथें कायदे करणारी एक मंडळी आहे, ती जे जे कायदे करिते, व जे जे नेम ठरविते, त्यांच्या अनुसारानें राज्यकारभार चालतो. ( हें उत्तर देऊन नारायणास वाटलें कीं, मीं आज जसा काय सभाजयच केला आहे. मग तो जयमुद्रेनें इकडे तिकडे सर्वांच्या मुखांकडे पाहूं लागतो. विष्णु व जगू हे गालच्या गालीं हांसतात; गोपाळा तर मोठ्यानें खदखदां हांसूं लागतो.)

**गोपाळ**— नारायणराव, तुला ठाऊक नाहीं अशी गोष्ट आमच्या ह्या खोलींत नाहींच, असें आम्हांस खचीत वाटतें.

**नारा०**—मलाही तसेंच वाटतें, गोपाळा.

**मामा**—बरें, नाना, ह्या चौरंगावर जी चहादाणी विठूनें आणून ठेविली आहे, तिचें झांकण काय म्हणून जोरानें वर उडतें? आणि तींतून फसफस शब्द करून धूर कां बाहेर येतो? ह्या दोन गोष्टींचीं कारणें जगूस समजावून दे बरें, पाहूं.

**नारा०**—मामा, ह्यांत काय आहे? हें सांगावयाचें तर अगदीं सोपें आहे. ह्या गोष्टीचें कारण दुसरें काय असावयाचें आहे? ह्याचें कारण पाण्याची वाफ.

**मामा**—होय हें खरें, पण ज्या हौदांतून तें पाणी भरलें त्या हौदाच्या पाण्यांत कांहीं वाफ नाहीं.

**नारा०**—पाणी कढलें म्हणजे उष्णतेच्या योगानें त्याची वाफ होते.

**मामा**—होय. पण हें घोकींव उत्तर. परंतु कशी, कोणत्या रीतीनें, उष्णतेच्या योगानें हौदांतील पाण्याची वाफ होते, हें उलगडून आम्हांस सांग. (हें ऐकून नारायण गोंधळतो; ह्यावर त्यास उत्तर देतां

येत नाहीं.) नारायणा, तर तुला ठाऊक नाहीं अशी गोष्ट ह्या लहानशा खोलींत एक निघाली आहे बरें! आणखी अशा कांहीं गोष्टी निघणार नाहींत, असें तुला खचीत वाटतें? नीट विचार कर.

नारा०—(विचारपूर्वक चोहींकडे पाहून उत्तर देतो.) मला ठाऊक नाहीं अशी दुसरी गोष्ट निघणार नाहींसें वाटतें. ह्या खोलींतील बाकीच्या गोष्टी सर्व मला माहीत आहेत, अशी माझी बरीच खातरी आहे.

विष्णु—( भलेपणानें हटकून बोलतो. ) संभाळा, नारायणराव, उगीच खातरीचीं भाषणें बोलूं नका.

मामा—बरें तर नाना, त्या पलीकडचे दारास किल्ली घालावयाचें भोंक आहे, त्यांतून वारा पार जातांना शिळीसारखा कां वाजतो? ( त्याच्यानें उत्तर देववत नाहीं. ) पहा, तुला ठाऊक नाहीं अशी ही दुसरी गोष्ट निघाली आहे. पहा, ह्या खोलींत काय काय चमत्कारिक पदार्थ आहेत! त्यांपैकीं ईश्वरानें पदार्थाचेठायीं जे गुण व ज्या शक्ति करून ठेविल्या आहेत त्यांचे कांहीं परिणाम आहेत, व मनुष्याच्या कलाकौशल्यांचे कांहीं परिणाम आहेत. त्या गुणांचें व शक्तींचें व कलाकौशल्यांचें वर्णन करूं म्हटलें, तर मोठाले ग्रंथ होतील. तुला आणखी विचारितों, त्या चौरंगावर मोहोळाच्या पोळीचा तुकडा आहे, तो कसा केला आहे हें तुझ्यानें सांगवेल बरें? तें पलीकडे उष्णमापक यंत्र आहे त्यांतील पारा कां वर चढतो, व कां खालीं उतरतो, हें तुझ्यानें सांगवेल बरें? विठूनें लांकडें चुलींत घातलीं, तीं तडतड कां वाजतात, हें तुझ्यानें सांगवेल बरें? ती पहा एक माशी भिंतीला धरून चालत आहे, व एक खालीं पाठ करून छतावर चालत आहे, असें त्यांस कशानें चालतां येतें, हें तुझ्यानें सांगवेल काय?

नारा०—( मला सर्व गोष्टी ठाऊक आहेत अशी शेखी मिरवीत होता तिची कांहींशी लाज धरून, ) माझ्यानें सांगवत नाहीं, मामा.

मामा—ज्या कारणानें किल्लीच्या भोंकांतून वारा शिळीसारखा वाजतो, त्याच कारणानें त्या माशांस चालतां येतें, व त्याच कारणानें चहा-

दाणीचें झांकण उडत आहे, आणि वाफेचीं जीं यंत्रें चालतां त्वां पाहिलीं तींही त्याच कारणानें चालतात. ह्याच कारणानें अशीं मोठीं मोठीं कार्यें इतकीं होतात कीं त्यांची गणना करवत नाहीं.

**विष्णु**— बाबा, पुस्तकें वाचून ह्या गोष्टी आम्हांस शिकल्या पाहिजेत कोणत्या पुस्तकांत ह्या गोष्टी सांपडतील?

**मामा**— किती एक गोष्टी अशा आहेत कीं डोळ्यांनीं त्या पाहिल्या वांचून साफ समजत नाहींत. पुस्तकें वाचून जें त्यांविषयीं ज्ञान होतें तें संदिग्ध ज्ञान. ज्या गोष्टी म्यां नारायणास पुसल्या त्या ह्याच जातीच्या आहेत; असो, ह्या सर्व गोष्टी तुमच्या ध्यानांत भरावयास तुम्ही अझून लहान आहां; तरी महिना पंधरा दिवस गेल्यावर ह्या गोष्टी पाहण्याची इच्छा तुमच्या मनांत राहिली, तर मला सांगा, म्हणजे मी तुमच्या गुरूची प्रार्थना करून वायुविद्येचे कांहीं चमत्कार त्यांजकडून तुम्हांस दाखववीन.

---

## सहल करून येणें.

कोंकणप्रांतीं, एका डोंगराच्या पायथ्याशीं, नदी किनाऱ्यास एक गांव आहे, तेथें एका विद्वानापाशीं रामा व गोविंदा असे सोळा सोळा वर्षांचे दोन मुलगे विद्याभ्यास करीत असत. ह्या दोघांमध्यें रामाचा स्वभाव फार शोधक असे. त्यानें कोणतीही साधारण जरी गोष्ट पाहिली, तरी तींत खुबी काय आहे हें समजण्याविषयीं तो फार प्रयत्न करी, आणि ती समजली असतां त्यास फार आनंद होत असे. परंतु गोविंदाची प्रकृति तशी नव्हती. पोशाक, दागिने, वगैरे लोकांत ज्या डामडौलाच्या गोष्टी आहेत, त्यांजकडेच त्याचें लक्ष असे. असो; एक दिवस सुटी होती त्यादिवशीं रामा आणि गोविंदा हे दोघेही मौजेनें फिरावयास गेले होते. मग सांजचे वेळेस गोविंदा पहिल्यानें घरीं आला, त्यास गुरु विचारितो.

**गुरु**—कां गोविंदा, आज कोणीकडे फिरावयास गेला होतास? त्वां आज काय काय मौज पाहिली बरें!

**गोविंदा**— आज, गुरुजी, मी आंबराईत गेलों होतों, व तेथून डोंगरावर गेलों, आणि तेथून घरीं आलों.

**गुरु**— तें चक्कर तर मोठें व बहारीचें आहे; तिकडून गेलें असतां बहुत चमत्कार दृष्टीस पडवात.

**गोविंदा**—गुरुजी, खरें पुसाल तर मला तें चक्कर फारच उदासवाणें दिसलें. त्या तितक्या वाटेंत मला शपथेस देखील माणूस भेटलें नाहीं, किंवा एकही घोडें दिसलें नाहीं. इकडे गेलों त्यापेक्षां सडकेच्या रस्त्यानें गेलों असतों तर बरें झालें असतें.

**गुरु**— गोविंदा, पुष्कळ माणसें आणि घोडीं पाहून तुला आनंद होतो, त्यास तूं रहदारीच्या रस्त्यावर गेला असतास, तर तुला खरोखरी संतोष झाला असता. बरें, रामा तुला भेटला होता काय?

**गोविंदा**— होय, गुरुजी, आम्ही उभयतां बरोबरच बाहेर पडलों; परंतु आंबराईंत जातांना वाटेनें जी पाणद लागते तेथें तो मागें रेंगाळूं लागला, म्हणून त्यास मागें टाकून मी एकटाच पुढें चालता झालों. तो वाटेनें चालला असतां, ह्याजकडे बघ, त्याजकडे बघ, असें करून तो फारच चेंगटपणा करितो.

**गुरु**— ( गोविंदास उत्तर न देतां) हा रामा आला! कां, रामा, आज तूं कोणीकडे फिरावयास गेला होतास?

**रामा**— आहा, गुरुजी, काय सांगूं? आज ज्या वाटेनें मी सहल करावयास गेलों होतों ती वाट पराकाष्ठेची मनोरम होती. मी प्रथमतः सर्व आंबराईभर हिंडलों, मग डोंगराच्या माथ्यावर चढलों, नंतर तेथून खालीं उतरून तसाच नदीच्या कांठानें हिरव्या कुरणांत फिरावयास गेलों.

**गुरु**--असें कां बरें? तूं जें चक्कर घेऊन आलास तें चक्कर घेऊन तुझ्या पुढें हा आतांच गोविंदा आला. त्यांत तूं तें फार चांगलें होतें अशी त्याची स्तुति करितोस, आणि तो तर तें फार उदासवाणें होतें म्हणून त्याची निंदा करितो; ह्याचें कारण काय?

**रामा**—हें ऐकून मला मोठा अचंबा वाटतो. आतां त्यास काय वाटलें असेल तें वाटो; परंतु मला तर पावला गणीत कांहीं तरी चमत्कार म्हणून दिसलाच; त्या पहा, म्यां आपल्या खिशांत किती नव्या नव्या चमत्कारिक चिजा भरून आणिल्या आहेत!

**गुरु** – बरें, त्वां वाटेनें काय काय मौजा पाहिल्या त्या आम्हांस सविस्तर सांग बरें. मला वाटतें कीं त्या गोष्टी जशा मला नव्या वाटतील तशा गोविंदासही नव्याच वाटतील, कांकीं त्यानेंही त्या पाहिल्या नसतील.

**रामा**– होय, गुरुजी, सांगतों. आतां आंबराईत जी पाणद जाते तींत काय नुसती वाळू आहे; तेथें झाडझाडूड, ह्याकरितां मी इकडे तिकडे न पाहतां एकसारखा झप् झप् आंबराईकडेच चाललों; परंतु मी पाणदींतून चाललों असतां कुंपणाच्या आंतल्या बाजूस आंब्याचें एक झाड माझ्या दृष्टीस पडलें; त्या झाडावर झुपकेदार एक दुसरें झाड होतें, त्या झाडाचीं पानें आंब्याच्या पानांहून अगदीं वेगळीं होतीं; ही पहा त्या झाडाची एक फांदी मीं आणिली आहे. हें कोणतें झाड बरें?

**गुरु**—त्या झाडास बांडगूळ असें म्हणतात. हीं झाडें जमिनीवर कधींही उगवत नाहींत, नेहमीं दुसऱ्या झाडांवर उत्पन्न होतात; आणि आपल्या मुळांनीं त्या झाडाचा रस शोषून त्यावर उपजीवन पावतात. म्हणून ह्या झाडांस संस्कृत भाषेंत वृक्षादनी, म्हणजे झाड खाणारी लता, असें नांव प्राप्त झालें आहे.

**रामा**— मग आंबराईत पोहोंचल्यावर पाहिलें, तों तेथें गार, मंजूळ वाऱ्याची चांगली झुळूक चालली होती. तेथें कांहीं तांबडीं, कांहीं पिंवळीं, कांहीं पांढरीं, कांहीं गुलाबी, अशीं नानाप्रकारचीं सुंदर फुलें त्या रानभर इतकीं दाट लागून गेलीं होतीं कीं जसा काय त्या रानांत एक चित्र विचित्र वर्णाचा गालीचाच पसरला आहेसें वाटत होतें. त्या फुलां पैकीं बहुत फुलें म्यां पूर्वीं कधींही पाहिलीं नव्हतीं. हीं पहा, मीं कांहीं चमत्कारिक फुलें धोत्रांत आणिलीं आहेत. त्याच रानांत एके बाजूस जेथें जमीन चिबड होती तेथें शेंपन्नास टिटव्यांचा एक थवा बसला होता, तो पाहून मला फार मौज वाटली. मी जवळ जातांच त्यांपैकीं कांहीं टिटव्या माझ्या डोक्यावरती घिरट्या घालूं लागल्या, आणि टीं टीं हा शब्द असा स्पष्ट करीत होत्या कीं जणूं का त्या बोलतच आहेत. एक टिटवी पंख मोडलासें करून

जमिनीवर पडत पडत उडूं लागली. त्यावरून तिला धरण्याच्या हेतूनें मी तिच्या मागें गेलों, पण मी जसा जसा जवळ जाई तसतशी ती जेमतेम करून पुढें जाई.

गुरु— (हांसून) आहा, रामा! तिनें तुला खूप फसविलें, खरें. तिनें तुला आपल्या घरट्यापासून ठकवून दूर नेण्याकरितां तें कसब लढविलें. हीं पांखरें मोकळ्याजागीं आपलीं घरटीं बांधितात. आणि तीं जर असें मोठमोठ्यानें आरडून किंवा पंख मोडल्याचें मिष करून मनुष्यांस फसवून दूर न नेतीं, तर त्यांचीं घरटीं सहज मनुष्यांचे दृष्टीस पडतीं.

रामा- हें तिचें कपट जर मला पूर्वींच कळतें, तर बरें झालें असतें. पहा, त्या टिटवीस धरण्याचे नादीं भरून त्या चिखड जागेंत पांच सहादां मीं आपला जोडा उगीच पाण्यांत भिजवून घेतला. परंतु तिच्या पाठीस लागण्याच्या योगानें मला पुढें एक म्हातारा बावा व एक मुलगा अशीं दोन मनुष्यें भेटलीं. तीं त्या रानांत लांकडें तोडून मोळ्या बांधीत होतीं. तुमची एकेक मोळी शहरांत केवढ्याला जाते, व मोळ्यांचीं लांकडें तोडण्या बदल तुम्हांस रानवाल्यास कांहीं द्यावें लागतें कीं काय! अशा म्यां त्यांस बहुत गोष्टी विचारिल्या; व त्यांनींही विच्यारिल्या प्रश्नांचीं उत्तरें दिलीं. नंतर मी डोंगराकडे चालता झालों, आणि भोंवतालचा अफाट प्रदेश पहावा ह्या इच्छेनें डोंगरावर चढलों. तेथून आसमंतात केवढा हो विस्तीर्ण प्रदेश दिसतो, आणि किती दूरवर तरी नजरेचा पल्ला पोहोंचतो! तेथून मला पंधरा देवळांचीं शिखरें दिसत होतीं; व भोंवतालच्या बागांतील व आगरांतील झाडांच्या हिरव्या गार पालवींतून वर आलेल्या अशा गृहस्थ लोकांच्या हवेल्या मला पुष्कळ दिसत होत्या. तशी नदीही डोंगराच्या आड जाई तोंपर्यंत वळणावळणांनीं लवणांतून वाहत जातांना चांगली साफ दिसत होती. माझ्या मनांत एक गोष्ट करावयाची आली आहे, आज्ञा झाल्यास सांगेन, ती अशी कीं, आपल्या शाळेंत आपल्या प्रांताचा नकाशा आहे, तो जर आपण कृपा करून मजपाशीं प्रहर

दीड महर द्याल, तर तो घेऊन आणखी एकदां त्या डोंगरावर जाईन, म्हणजे त्या नकाशावरून कोणत्या ठिकाणास काय म्हणतात हें बहुतेक सर्व चांगलें ओळखून काढितां येईल.

गुरु—रामा, फार उत्तम. तुला तो नकाशा मिळेल, व मीही आपली धाकटी दुरबीन घेऊन तुझ्या संगती येईन.

रामा—मग मीं डोंगरावरून खालीं कुरणांतच थेट उतरलों, आणि आपल्या नदीस मिळणारा एक ओढा आहे त्याच्या बाजूनें पुढें चाललों. त्या ओढ्याच्या दुतर्फा बोरूचीं व कळकीचीं बेटें लागून गेलीं होतीं; तशाच दोन्हीकडे कण्हेरी व इतर फुलझाडें फुललेलीं होतीं, व त्यांचीं प्रतिबिंबें पाण्यांत पडून जसें काय ओढाभर फुलें विखरिलीं आहेत, अशी कांहीं चमत्कारिक शोभा दिसत होती. तेथें पाण्यावर बहुत मोठमोठ्या चित्रविचित्र रंगांच्या माशा उडत होत्या, त्या सर्वांत जी मला सुंदर वाटली ती ही, मीं हातांत धरून आणिली आहे, पहा ! तेथें पाण्यावर तळपतांना मीं एक पांखरूं पाहिलें. तें वर उडत असतां एकाएकीं तुटून झांप घालून पाण्यांत बुडी मारी. हें पांखरूं धरण्याविषयीं मला फार उत्कंठा होती, परंतु तें कसचें सांपडतें ? ह्या पांखराचा रंग शानदार हिरवा निळा होता. व नारंगी रंगही त्यांत कांहीं लकेर मारीत होता. हा पक्षी साळुंकीपेक्षां कांहीं लहान होता, त्याचें डोकें व चोंच हीं मोठीं होतीं, व शेपूट आंखूड होतें.

गुरु—समजलें. ह्या पक्ष्यास पाणबुड्या किंवा गण्या असें नांव आहे. ह्या पक्ष्यांचें भक्ष्य मासे होत. त्यांस ते कसें धरितात हें त्वां पाहिलेंच आहे. हे दरडीस बिळें पोंखरून त्यांत राहतात. हे एकलकोंडे आहेत. ज्या ओढ्याजवळ व ज्या नदीजवळ त्यांचीं घरटीं असतात, त्या ओढ्यापासून किंवा त्या नदीपासून दूर अंतरावर ते कधींही जात नाहींत.

रामा—हा पक्षी मला पुनः एकवेळ पाहिला पाहिजे. तो पाहून मला जितकी मौज वाटली तितकी दुसरा पक्षी पाहून वाटली नाहीं. असो; मग तो ओढा नदीस मिळे तोंपर्यंत मी तसाच त्याच्या

कांठानें पुढें चाललों होतों. मग मी नदीच्या तीरानें जाऊं लागलों. तेथें चिमण्यां सारखीं कांहीं पांखरें नदींत खेळत होतीं, तीं म्यां पाहिलीं. केव्हां केव्हां तीं धाडदिशीं नदींत उड्या घालीत, व केव्हां केव्हां तीं अशा झपाट्यानें एकमेकांमागें धांवत, कीं त्यांवर नजर देखील ठरत नसे. असा त्यांचा खेळ पाहून मला फार मौज वाटली. मीं दुसरी एक गोष्ट पाहिली, ती अशी कीं, तेथें भिंतीसारिखी एक उंच दरड होती, तीस पुष्कळ भोंकें होतीं त्यांत ते कांहीं पक्षी शिरत व कांहीं त्यांतून बाहेर निघत.

**गुरु**— तीं पांखरें पाकोळ्यांचीच एक जात आहे. त्यांच्या पाठीचा रंग काळा असतो, व पोटाचा रंग पांढरा असतो, व तीं भोंकें त्यांचीं घरटीं होत; त्यांत तीं आपलीं पिलें ठेवितात. तीं भोंकें खोल असतात, व तीं अवघड जागीं असतात, तेणेंकरून त्यांचीं पिलें कोणास चोरितां येत नाहींत.

**रामा**— तेथून जवळच मीं एक बावा पाहिला, तो एका लहानशा होडींत बसून वांबा धरीत होता. त्याच्या हातांत एक लांब काठी होती, व तिच्या शेवटास एक लोखंडी फाळ होता. नदींत जेथें फार गाळ असे तेथें तो ती काठी घाली, आणि वांब लागली म्हणजे तो रगडून जोरानें टोंचून तिनें ती वांब बाहेर काढी.

**गुरु**— वांबा धरण्याचा तो प्रकार म्यां पाहिला आहे. पुढें ?

**रामा**— मी त्या मनुष्याकडे पाहत होतों तों इतक्यांत एक बगळा माझ्या डोक्यावरून उडत जाऊन पलीकडे जवळच नदी वळत होती तेथें जाऊन उतरला. मग मींही तो काय करितो हें पाहण्यासाठीं तो ज्या दरडीजवळ होता त्या दरडीमागें हळूच जाऊन उभा राहिलों. पोटास पाणी लागे तोंपर्यंत तो पाण्यांत चालत जाऊन, मग मान आखडून घेऊन, डोळे पाण्यावर लावून उभा राहिला. नंतर एक मासा जवळ आला, तो येतांक्षणींच डोळ्याचें पातें लवलें न लवलें इतक्यांत तो त्यानें चोंचीनें बाहेर काढून गिळून टाकिला. ह्याप्रमाणें त्यानें दोन तीन मासे खाल्ले, इतक्यांत माझ्या पावलांची चाहूल त्याला लागतांच तो भिऊन उडाला; आणि तेथून कांहीं अंतरावर कांहीं झाडें होतीं त्यांतील एका उंच झाडावर जाऊन बसला.

**गुरु.**—मला वाटतें त्या बगळ्याचें घरटें त्या झाडावरच असेल; कां तर बगळे आपलीं घरटीं उंच उंच झाडांवर करीत असतात; व कधीं कधीं ते कावळ्यासारिखे बहुत मिळून एकत्र राहत असतात.

**रामा.**—मग मी कुरणांतून घराकडे वळलों. आपल्या घराजवळच उंचवट्यावरचें जें शेत आहे तेथें जेव्हां मी पोहोंचलों तेव्हां सूर्य अस्तास जात होता. आहाहा! त्या वेळेस काय मौज दिसली! सूर्याच्या किरणांनीं मेघ काय चमकत होते; कांहीं तांबडे, कांहीं हिरवे, कांहीं जांभळे, असे नाना प्रकारचे अधिक उण्या कसाचे रंग त्यांत दिसत होते. सूर्य मावळतांना केवढा तरी मोठा दिसतो हो.

**गुरु.**—होय, फारच मोठा दिसतो. तसा चंद्रही उगवतांना मोठा दिसतो, हेंही त्वां पाहिलेंच असेल. सूर्य, चंद्र उगवतांना, मावळतांना असे मोठे दिसतात हा एक दृष्टीचा भ्रम आहे; व ह्या भ्रमाचीं सर्व कारणें दर्शनानुशासन नामक शास्त्रांत सांगितलीं आहेत; परंतु त्या शास्त्रांत तुझा कांहीं निवेश झाल्यावांचून तीं तुझ्या ध्यानांत नीट येणार नाहींत; असो, कांहीं चिंता नाहीं. पण आज त्वां सहल केली तींत तुला किती बरें नव्या नव्या गोष्टी आढळल्या, व तेणेंकरून किती भव्या कल्पना तुझ्या मनांत भरल्या बरें! गोविंदा, ह्या गोष्टींतून तुला कांहींच आढळलें नाहीं, कायरे!

**गोविंदा.**—ह्या गोष्टींपैकीं कांहीं गोष्टी म्यां पाहिल्या, परंतु त्यांकडे मीं विशेष लक्ष दिलें नाहीं. आणि त्या पाहण्यांची मला फारशी मौजही वाटली नाहीं. मी आपला जसा गेलों तसा नीट घरीं आलों.

**गुरु.**— जर तूं एखादा निरोप घेऊन गेला असतास, तर तुझें करणें ठीक झालें असतें; परंतु तूं मौज पाहण्याच्याच हेतूनें गेला होतास, म्हणून कोठें कोठें काय काय मौज आहे ह्याकडे चित्त दिलें असतें, तर हें शहाणपणाचें काम झालें असतें. असो, ह्याप्रमाणें ह्या प्रपंचांत कांहीं लोक डोळे उघडे ठेवून फिरतात, व कांहीं डोळे झांकून फिरतात; म्हणजे कांहीं लोक असे असतात कीं, ते कोणेकाचा कोणत्या एका गैरचालीनें नाश झालेला पाहून आपण ती चाल आपल्या आंगीं असल्यास तत्काळ टाकून देतात; किंवा

चांगल्या चालीनें कोणाचें कल्याण झालेसें पाहून ती आपण स्वीकारितात; परंतु कांहीं असे मूर्ख असतात कीं ते हा प्रकार कांहींच पाहत नाहींत. तरी ह्या प्रकाराकडे लक्ष दिल्यानें कांहीं लोकांस दुसऱ्यापेक्षां विशेष ज्ञान प्राप्त होतें. भाडेकरी लोक व खलाशी लोक बहुत देश व बहुत मोठमोठीं विख्यात शहरें पाहतात, परंतु त्यांस तेथील कांहीं वाण्यांचीं व तांबोळ्यांचीं दुकानें, जेथें त्यांस शिधा व पानतंबाखू घ्यावयास जावें लागतें, तीं व त्याच जिनसाचा भाव हीं खेरीज करून दुसरें कांहींच माहीत नसतें. परंतु जो शोधक व शहाणा आहे तो चार कोस मात्र जरी हिंडला, तरी तितक्यांतच लोकांस उपयुक्त अशा कांहीं तरी गोष्टींचा शोध करितोच करितो. सहस्रावधि अविचारी लोक देशांचे देश व खंडांचीं खंडें फिरले आहेत, परंतु शोधक व ज्ञानी लोकांस एके सहलींत जितकी अक्कल व जितका आनंद प्राप्त होतो तितका देखील त्यांस प्राप्त झाला नाहीं. असो; रामा, तूं आपल्या डोळ्यांचा असाच उपयोग करीत जा. गोविंदा, असें वेड्यासारखें पुनः करूं नको. कोणतीही गोष्ट पाहिली असतां तिकडे लक्ष देत जा, व मनांत पक्कें समज कीं ईश्वरानें तुला जे हे डोळे दिले आहेत, ते मिटून ठेवण्यास दिले नाहींत, तर नीट उघडून पाहून त्यांचें सार्थक्य करण्यास दिले आहेत.

---

## आत्मसंयमन.

एका गृहस्थास सदाशिव व हरी असे दोन मुलगे होते, त्यांस तो वारंवार सांगे कीं, मुलांनो, आत्मसंयमन करावें. एके दिवशीं रात्रीं घड्याळाचे नऊ ठोके वाजले तों, नऊ वाजल्यावर क्षणभरही जागूंनये, अशी बापाची आज्ञा होती तिचें स्मरण हरीला झालें; मग त्यानें आपल्या भावास ह्या आज्ञेचें स्मरण दिलें. सदाशिव म्हणाला, कांहीं चिंता नाहीं, येथें नामी आगटी पटलेली आहे, मी येथें शेकत बसेन. हरीनें उत्तर केलें, मलाही येथें राहून शेकावेंसें वाटतें; पण राहिलों तर आत्मसंयमन होणार नाहीं, होईल काय दादा! सदाशिव म्हणाला, झक

मारितोस, मी येथून कांहीं हालणार नाहीं, हें तुला खचीत ठाऊक असूं दे. मग हरी बोलला, तर मी जातों; तूं आपला खुशाल बैस.

त्या दोघा मुलांनीं नित्य सहा वाजतां उठावें असा क्रम त्यांच्या आईबापांनीं लावून दिला होता, त्याप्रमाणें दुसरे दिवशीं सहा वाजतां हरी दचकून उठला; तेव्हां थंडीचा कडाका इतका पडला होता कीं फिरून निजावें असें त्याच्या मनांत आलें; परंतु त्याला फिरून असें वाटलें कीं, आत्मसंयमन करण्याचा हा प्रसंग चांगला आला आहे, म्हणून आतां निजूंनये. असा विचार करून तो नानू केल्यावांचून झट्कर धडपडून उठला. त्याचा भाऊ सदाशिव निजला होता, त्यास हाका मारून म्हणाला, सदूदादा, सहा वाजले. गुंगीच्या व त्रासाच्या शब्दानें सदू बोलला, कांहीं चिंता नाहीं, जा. हरीनें उत्तर केलें, बरें तर खुशाल नीज. असें म्हणून तो हुशार होऊन मोठ्या उल्हासानें माडीवरून खालीं धांवत आला. संस्कृत भाषेचा धडा केल्यावर फराळ करण्याच्या अगोदर त्यास आनंदानें इकडे तिकडे फिरावयास अवकाश सांपडला. ह्यावरून तो ताजा तवाना व टवटवीत होऊन आला; आणि त्याला चांगली भूक लागली, इतकेंच केवळ नाहीं; आणखी त्याची वृत्ति आनंदयुक्त झाली. बिचारा सदाशिव हातर फराळाची वेळ झाली तों नुकताच आंथरुणावरून धडपडत उठला होता. तो तोंड उतरल्या सारखा, व दाष्ट, व थंडीनें कुडकुडलेला, व असंतोषी होऊन खालीं आला. हरीच्या आंगीं कांहीं विनोदीपणा होता, तो सदूचें केविलवाणें तोंड पाहून त्याची मस्करी करणार होता, इतक्यांत त्याला स्मरण झालें कीं आत्मसंयमन केलें पाहिजे. त्यानें असा विचार केला कीं, दादाला थट्टा सोसत नाहीं, व त्याचें मन खट्टं झालें असतां तर अगदींच सोसणार नाहीं, म्हणून त्यानें आपली थट्टा करण्याची इच्छा दाबिली. थट्टा करण्याची इच्छा दाबणें हें बरेंच आत्मसंयमन केल्या-वांचून होत नाहीं.

फराळाच्या वेळेस हरीच्या बापानें त्यास सांगितलें कीं, पाऊस पडला नाहींतर जेवणाचेपूर्वी घरआा तट्टूवर बसकून तुला खचीत बरोबर नेईन. ह्या गोष्टीचा हरीला फारच संतोष वाटला, आणि तो सकाळचा उद्योग

करीत असतां ह्या गोष्टीची आठवण त्यास फार वेळां झाली. वेठकीच्या खोलीच्या खिडकींतून ऊन चांगलें पडलें, आणि सगळा दिवस तसाच चांगला जाईल, अशी उमेद आली; परंतु दुपारचे सुमारें कांहीं अभाळ आलें, आणि खालच्या अंगणांतील फरसावर पावसाचे कांहीं मोठमोठे थेंब पडले, हें पाहून हरी दचकला; तरी नेमलेल्या वेळेस त्यानें अंगरखा पागोटें घालून, टोपी पांघरून, बाहेर जाण्याची तयारी केली, आणि घोडे केव्हां येतील ह्याची वाट पाहत आपल्या चाबुकाशीं खेळत ओसरीवर उभा राहिला. त्याची आई त्याजवळून जातांना म्हणाली, लाडक्या, आज कांहीं स्वारी व्हावयाची नाहीं, असें मला वाटतें; फरस चिंब भिजला आहे, हें तूं पाहतोसना? हरी म्हणाला, आईगे, मला पावसाच्या थोड्याशा थेंबांचें भय वाटतें, अशी कल्पना तुझ्या मनांत येते काय? हें काय? पाऊस आलाच तर एक सर मात्र येईल.

इतक्यांत त्याचा बाप तेथें आला. त्यानें पहिल्यानें अभाळाकडे पाहिलें, मग वायुमापक यंत्राकडे पाहिलें. हरी म्हणाला, बाबा, तुझा जाण्याचा बेत आहेना? बापानें उत्तर केलें, मला काम आहे, मला गेलेंच पाहिजे; तरी, हरी बाळा, आज त्वां घरीं रहावें, हें तुला बरें आहे. हरी फिरून म्हणाला, मीं टोपी पांघरून बंदोबस्त चांगला केला आहे; ह्या पावसाच्या शिंतोड्यानें मला किंचित् तरी अपकार होईल असें तुम्हांस वाटतें काय? बाप म्हणाला, होय, हरी बाळा, ह्या पावसाच्या शिंतोड्यानें देखील तुला अपकार होईल, असें मला वाटतें; कांकीं तुझें दुखण्याचें आंग आहे; आणि पावसाचा शिंतोडाच येऊन राहील, असें नाहीं; ह्याहून मोठा पाऊस येईल, असा संभव आहे. ह्या प्रसंगीं ह्या गोष्टीचा निर्णय तुजवरच ठेवितों. मला ठाऊक आहे कीं तुझ्या आंगीं आत्मसंयमनाचें कांहीं सामर्थ्य आहे; मी इतकेंच म्हणतों कीं, तूं आज जर बाहेर गेलास तर तुझे आईस बरें वाटणार नाहीं, आणि मलाही आज तुझें जाणें अनुचित दिसतें; आतां तूंच ह्या गोष्टीचा ठराव कर, जावें कीं न जावें.

हरीनें फिरून अभाळाकडे, मग फरसाकडे, मग टोपीकडे, शेवटीं आपल्या कृपाळू आईकडे पाहिलें; तेव्हां त्याला आत्मसंयमनाची आठवण झाली. त्यानें आपल्या मनांत विचार केला कीं, आज आपणास

आत्मसंयमन करण्याचा जो सर्वोत्कृष्ट प्रसंग तो हाच आहे. असा विचार करितांच, करव्या तट्टूवर खोगीर ठेवूं नको, हें रामा मोतदारास सांगावयास बाहेर धांवत गेला.

त्याच दिवशीं जेवणाचे वेळेस सदू एक पोळी चट्ट केल्यावर आईस म्हणाला, आणखी एक पोळी मला व्हावी. हरीला आई म्हणाली, हरीबाळा, तुला आणखी पाहिजे काय? पहिल्यानें हरीनें उत्तर केलें, होय पाहिजे; मग पुढें हात करून म्हणाला, नको आतां; कां तर इतक्यांत त्यानें विचार केला कीं, मीं खाल्लीं तितकी पुरे, आणखी घेतली तर भुकेहून अधिक होईल, आतां हा आत्मसंयमन करण्याचा प्रसंग आहे.

जेवण झाल्यावर त्याची धाकटी बहीण त्यास म्हणाली, हरीभाऊ, फार दिवस झाले तूं बोलला होतास कीं, तें सुंदर कोडें कसें करावें हें तुला दाखवीन; तर तें केव्हां दाखविणार? हरी म्हणाला, ताई, मी आतां कामांत आहें, तूं आतां मला छळूं नको. असें ऐकतांच ती कांहीं बोलली नाहीं, तोंड हिरमुसलें करून आपल्या भावाजवळच उभी राहिली. मग एकाएकीं त्याला आठवण होऊन तो म्हणाला, बरें तर, तुझें कोडें मजकडे घेऊन ये, नंतर आपलें पुस्तक ठेवून, कोडें कसें करावें हें त्यानें आपल्या धाकट्या बहिणीस गोडीनें दाखविलें रात्रीस दोघे मुलगे निजावयास गेले तेव्हां आत्मसंयमन करण्याचे जे प्रसंग आले होते त्यांची आठवण होऊन हरीचें चित्त प्रसन्न झालें, आणि आपल्या भावास सांगावयासाठीं त्याच्या ओंठांपर्यंत शब्द आले होते, तों त्यानें विचार केला कीं सांगूं नयेत. हा दुसरा एक प्रसंग आत्मसंयमन करण्याचा आहे, मी एक शब्द बोलणार नाहीं; आणि हेंही आहे कीं वल्गना केली तर सगळ्याचा नाश होतो. ह्यावरून हरी मुकाट्यानें निजला, आणि हे शहाणपणाचे विचार केले, जरी माझी आशा मोडली, आणि म्यां आपली मर्जी मोडून कितीएक गोष्टी केल्या, तरी हा दिवस मला सुखाचा गेला. आत्मसंयमन हें प्रथम क्षणभर दुःखकारक आहे, पण परिणामीं गोड आहे, असा मला अनुभव आला आहे. ह्या बेतानें मी नित्य चाललों तर आयुष्य सुखानें घालवीन, असा संभव आहे.

# धारिष्ट.

धारिष्ट हें सर्वांस पाहिजे. आपण होऊन आपणावर संकट आणूं नये; परंतु आपणावर संकट प्राप्त झालें असतां त्यावेळीं न भितां धैर्य धरूनच ती वेळ निभाविली पाहिजे. संकट केव्हां येईल ह्याचा काय नियम आहे? आपण कितीही सावधगिरीनें वागलों, तरी आपणावर कांहीं संकट येणार नाहीं असा निश्चय करवत नाहीं. पहा, आपण विस्तवाजवळ शेकत बसलों असतां तेथें आपल्या आंगावरचीं चिरगुटें कदाचित् जळतील; कदाचित् आपल्या घराला आग लागेल; कदाचित् आपण पाण्यांत पडून बुडूं; किंवा गाडींत बसून चाललों असतां कदाचित् गाडीचा घोडा बुजून गाडीची गाडीच कोणीकडच्या कोणीकडे घेऊन जाईल. असल्या प्रसंगीं कदाचित् आपण ठार देखील मरूं; निदान मोठी दुखापत तरी होईल; म्हणून असला प्रसंग आला असतां त्यावेळीं धैर्य धरून आपला निभाव होईल तसें केलें पाहिजे. संकटाचा प्रसंग आला असतां त्यांतून पार पडण्याचा उपाय सुचणें ह्यास प्रसंगावधान म्हणतात.

संकटसमयीं कित्येकांची अशी धांदल होऊन जाते कीं त्यांला त्या संकटांतून निभावण्याचा कांहींच उपाय सुचत नाहीं; ह्यामुळें ते कदाचित् जिवासही मुकतात. म्हणून असल्या प्रसंगीं न भितां व न गडबडतां आपला बचाव होईल असें करण्यास लागावें. तें कसें ह्याचे कांहीं प्रकार सांगतों. हे प्रकार तुम्हीं पूर्वी कधीं ऐकिले नसतील, म्हणून तुम्हांला अमळ आश्चर्य वाटेल, आणि, त्यांनीं काय व्हावयाचें आहे, असेंही कदाचित् तुमच्या मनांत येईल; परंतु त्याप्रमाणें केलें असतां संकटांतून निभाव बहुतकरून होईल ह्यांत कांहीं संशय नाहीं; म्हणून सर्वांनीं त्याप्रमाणें करण्यास झटावें.

जर एखाद्याचे आंगवस्त्रास आग लागली, तर त्यानें तें लागलेंच आंगावरून काढून दूर फेंकून द्यावें. आतां काय करूं, असें म्हणून तें तसेंच आंगावर ठेवूं नये. ठेविलें तर तें जळून आंगही भाजेल. जर नेसलेल्या धोतरास आग लागली, तर घाबरून इकडे तिकडे धांवूं नये. धावूं लागलें तर वारा अधिक लागून धोतर अधिक पेटूं लागतें, म्हणून

धोतराला आग लागतांच तें सोडून टाकावें. लवकर न सुटे तर भुईवर लोळावें, अथवा बुर्णूस, किंवा सत्रंजी, किंवा घोंगडी कंबरे भोंवतीं अगदीं गच्च गुंडाळून घ्यावी, म्हणजे आंग विझेल.

जर घराला आग लागली, तर ती विझविण्यासाठीं, किंवा आंतील सामान बाहेर आणण्यासाठीं, धूर असेल तेथून उभ्यानें जाऊं नये. उभ्यानें गेलें तर गुदमरून मरायाला होईल, म्हणून ओणव्यानें जावें. ह्याचें कारण असें आहे कीं, पृथ्वीवर हवेचा थर असतो तो पृथ्वीचे जवळ दाट असतो; आणि वरती उत्तरोत्तर पातळ पातळ होत जातो. आणि धूर हवेपेक्षां हलका असतो; म्हणून पाण्यांत लांकूड टाकिलें म्हणजे तें पाण्या पेक्षां हलकें असतें म्हणून जसें वरती येतें, तसा धूर पृथ्वीचे जवळच्या हवेच्या वरती जातो; ह्यामुळें तो अर्थातच पृथ्वीचे जवळ नाहींसा होतो; म्हणून जमिनीजवळ तोंड करून कोणी ओणव्यानें जाऊं लागलें असतां त्यास तो लागत नाहीं, आणि उभ्यानें चाललें तर वरती धूर असतो तो लागून त्याला गुदमरायाला होतें.

जर कदाचित् आपण पाण्यांत पडलों, आणि आपणास पोंहतां येत नसलें, तर आपण अगदीं हात पाय हालवूं नयेत. हालविले तर खचीत बुडूं. म्हणून आपण तोंड वर करून स्वस्थ पडून रहावें. असें केलें म्हणजे बुडण्याचें भय नाहींसें होईल. कारण आपलें आंग पाण्यापेक्षां हलकें आहे म्हणून आपण चळवळ केली नाहीं तर तें पाण्या॰ वर तरल्याशिवाय राहणार नाहीं.

जर कदाचित् गाडीचा घोडा बुजून गाडी घेऊन पळून जाऊं लागला, तर आपण भिऊन लागलीच खालीं उडी टाकूं नये. कदाचित् घोडा आपोआप उभा राहिला, तर आपण उडी टाकल्यावांचून आपला बचाव झाला असें होईल. म्हणून आपण अमळ तसेंच बसून रहावें. असें केल्यावर जर घोडा उभा राहत नाहीं, आणि आपणास खालीं उडी टाकणें भागच पडलें, तर हळूच गाडीचे मागल्या आंगें तरी उडी टाकावी; पुढें टाकूं नये. ह्याचें कारण असें आहे कीं, आपण गाडींत बसून जाऊं लागलों म्हणजे गाडीच्या आंगीं पुढें जाण्याचा वेग असतो, तसा आपल्याही आंगीं असतो. म्हणून आपण गाडींतून पुढें उडी टाकिली

तर आपण उपडे पडूं, आणि आपणास मोठा धक्का बसेल; परंतु मायबापाकडे आपण उडी टाकिली, तर आपणास तसा धक्का बसणार नाहीं.

तात्पर्य कीं संकट प्राप्त झालें असतां धैर्य धरून तें निभावणें हेंच मनुष्यास योग्य आहे.

धैर्य धरिलें असतां संकटांतून आपला निभाव होतो ह्याविषयीं एक गोष्ट लिहितों.

एका शहरांत एक किराण्याचा व्यापारी होता, तो किराणा जिन्नस विकीत असे, आणि तऱ्हेतऱ्हेचें बींही विकीत असे. त्याच्या घराला एक तळघर होतें, त्यांत त्यानें आपला बहुतेक माल सांठवून ठेविला होता. एके दिवशीं त्यानें आपल्या मुलाला त्या तळघरांतून टोपलीभर जिरें आणूं सांगितलें, आणि तेथें अंधार फार असे ह्यामुळें जातांना एक कांकडा लावून घेऊन जा, म्हणून सांगितलें. त्याप्रमाणें तो मुलगा चांगला एक लांब कांकडा करून लावून घेऊन त्या तळघरांत गेला आणि जिरें टोपलींत भरतांना हातांतला कांकडा कोठें तरी खालीं ठेविला पाहिजे, म्हणून जवळ एक दारूचें पोतें उघडेंच पडलें होतें, तें कसलें तरी काळ्या बियांचें आहे असें त्याला वाटून, त्यानें तो कांकडा त्यांत खोंचून ठेविला. नंतर जिऱ्याची टोपली उचलून आणितांना त्याचे दोन्ही हात गुंतले; म्हणून कांकडा ठेविला होता तेथेंच राहिला. मग तो मुलगा तळघराच्या पायऱ्या चढून वरती येऊं लागला, तेव्हां त्याचे हातांत कांकडा नाहीं असें पाहून त्याच्या बापानें, कांकडा कोठें ठेविला म्हणून त्यास विचारिलें, तेव्हां, जिऱ्याचे पोत्या जवळ एक काळ्या बियांचें पोतें होतें त्यांत खोंचून ठेविला आहे, म्हणून त्यानें सांगितलें. हें ऐकतांच बापाचे पोटांत धस्स झालें, आणि तो मनांत म्हणूं लागला कीं, काळें बीं म्हणून जें हा मुलगा सांगतो तें काळें बीं नव्हे; ती बंदुकीची दारू आहे; आणि जर कांकड्याची एक ठिणगी तींत पडली, तर घर आणि घरांतील सर्व माणसें एकदम उडून जळून जातील. तेव्हां आतां काय करावें? जर कांकडा आहे तेथेंच असूं द्यावा, तर तो जळत जळत दारूपर्यंत येईल, आणि एकदम सर्वांचा नाश होईल. जर पळून बाहेर जावें तर घर आणि माल ह्यांचा तरी नाश आपण केला असें होईल. बरें, जर कांकडा वरती आणायाला

जावें, तरीही कदाचित् जातांक्षणींच दारूंत ठिणगी पडली असतां, आपण होऊन आपला नाश केला, असें होईल. तेव्हां करावें तरी काय! अशा विचारांत तो पडला. परंतु शेवटीं तळघरांत जाऊन कांकडा वरती आणावा, मग काय होईल तें होवो, असा मनाचा निश्चय करून तो तळघरांत उतरला. पण लवकर जावें तर कांकड्याला वारा लागून कदाचित् ठिणगी दारूंत पडेल, म्हणून हळूच जवळ गेला, आणि ठिणगी पडली तरी हातावरच पडावी, म्हणून हाताची ओंजळ करून तीमध्यें हळूच कांकडा धरून वरती आला. पण ईश्वरकृपेनें ठिणगी कोठेंच पडली नाहीं; आणि कशाचाही नाश झाला नाहीं. तात्पर्य कीं, प्रसंगीं सावधगिरी असली, तर कांहींना कांहीं तरी युक्ति सुचून अरिष्टांतून निभाव होतो, ह्यांत संशय नाहीं.

---

## एक मोहर दहा हजारांहून थोर.

मुंबई शहरांत कृष्णनाथ हरिचंद ह्या नांवाचा शिंपी जातीचा एक गृहस्थ होता. त्याची यमनी नांवाची एक मुलगी होती ती मुलींच्या शाळेंत जाऊन कशीदा काढावयास शिकली होती. ती वयानें लहान होती, पण मोठी उद्योगी होती, आणि कशीदा फार चांगला काढीत असे. तिचे आईबाप गरीबच होते, तरी आपल्या मुलीनें कशीद्याच्या कामावर मिळविलेला पैसा ते अगदीं घेत नसत, त्या पैशावर केवळ यमनीचीच सत्ता असे. ह्यामुळें आपण कितीही पैसा मिळविला तरी तो आपलाच आहे, असें समजून पुष्कळ पैसा मिळविण्यासाठीं ती मोठ्या हौसेनें फारफार काम करीत असे. शाळेची वेळ सोडून सकाळीं संध्याकाळीं जेव्हां पहावें तेव्हां ती मुलगी खिडकीशीं बसून तिचा हात झरझर झरझर चालला आहे असेंच नजरेस पडे. मुलें खिडकीशीं बसलीं म्हणजे त्यांस असा चाळा असतो कीं आपलें काम सोडावें आणि रस्त्यांतून जातें कोण व येतें कोण हें वरचेवर बाहेर डोकावून पहावें. पण यमनी एकदां कामावर बसली म्हणजे कारणाशिवाय वर मानच उचलीत नसे. तिचा हा गुण पाहून सर्व लोक असें म्हणत कीं, मुलगी मोठी सुलक्षण आहे.

सणावाराच्या दिवशीं रस्त्यांतून लोक रोजच्यापेक्षां अमळसे अधिक जातात येतात, तर त्या दिवशीं खेळकर मुलांचें काम रोजच्या कामाच्या

तिसरा हिस्सा देखील व्हावयाचें कठीण; पण यमनीचें असें असे कीं आपलें काम बरें आणि आपण बरी. आणि वास्तविक पाहिलें तर, खालून जात आहे कोण, येत आहे कोण, कोणीं कसा पोषाक केला आहे समोरच्या हलवायाच्या दुकानीं जाऊन मिठाई कोण खरेदी करितें, इत्यादि गोष्टींकडे चित्त देण्यापासून तिला कांहीं एक फायदा नव्हता, हें खरें, रोजच्याप्रमाणें संध्याकाळीं काम उरकलें म्हणजे त्यापासून तिचा बहुत फायदा होता.

यमनीच्या शेजारच्या घरीं एक मुलगी होती तिचें नांव चिमणी, ती यमनीची शाळेंतील मैत्रीणच होती, तीही यमनीप्रमाणें आपल्या माडीवर बसून कशीदा काढीत असे. पण तिनें समोरच्या हलवायाच्या दुकानाकडे वरचेवर पहावें, ह्यामुळें तिच्या मिळकतींत नुकसान होत असे. एखाद्या माणसाला रोज मिठाई खाण्याची चटक असल्यानें त्याचा पैसा दररोज कमी होऊन त्याचा जसा तोटा होत असतो, तसाच तिच्या मिळकतींत त्या पाहण्यानें दररोज तोटा होत असे. चिमणीला मिठाई मनापासून आवडे, पण उपयोग काय? मिठाईला देण्यापुरता पैसा कोठें तिला मिळत असे?

मोठ्या शहरांत म्हटलें म्हणजे रिकामटेकडे, खुशालचंद असे कांहीं लोक असतातच. त्यांस कांहीं काम नसतें, धंदा नसतो; उजाडलें म्हणजे गांवांत हिकडून तिकडे टिवल्या बाव्हल्या करीत त्यांनीं फिरावें; फिरतां फिरतां अमळसे थकले, म्हणजे एखाद्या काचीच्या किंवा हलवायाच्या दुकानीं बसून विसावा घ्यावा, व कांहीं थोडासा फराळ करावा. चिमणीचें असें होतें कीं कोणी बायका माडीखालून गेल्या, किंवा कोणाचीं मुलें गेलीं, म्हणजे कोणीं कसा पोषाक केला आहे, कोण कसें चालतें, कोण समोरच्या दुकानांत जातें, कोण किती वेळ बसतें, भुलेश्वराकडे कोण जातें, मार्किटाकडे कोण जातें, असल्या गोष्टींत मन घातल्याशिवाय तिला राहवतच नसे. खरेंच म्हटलें तर ती राहत नसे इतकेंच. त्या वेड्या पोरीच्या मनांत असें येईना कीं, कोणत्या रीतीनें एक पैसा वांचविला म्हणजे एक पैसा मिळविला, असें सर्व समजतात. त्या प्रमाणेंच, एक पैसा मिळायाचा तो न मिळविला म्हणजे तेवढा बुडविला, असेंच समजलें पाहिजे.

यमनी लक्ष देऊन जो इतका उद्योग करीत असे त्याचें फळ तिला लवकरच आलें. एकवर्षभर तिनें झटून उद्योग केला तेव्हांपासून तिच्या साडीचोळीचा वगैरे खर्च भागून तिजपाशीं चौदा रुपये शिलक राहिले. येणेंकरून आईबापांवर तिच्या चिरगुटपांघरुणांचें ओझें राहिलें नाहीं, आणि तिला श्रम करण्याला उत्तेजन आलें. यमनी खर्च करी तो फार हात राखून करीत असे. श्रम करून द्रव्यसंचय करणारे जे लोक असतात ते प्रायः हात राखून खर्च करणारे असतात. इतर मुली आपल्या आईबापांपासून गंडेरीपदरी साड्या, जरीकांठी चोळ्या नकली शालजोड्या, वगैरे जिन्नस हट्ट करून घेतात, पण यमनी जातीनें पैसा मिळवीत असतां व त्या पैशावर तिचीच सत्ता असतां, ती असले चैनीचे जिन्नस घेत नसे; म्हणून तिजपाशीं इतका पैसा शिलक राहिला होता, नाहीं तर खचीत राहिला नसता. वर सांगितलेल्या प्रकारच्या साड्या चोळ्यांपासून बाहेरची मात्र शोभा, पण वास्तविक प्रतिष्ठा किंवा संभावितपणा त्यांपासून आहे असें नाहीं. वास्तविक प्रतिष्ठा म्हटली म्हणजे माणसांच्या गुणांवरच असते.

एके दिवशीं यमनी आपल्या एका मैत्रिणीच्या घरीं भातकुलीला गेली होती; तेथें दुसरी एक मुलगी आली होती, आणि तिच्या गळ्यांत पुतळ्यांची माळ होती. त्या माळेच्या मध्यभागीं मोहर होती, ती चांगली न्याहाळून पाहून यमनी तेथल्या एका जाणत्या मुलीला म्हणाली, आऊताई, मोहर म्हणतात ती हीच ना? आऊताई म्हणाली हीच. यमनीनें तिला विचारिलें, हिला किती रुपये पडतात बरें? आऊताईनें सांगितलें, एका मोहरेला सुमारें पंधरा रुपये पडतात. नंतर ते दिवशीं संध्याकाळ होऊन खेळ आटोपला आणि सर्व मुली आपआपल्या घरीं गेल्या, तशी, यमनीही आपल्या घरीं आली.

नंतर दुसरे दिवशीं यमनी काम करायाला बसली तेव्हां तिला अदल्या दिवसींच्या मोहरेची आठवण होऊन तिच्या मनांत असें आलें कीं, आपणाजवळ आपल्या सत्तेची एक मोहर असेल तर काय मोठी मौज होईल. नंतर तिनें आपल्या पेटीचें कुलूप काढून रुपये मोजून पाहिले, आणि ते सर्व आपल्या ओटींत घेतले. मग ती आपणाशींच म्हणाली, मजपाशीं चौदा रुपये आहेतच; आणखी एक मिळविला

म्हणजे ते सगळे देऊन एक मोहर विकत घेतां येईल. आपणाला एक रुपया मिळविण्यासाठीं नेटानें कामाला बसलें पाहिजे. तिनें आपल्या ओटींत रुपये वगैरे मोजून घेतले होते त्यांत हात घालून मोठ्या आनंदानें खुळखुळ खुळखुळ वाजवीत आपल्या खिडकीपासून पेटीकडे येत होती, तों तिच्या बोटांतलें अंगुस्तान खालीं पडून लागलेंच कोणीकडे गेलें, तें दिसेनासें झालें. यमनीनें त्या अंगुस्तानाकरितां त्रिखंड शोधिलें, पण तें कांहीं सांपडलें नाहीं. शेवटीं तिनें अटकळ केली कीं, खिडकीजवळ जें उंदराचें बीळ आहे त्यांतच गेलें असावें. ती आपल्या मनांत म्हणाली, हें बीळ जर ह्या मार्गेंच बुजविलें असतें तर आज असें कां बरें होतें? नंतर यमनीनें पहिल्यानें त्या बिळांत कातरी घालून पाहिली. नंतर एक बारीक लांब काठी त्यांत घालून पाहिली; पण त्यांतून त्या काठीला लागून कांहीं जळमटें मात्र निघालीं, दुसरें कांहीं नाहीं. पुढें तिनें अंगुस्तानावांचूनच कांहीं दिवस काम चालविलें; पण त्यांत तिचा वेळ फारच जाऊं लागला, म्हणून तिनें आपल्या आईचें अंगुस्तान मागून घेतलें; आणि तें बोटाला ठीक होण्याकरितां बोटाला कागद गुंडाळी, आणि त्यावर तें अंगुस्तान बसवी. अशा रीतीनें तिनें कांहीं दिवस काम चालविलें, पण तें अंगुस्तान वारंवार पडे ह्यामुळें तोही प्रकार जमेनासा झाला. आणखी, तिच्या आईचें त्यावांचून अडत असे, कारण तीही जातीची शिंपीण होती, म्हणून तिलाही शिवण्याच्या कामाचा नाद होताच. मग यमनीनें बापाला सांगून त्याजकडून पूर्वींच्या प्रमाणें एक रुप्याचेंच अंगुस्तान आणविलें. त्याला एक रुपया किंमत पडली, त्यामुळें पहिल्यानें पंधराला एक कमी होता ते आतां दोन कमी झाले, आणि मोहर होण्याला पहिल्यापेक्षां आतां दुप्पट वेळ वाट पाहिली पाहिजे असें झालें.

मग यमनीला दिवाळीपर्यंत, म्हणजे सुमारें एक महिना, वाट पहावी लागली, तेव्हां तिचे दोन रुपये गांठीं पडले. नंतर तिनें आपल्या बापाकडून पंधरा रुपयांची एक मोहर आणवून ती आपल्या पेटींत घालून ठेविली. ही मोहर पाहिली म्हणजे तिला समाधान वाटत असे. एवढ्या मोहरेवर आपणास काय पाहिजे तें घ्यावयास सांपडेल, अशा प्रकारच्या अनेक गोष्टी तिच्या मनांत येऊं लागल्या. प्रथम ज्यांचें कांहीं

विशेष अगत्य नाहीं असल्या पदार्थांकडे तिची बुद्धि गेली. पण थोडा-सा विचार करून ती आपल्या मनालाच म्हणाली, छेः असले पदार्थ काय कामाचे? असले पदार्थ घेण्याचें मनांत देखील आणूंनये. आतां पुढें थंडीचे दिवस आले आहेत, आणि सकाळच्या प्रहरीं शाळेंत जातांना थंडी फार वाजेल, ह्यासाठीं एक दुलई विकत घ्यावी, म्हणजे ती पांघरून शाळेंत जाण्यास ठीक पडेल. वाज्याची पेटी किंवा एखादा मोठा आरसा घेतला, तर मनाला मोठी मौज वाटेल खरी, पण त्यापासून शाळेंत जातांना थंडी वाजते ती रहावयाची नाहीं. तेव्हां आपला दुलई करण्याचा बेत करावा, हें फार चांगलें आहे, असा तिचा निश्चय ठरला.

नंतर तिनें आपलें कशीद्याचें काम पुन्हा हातीं घेतलें. ती तोंडानें कांहीं गाणें म्हणत होती, आणि हातानें काम करीत होती, तितक्यांत तिची पेटी उघडी होती त्यामुळें तिची दृष्टि त्या मोहरेवर गेली, आणि मनांत आलें काय, सारी आपणाजवळ काय ती एकच मोहर आहे! आहा हा! मजजवळ एक मोहर असतां जर मी इतकी सुखी आहें, तर कितीएक लोकांप्रमाणें माझ्या जवळ हजारों मोहरा असल्यास मी किती सुखी होईन बरें! मजपाशीं दहा हजार मोहरा असल्यावर अर्थातच मला आतांच्या पेक्षां दहा हजारपट सुख जास्त होईल. तर हल्लीं मला जें सुख होत आहे तें इतकें कमी आहे. हें काय सुख म्हणायाचें? हें कांहींच नव्हे. असें तिच्या मनांत येऊन तिला थोडेंसें वाईट वाटूं लागलें.

पुढें कांहीं दिवस गेल्यानंतर एके दिवशीं यमनी नेहमीं प्रमाणें काम करीत बसली होती. ती ज्या खिडकीशीं बसत असे तिच्या बाहेरल्या आंगास राघूचा एक पिंजरा टांगला होता; तो राघू फार चांगला बोलका होता. सज्जावर ओळीनेंच कांहीं पाचेचे, कांहीं मरव्याचे, कांहीं दुसऱ्या सुवासिक फुलझाडांचे पेले ठेविले होते. सणावाराच्या दिवशीं असल्या जागीं बसणें फार चांगलें; म्हणजे पुढच्या आंगास फुलझाडांचे पेले आहेतच, वरच्या आंगास राघूचा पिंजरा टांगून दिलाच आहे, असें ती मनांत म्हणत आहे इतक्यांत तिच्या आईच्या ओळखीच्या कांहीं मुली कशीद्याच्या चोळ्या विकत घेण्यासाठीं तेथें आल्या. यमनीनें

निरनिराळ्या प्रकारचा कशीदा काढलेल्या चोळ्यांचे पुष्कळ नमूने त्यांस दाखविले, पण त्या मुलींपैकीं एक मुलगी होती तिच्या मनास त्यांतली कोणतीच चोळी येईना. ती अगदीं नाखुश होऊन गेली, आणि म्हणाली, ह्या ठिकाणीं मनासारखें कांहीं मिळायाचेंच नाहीं. ती मुलगी नाखुश झाली हें यमनीनें पाहिलें, आणि ती आपल्या मनांत म्हणाली, ही मुलगी आपलें हित मात्र पाहते, पण दुसऱ्याच्या वेळेकडे कांहीं लक्ष देत नाहीं. यमनी जें म्हणाली तें कांहीं खोटें नाहीं, कारण त्या मुलीनें तेथें येऊन यमनीचा अर्धा तास फुकट घालविला. तिनें आल्यापासून असें चालविलें होतें कीं, हा एक नमूना पहावा, तो एक नमूना पहावा, असलाच पाहिजे म्हणावें, तसलाच पाहिजे म्हणावें, असें करितां करितां शेवटीं एकही चोळी पसंत न करून आपल्या मैत्रिणीसुद्धां निघून गेली. आणि, मजसाठीं तुझा वेळ, बाई, फुकट गेला, असेंही फुकाचें म्हणाली नाहीं, दुसरें काय!

त्या मुली बाहेर निघून गेल्यावर यमनीच्या आईनें खोलींत येऊन, कांहीं चोळ्यांची फर्मास केली आहे किंवा काय, म्हणून यमनीस विचारिलें. यमनीनें काय होतें तें सर्व आईस सांगितलें, आणि म्हणाली, आई, त्या अंजिरी पैठणी नेसलेल्या मुलीपरीस मी बरी, असें मला वाटतें; कारण कीं, तिला सुख मिळून काय तें नाहींच. हें मनास यावयाचें नाहीं, तें मनास यावयाचें नाहीं, ह्याला एक नांव ठेवील, त्याला एक नांव ठेवील; सरासरी संतोष कोणत्या प्रकारें नाहीं. मी हें कशीद्याचें काम करून पैसा मिळवितें, आणि त्यांतून थोडासा खर्च करून गरिबीच्या साध्या चोळ्या घेतें, तथापि मला कांहीं सुख म्हणून आहे. हें ऐकून आई म्हणाली, तूं शुद्धीवर आहेस काय? तूं कोणाविषयीं हें बोलत आहेस? ती पैठणी नेसलेली बापुजी गोंविदजी शेटाची मुलगी, तिचें नांव सगुणा. तिच्या बापानें दहा हजार मोहरा तिच्या नांवानें काढून ठेविल्या आहेत.

यमनी हें ऐकून थक्क होऊन म्हणाली, दहाहजार मोहरा! अं, अबबब! किती मोहरा ह्या! इतकें म्हणून ती उगीच राहिली. आणि त्या शब्दावरून, मागें सहज ती आपल्या एका मोहरेविषयीं विचार

करीत असतां, मजपाशीं दहा हजार मोहरा असल्या तर मला किती सुख होईल, असें तिला वाटलें होतें तें सर्व ह्यावेळेस तिला आठवलें. ती म्हणाली, त्या मुलीपाशीं दहा हजार मोहरा आहेत, त्यापक्षीं मजपेक्षां तिला दहाहजार पट सुख जास्ती असावें, तें एकीकडेसच राहून तिला माझ्या इतकें देखील सुख होत नाहीं, हा मोठा चमत्कार आहे. अशा रीतीनें तिचा कांहीं विचार चालला आहे, तों तिचा शिक्षक तेथें आला. यमनीची आपल्या गुरुजीवर फार निष्ठा असे. आणि त्या शिक्षकाचा तिजवर लोभ असे. आपल्या शाळेंतल्या बुद्धिमान् व हुशार ज्या मुली असत त्या शाळेंत सुटी असते त्या दिवशीं आपल्या घरीं काय करीत असतात, कांहीं चांगला उद्योग करितात किंवा नाहीं, हें पहा॰ वयासाठीं कधीं कधीं त्यांच्या घरीं जाण्याचा त्या शिक्षकाचा परिपाठ असे. तो गृहस्थ बोलून चालून फार चांगला होता. त्याजपाशीं कोणी मुलीनें कांहीं गोष्ट सांगितली असतां तो तिची हेलना करीत नसे. जें कांहीं सुखदुःखाचें वर्तमान सांगावें तें स्वस्थपणें ऐकून घ्यावें; कांहीं एखादी संकटाची गोष्ट सांगितली तर तिजवर एखादी योग्य तजवीज दिसेल ती सांगावी, असा त्याचा स्वभाव होता, ह्यामुळें आपल्या मनांत जो विचार घोळत होता तो गुरुजी बावांस सांगावा असें यमनीस वाटून तिनें सर्व कच्चें वर्तमान त्यांस सांगितलें. तिनें पहिल्यानें आपले एके मोहरेचा वृत्तांत त्यांस सांगून विचारिलें कीं, मघाशीं बापूजी गोविंदजीची मुलगी सगुणा एथें आली होती, आणि आई म्हणते कीं तिच्या॰ बापानें तिजसाठीं दहा हजार मोहरा ठेविल्या आहेत, ही गोष्ट खरीच काय?

**गुरुजी**—ही गोष्ट खरीच आहे.

**यमनी**—तर तिनें बहुत सुखी असावें असें मला वाटतें, पण तिच्या चालीवरून ती फार दुःखी आहे असें दिसलें, तें कां बरें?

**गुरु**—हां, आतां मी समजलों, यमने, ज्यापाशीं जितकेपट धन अधिक तितकेपट त्यास सुख अधिक, अशी तुझी आणि त्या सगुणेची एका च रीतीची समजूत झाली आहे; पण ती तुमची दोघींचीही चूक आहे. तुझ्या जवळ केवळ एकच मोहोर आहे म्हणून तूं आपल्या

मनांत दुःखी आहेस, आणि सगुणीजवळ केवळ दहा हजारच आहेत अधिक नाहींत म्हणून तीही आपल्या मनांत फार दुःखीच आहे. एकपुती रडे आणि सातपुती रडे अशी म्हण आहे ती खोटी नाहीं.

यमनी—दहा हजार आहेत ना ? मग तेवढ्या पुरेशा नाहींत का झाल्या?

गुरु—सगुणीला वाटतें कीं, आपल्या बापानें आपणास तीस हजार मोहरा द्यावयाच्या होत्या, आणि तितक्या दिल्या असत्या तर आपणाला हल्लींच्यापेक्षां तिप्पट सुख जास्ती झालें असतें. बापानें दहा हजार मोहरा माझ्या नांवानें काढून ठेविल्या, तरी मृत्युपत्रांत आणखी वीस हजार लिहील, असें तिचे मनांत होतें, पण तिचा बाप मेला तेव्हां तिला कळलें कीं दुसऱ्या मोहरा देण्याविषयीं लिहून ठेविलें नाहीं. तेव्हां वाईट वाटून ती वेड्या सारखी होऊन गेली होती, आणि अझूनही कधीं हसतमुख अशी दिसतच नाहीं.

यमनी— आतां, नशीब तिचें, असें म्हटलें पाहिजे. ज्याजवळ दहा हजार मोहरा आहेत त्याला ज्या पदार्थांची गरज असेल तो पदार्थ विकत घेतां येईल, असें मला वाटतें.

गुरु—हें खरें आहे. आणि एवढ्याच गोष्टींचा पुरता विचार केला म्हणजे तूं ज्या एवढ्या गोंधळांत पडली आहेस तो देखील नाहींसा होईल. द्रव्याचा उपयोग इतका आहे कीं आपणास आपल्या योग्यतेप्रमाणें अन्न, वस्त्र, पात्र, वगैरे ज्याज्या गोष्टींची गरज आहे त्या त्या मिळाव्या. आणि द्रव्यापासून सुख होतें तें अशाच रूपानें होतें. केवळ पैशाचा साक्षात् उपयोग पाहिला असतां कांहीं नाहीं. अन्न, वस्त्र, वगैरे घेण्या पुरता ज्या जवळ पैसा आहे तो सुखी समजावा. मग तो पैसा कितीका थोडा असेना. आतां तुझीच गोष्ट पहा बरें. मला ज्याची गरज लागेल तें ह्या मोहरेवर घेतां येईल, असें तूं मानीत होतीस तोंपर्यंत तूं सुखी होतीस. आपणाला थंडीच्या दिवसांकरितां एक दुलई पाहिजे आहे ती आपणास घेतां येईल, एवढ्यावर तूं मोठी खुष होतीस. पुढें ज्या पदार्थांची वास्तविक गरज नाहीं ते पदार्थ घेण्याचें मनांत आणिलें, आणि ते कसे मिळतील

अशी उगीच काळजी करूं लागलीस, तेव्हां तुला दुःख होऊं लागलें. पहा, मला हजार मोहरा पाहिजेत, असें वेड्यासारखें जर मीं मनांत आणिलें, तर मला कशा बरें मिळतील? मिळणारच नाहींत. मग उगीच दुःख कां मानावें? यमने, आतां खरेंच सांग बरें, कोणत्या वस्तूवांचून तुझें आतां अगदीं अडलें आहे तें? हें ऐकून यमनी विचार करूं लागली, पण तिला कांहीं आठवेना.

गुरु—असें काय बरें यमने, खरेंच सांग, तुझें कशा वांचून अडलें आहे तें?

यमनी—अमुकच पाहिजे, असें एक नांव घेऊन सांगवत नाहीं; पण कधीं जत्रेला वगैरे गेलें असतां दुकानांतून कांहीं चमत्कारिक पदार्थ दृष्टीस पडतात, तेव्हां ते पदार्थ आपणाला असावे असें मनाला वाटतें.

गुरु—पण ते पदार्थ तुझ्या योग्यतेला शोभण्यासारखे नसतील असें वाटतें. आणि नसले म्हणजे त्यांपासून तुला सुख होणें तर एकीकडेसच राहील, उलटें तुझें हासें होऊन तुला कांहीं अंशीं दुःख मात्र होईल. तुला नाहीं काय असें वाटत?

यमनी—इतर प्रतिष्ठित बायकां प्रमाणें मी जर प्रतिष्ठित बायको नसेन, तर माझी अप्रतिष्ठा आणि हासें होईल खरें.

गुरु—बरें पण, तूं प्रतिष्ठित बायको नाहींसच. तूं अझून लहान मुलगी आहेस. तुला हा कशीदाचा व्यापार चांगला साधला आहे, त्यामुळें तुजकडे कशीद्याच्या चोळ्या, टोप्या, कुंच्या, झोळणे, वगैरे जिन्नस विकत घेणारे लोक येतात, हें फार चांगलें आहे. पण ह्यावरून मी प्रतिष्ठित बायको झालें, असें तूं समजूं नको. तूं सुखी मुलगी आहेस; आणि तुझ्यासारख्या सुखी मुली फारच विरळा आहेत, हें चांगलें उमजून असल्या पदार्थांत जर तूं समाधान करून घेशील, तर तुझ्या ह्या एका मोहरेपासून तुला जितकें सुख होईल, तितकें सुख ज्यांच्यापाशीं दहा हजार मोहरा आहेत त्यांस देखील होणार नाहीं. हें भाषण ऐकून यमनीचें समाधान लागलेंच झालें. नंतर खुष होऊन गुरुजी बावापाशीं तिनें दुलई करण्याची गोष्ट काढिली. गुरुजींनीं तें ऐकून यमनीला सांगितलें कीं, दुलईसाठीं तुला मी मोठें नामी कापड आणून देईन.

## उद्योग.

उद्योगः खलु कर्तव्यः फलं मार्जारवद्भवेत् ॥
जन्मप्रभृति गौर्नास्ति पयः पिबति नित्यशः ॥

ह्याचा अर्थ. निश्चयेंकरून उद्योग करावा. उद्योगापासून मांजरास जसें फळ होतें तसें फळ होईल. मांजरापाशीं जन्मापासून गाय नसतां तें नित्य नित्य दूध पितें, हें त्याच्या उद्योगाचें फळ होय. ईश्वरानें मनुष्यास हात, पाय, डोळे, इत्यादि इंद्रियें दिलीं आहेत तीं उगीच स्तब्ध ठेविण्यासाठीं दिलीं नाहींत; कांहीं तरी उद्योग करावा ह्यासाठीं दिलीं आहेत. केवळ मनुष्यासच इंद्रियें देवानें दिलीं आहेत असें नाहीं, पश्वादिकांसही दिलीं आहेत; तरी बुद्धि हा पदार्थ मनुष्यासच दिला आहे. मनुष्यासाठीं सर्व पदार्थ देवानें उत्पन्न करून ठेविले आहेत; परंतु ते केवळ मनुष्याच्या हाताशीं ठेविले नाहींत, कांहींसे दूर ठेविले आहेत. ते मनुष्यानें उद्योग करून जवळ करून घ्यावे, असा परमेश्वराचा अभिप्राय उघड दिसतो. पहा, खाणीच्या पोटांत रत्नें ठेविलीं आहेत तीं खणून बाहेर काढिलीं पाहिजेत. उंच झाडावर फळें उपजविलीं आहेत तीं वर चढून काढिलीं पाहिजेत. जमिनींत शेतें पिकविण्याची शक्ति ठेविली आहे, पण पेरणी केली पाहिजे. नदी तळीं विहिरी पाण्यानें भरल्या आहेत, पण पात्रानें पाणी बाहेर काढिलें पाहिजे. कापशीच्या फुलांत तंतु केले आहेत पण त्यांचें सूत वळून कापड विणिलें पाहिजे. असे हजारों प्रकारचे उद्योग आहेत. तर जो उद्योग करितो त्यालाच तीं फळें प्राप्त होतात. म्हटलें आहे,

उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मीः ॥
उद्योग्याचे घरीं रिद्धी सिद्धी पाणी भरी.

तुम्ही उद्योग मात्र करा, मग तुम्हांस कोणत्याही गोष्टींची वाण पडणार नाहीं. उद्योग करावा हा मनुष्याचा मुख्य धर्म होय. उद्योगावांचून कोणतेंच कार्य सिद्ध होत नाहीं. नुसतीं हत्यारें लोखंड घडीत नाहींत. नुसतीं औतें जमीन नांगरीत नाहींत. त्यांस मनुष्याचा प्रयत्न सहाय पाहिजे. उद्योग हा आपला बंधु होय, आणि आळस हा आपला शत्रु होय. म्हटलें आहे, जावेगा सो पावेगा, सोवेगा सो

खेविगा. ह्याचा अर्थ असा कीं, जो उद्योग करून आतो त्यालाच लाभ प्राप्त होतो, आणि जो आळसानें निजून राहतो तो लाभास अंतरतो. आळसा सारिखा घातक शत्रु दुसरा कोणी नाहीं. आळसानें मोठाले लाभ हातचे जातात; आळस शरीराची खराबी करितो; आळस मनुष्यास हलकेपणा आणितो; आळसामुळें मित्र असतात ते शत्रु होतात. असे आळसापासून अनेक प्रकारचे तोटे आहेत म्हणून आळस टाकून उद्योग करावा. उद्योगावांचून प्रतिष्ठा मिळत नाहीं, उद्योगानें पाहिजे तो पदार्थ मिळतो; उद्योगानें मोठालीं राज्यें हस्तगत होतात; उद्योगानें मित्र जोडतात; उद्योगानें शत्रु जिंकितां येतात; उद्योगानें संपत्ति मिळते; उद्योगानें विद्या येते; उद्योगानें शरीरप्रकृति चांगली राहते; उद्योगानें ईश्वरी ज्ञान प्राप्त होतें; उद्योगानें परलोक साधितां येतो: जो जो मनोरथ करावा तो तो उद्योगानें सफळ होतो. मनुष्याच्या मागें पोट आणि प्रपंच लागला आहे, ह्यासाठीं मनुष्यानें उद्योग अवश्य केला पाहिजे. आळशाचें कुटुंब उपाशीं मरतें. द्रव्यावांचून निर्वाह होत नाहीं, आणि उद्योगावांचून द्रव्य मिळत नाहीं. ज्या देशांत उद्योगी पुरुष नाहींत तो देश दरिद्री राहतो, त्या देशांत संपत्ति येत नाहीं; त्या देशाकडे विद्या, कला, कौशल्य ह्यांचें ज्ञान ढुंकून पाहत नाहीं; त्या देशावर शत्रु फार उठतात; त्या देशावर विपत्तीची कृपादृष्टि असते; म्हणून तुम्ही निरुद्योगी किंवा आळशी राहून आपला देश संकटांत घालूं नका. ज्या देशांत उद्योगी पुरुष आहेत त्याची कीर्ति चोहोंकडे पसरते; तो देश संपत्तीचें माहेर, आणि विद्येचें विलासमंदिर होय; त्या देशास सर्व देश नमून असतात; त्या देशाचा कित्ता इतर देश घ्यावयास पाहतात; त्या देशांतील लोकांस ददातीची भेट कधीं होत नाहीं; त्या देशांतील सुखाचें पीक कधीं बुडत नाहीं; त्या देशावर अनीतीचीं अभाळें कधीं येत नाहींत, आणि त्या देशावर सत्याचा सूर्य सदा प्रकाशित असतो. ह्यासाठीं तुम्ही उद्योगी होऊन आपणांसाठीं व आपल्या देशासाठीं सुखाचीं भांडारें वृद्धिंगत करा.

---

# प्रसंगावधान.

मुंबई शहरांत सदाशिवपंत म्हणून एक गृहस्थ होता, त्याची बारा वर्षांची एक मुलगी होती तिचें नांव बया, आणि एक दहा वर्षांचा मुलगा होता त्याचें नांव रंगू. बया लहान असून मोठी शहाणी आणि चाणाक्ष होती, पण अमळशी भितरी मात्र होती.

एकेदिवशीं सदाशिवपंताच्या मनांत आपल्या हाताची शीर तोडवावी असें येऊन त्यानें शस्त्रवैद्यास बोलावून आणविलें. सदाशिवपंत व बया हीं दोघें ओटीवर बसलीं आहेत इतक्यांत तो शस्त्रवैद्य तेथें आला. नंतर त्यानें आपली पेटी उघडून आंतून नस्तर वगैरे लकलकीत शस्त्रें बाहेर काढिलीं. तीं पाहतांच बया भिऊन, मोठ्या गडबडीनें उठून, आंत जाऊं लागली, तों बापानें तीस परत बोलाविलें.

**सदाशिवपंत**— बया, जाऊं नको; तूं येथें माझ्याजवळ बैस ये, आणि वैद्यबावा माझ्या हाताची शीर तोडतील ती पहा.

**बया**— बाबा, तुमची शीर तोडल्यावर हातांतून रक्त वाहील, तें माझ्यानें पाहवणार नाहीं; म्हणून मी आपली आंत जातें.

**सदा०**— पाहवणार नाहीं म्हणजे? तुला काय करणार आहे तें?

**बया**— बाबा, रक्ताकडे बघितलें म्हणजे मला घेरी येते. एक दिवस आपला रंगू विळीवर बसून कांबटीची लेखणी तासीत होता, तेव्हां त्याचा हात कापला आणि त्यांतून रक्त वाहूं लागलें, तें मीं पाहिलें, तेव्हां मला लागलीच घेरी आली, म्हणून आतां मला रक्ताकडे पहावयाचें भय वाटतें. आणि दुसरें असें कीं तुम्हांला झालेलें दुःख माझ्यानें मुळींच पाहवणार नाहीं.

**सदा०**—मी स्वतां जर निमुटपणें दुःख सोशितों तर तुझ्यानें तें पाहवणार कां नाहीं? बा:, जाऊं नको, येथें येऊन बैस, मग त्याविषयीं मी तुला एक गोष्ट सांगेन.

बापानें इतकें म्हटलें तेव्हां बयाचें काय चालतें? तोंड वाईट करून कांपत कांपत ती बापाजवळ येऊन बसली. नंतर तिनें त्या शस्त्रवैद्याची पूर्वींची सर्व कृति पाहिली, पण त्यानें सदाशिवपंताच्या हाताला नस्तर लाविलें तें तिच्यानें पाहवलें नाहीं. तिनें पटकन मान फिरविली.

आणि पहिल्यानें जी रक्ताची चिळकांडी उडाली ती पाहतांच तर बयास धडकी बसली. नंतर अमळशानें सारें जिकडल्या तिकडे होऊन वैद्यबावा निघून गेले; मग बापाचें तिचें बोलणें झालें.

**सदा०**—बया, तुला ह्या गोष्टींचा जो एवढा बाऊ वाटला होता तो कां? ह्यांत आहे काय? उगीच आपलें पळून जावें ह्यांत वेडेपणा नाहीं काय?

**बया**—बाबा, वैद्यबावांनीं तें शस्त्र तुमच्या हाताला लाविलें तेव्हां मी किती भ्यालें! त्या शस्त्रानें तुमच्या हाताला पुष्कळ इजा झाली असेल, नाहीं बरें?

**सदा०**—अगदीं थोडी इजा झाली. आणि फार इजा झाली म्हणून काय झालें? तिजपासून पुढें हित होईल.

**बया**—पण बाबा, मला येथें बसवून घेऊन हें बघण्याचा आग्रह कशाला केला बरें? मीं येथें बसून तुमचें काय केलें?

**सदा०**—तुझ्या बसण्यापासून तादृश मला उपयोग नाहीं खरा; पण तुला असल्या गोष्टी पाहण्याची संवय होऊन तुझी भीति जाईल, हा तुला मोठा उपयोग होईल म्हणून तुला बसवून घेतलें.

**बया**—हें पाहण्याची संवय होऊन मला काय करावयाचें आहे?

**सदा०**—बया, प्रसंगाचा कांहीं नियम आहे बरें? नेहमीं कोणावर कांहीं कोणावर कांहीं प्रसंग येतच आहेत. आणि तुला सांगून ठेवितों कीं, कोणावरही दुःखाचा प्रसंग गुदरला असतां आपल्या हातून होईल तितकी मदत आपण त्यास करावी, हा आपला धर्मच होय. आणि अशा प्रसंगीं आपण त्या दुःखांत पडलेल्या माणसा जवळ जाऊंच नये, असें केलें तर आपणांस तसल्या प्रसंगाचें ज्ञान कधीं व्हावयाचें नाहीं, आंगीं धीटपणा यावयाचा नाहीं, आणि अशा प्रसंगीं काय करावें हेंही कधीं सुचावयाचें नाहीं. दुसरी गोष्ट अशी आहे कीं, आपण जर दुसऱ्या माणसाला मदत करण्याविषयीं भयानें मागें घेतलें, तर दुसरींही माणसें आपणाविषयीं कदाचित् तसेंच करतील.

**बया**—अमुक रीतीचा प्रसंग पडला असतां अमुक उपाय करावा असें मला शिकवून ठेविलें, तर मला लोकांस मदत करितां येणार नाहीं काय? मग संवय होऊन काय करावयाचें आहे?

सदा०—कशी मदत करितां येईल ? नाहीं येणार. ज्या गोष्टीपासून इजा म्हणून होते त्या गोष्टीचें आपणांस साहजिकच भय वाटतें; आणि तशा गोष्टीचा प्रसंग कोणा एखाद्यावर आला, तर त्यावेळेस न घाबरतां प्रसंगावधान राहून एखादी तजवीज काढणें, हें पुष्कळ पाहून सवरून आंगीं चांगला धीटपणा आल्याशिवाय बहुतकरून कोणाच्याच हातून होत नाहीं. आणि तें प्रसंगावधान राहण्यास म्हटलें म्हणजे संवयच मुख्य आहे.

बया—प्रसंगावधान म्हणजे काय, बाबा ?

सदा०—कोणतें एखादें संकट अथवा भय येऊन पडल्यास, त्या समयीं न गडबडतां न घाबरतां स्वस्थ राहून एखादी तजवीज काढितां यावी अशी जी मनाची स्थिति तिचेंच नांव प्रसंगावधान. अमुक मनुष्य देहभानावर आहे, अमुक मनुष्य देहभानावर नाहीं, असें लोक म्हणतात तें तर त्वां ऐकिलेंच आहे. तें देहभान असणें हें प्रसंगावधानापासूनच होतें. प्रसंगावधान आंगीं असणें हा मोठा गुण आहे, असें समजलें पाहिजे. कारण, तो जर आंगीं नसेल तर संकटांतून पार पडणें हें क्वचित् घडेल. गणपतरावाची लेंक आवडी एकदां समईपाशीं खेळत होती आणि तिच्या साडीचा पदर पेटला त्या गोष्टीची तुला आठवण आहे?

बया—होय, आठवण आहे तर. आपल्या ह्या माजघरांतलीच गोष्ट ती.

सदा०—आवडीच्या जवळ आपली मोलकरीण साळाऊ होती तिनें ती साडी पेटलेली पाहतांक्षणींच मोठ्यानें आरोळी ठोकिली, आणि बाई, बाई म्हणत बाहेर निघून गेली. त्यानंतर ती आंत येऊन पदर विझविण्याची एखादी तजवीज करीपर्यंत आवडीची काय अवस्था झाली बरें ?

बया—खरेंच बाबा, काय वेडी ही साळाऊ !

सदा०—वेडी म्हणजे संशय काय ? तिला एका काडी इतकें प्रसंगावधान नाहीं. आणि तिच्या वेडेपणापासून परिणाम काय झाला तो पहा कीं, तिचें देहभान अगदीं सुटून प्रसंगीं ती अगदीं निरुपयोगी झाली. आवडीचें आंग भाजून तिनें किंकाळी फोडिली, तेव्हां तिची आई तेथें आली आणि पाहते तों पदर फार पेटला.

तेव्हां तिनें तजवीज केली कीं जवळ बिछाना पडला होता त्यांतली घोंगडी चपकर ओढून घेऊन ती आवडीच्या पदरावर घातली, आणि सडकून दाबून धरितांच आग विझून गेली.

**बया**— इतकें केलें तरी आवडीचें आंग पुष्कळ भाजलें होतें, बाबा.

**सदा०**— होय, तें खरें. पण त्यापेक्षां भलतेंच एखादें कांहीं झालें नाहीं ही केवढी गोष्ट झाली? साळाऊनें जर पाहिल्यानेंच अशी चांगली तजवीज केली असती, तर आवडीला कांहीं एक इजा झाली नसती. एक साडी मात्र थोडकीशी जळाली असती. आंगीं प्रसंगावधान नसल्यामुळें एकेठिकाणीं दुसरी एक मोठी अनर्थाची गोष्ट घडली ती तुला सांगतों. एक बाई रात्रीं आपल्या घरीं माडीवर निजली होती, तों एकाएकीं घराला आग लागून माडींत ज्वाळा येऊं लागल्या, तेव्हां ती बाई जागी झाली. नंतर तिनें जिन्याच्या दाराची कडी काढिली. तिचीं मुलें तिसऱ्या मजल्यावर तिच्या बहिणीपाशीं निजलीं होतीं. त्या सर्वांस जागें करून आपणाबरोबर खालीं आणावें, तसें न करितां अगदीं घाबरून जाऊन ती जिन्यानें नीट खालीं उतरली, आणि आगीच्या डोंबांतून मोठ्या संकटानें बाहेर पडली. तीच वर गेली असती, तर त्यावरच्या सर्व मनुष्यांस उठवून त्यांसुद्धां ती दुसऱ्या वाटेनें सुखरूप बाहेर पडली असती. पण सुचलें कोठें? सुचलेंच नाहीं. पुढें ती रस्त्यांत गेल्यावर मग तिला मुलाबाळांची आठवण झाली. पण इतकें होई तोंपर्यंत वेळ ननस्ती गेला. मग उपयोग काय? चोंहोंकडून घर पेटलें तेव्हां मग कोणाच्यानें वर जाववेना. आणि तीं मुलेंबाळें आंथरुणां-तल्या आंथरुणांतच जळून मेलीं.

**बया**—काय अनर्थ हा!

**सदा०**—अनर्थ म्हणजे पुसावें काय? आतां तुला प्रसंगावधानाची एक गोष्ट सांगतों. ती गोष्ट मागल्या गोष्टीशीं अगदीं उलटी आहे. एक बाई रात्रीं माडीवर आपल्या खोलींत निजली होती. मध्यरात्रीं घरास एकाएकीं आग लागून तुळया, खांब, वगैरे लांकडें जळतांना कडकडूं लागलीं. त्या कडकडण्यानें ती बाई जागी होऊन पाहते तों दाराच्या फटींतून तिच्या दृष्टीस उजेड पडला. इतक्यांत तिचा

नवराही जागा होऊन उठला, आणि पुढें तो दाराची कडी काढावयास जात होता; पण बायकोनें सांगितलें, कडी काढूं नका; कारण, आंत एकदम धुराचा लोट आणि आगीच्या ज्वाळा येऊन आपला जीव अगदीं गुदमरून जाईल. त्या बाईचीं मुलें तेथेंच दुसऱ्या खोलींत आपल्या आजीपाशीं निजलीं होतीं, त्या आजीस व मुलांस जागें करून तिनें उठविलें. नंतर धोतरें लुगडीं इत्यादि पुष्कळ चिरगुटें जमवून तीं एकाला एक बांधून लांब दोरीप्रमाणें केलें. आणि त्याचा एक शेवट आजीच्या कंबरेस बांधून खिडकी वाटे तिला खालीं सोडून दिलें. नंतर एक एक मूल खालीं सोडून दिलें, तें आजीनें घेतलें. आणि त्याच एके ठिकाणीं गांठलेल्या चिरगुटांस हाता हाता वर दोन दोन हातां वर गांठी देऊन त्याचें एक शेवट खिडकीच्या गजाला बांधिलें, आणि त्याला धरून शेवटीं तीं नवरा बायको खालीं उतरलीं. मग अमळशानें सर्वजणें पाहतात तों कडीपाट पेटून ढांसळला, आणि सगळ्या घरांत आगीचा डोंबाळा झाला.

**बया**— वाहवा! सगळींजणें खुशालपणें बाहेर पडलीं!

**सदा०**— तर शहाणपणाचें काम असेंच आहे. तिनें, पहा बरें, कसें केलें तें. तिची धांदल अगदीं न होतां तिला सर्व गोष्टी समयीं सुचून तिनें स्वस्थपणानें सर्व मनुष्यें पार पाडिलीं. मुलांवर ममता करणें, व त्यांच्या जिवांकरितां पाहिजे तसल्या संकटांत उडी घालणें, हा बहुतकरून आईचा स्वभावच होय; पण तीच आई जर भितरी असली, तर असा एखादा प्रसंग मुलांवर आला म्हणजे तिच्या त्या ममतेमुळेंच ती घाबरून जाऊन तिला कांहीं एक तजवीज सुचेनाशी होते. पहा, एक बाई मांडीवर आपला मुलगा घेऊन बसली होती; तेथेंच जवळ बोरें पडलीं होतीं त्यांतलें एक बोर उचलून त्या मुलानें तोंडांत घातलें, तें त्याच्या घशांत अडकून त्याचा श्वास कोंडला. तेव्हां तें मूल काळवंडून अगदीं तडफडूं लागलें. आईनें लागलेंच त्याच्या घशांत बोट घालून बोर काढून टाकिलें असतें, तर सहज काम झालें असतें. पण मांडीवरचा मुलगा खालीं ठेवून ती दुसऱ्या आया बायांला बोलावयास गेली.

पण दुसऱ्या आयाबाया आल्या त्या तिजप्रमाणेंच घाबरून गेल्या, आणि कांहीं एक तजवीज न निघतां बिचारें मूल तडफडून मरून गेलें.

**बया**— अरेरे ! त्या आईला ह्या बाळाबद्दल किती दुःख झालें असेल बरें?

**सदा०**—तें काय सांगावें. त्या पुत्रशोकामुळें ती बाई दुखण्यास पडून अगदीं मरावयास टेंकली. दुसऱ्या एका बाईची अशीच चमत्कारिक गोष्ट झाली. तिचें मूल शिडीवर दहा बारा पायऱ्यांवर चढून गेलें. तें पाहून तिनें मोठ्यानें किंकाळी फोडिली. त्यासरसें मूल घाबरून शिडी वरून एकदम धडधडून खालीं पडलें, आणि फार दुखावलें. तीच न घाबरतां हलकेंच जर मुलाला बोलावती तर तें स्वस्थपणें खालीं आलें असतें.

**बया**—(बापाच्या हाताकडे दृष्टि जाऊन) बाबा, तो पहा तुमच्या हातावर रक्ताचा ओघळ आला आहे.

**सदा०**—खरेंच, पुन्हा रक्त वाहूं लागलें. मीं फार लवकर हात हालविला, म्हणून असें झालें.

**बया**—( फार घाबरून ) बाबा, आतां काय करावें?

**सदा०**—तूं भिऊं नको. मी बोटानें तें भोंक दाबून धरितों, म्हणजे रक्त अगदीं बंद होईल. तूं सुभानाला हाक मार. (बयानें हाक मारल्यावर सुभाना आंत येतो ) सुभाना, हें पहा, रक्त वाहत आहे. तुला हात फिरून नीट बांधितां येईल?

**सुभाना**—जी, मी बांधितों ( असें म्हणून त्यानें पहिली पट्टी काढून त्या ठिकाणीं दुसरी बांधिली. )

**बया**— आतां राहिलेंसें वाटतें.

**सदा०**— आतां राहिलें. सुभानानें हात चांगला बांधिला. पहा बरें, त्यानें कसें स्वस्थपणें काम केलें तें. माझ्या हातावरून मला दुसरी एक गोष्ट आठवली आहे, ती तुला सांगतों. एका शेतकऱ्यानें कापणी करितां करितां विळ्यानें हाताची धमनी कापून घेतली, आणि रक्ताची चळकांडी लागली.

**बया**— धमनी म्हणजे काय, बाबा !

**सदा०**— गुदस्तां रंगूच्या लग्नाकरितां आपण पुण्यास गेलों होतों; मग तेथें लग्न होऊन गेल्यावर एक दिवस आपण कात्रजेचा घाट पाहण्याकरितां गेलों होतों. तिकडे जातांना वाटेनें एक मोठें तळें लागतें; त्यांतील पाणी खजिन्यांत घेऊन तेथून नळ बांधून पुण्यांत पाणी आणिलें आहे. तो खजीना त्यावेळेसच मीं तुला दाखविला. तें पाणी लहान लहान नळ्यांतून पुष्कळ ठिकाणीं जाऊन त्यावर सर्व लोकांचें पोषण होतें, असें मीं तुला सांगितलें होतें, तें तुला आठवतेंना?

**बया**— होय, तें आठवतें.

**सदा०**— तसेंच मनुष्याच्या शरीरांत हृदय हा एक रक्ताचा खजीना आहे, आणि त्यांतून सर्व शरीरांत नळ्या गेल्या आहेत, आणि हृदयांत रक्त तयार होऊन त्या नळ्यांतून जाऊन सर्व शरीराचें पोषण करितें. त्या प्रत्येक नळीस धमनी असें म्हणतात. ही धमनी कापली असतां रक्त फार वाहतें. तें रक्त बंद होण्याचा उपाय एकच आहे, तो असा कीं कापलेलें ठिकाण व हृदय ह्यांच्या मध्यें कोठें तरी गच्च आंवळून बांधून टाकावें, म्हणजे हृदयांतून कापलेल्या ठिकाणाकडे जें रक्त येत असतें तें बंद होतें. असो त्या वरील शेतकऱ्याच्या हातांतून रक्त फार वाहवलें. त्याच्या जवळ बायका, पुरुष वगैरे जीं माणसें होतीं तीं कांहीं हिकडे पळालीं, कांहीं तिकडे पळालीं, कांहीं दगडाप्रमाणें स्तब्ध उभीं राहिलीं. पण काय करावें हें कोणा एकासही सुचेना. तजवीज निघाल्यावांचून आणखी थोडीशी वेळ गेली असती तर तो बिचारा शेतकरी मेलाच असता. पण इतक्यांत तेथें हुशार आणि धीट अशी एक मुलगी आली, आणि एक दोरी घेऊन जखमेच्या वरल्या आंगास तिनें बळकट आंवळून टाकिलें. असें करितांच रक्त अगदीं बंद झालें. पुढें दुसरा उपाय होऊन जिकडच्या तिकडे सर्व बंदोबस्त झाला.

**बया**—वाहवा! काय शहाणी मुलगी! पण, बाबा, ही तजवीज करण्याचें त्या मुलीला कसें बरें समजलें?

**सदा०**—त्वां जसें आज ऐकिलें, तसें तिनेंही पूर्वी कधीं असें करण्याचें ऐकिलें असेल. आणि त्या शेतकऱ्याजवळ जीं दुसरीं माणसें होतीं

ह्यांतूनही कोणा एखाद्यानें ऐकिलें असेल, नसेल असें नाहीं. पण उपयोग काय? वेळेस सुचलें तर सारें. आतां तुला असें विचारितों. रस्त्यानें तूं चालली असतां तुझ्या आंगावर जर एखादा पोळ चालून आला तर तूं काय करशील बरें? तूं म्हणशील कीं, मी पळून जाईन, पण पळाल्यानें सुटका व्हावयाची नाहीं. कारण, पोळा पुढें तूं किती पळशील? उगीच उभें राहिलें असतां बचाव होण्याचा संभव असतो तेवढाही पळाल्यानें नाहींसा होईल. दुसरें कांहीं नाहीं.

**बया**—असें झालें तर काय करावें बरें?

**सदा०**—ह्या विषयीं एक तुला गोष्ट सांगतों. मागें एकदां मी पुण्यास गेलों होतों, तेव्हां तेथें एके दिवशीं दोन बाया वृद्धेश्वरास गेल्या होत्या, त्या परत येत असतांना एक पोळ शिंगांनीं माती उकरीत आहे, डुरकण्या फोडीत आहे, असें त्यांच्या दृष्टीस पडलें. पहिल्यानें त्यांस वाटलें कीं तो दुसऱ्या रस्त्याला जाईल. पण अमळशानें पाहतात तों तो पोळ पहिला रोंख सोडून नीट आपल्या आंगावर चालून आला.

**बया**—बाबा, मी असतें तर माझी अवस्था मोठी कठीण झाली असती; आणि मी मोठ्यानें ओरडलें असतें.

**सदा०**—तूं ओरडली असतीस खरीच. त्या दोघींपैकीं एकजण तुजसारखी भितरी होती, ती घाबरून ओरडली. पण दुसरी होती ती मोठी धीट होती. ती तिला म्हणाली, तूं घाबरूं नको; माझ्या पाठीशीं उभी रहा, आणि एकेक पाऊल हळूच मागें सरत जा. अशा रीतीनें आपण दोघीजणी ह्या शेजारच्या फाटकांत शिरून तें लावून टाकूं, म्हणजे पोळ कांहीं करणार नाहीं. नंतर जी धीट होती तिनें तेथल्या तेथें ठाम उभें राहून धट्टपणानें त्या पोळाकडे नजर लाविली. तो जवळ आला तसा तोही उभा राहिला. पायानें जमीन उकरणें व डुरकणें हें त्याचें चाललेंच होतें. बया, तुला मी एक नेम सांगून ठेवितों कीं मनुष्य धट्टपणानें उभें राहिलें असतां कोणतेंही जनावर त्याच्या आंगावर बहुतकरून चालून येत नाहीं. पुढें ती धीट बाई पोळाकडे पाठ न करितां कांहीं पावलें मागें सरली. तें पाहून तो पोळही पुढें आला. पुन्हा ती थांबली, तसा तोही थांबला. पुन्हा मागें सरावें, पुन्हा थांबावें, असें करीत करीत ती बाई एके बागेच्या

फाटकापर्यंत आली. ती भितरी बाई फाटकाच्या आंत पूर्वीच शिरली होती. दुसरी धीट होती तीही संधान पाहून पट्‌कन आंत शिरली, आणि लागलेंच फाटक लावून टाकिलें. अशा रीतीनें दुसरीला संकटांतून पार पाडून आपणही पार पडली.

**बया**—मोठ्या शिपाइगिरीचें काम केलें खरें; पण अशा धीट बायका फार थोड्या असें वाटतें.

**सदा०**—होय, ह्यांत काय संशय! इतक्या धैर्याची बायको विरळा. मागें एका ठिकाणीं असें झालें कीं रात्रीं कांहीं बायका, पुरुष, मिळून सगळींजणें दारा बाहेर गोष्टी सांगत बसलीं होतीं. तितक्यांत जवळच्या कुंपणांतून एक सनाटा वाघ त्यांच्याजवळ येऊन ठेपला, आणि आतां उडी मारणार तों त्यांपैकीं एक बाई धीट होती तिनें जवळच एक छत्री पडली होती ती घेऊन वाघाच्या अंगावर धांवून जाऊन त्याच्या तोंडापुढें एकदम उघडली. त्या सरसा तो वाघ भ्याला, आणि फाडकर उडी मारून कुंपण उडून गेला, आणि तेथून जवळच्या झाडींत जाऊन दिसेनासा झाला.

**बया**—हीतर मोठ्याच धैर्याची गोष्ट. मीं अशी गोष्ट कधींच ऐकिली नाहीं. पण, बाबा, अशा प्रकारचें धैर्य एखाद्याला आंगीं आणितां येईल काय?

**सदा०**—धैर्य दोन प्रकारचें आहे. एखाद्याच्या आंगीं उपजतच धैर्य असतें, तो एक प्रकार, आणि कोणी मनाचा निग्रह करून अभ्यासानें धैर्य आंगीं आणितात, हा दुसरा प्रकार. बायकांपेक्षां पुरुष स्वभावानें विशेष धैर्यवान् असतात; म्हणजे एखादें संकट आलें असतां ते बायकांप्रमाणें भयभीत होऊन लागलेच घाबरत नाहींत. सृष्टिकर्त्यानें स्त्रीदेहाची रचना आणि पुरुष देहाची रचना करते वेळेसच असा भेद ठेविला आहे. कोणी कोणी माणसें विलक्षण धैर्यवान् आढळतात, ह्याचें तरी कारण हेंच कीं ईश्वरानें त्यांचा स्वभाव तसाच केला आहे. अभ्यासानें जो धीटपणा यावयाचा तो सर्वांस येईल. विचार केला असतां आपणांस इतकें समजतें कीं नाहीं, कीं लहान संकट सोसल्यानें जर मोठें संकट टळत आहे, तर लहान सोसून मोठें टाळावें हें योग्य आहे. आतां आपणांस जर कांहीं एक-

काम अवश्य केलें पाहिजे असें आहे, आणि तें करीत असतां जर मोठें एखादें संकट आपणांवर येऊन पडलें, तर तेथें काय करावयाचें आहे ? तें मोठेंही संकट सोसलेंच पाहिजे. जीं संकटें मनुष्यांवर नेहमीं येतात त्यांस मनुष्यें इतकीं भीत नाहींत. कारण, संवईनें त्यांची भीति कमी होते. ह्याचें उदाहरण तुला सांगतों. एथल्या बंदरावर मोठमोठालीं तारवें येतात तीं त्वां पाहिलीं आहेत. तीं तारवें दूर देशांहून येतात. वाटेनें मोठालीं भयंकर तुफानें होतात, तेव्हां तारवावर जर नवके लोक असले तर ते अगदीं घाबरून जातात, पण तारवटी लोक असतात ते भीत नाहींत. कारण, नेहमीं जमिनीवर राहणाऱ्यांस तुफानाचा अनुभव अगदीं नसतो, म्हणून त्यांस फार भीति वाटते; पण तारवटी लोकांनीं हजारों तुफानें पाहिलीं असतात, त्यामुळें त्यांस भीति वाटत नाहीं. पण तेच तारवटी लोक घोड्यावर बसून बाहेर निघूं द्या, आणि घोडा जरासा भरधांव निघूं द्या, म्हणजे तत्काळ घाबरून जातील. घोड्यावर बसण्याचा ज्याला सराव आहे तो बसला असला तर घोडा भरधांव निघो किंवा कसाही निघो, बसणारा काडी इतका डगणार नाहीं. बायकांचें धैर्य पाहणें तें संसारकृत्यांत जीं संकटें येतात तीं त्या कशीं दूर करितात ह्यावरून पाहिलें पाहिजे. कुटुंबांतील कोणी दुखण्यास पडलें, कोणी मरूं लागलें, म्हणजे बायकांनीं जवळ असायाचें, तेव्हां त्यावेळेस मोठे मोठे प्रसंग जरी त्यांवर आले तरी त्यांनीं धैर्य सोडून भिऊं नये. सर्वकाळ संकटसमयीं पुढें होण्याला त्यांनीं तयार असावें, अशा कृत्यांविषयीं धारिष्ट आंगीं येण्यास संवयच मुख्य कारण आहे. एरवीं मोठा धाडसाचा कां पुरुष असेना, पण त्याचीही तसल्या प्रसंगीं त्रेधा होऊन त्याला कांहीं सुचेनासें होईल, ह्यांत संशय नाहीं.

**बया**—मीं असें ऐकिलें आहे, कीं दुखणें बाहणें सोसण्याला बहुतकरून पुरुषांपेक्षां बायका ज्यास्ती खबरदार असतात.

**सदा०**—खबरदार असतात खऱ्या. आणि त्याचें कारण हेंच कीं स्वतां दुखणें सोसण्याची व दुसऱ्यांचें दुखणें काढण्याची संवय पुरुषांपेक्षां बायकांस विशेष असते. बायको एकदां बाळंतीण झाली

म्हणजे तिची अवस्था तीन महिनेपर्यंत दुखणेकऱ्या प्रमाणेंच असते. पुढें मूल मोठें होईपर्यंत त्याचें दुखणें तिलाच काढावें लागतें. आणि पुरुषाचा प्रकार असा नाहीं.

बया—पुढें जर कोणा एखाद्याची शीर तोडिली तर पाहण्याविषयीं मला भय वाटणार नाहीं.

सदा०—न वाटेल तर बरेंच. आणि आज मीं तुला जवळ बसवून घेतलें तें तरी पुढें भय न वाटावें ह्या साठींच. अशा प्रकारचा प्रसंग कधीं कोणावर आल्यास तेथें जवळ स्वस्थपणें उभें राहून आपल्या हातून होईल तितकी मदत करावी, असें तुला माझें सांगणें आहे. मग तो प्रसंग आरंभीं कितीही भयंकर दिसेना; पण भितरेपणानें तेथून दूर पळून जाऊंनये. म्हणजे संवईच्या योगानें धीटपणा आणि प्रसंगावधान हीं जीं आंगीं यावयाचीं तीं लवकर येतील.

बया—बाबा, असें केल्यापासून, वैद्यानें माझीच शीर तोडिली तर ती तोडून घेणें मला आवडेल काय?

सदा०—आवडण्यासाठीं असें करावें, हें माझें म्हणणें नाहीं, तर मूर्खपणामुळें त्याविषयीं उगीच भीति असते ती दूर व्हावी, आणि शीर तोडण्याचा प्रसंगच आला तर स्वस्थपणीं बसून तोडवून घ्यावी, इतक्या साठींच आहे. आणि तूं आतां असें करशील ह्यांत संशय नाहीं.

---

## एका तुर्क मनुष्याची कृतज्ञता.

निरनिराळ्या देशांतले लोक परस्परांशीं मोठ्या निकरानें लढतात, आणि शत्रूकडचे लोक हातीं लागले असतां त्यांचें संरक्षण करावें अथवा त्यांस सोडून द्यावें, तसें न करितां, त्यांस कैदेंत ठेवितात, किंवा गुलाम म्हणून विकितात, ही गोष्ट फारच वाईट आहे. इतालीं देशांतील बहुतेक संस्थानांतल्या लोकांचें तुर्क लोकांशीं मोठें वैर होतें. त्यांत वेनिस प्रांतांतले लोक व तुर्क लोक ह्यांचें वैर फारच होतें.

एके समयीं वेनिसवाल्यांनीं पुष्कळ तुर्क लोकांस धरून आणून आपल्या शहरांत त्या बिचाऱ्यांस गुलाम म्हणून विकिलें. त्या विकलेल्या लोकांपैकीं अहमद ह्या नांवाचा एक असामी दैववशात् फ्रान्सिस्को नामक एका श्रीमंत गृहस्थाच्या घरासमोरच राहत होता, त्यां

गृहस्थास एक मुलगा होता, त्याचें वय सुमारें बारा वर्षांचें होतें. तो मुलगा अहमदाजवळून जाऊं लागला म्हणजे अमळ उभा राहून त्याच्या तोंडाकडे टक लावून पाहत असे. तो मुलगा मोठा दयाळू व सुस्वभावाचा असें त्याच्या मुद्रेवरून दिसे, त्यामुळें अहमद मोठ्या सभ्यपणानें त्यास सलाम करीत असे. तो मुलगा आला म्हणजे अहमदास मोठा आनंद होत असे. पुढें त्या मुलाची अहमदावर इतकी प्रीति जडली कीं दिवसांतून पुष्कळ वेळां तो त्याजकडे जात असे, आणि शक्त्यनुसार त्यास कांहीं कांहीं वस्तु नेऊन बक्षीस देत असे.

तो मुलगा जवळ येऊन बसला व गोड बोलला, म्हणजे अहमदास आनंद होई, हें खरें; तरी वारंवार अहमद फार शोक करीत असतो असें त्या मुलाचे नजरेस आलें. किती एक वेळां त्यानें हलकेंच यावें तेव्हां अहमदाच्या नेत्रांतून अश्रूंच्या धारा वाहत असाव्या. मुलगा दृष्टीस पडतांच अहमदानें आपणाकडून रडें कितीही दाबिलें तरी तें दाबिलें जात नसे. ह्याप्रमाणें अहमदाचें दुःख अनेक वेळां दृष्टीस पडल्यामुळें फारच वाईट वाटून तो मुलगा ती गोष्ट आपल्या बापाजवळ काढून म्हणाला, बाबा, तुमच्या हातून अहमदाच्या दुःखाचा परिहार होण्यासारखा असला तर करून त्यास सुखी कराल, तर गरिबावर मोठे उपकार होतील. मुलगा बापाचा फार लाडका होता, आणि दुसरें असें कीं, तो बापास भीड घाली ती अशीच एखादी परोपकाराची गोष्ट करण्याकरितां घाली. भलत्या सलत्या गोष्टी करण्याविषयीं घालीत नसे. त्यामुळें मुलाच्या म्हणण्यास रुकार देऊन, स्वतः त्या मनुष्याकडे जाऊन बोलण्याचा बापानें बेत केला.

दुसऱ्या दिवशीं तो गृहस्थ अहमदाकडे गेला, आणि कांहीं वेळपर्यंत त्याजकडे मुकाट्यानें टक लावून उभा राहिला. मग अहमदाच्या मुद्रेवरून त्यास असें वाटलें कीं, हा सात्विक व प्रामाणिक मनुष्य आहे; त्यावरून त्या गृहस्थास त्याची दया येऊन त्यानें त्यास पुसिलें कीं, माझ्या मुलाची ज्यावर फार प्रीति जडली आहे, व ज्याच्या सात्विकपणाविषयीं व सभ्यतेविषयीं तो माझे जवळ नेहमीं बोलत असतो तो अहमद नांवाचा मनुष्य तूंच काय? अहमद म्हणाला, होय, मीच तो दुर्दैवी अहमद; आज तीन वर्षें गुलाम होऊन पडलों आहें. येथें जो मुलगा मजकडे येत

असतो त्याचे तीर्थरूप तुम्हीच असल्यास, तुम्हास खरेंच सांगतों कीं, इतक्या काळामध्यें माझे हाल पाहून दया आली असा तोच एक मनुष्य आहे, दुसरा कोणी नाहीं; म्हणून ह्या क्रूर लोकांच्या देशामध्यें माझी प्रीति तेवढ्याच मनुष्यावर जडली आहे. आणि जो ईश्वर जसा ख्रिस्ती लोकांचा तसा तो तुर्क लोकांचा देव आहे, त्याजपाशीं मी सांजसकाळ मागतों कीं, ईश्वरा, तूं ह्या बाळाचें सर्व प्रकारें कल्याण कर, व जीं दुःखें मी भोगीत आहें तीं त्याजवर त्वां कधीं येऊं देऊं नयेत.

तो गृहस्थ म्हणाला, हल्लींच्या स्थितीवरून पाहिलें असतां त्याजवर अशा प्रकारचें संकट येईल असें दिसत नाहीं खरें; तरी तूं ईश्वरापाशीं त्याच्या कल्याणाविषयीं प्रार्थना करितोस ह्या बद्दल तो तुझा खरोखर फार आभारी आहे. बरें, पण, अहमदा, माझ्या मनांत तुझें बरें करावें असें आहे; तर मीं काय केलें असतां तुझें बरें होईल, तें तूं सांग. माझा मुलगा मला सांगतो कीं, तूं नेहमीं दुःखानें व शोकानें व्यापलेला असतोस, तें दुःख कोणतें तें सांग बरें.

अहमदास आपल्या स्थितीविषयीं फार वाईट वाटून मोठ्या आवेशानें तो म्हणाला, ईश्वरानें मनुष्यास स्वातंत्र्य ही उत्तम प्रकारची देणगी दिली आहे, तें माझें स्वातंत्र्य जाऊन मी ह्या देशांत गुलाम होऊन राहिलों आहें, ह्यामुळें मी एकीकडे बसून दुःख व खेद करीत असतों, ह्यांत काय नवल आहे? तो गृहस्थ म्हणाला, इतकें तुला वाटतें, तरी आमच्या देशचे हजारों हजार लोक तुम्ही आपल्या देशांत कैदेंत ठेविले आहेत.

अहमद म्हणाला, शेटजी, तुमच्या देशांतल्या लोकांच्या क्रूरपणाबद्दल जबाबदारी तुम्हांवर नाहीं, तशी आमच्या देशांतील लोकांच्या क्रूरपणाबद्दल जबाबदारी मजवर नाहीं. पण स्वतः मजविषयीं जर म्हणाल, तर मनुष्यांस धरून त्यांस गुलामकरण्याचें कृत्य मीं कधींही केलें नाहीं. वेनिसच्या व्यापाऱ्यांचा माल लुटून आपली संपत्ति वाढवावी, असें मीं कधीं केलें नाहीं. ईश्वरानें मनुष्यास जी स्वतंत्रतेची स्थिति दिली आहे ती मनांत पुरती धरून मी नेहमीं सर्वांशीं वागत आलों आहें. असें असतां माझी स्थिति अशा प्रकारची झाली आहे, म्हणून मला फारच वाईट वाटतें. असें बोलतांना त्याच्या डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या, आणि कंठही भरून आला. इतक्यांत भानावर

येऊन, मोठ्या गांभीर्यानें हातांत हात घालून ते छातीवर ठेवून तो उभा राहिला, आणि ईश्वरास नमून म्हणाला, ईश्वर दयाळू आहे, आणि त्यानें मनुष्यास जें जें नेमिलें आहे तें तें मनुष्यानें मानिलें पाहिजे.

अहमदाची गंभीर मुद्रा पाहून व त्याचें धैर्याचें भाषण ऐकून त्या गृहस्थास कळवळा आला, आणि तो म्हणाला, अहमदा, तुझे हाल होत आहेत हें मला फार वाईट वाटतें, आणि कदाचित् माझ्या हातून त्यांचें निवारण होईल. पण मला इतकें सांग कीं, स्वातंत्र्य फिरून मिळविण्यास तूं काय करण्यास राजी आहेस? अहमद म्हणाला, काय, करण्यास मी राजी आहें, हें पुसतां काय! मनुष्यास जें जें दुःख व जें जें, भय येऊं शकतें तें तें सोसण्यास मी राजी आहें. गृहस्थ म्हणाला, अहमदा, तसें कांहीं संकट तुजवर येणार नाहीं, तुझ्या मुखचर्येप्रमाणेंच तुझें धैर्य असल्यास, आपली सुटका करून घेण्याचा उपाय खरोखर जवळच आहे. हें ऐकतांच अहमद मोठ्या आवेशानें म्हणाला, शेटजी कोणता कसा उपाय तो सांगा. अत्यंत भयंकर स्वरूप धारण करणारा जो मृत्यु तोच साक्षात् मजपुढें येऊन उभा राहूं द्या; आणि मी जर त्यास भ्यालों तर.—–

असें तो बोलत आहे इतक्यांत गृहस्थ म्हणाला, थांब, हळू बोल. कोणी एखादें कदाचित् आपणांस पाहील. मी तुला सांगतों हें तूं चांगलें चित्त देऊन ऐक. ह्या शहरामध्यें एक माणूस माझा हाडवैरी आहे. त्यानें हरएक प्रकारें मला पराकाष्ठेचें दुःख दिलें आहे. तो बलाढ्य आहे, व मदमस्त आहे. त्याच्या शौर्याचें व बळाचें मला फार भय वाटतें, ह्यामुळें त्याच्या अपराधाबद्दल त्याचा सूड उगवावा तसा मीं उगविला नाहीं. परंतु आतां तुझ्या चर्येवरून, तुझ्या बळा-वरून, व तुझ्या बोलण्याचालण्यावरून, मला असें खास वाटतें कीं तुझ्या हातून मोठमोठीं शौर्याचीं कामें होतील. तर तूं ही कटार घे, आणि आज रात्रीस काळोख पडला म्हणजे ज्या ठिकाणीं माझा शत्रु राहत असतो त्या ठिकाणीं मीच तुला घेऊन जाईन. तेथें त्यानें केलेल्या अपराधाचा सूड उगीव, म्हणजे तुझें स्वातंत्र्य तुला मिळेल.

त्या गृहस्थाच्या तोंडांतून हे शब्द येतांच अहमदास फार संताप येऊन त्याचे नेत्र कावरेबावरे झाले; आणि संतापाच्या आवेशामुळें कांहीं

वेळपर्यंत त्यास बोलवेनासें झालें. शेवटीं सांखळींत गुंतलेला हात जेथवर उंच करितां आला तेथवर उंच करून क्रोधाच्या स्वरानें तो बोलला, हे समर्था पैगंबरा, आम्हासारख्या तुझ्या निस्सीम भक्तांस असल्या दुष्टांनीं दास करावें काय? हे अधमा ख्रिस्ती मनुष्या, तूं जा येथून आतां; आणि मनांत पक्कें समज कीं, त्वां ह्या शहरांतली सगळी संपत्ति जरी दिली, तरी देखील हा अहमद मारेकऱ्याचें काम पतकरणार नाहीं. आणि केवळ एकट्याची सुटका करून घेण्याकरितां तर काय, पण जेवढे तुर्कलोक येथें बंदींत आहेत तेवढ्या सर्वांची सुटका करून घेण्याकरितां देखील हें काम करणार नाहीं.

हें भाषण ऐकतांच तो गृहस्थ विशेष लाजल्याप्रमाणें तर न दाखवितां म्हणाला, तुला वाईट वाटण्यासारखी गोष्ट मी बोललों ह्याचा मला खेद वाटतो, परंतु मी जी गोष्ट बोललों ती तुला स्वातंत्र्याचें अगत्य विशेष असल्यामुळें तूं सहज करशील, असें वाटून मी बोललों. असें बोलून तो निघून गेला. निघतांना इतकें बोलला, माझ्या म्हणण्याचा तूं नीट विचार कर, म्हणजे उद्यां कदाचित् माझ्या बोलण्याप्रमाणें करावें असें तुला वाटेल. ह्या बोलण्याचा त्रास आल्यामुळें अहमदानें कांहींच उत्तर दिलें नाहीं, आणि गृहस्थ आपल्या घरीं निघून गेला.

दुसऱ्या दिवशीं तो गृहस्थ आपल्या मुलासहवर्तमान तेथें येऊन संथपणानें म्हणाला, काल जी गोष्ट करण्याविषयीं मी तुला बोललों ती ऐकून तुला संताप आला खरा. परंतु त्याच गोष्टीविषयीं तुजशीं शांतपणानें संभाषण करावें म्हणून मी आतां आलों आहें. आणि माझी खातरी आहे कीं, तूं मजपासून सर्व कारणें ऐकून घेशील तर—

हें ऐकून अहमद शांत असून निष्ठुर अशा मुद्रेनें मध्येंच बोलूं लागला, अरे ख्रिस्ती मनुष्या, मला सुखदेण्याचें तर राहूं दे; परंतु मुळींच दुःखानें व्याप्त झालेल्या अंतःकरणास ह्या हातापायांतल्या बिड्यांपेक्षांही दुःसह अशा प्रकारच्या गोष्टी बोलून दुःख देतोस हें तरी देऊं नको. अशा गोष्टी करण्याविषयीं तुझ्या धर्मांत तुला निषेध नसेल तर नसो; परंतु जो मुसलमान आहे त्याच्या मतानें ह्या गोष्टी अत्यंत निंद्य व द्वेष्य आहेत, असें पक्कें समज. ह्याकरितां आतां इतःपर तुझें माझें बोलणें चालणें

अगदीं बंद करून एकमेकांची एकमेकांशीं अगदीं ओळखच नाहीं, असें निखालस करून टाकूं.

हें भाषण ऐकतांच तो गृहस्थ अहमदास पोटाशीं आंवळून धरून म्हणाला: अहमदा, असें बोलूं नको. इतःपर तर पूर्वींच्याही पेक्षां जिवलग मित्र होऊं. तूं मोठा सद्गुणी व महात्मा आहेस. तुझे सद्गुण असे आहेत कीं ते पाहून तुझ्या शत्रूंच्या हातांतलीं शस्त्रें गळून त्यांस सुबोध व्हावा. प्रथम माझें मन तुजकडे लागलें; तें मुलावरच्या ममते मुळें लागलें; पण काल तुला पाहिल्यापासून तुला मोकळें करण्याचा माझा निश्चय झाला आहे. तुझ्या आंगच्या सद्गुणांची मीं परीक्षा पाहिली, त्यामुळें तुझ्या मनाच्या स्थितीचें वास्तविक स्वरूप मला समजून तुझी योग्यता मला अधिक वाटते. आतां माझ्या बोलण्यापासून तुला राग आला त्याबद्दल तूं मला क्षमा कर. विश्वासघात करणें अथवा एखाद्याचा जीव घेणें ह्या गोष्टीचा जसा तुला त्रास आहे तसाच मलाही आहे. अरे उदारमनाच्या अहमदा, तूं आतां मोकळाच आहेस. तुजबद्दलचा खंड मी देऊन चुकलों आहें. तुला इतकेंच कर्तव्य आहे कीं, ह्या माझ्या लहान पुत्राची तुजवर फार प्रीति जडली आहे, ह्याच्या प्रीतीची आठवण सर्वदां ठेवावी, आणि इतःपर तुर्क देशांत एखादा ख्रिस्ती मनुष्य गुलाम केलेला आढळल्यास तुला वेनिसची स्मृति होऊन त्यास सुखोत्पत्ति होण्याची तजवीज त्वां करावी.

ह्याप्रमाणें आगा नसतां एकाएकींच सुटका झाली, तेव्हां अहमदास जो आनंद झाला तो सांगतां येतच नाहीं. ह्या कृत्याबद्दल त्या गृहस्थाचे उपकार अहमदानें किती मानिले असतील, हें वाचणाऱ्यांनीं मनांत आणावें. फ्रान्सिस्कोनें, म्हणजे त्या गृहस्थानें, तुर्क देशाकडे एक गलबत जात होतें त्यांत अहमदास बसविलें, वाटखर्चीसाठीं तो घेत नसतां जुलमानें त्याजकडून एक सोन्याच्या नाण्यांची पिशवी घेवविली, आणि मोठ्या ममतेनें त्याला स्वदेशीं जाण्यास निरोप दिला. ज्याच्या निष्काम प्रीतीनें आपणास स्वातंत्र्य मिळालें असा आपला लहान मित्र त्याचा वियोग होणें हें अहमदास मोठ्या दुःखास कारण झालें. त्यास प्रेमाचा उमाळा येऊन, सद्गदित होऊन, त्यानें त्यास आलिंगिलें, आंसवानीं त्यास न्हाणिलें, आणि, ईश्वर तुझें सर्वप्रकारें कल्याण करो, असें बोलला.

ह्यानंतर सुमारें सहा महिन्यांनीं फ्रान्सिस्कोच्या वाड्यास एके दिवशीं

मध्यान्ह रात्र उलटल्यावर एकाएकीं आग लागली. ती वेळ म्हटली म्हणजे गाढ झोंप लागण्याची, त्यामुळें वाड्यास चोहोंकडून आग लागली तरी सर्व झोपेंत असल्यामुळें कोणीं पाहिलें नाहीं. अखेरीस कांहीं गडीमाणसांच्या दृष्टीस ती आग पडून तीं घाबरलीं; पण दैववशात् त्यावेळेस त्यांस सुचून त्यांनीं माडीवर यजमान निजला होता त्यास जलदीनें उठवून खालीं आणिलें. तो खालीं येऊन पोहोंचलामात्र, इतक्यांत जिन्यास आग लागून तो पेटला, आणि धाडकन एकदम खालीं बसला.

आपण जीवंत बाहेर निघाल्यामुळें फ्रान्सिस्कोस क्षणभर मोठा आनंद झाला, पण अमळशानें त्यास फारच मोठें दुःख झालें. तें असें. खालीं आल्यानंतर, तिसऱ्या मजल्यावर आपला मुलगा निजला होता त्याचें काय झालें? असा शोध करितां त्याला असें समजलें कीं, त्या गडबडींत त्याला खालीं आणावयाचें कोणास सुचलें नाहीं, व तो अद्यापि तेथेंच आहे. अशी गोष्ट समजल्यानंतर बापाच्या दुःखास काय पारावार विचारावयाचा आहे? तो त्या आगीच्या भडक्यांतच उडी घालून पुत्राकडे जात होता, तितक्यांत त्याच्या चाकरांनीं त्यास धरिलें. त्यानंतर तो अगदीं घाबरून मोठमोठ्यांनीं शोक करूं लागला, आणि म्हणाला कीं, माझ्या मुलाचा जीव वांचविण्यासाठीं आपल्या जिवावर उदार होऊन जो कोणी त्यास घरांतून बाहेर काढून आणील त्यास मी आपल्या संपत्तींतून अर्धी संपत्ति देईन. फ्रान्सिस्कोची संपत्ति बहुत आहे अशी लोकांत प्रसिद्धि होतीच, त्यामुळें अर्धी संपत्ति मिळणार ह्या आशेनें छातीच्या किती एक लोकांनीं अनेक ठिकाणीं शिड्या लावल्या, आणि आंत शिरण्याचा उद्योग केला; परंतु सर्व खिडक्यांतून ज्वाळांचे लोट बाहेर येत होते, व वरून जळकीं लांकडें वगैरे धडाधड पडत होतीं, त्यामुळें जे जे गेले ते ते सर्व निराश होऊन माघारे आले. आणि तो मुलगा जागा होऊन, गच्चीवर येऊन दीन मुद्रेनें हात पुढें पसरून मोठ्यांनीं ओरडून सर्वांस म्हणूं लागला, अहो मला कसा तरी खालीं घेऊन जा, मला कसातरी वांचवा; परंतु कोणाचाच इलाज चालेना, तेव्हां, हा मुलगा खास मरतो, असें सर्वांस वाटलें.

बिचारा बाप तर अगदीं बेहोष होऊन जमिनीवर मृतप्राय पडला. सर्व लोकांस अत्यंत वाईट वाटलें, जिकडे तिकडे हाहाकार झाला, इत-

क्यांत एक मनुष्य मोठ्या आवेशानें त्या गरर्दीतून पुढें घुसून सर्वांत उंच जी शिडी होती तिजवर मोठ्या धैर्यानें चढला. त्याच्या आवेशावरूनच सर्वांस वाटलें कीं, हा मनुष्य कार्य तरी करील नाहीं तर मरून जाईल, पण एरवी माघारा येणार नाहीं. तो वरतीं गेला आणि तसाच दिसेनासा झाला. त्यानंतर लवकरच धुराचा व ज्वाळेचा मोठा लोट एकाएकीं बाहेर आला त्यावरून सर्व लोकांस वाटलें कीं, आंत गलेला मनुष्य जळून गेला खचीत. पुढें लागलाच तो मनुष्य मुलाला कडेवर घेऊन बाहेर आला, आणि शिडीवरून उतरला. त्याच्या शरीरास व त्या मुलाच्या शरीरास कांहीं तादृश इजा झाली नव्हती. मग त्या मनुष्याची जी वाहवा सर्वांनीं केली तिनें दिशा देखील दणाणल्या. मुलगा बापाच्या गळ्याला मिठी मारून हाका मारूं लागला, तेव्हां बाप सावध होऊन पाहतो तों मुलग्यास कांहीं एक इजा झाली नसून तो स्वस्थपणें आपणाजवळ आहे. मग त्यावेळच्या त्याच्या आनंदास काय विचारावयाचें आहे! त्याविषयीं तोंडानें कितीही सांगितलें, अथवा लेखणीनें कितीही लिहिलें, तरी तें पुरें होणारच नाहीं.

ह्याप्रमाणें आनंद होऊन, मोठ्या प्रेमानें त्या मुलाच्या आंगावरून हात फिरवून, मग, ह्याला बाहेर काढून आणणारा माणूस कोणता? अशी चौकशी त्यानें करितां, लोकांनीं तो मनुष्य दाखविला. तो शरीरानें उमदा व भव्य दिसत होता, परंतु त्याचीं वस्त्रें अगदीं हलक्या प्रतीचीं होतीं, आणि तो आगींतून जाऊन आला होता ह्यामुळें त्याचा चेहरा इतका मळला होता कीं तो ओळखूं येत नव्हता. तरी फ्रान्सिस्को त्याचा आदर करून त्यास सोन्याच्या नाण्यानें भरलेली पिशवी देऊं लागला, आणि म्हणाला, सध्यां एवढें घ्या, आणि मी पूर्वीं बोलल्याप्रमाणेंच अर्धी संपत्ति तुम्हांस उद्यां वांटून देईन. ह्यावर तो मनुष्य म्हणाला, शेटजी, तुम्हीं म्हणतां हें बक्षीस मी घेणार नाहीं. मी जिवावर उदार झालों तो बक्षिसाच्या आशेनें झालों नाहीं.

त्याचा शब्द ऐकून तो गृहस्थ म्हणाला, औं, हा शब्द खचीत ओळखीचा दिसतो ! तेव्हां मुलगा आपणास आगींतून बाहेर काढणाऱ्याच्या कमरेस मिठी मारून आवेशानें म्हणाला, अहो बाबा, हा आपला अहमद आहे, हा अहमद आहे !

खरोखर तो अहमद होता. सहा महिन्यांपूर्वी फ्रान्सिस्कोनें त्यास गुलामपणांतून सोडविलें होतें त्यावेळेस जशीं हलक्या प्रतीचीं वस्त्रें त्याच्या आंगावर होतीं तशींच ह्यावेळेसही होतीं. अहमद ह्यावेळेस येथें आला कसा, ह्याचें आश्चर्य फ्रान्सिस्कोस पराकाष्ठेचें वाटलें, व त्यानें केलेल्या कामापासून आपणावर झालेला उपकार त्याचे मनांत पुरतेपणीं ठसला; परंतु त्यावेळेस भोवतीं लोकांची गर्दी फार होती, म्हणून फ्रान्सिस्को अहमदास घेऊन एका इष्टाच्या घरीं गेला, आणि तेथें दुसरें कोणी नाहींसें झालें तसें तो मोठ्या प्रेमानें त्यास भेटला, आणि म्हणाला, तूं पुन्हा ह्या देशांत येऊन गुलाम होऊन कसा राहिलास, हें मला मोठें आश्चर्य वाटतें. आणि तुझी स्थिति अशी झाल्याचें त्वां मला कसें कळविलें नाहीं ?

अहमद म्हणाला, ईश्वरानें मला फिरून गुलाम करून ठेविलें, ही त्याची मजवर मोठीच कृपा झाली, असें मी मानितों. कारण, तुम्हीं मजवर पूर्वीं दया केली त्या दयेस मी कांहींसा योग्य होतों हें दाखविण्याचा, व ज्याच्या जिवास मी आपल्या जिवापेक्षां हजारपट अधिक चाहतों त्यास वांचविण्याचा प्रसंग आज मी येथें गुलाम होऊन राहिलों आहें म्हणूनच सांपडला. आतां त्यावेळेपासून पुढें माझी हकीकत कशी झाली, हें तुम्ही माझे उदार यजमान आहां त्यापक्षीं तुम्हांस सांगणें योग्यच आहे. तर आतां तुम्ही ऐका. तुमच्या लोकांनीं मला धरून गुलाम केलें तेव्हां माझ्या बापालाही धरून गुलाम केलें. माझा बाप वयानें वृद्ध आहे. तुमच्या मुलानें मला रडतांना पाहिलें तें सर्व रडें त्याबापाच्या स्थितीबद्दलचें होतें. नंतर तुम्हांस माझी दया येऊन तुम्हीं विलक्षण उदारपणानें माझी सुटका केली. पुढें ज्या ख्रिस्ती मनुष्यानें माझ्या बापास विकत घेतलें होतें त्याचा शोध लवकरच लावून मीं त्यास म्हटलें कीं, माझा बाप अगदीं म्हातारा व अशक्त आहे, आणि मी चांगला तरुण धट्टाकट्टा आहें, तर त्याला सोडून देऊन त्याजबद्दल मला ठेवून घे. तुम्हीं वाटखर्चीसाठीं मला कांहीं पैसा दिला होता तोही त्या मनुष्यास देऊन त्याजकडून बापाची सुटका करून, ज्या गलबतांत तुम्हीं मला जागा देवविली होती त्याच गलबतांत बसवून त्याला सोडविणारा कोण वगैरे मजकूर त्यास कळूं न देतां, परभारें

मीं देशास त्याची रवानगी करविली. त्या दिवसापासून ह्या ठिकाणीं पुत्रधर्मास अनुसरून बापाच्या ऐवजीं मी आपल्या खुशीनेंच गुलाम होऊन राहिलों आहें.

ह्याप्रमाणें अहमदाची गोष्ट ऐकून फ्रान्सिस्कोस त्याच्या औदार्याचें व सद्गुणांचें मोठें आश्चर्य वाटलें. नंतर अहमदानें केलेल्या उपकाराबद्दल जें जें बोलवेंसें वाटलें तें तें बोलून अखेरीस, माझ्या संपत्तींतून अर्धी संपत्ति घेऊन वेनिस मुकामीं खुशाल जन्मभर रहावें, असें म्हणाला. अहमदानें, तें बक्षीस मला नको, म्हणून सांगितलें, परंतु मोठ्या आदरानें सांगितलें, उद्धटपणानें सांगितलें नाहीं. तो आपल्या मित्रास म्हणाला, मीं जें कांहीं केलें तें कृतज्ञतेस व मित्रत्वास जें उचित तेंच केलें, आधिक कांहींच केलें नाहीं. तुम्हीं पूर्वीं औदार्यानें मला गुलामपणापासून मुक्त केलें हा तुमचा मोठा उपकार झाला त्यामुळें मजवर तुमचा हक्कच होता. तुमच्याकरितां जरी हा माझा जीव खर्चिला असता तरी त्याचें सार्थक्यच झालें असतें. परंतु माझा जीव वांचावा अशी ईश्वराची इच्छा होती. मी कृतघ्न नाहीं ह्याविषयीं मीं तुमची खातरी केली आहे, आणि तुमच्या सौख्याच्या रक्षणास कांहीं अंशीं मी कारण झालों, ह्यांतच मला सर्व गोष्टींचा लाभ झाला, व माझ्या मनाला मोठा संतोष झाला; मला दुसरें बक्षीस नको.

अहमदाचा स्वभाव अत्यंत निर्लोभ होता, ह्यामुळें आपण काम केलें होतें तें कांहीं विशेष स्तुति करण्यासारखें नाहीं, असें त्यानें बोलून दाखविलें; तथापि आपला आभारीपणा दाखविण्याकरितां जितक्या गोष्टी आपल्या हातून घडावयासारख्या होत्या तितक्या केल्यावांचून फ्रान्सिस्कोस चैन पडेना. म्हणून त्यानें अहमदाच्या गुलामपणाबद्दल खंड पुन्हा भरून त्यास मोकळें केलें, आणि त्यास स्वदेशीं पाठविण्याकरितां एक गलबत मुद्दाम तयार करविलें. मग फ्रान्सिस्को व त्याचा मुलगा हे अहमदाचे लोकोत्तर उपकार पुरते स्मरून मोठ्या प्रेमानें त्यास भेटले, आणि त्यास गलबतांत बसवून, फिरून गांठ पडावयाची नाहीं अशा बुद्धीनें, त्यास निरोप देते झाले.

अहमद स्वदेशीं निघून गेल्यानंतर पुष्कळ वर्षे गेलीं, परंतु त्याजकडील समाचार मुळींच कळला नाहीं. इकडे फ्रान्सिस्कोचा मुलगा मोठा

होऊन वयांत आला, तो कलाकौशल्यांत तरबेत झाला होता. सभ्य रीतीभातींचा होता; व स्वभावानें फार चांगला होता, ह्यामुळें सर्व लोकांत त्याची चहा व मानमान्यता पुष्कळ होती.

पुढें एके दिवशीं त्या बापलेकांस कांहीं कामाकरितां समुद्रकांठच्या एका शहरीं जाणें अवश्य पडलें. खुषकीच्या मार्गापेक्षां जलमार्गानें लवकर जाऊन पोहोंचूं, अशा अभिप्रायानें ते त्या ठिकाणीं जाणारें एक गलबत पाहून त्यांत बसून निघाले. ते निघाले तेव्हां वारा त्यांस पाहिजे तसाच वाहत होता, व दुसऱ्याही सर्व गोष्टी अनुकूल होत्या; परंतु त्यांचें गलबत सुमारें अर्ध्या वाटेवर गेलें तेव्हां, तुर्क लोकांचें एक लढाऊ गलबत आपल्याच गलबतावर चाल करून येत आहे, असें त्यांनीं पाहिलें. तें अतिशय त्वरेनें येत होतें ह्यामुळें त्याजपुढें पळून जाण्याचेंही त्यांस साधलें नाहीं. वेनिसच्या गलबतावरील बहुतेक लोक तुर्क लोकांचें गलबत जवळ येण्यापूर्वींच देखील अगदीं गर्भगळित होऊन गेले. परंतु फ्रान्सिस्कोच्या मुलानें आपली तरवार उपसून त्या लोकांची, तुम्ही अगदीं नामर्द आहां, अगदीं भित्रे आहां, अशी निंदा करून त्यांस चेव आणिला. तेव्हां आपणाकडून होईल तितकें करून आपलें संरक्षण करावयाचें; कदाचित् आपण मेलों तरी चिंता नाहीं, परंतु त्यांच्या हातीं लागावयाचें नाहीं, असा त्यांनीं निश्चय केला. इतक्यांत तुर्क लोकांचें तें भयंकर गलबत जवळ येऊन ठेपलें. आणि लागलाच तोफांचा धडाका सुरू होऊन धुरानें दिशा व्याप्त झाल्या, मध्येंमध्यें तोफा सुटत तेव्हांमात्र काय तो प्रकाश दिसत असे. तुर्कलोक वेनिसच्या गलबतावर तीन वेळ उड्या घालून गेले, आणि तीन वेळ वेनिसच्या गलबतावरच्या लोकांनीं जिवावर उदार होऊन त्यांस मागें हाकून लाविलें फ्रान्सिस्कोचा मुलगा त्यांचा पुढारी होऊन मोठ्या शौर्यानें लढला. तुर्कांचें गलबतावरचे मनुष्य फार मेले, ह्यामुळें ते लढाई बंद करून दुसरीकडे निघून गेले. तुर्कलोकांनीं पळ काढिलेला पाहून वेनिसच्या लोकांस मोठा आनंद झाला. सर्वांस जय मिळून तुर्कलोकांच्या हातीं आपण सांपडलों नाहीं, हें फार चांगलें झालें, असें आपणांत सर्व आनंद करीत होते, इतक्यांत एकाएकीं दोन गलबतें निखालस वाऱ्याप्रमाणें अत्यंत वेगानें चाल करून आपणांवर येत आहेत, असें वेनिसच्या लोकांनीं पाहिलें. तीं गलबतें अमळ जवळ

येतांच त्यांजवरचीं निशाणें आपल्या शत्रूंचीं आहेत, असें वेनिसच्यां लोकांनीं पाहिलें, तेव्हां सर्व लोक मनांत अगदीं भिऊन गेले. आतां लढण्याचा अगर ह्यांच्या हातून निघून जाण्याचा इलाज राहिला नाहीं, असें त्यांस समजलें; तेव्हां शत्रूंच्या स्वाधीन व्हावयाचें असल्यास आपल्या गलबतावरचें निशाण खालीं करावें, अशी चाल आहे त्याप्रमाणें वेनिसच्या लोकांनीं केलें. नंतर एका क्षणामध्यें चोहोंकडून व्याघ्र बकऱ्यावर उडी घालतो त्याप्रमाणें तुर्क लोकांनीं त्यांजवर एकदम उड्या घातल्या तेव्हां त्या गलबतावरील सर्व लोक तुर्क लोकांच्या कबजांत सांपडले.

वेनिसच्या लोकांपैकीं जेवढे लोक जिवंत राहिले होते तेवढ्या सर्वांस बिड्या घालून त्युनिस बंदरीं जाऊन पोहोंचत तोंपर्यंत गलबताच्या कोठींत टाकून दिलें होतें.

त्या बंदरीं पोहोंचल्यानंतर त्या लोकांस हातांतील बिड्यां सुद्धां बाजारांत गुलाम म्हणून विकण्याकरितां तुर्क लोकांनीं आणिलें. नंतर तेथें बळकटीच्या प्रमाणानें त्या आणिलेल्या सर्व लोकांस निरनिराळ्या घेणाऱ्यास निरनिराळ्या किमतीस देऊन टाकिलें. ही सर्व अप्रतिष्ठा त्या लोकांस आपल्या डोळ्यांनीं पहावी लागली. शेवटीं तेथें एक तुर्क आला, तो पोषाखावरून व चर्येवरून कोणी तरी मोठा मनुष्य असावा असें दिसत होतें. तो विकण्याकरितां उभे केलेल्या सर्व लोकांकडे दयार्द्र दृष्टीनें पाहून मग फ्रान्सिस्कोच्या मुलाकडे टक लावून पाहूं लागला, आणि गलबताच्या नाखव्यास म्हणाला, ह्या मनुष्याची किंमत काय आहे ती सांग नाखवा म्हणाला, ह्याची किंमत पांचशें मोहरांहून कमी कधीं घेणार नाहीं. तुर्क म्हणाला, ह्याजपेक्षां पुष्कळ बळकट असे मनुष्य त्वां माझ्या देखत देखत शंभर, दीडशें, दोनशें, मोहरा अशा लहान लहान किमतीस विकिले, आणि ह्याच मनुष्याबद्दल इतकी किंमत मागतोस, हें मोठें आश्चर्य आहे. नाखवा म्हणाला, त्यानें माझा बहुत नाश केला आहे त्या बद्दलचा ऐवज त्याच्या किमतींत मला मिळाला पाहिजे; आणि नच मिळेल तर त्याला जन्मभर गुलामपणांत वल्हें मारण्याचें काम करावें लागेल. तुर्क म्हणाला, बाकीच्या सर्व मनुष्यांवर किंमत अगदीं थोडथोडी लाविली होती, आणि ह्याजवरच फार किंमत लाविली आहे, तर बाकीच्या सर्व

असामीं पेक्षां ह्या एकट्यानेंच एवढा मोठा नाश केला, हें झालें तरी कसें? नाखवा म्हणाला, सगळे ख्रिस्तियन लोक अगदीं जिवावर उदार होऊन आम्हां बरोबर लढले. ह्या सर्व कृत्यास उत्तेजक काय तो हाच मनुष्य. ते लोक अशा निकरानें लढल्यामुळें माझे कितीएक चांगले लढाऊ लोक मारिले गेले. तीन वेळां आम्ही त्यांच्या गलबतावर मोठ्या आवेशानें चढाव करून गेलों, आणि तीन वेळां त्यानें आमच्या लोकांवर हल्ला करून आम्हांस मोठ्या अप्रतिष्ठेनें मागें परतविलें. आणि दरवेळेस आमचे वीस लोक मारिले जावे, असें तिन्ही वेळां झालें. म्हणून तुम्हांस पुन्हा सांगतों कीं, ह्या मनुष्याची किंमत पांचशें मोहरा घेईन, नाहीं तर ह्याचा सूड उगविण्याकरितां ह्याजकडून जन्मभर मी आपल्या गलबतावर वल्हें मारण्याचें काम करवीन.

हें ऐकतांच त्या तुर्कानें त्या तरण्या मनुष्याच्या तोंडाकडे पुन्हा पाहिलें. त्या तुर्काचें व नाखव्याचें बोलणें चाललें असतां तो तरणा मनुष्य खिन्न होऊन खालीं पाहत होता, त्यानें एकाएकीं वर मान उचलून त्या तुर्काकडे पाहिलें. त्याला पाहतांच त्यास ओळखून त्यानें, अहमदा म्हणून, हाक मारिली. त्या तुर्कानेंही क्षणभर त्याच्या तोंडाकडे पाहून लागलेंच त्याला पोटाशीं धरिलें, आणि फार दिवस दूर गेलेला मुलगा दैवगत्या अकस्मात् दृष्टीस पडला असतां बापास जसा आनंद होतो तसा आनंद होऊन, तो त्यास मोठ्या प्रेमानें भेटला. फ्रान्सिस्कोच्या मुलानें केलेले उपकार अहमद स्मरत होता, व त्याचें त्याजवर विलक्षण प्रेमही होतें, ह्यामुळें तो ह्या प्रसंगीं त्याजबरोबर अनेक प्रकारच्या गोष्टी बोलला, त्या सर्व येथें सांगण्याची गरज नाहीं. त्यानंतर अहमदास जेव्हां असें समजलें कीं विकण्याकरितां उभे केलेल्या लोकांमध्यें फ्रान्सिस्कोही आहे, तेव्हां एक क्षणभर त्यास अत्यंत वाईट वाटून त्यानें पदरानें तोंड झांकून घेतलें. नंतर पुन्हा देहभानावर येऊन म्हणाला, हे ईश्वरा, माझा पुरातन आश्रयदाता जो हा फ्रान्सिस्को तो असल्या दुःखांत पडला हें फार वाईट झालें. पण त्याची सुटका माझ्या हातून व्हावी असा योग घडवून त्वां आणिला तेणेंकरून मी फार धन्य झालों. नंतर ज्या ठिकाणीं फ्रान्सिस्कोस विकण्याकरितां उभें केलें होतें तेथें तो मोठ्या जलदीनें गेला, आणि पाहतो तों फ्रान्सिस्को

निराश होत्साता मोठ्या धैर्यानें स्वस्थ उभा राहिला आहे. फ्रान्सिस्कोचे अहमदावर उपकारच होते, आणि अहमद सर्व स्मरत होता, म्हणून फ्रान्सिस्कोस पाहतांच अहमदानें त्याच्या गळ्यास घट्ट मिठी घातली, आणि म्हणाला, हे प्रिय मित्रा, हे उपकार करणाऱ्या, हा प्रसंग तुम्हांवर कसा गुजरला? त्यानंतर त्यानें त्या बापलेंकांच्या बिड्या तोडविल्या, आणि त्या उभयतांस तो आपल्या खासगत वाड्यांत घेऊन गेला. तेथें एका दिवाणखान्यांत जाऊन तेथें कोणी नाहींसें झाल्यानंतर ते परस्परांस परस्परांच्या सुखदुःखाच्या गोष्टी सांगूं लागले. तेव्हां अहमदानें त्यांस सांगितलें कीं, तुम्हीं कृपा करून गुलामगिरीपासून मला मुक्त करून स्वदेशीं पाठविल्यानंतर मी आपल्या सरकारचे फौजेंत हुद्याची चाकरी पतकरिली; आणि कितीएक प्रसंगीं माझा जय होऊन मला यश मिळाल्यामुळें उत्तरोत्तर मोठमोठीं कामें मला मिळत गेलीं आहेत, आणि हल्लीं त्युनिसच्या पादशाहाची जागा मिळाली आहे. ही जागा मिळाल्यापासून माझ्या मनाप्रमाणें मुख्य गोष्ट एक झाली आहे, ती ही कीं आमच्या देशांतील खलाशी लोक कितीएक बिचाऱ्या ख्रिस्ती लोकांस पाडाव करून आणून येथें विकितात, त्यांस त्या दुःखापासून मुक्त करण्याची शक्ति मला आहे. ज्यामध्यें असल्या प्रकारचे लोक धरून आणिले आहेत अशा प्रकारचें एखादें गलबत येथें येऊन लागलें, म्हणजे मी हमेषा गुलामांच्या बाजारांत जातों, आणि कांहीं लोक विकत घेऊन त्यांस स्वातंत्र्य देतों. आणि हा जो उद्योग मी करीत असतों तो परमेश्वरास पसंत आहे असें दिसतें, कां तर सर्व मनुष्यांमध्यें उत्तम व सर्वांपेक्षां प्रिय असे जे तुम्ही त्या तुमच्या उपयोगीं मी पडावा असा त्यानें योग घडवून आणिला आहे.

अहमदानें दहा दिवस त्या पितापुत्रांस आपल्या घरीं ठेवून घेतलें होतें. तितक्या काळांत त्या उभयतांचें मनोरंजन होण्याकरितां जें जें त्याच्या हातून झालें तें तें त्यानें केलें. परंतु त्यांच्या मनांत आतां स्वदेशीं परत जावें असें आलें हें अहमदास समजतांच तो म्हणाला, आतां मी आपणांस येथें राहण्याविषयीं उगीच आग्रह करीत नाहीं. वेनिसास जाण्याकरितां उद्यां येथून गलबत निघणार आहे, त्यांत च आपण उभयतां निघून जावें, असें त्यानें सांगितलें. त्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं

त्यानें त्यांस मोठ्या प्रेमानें वारंवार आलिंगन करून परम खेदानें त्यांस निरोप दिला. आणि त्यांस गलबतावर पोहोंचवायाला त्यानें आपल्या गाडदीचे कित्येक लोक बरोबर पाठविले. ते पितापुत्र गलबतावर जाऊन पोहोंचले, तों त्यांनीं पाहिलें कीं, जें गलबत तुर्कानीं धरिलें होतें तें व त्यांतील सर्व लोक ह्या सर्वांस अहमदानें मोठ्या औदार्यानें खंड भरून मोकळें केलें आहे. हें पाहून त्यांस जो चमत्कार वाटला व जो आनंद झाला तो काय विचारावयाचा आहे? फ्रान्सिस्को व त्याचा मुलगा हे गलबतावर चढून निघाले. ते कांहीं एक संकट आल्यावांचून स्वदेशीं सुखरूप पोहोंचले. तेथें बहुत वर्षांपर्यंत मोठ्या प्रतिष्ठेनें व मानमान्यतेनें ते राहिले. ह्या संसारांतली हरएक स्थिति क्षणभंगुर आहे; कोणत्या मनुष्यावर कोणत्या वेळेस कोणता प्रसंग येईल ह्याचा भरंवसा अगदीं नाहीं; असें पक्कें समजून ते मनुष्यमात्रावर होतील तितके उपकार निरंतर करीत असत.

---

## मनुष्य परक्या स्थळीं गेलें असतां, तेथील गोष्टी पाहून किंवा ऐकून त्याच्या मनाची स्थिति कशी होते ह्याविषयीं कल्पित गोष्ट.

प्राचीनकाळीं आशियाखंडांत एक मोठें नगर होतें, त्या नगरांतील एका मोठ्या राजमार्गांतून एके दिवशीं एक नवखा गृहस्थ भोंवतालच्या पदार्थांकडे चमत्कारपूर्वक पाहत पाहत व हळूहळू पावलें टाकीत चालला होता, त्याचा वेष व मुद्रा फारच अलौकिक दिसत होती, तेणेंकरून पुष्कळ लोक त्याच्या सभोंवतीं गोळा होऊन, आपण कोणत्या देशाहून आलां, व कोणत्या कामाकरितां आलां, असें त्यास विचारूं लागले. परंतु त्यांस लागलेंच दिसून आलें कीं त्यास आपली भाषा कळत नाहीं. तसेंच त्याच्या कृतीवरून त्यांस असेंही लवकरच समजलें कीं त्यास लौकिकांतले अत्यंत साधारण सुद्धां रिवाज कळत नाहींत. तथापि त्याच्या चालचर्येवरून तो मोठा थोर व हुशार असावा, असें दिसत होतें; ह्यामुळें तो कोणी अडाणी किंवा वेडा असेल असें त्यांच्या मनांत येईना. शेवटीं, त्यांच्या खुणांवरून त्यास समजलें कीं आपण कोणीकडून आलों म्हणून ते आपणास विचारितात; तेव्हां

त्यांस उत्तर देण्याकरितां त्यानें आकाशाकडे बोट दाखविलें. त्यावरून हा कोणी देव आहे, असा तर्क बांधून ते देवाच्यासारखे त्याच्या पायां पडावयास लागले. परंतु त्यांचा अभिप्राय त्यास समजतांच, त्यास फार वाईट वाटून त्यांचा तो सत्कार त्यानें नाकारिला; व आपण जमिनीवर नमस्कार घालून आकाशाकडे हात जोडून उभा राहिला; आणि तेणेंकरून त्यानें त्या लोकांस असें सुचविलें कीं, मी देव नव्हें, तुम्हांसारखा मनुष्यच आहें.

ज्याविषयीं कोणास कांहींच तर्क होईना असा हा तिऱ्हाईत मनुष्य नगरांतल्या एका सरदारानें आपल्या घरीं येऊन रहावयास बोलावल्यावरून, त्याच्या घरीं राहिला; व तेथें त्यानें देशभाषा शिकण्याचा इतका कडाक्याचा अभ्यास मांडिला कीं थोड्या दिवसांत तींत त्याचा चांगला प्रवेश होऊन तो भोंवतालच्या माणसांबरोबर चांगला बोलूं चालूं लागला. हें पाहून ज्या सरदाराच्या घरीं तो राहिला होता, त्यानें आपल्या पाहुण्याचा देश कोण व धंदा वगैरे काय, हें समजून घ्यावें, असें मनांत आणून त्याविषयीं त्यापाशीं एके दिवशीं गोष्ट काढिली. तेव्हां त्यानें त्यास वचन दिलें कीं, आज संध्याकाळीं आपल्या प्रश्नाचें मी उत्तर देईन. नंतर सूर्यास्त होऊन रात्र पडूं लागल्यावर, तो पाहुणा त्या सरदारास हातीं धरून वाड्याच्या गच्चीवर घेऊन गेला. ती गच्ची उंच असल्यामुळें तीवरून भोंवतालचें सर्व शहर दिसत होतें. तें नगर मोठें धनाढ्य होतें, व तेथें लोकांची वस्तीही मोठी होती. त्या शहराला मोठी एक नदी होती तेथील रस्ते जाणाऱ्या येणाऱ्या लोकांनीं भरून गेले होते; व रस्त्यांत मोठमोठ्या वाड्यांत लक्षावधि दिवे लागले होते; व कांहीं दिव्यांचीं प्रतिबिंबें नदींत पडून तीं तिच्या काळ्या भोर पाण्यांत चमत्कारिक शोभत होतीं. तसेंच नदीच्या बंदरांत दूरदूरच्या सर्व देशांहून आलेलीं व उंच उंच मालानें भरलेलीं मोठमोठालीं गलबतें नांगरून पडलीं होतीं. शहरांत पहावें तों कोणीकडे सतार, वीणा, मृदंग, इत्यादि वाद्यें वाजतातच आहेत; व कोणीकडे घण, हातोडे, कानशी, वांकशी, करवती, इत्यादि हत्यारांचा नाद चाललाच आहे; व कांहीं रस्त्यांत लग्नादि समारंभाची गडबड चाललीच आहे; व घरोघर दरवाज्यांपुढें मेणबत्त्यांचे दिवे लखलखतातच

आहेत. पाहुणा भोंवतालची चमत्कारिक शोभा पाहत, व सर्व नाद एकत्र जमून उत्पन्न झालेलें गजबजणें ऐकत, ध्यानस्थासारखा कांहीं वेळ स्तब्ध बसला; आणि एकाएकीं जागा झाल्यासारखा डचकून आकाशाकडे पाहूं लागला. आकाश निरभ्र होतें; व लक्षावधि तारे चमकत होते, ते सर्व तारे टाकून त्यानें मोठ्या उत्कंठेनें शुक्राच्या चांदणीकडे डोळे लाविले. नंतर कांहीं वेळ गेल्यावर त्या सरदारास तो येणें प्रमाणें बोलला. ह्या चांदणीकडे मी इतकी टक लावून पाहतों, ह्याचा आपणास चमत्कार वाटूं देऊं नका. ती चांदणी माझें मूळ ठिकाण होय. मीं थोड्या दिवसांपूर्वीं तेथें राहत होतों. परंतु ह्या थोड्या दिवसांपूर्वीं मी एका वेड्या हौसेच्या नादीं भरून तें स्थल सोडून मुशाफरी आरंभिली. मी त्या चांदणीवर राहत होतों, त्यावेळेस तेथून तुमची ही पृथ्वी मला फार चकचकीत दिसे; ही सारखा लखलखणारा तारा आमच्या आकाशांत दुसरा नाहीं. ही पृथ्वी पाहून मला फारच चमत्कार होई; आणि असें वाटे कीं, हा इतका शानदार तारा दिसतो, ह्याची आपणास कांहीं चांगली माहिती होईल, तर फार मौज होईल. अशी माझ्या मनांत बहुत काळपर्यंत जी मोठी उत्कंठा होती, ती एकाएकीं पूर्ण झाली. मला देवांकडून अंतरिक्ष मार्गानें ह्या भूमंडळावर येण्याची परवानगी व सामर्थ्य हीं प्राप्त झालीं; परंतु त्या परवानगी बरोबर अशी अट होती कीं मी एकदां भूलोकीं गेलों, म्हणजे नेहमीं तेथेंच राहिलें पाहिजे; व तेथच्या लोकांस जें बरें वाईट होत असेल, तें सर्व मला होईल. मला हा लोक पाहण्याची हौस फार होती, ह्यामुळें मीं फारसा विचार नकरितां ती अट मान्य केली. तर आतां आपण मला सांगा कीं येथील लोकांस बऱ्या वाईट गोष्टी भोगाव्या लागतात त्या कोणत्या? व हें जें मला दिसतें आहे, व ऐकूं येतें आहे, हें मला चांगलें समजत नाहीं; तर तें सर्व चांगलें समजावून द्या.

असें पाहुण्याचें भाषण ऐकून सरदारास मोठा विस्मय झाला. मग तो ह्यास म्हणतो, अहो, मला तर तुमच्या मुलुखचे रीतीरिवाज, तेथील जिन्नस, व तेथील लोकांची अवस्था, हीं कांहींच ठाऊक नाहींत. तथापि मला असें वाटतें कीं, तुम्ही ह्या आमच्या पृथ्वीवर आलां ही गोष्ट फारच चांगली झाली. त्यांत तुम्ही आमच्या ह्या शहरासारख्या उत्तम शहरां-

तच आलां, हें तुमचें फारच मोठें दैव समजावयाचें. ह्या शहरांत सुखोपभोगाचे व ऐषआरामीचे जे प्रकार आहेत, तसे ह्या पृथ्वीवर सुद्धां दुसरे कोठें नसतील. असो, आतां मी आपणास खरेंच सांगतों कीं, आपणासारख्या थोरास पहावया जोगें म्हणून जें जें आहे, त्या सर्वांची माहिती मी आपणास मोठ्या आनंदानें करून देईन, व ही आपली चाकरी केल्याचें मी मोठें भूषण मानीन.

नंतर त्या सरदारानें आपल्या वचना अन्वयें त्या शहरांत सुखोपभोगाचे जे जे प्रकार होते, ते सर्व त्या पाहुण्यास माहीत करून दिले. त्या उपकारशील गृहस्थानें तेथें नानाप्रकारच्या ज्या शर्यती होत असत त्या व ठिकाणोठिकाणीं उत्साह होत असत ते सर्व दाखविले. नाटकें, गाणीं, वगैरे ज्या ठिकाणीं होत असत तेथें तो त्यास घेऊन गेला. आणि त्याच्या लोकांतल्यापेक्षां अत्यंत निराळे व विलक्षण जे ह्या लोकचे रिवाज व रीती त्यांची त्यास कांहीं थोडी थोडी गोडी लागते आहे, तों इतक्यांत मध्येंच एक गोष्ट घडली, तिच्या योगानें त्याचें मन निराळ्याच मार्गास लागलें.

भूलोकीं येऊन थोडेसे दिवस लोटत आहेत तों इतक्यांत एके दिवशीं शिळोप्याच्या वेळीं तो पाहुणा व त्याचा मित्र सरदार हे दोघे शहरच्या बाहेरून मौजेनें फिरत चालले असतां, चोंहींकडून भिंती घातलेल्या एका अवाडा जवळ आले; तेव्हां त्या पाहुण्यानें आपल्या सोबत्यास विचारिलें कीं, ह्या अवाडाचा उपयोग काय?

सरदारानें उत्तर केलें कीं ही गांवची स्मशानभूमि आहे.

पाहुणा म्हणाला, तुम्ही काय म्हणतां तें मला समजलें नाहीं.

सरदार. गांवांतलीं मढीं ह्या ठिकाणीं पुरतात.

पाहुणा. (गोंधळून) महाराज, वारंवार विचारिल्यानें रागावूं नका. तुम्ही काय म्हणतां हें मला समजलें नाहीं; तर कृपाकरून विशेष फोड करून सांगा.

सरदारानें आणखी विशेष सोपे शब्दांनीं तीच गोष्ट त्यास पुनः सांगितली.

पाहुणा (भयानें काळवंडून) तुम्ही काय म्हणतां हें मला अझून चांगलें पक्कें समजलें नाहीं. तुम्ही जें काय सांगत आहां ही गोष्ट आमच्या

लोकीं मुळींच नाहीं असें मला वाटतें, व ह्या तुमच्या लोकींही मला तिची अझून माहिती झाली नाहींसें मला दिसतें. तर तुम्ही ही गोष्ट काय आहे ती मला स्पष्ट समजावून द्या. कारण तुमच्या बोलण्याचा माझ्या मनांत कांहींसा अर्थ आला आहे, आणि तो अर्थ जर खरा असेल तर तुम्ही आजपर्यंत मला ज्या ज्या गोष्टी दाखविल्या व सांगितल्या त्या सर्वांमध्यें ही गोष्ट मोठ्या महत्वाची आहे असें म्हटलें पाहिजे.

सरदार. आपणा सर्वांस लवकर किंवा उशिरां ह्या भयाण अवाडांत एक दिवस आलें पाहिजे, आणि ही गोष्ट जर तुला माहीत नसेल तर तूं खरोखरच नवखा आहेस. मनुष्यास ज्या ज्या बऱ्या वाईट गोष्टी घडतात, त्या सर्वांत ह्या गोष्टीसारखी वाईट गोष्ट दुसरी कोणतीही नाहीं, व ह्याच कारणानें चार प्रतिष्ठित लोक जमले असतां त्यांत हिचें नांव काढीत नाहींत. तुम्हांस आजपर्यंत ही गोष्ट समजली नाहीं, त्याचें कारण हेंच होय. पण मी तुम्हांस वास्तविक सांगतों कीं, तुम्ही ज्या लोकाहून आलां तेथच्या राहणाऱ्यांस जर असल्या अनिष्टाचें भय नसेल, तर तुमच्यानें जितकी त्वरा होईल तितकी त्वरा करून तुम्ही तेथें परत जा ; कां म्हणाल तर ह्या लोकीं ह्या अनिष्टापासून सुटका होण्याचा मार्ग म्हणून नाहीं, आणि इतकेंच नाहीं तर तें तुम्हांस केव्हां येईल ह्याचा विश्वास नाहीं. एव्हांपासून एका घटकेनें किंबहुना एका पळानें तुम्ही जिवंत रहाल ह्याचासुद्धां जिम्मा माझ्यानें घेववत नाहीं.

पाहुणा. (पराकाष्ठेचा खिन्न होऊन) मीं मोठ्या संतोषानें तसें केलें असतें; परंतु ह्या लोकीं यावयाच्या वेळच्या अटी आहेतना? त्या आतां सुटावयाच्या नाहींत. त्यांचें महत्व ह्या घटकेपर्यंत मला समजलें नव्हतें. (काकुळतीस येऊन) पण मला तुम्ही कृपा करून ह्या चमत्कारिक स्थित्यंतराचें स्वरूप काय, व परिणाम काय, व तें मनुष्यास बहुतकरून घडतें केव्हां, हें सांगा.

असें तो भाषण करीत असतां बोबडी वळून त्याची जीभ आडखळूं लागली, सर्वांगास कांपरें सुटलें, तोंड काळें ठिकर पडलें, व कपाळावर घामाचे बिंदु दिसूं लागले.

नंतर तो फारच भ्याला व घाबरला असें पाहून त्याचा सोबती मनांत दचकून त्यास म्हणाला कीं, तुम्हांस मी धर्माध्यक्षांकडे घेऊन

जातों, म्हणजे तुम्ही विचारितां तें सर्व ते तुम्हांस सांगतील. हा त्यांचा विषय आहे, माझा विषय नाहीं.

पाहुणा. ( आश्चर्य पावून ) तर तुमचें बोलणें खचीत मला नीट समजलें नाहीं. माझ्या मनांत निःसंशय भलता अर्थ आला—नुसते धर्माध्यक्षच मरतात काय, तर तुम्हांला मरावयाचें नाहीं?

ह्या प्रश्नाचें उत्तर न देतां त्याच्या सोबत्यानें त्यास एका मोठ्या देवळांत नेऊन धर्माध्यक्षांचे स्वाधीन केलें, आणि आपण सुटला.

मग त्यानें धर्माध्यक्षांस बरेच प्रश्न केले; व त्यांनीं त्यास जीं सविस्तर उत्तरें दिलीं त्यांवरून त्यास असें समजलें कीं, मरण हें देहास आहे, जीवास नाहीं. जीव अजरामर आहे, व मरणानंतर त्यास अक्षय सुख किंवा अक्षय यातना ह्यांपैकीं एक प्राप्त होतें. हें ऐकिल्यावर त्यास जें दुःख झालें व जें भय वाटलें त्यांपुढें त्यास आपण मरणार हें प्रथमच समजल्यावर जें दुःख व भय हीं वाटलीं होतीं तीं कांहींच नव्हतीं. परंतु पुढें जेव्हां त्यास असें कळलें कीं, कांहीं कृत्यें आहेत तीं मरावयाच्या पूर्वीं केलीं असतां मनुष्यास अक्षय सुख नियमानें प्राप्त होतें, तेव्हां त्याचें दुःख वगैरे सर्व जाऊन त्यास असा हर्ष झाला कीं तो त्याच्या मनांत मावेना. आणि तो तीं कृत्यें कोणतीं हें समजण्याविषयीं इतका उतावेळ झाला कीं त्याचा तो उतावेळपणा पाहून त्याच्या गुरूंस मोठें आश्चर्य वाटलें; किंबहुना त्यांस त्याचा त्रास आला. ते म्हणाले, बाबा, आज जें तुला सांगितलें इतकें तूर्त पुरे, बाकी जें उरलें आहे तें उद्यां सांगूं.

असें त्यांचें भाषण ऐकून तो मोठ्या काकुळतीस येऊन त्यांस म्हणाला, आपण आतां सांगितलेंना कीं, मृत्यु केव्हां येईल ह्याचा नियम नाहीं. तर तो ह्याच घटकेस येणार नाहीं कशावरून? आणि तुम्ही म्हणतां तीं कृत्यें माझ्या हातून घडण्याच्या पूर्वीं तो आला तर माझी अवस्था काय होईल? ह्याकरितां, महाराज, मी पदर पसरून आपणांस विनंती करितों कीं, तीं कृत्यें कोणतीं हें मला लवकर सांगा, क्षणभर सुद्धां विलंब लावूं नका.

अशी त्याची उत्कंठा पाहून त्या धर्मोपदेशकांनीं तीं कृत्यें कोणतीं तें त्यास सविस्तर सांगितलें. परंतु पाहतो तों त्यांनीं कृत्यें करावयास

सांगितलीं तीं बहुतकरून सोपीं व सुखावह अशीं होतीं; व तीं करितांना कधीं कधीं प्रसंगवशात् अडचण किंवा इजा झाली तरी तीं संकटें वगैरे पृथ्वीवर मनुष्य कांहीं थोडा काळ आहे तों पर्यंत मात्र व्हावयाचीं, व त्याचा इहलोकचा वास संपला म्हणजे त्या अडचणी सरावयाच्या, असें जेव्हां त्यास कळलें तेव्हां त्यास पराकाष्ठेचा जो आनंद झाला त्या आनंदाचें वर्णन सुद्धां करितां येत नाहीं. त्या आनंदानें तो देहभान देखील कांहीं वेळ विसरला.

तेव्हांपासून पुढें तो नवखा मनुष्य अक्षय सुख प्राप्त करून देणारीं कृत्यें करण्याकडे आपला सर्व काळ योजूं लागला. कधीं एखादे वेळेस त्यास मोह पडून त्यांतील एखादें कृत्य करण्याची हयगय जर त्याच्या हातून घडली, तर तो पराकाष्ठेचा कष्टी होऊन आपल्या वेडेपणाविषयीं फार खेद करी. तसेंच धर्मोपदेशकांनीं जीं कृत्यें करूं नयेत म्हणून सांगितलें होतें, तीं करण्यास जर कोणीं कधीं त्यास बोलाविलें, तर त्या सर्वांस त्याचें एक उत्तर असे कीं, मला मरावयाचें आहे, मी असें कसें करूं!

---

## कविता.

### ओव्या दासबोधांतील.

#### नरदेहप्रशंसा.

धन्य धन्य हा नरदेहो ॥ येथील अपूर्वता पहा हो ॥
जो जो कीजे परमार्थलाहो ॥ तो तो पावे सिद्धीतें ॥ १ ॥
या नरदेहाचेनि आधारें ॥ नाना साधनांचेनि द्वारें ॥
मुख्य सारासारविचारें ॥ बहुत सुटले ॥ २ ॥
ह्या नरदेहाचेनि संबंधें ॥ बहुत पावले उत्तमपदें ॥
अहंता सांडोनि स्वानंदें ॥ सुखी झाले ॥ ३ ॥
नरदेहीं येऊनि सकळ ॥ उद्धारगती पावले केवळ ॥
येथें संशयाचें मूळ ॥ खंडोनि गेलें ॥ ४ ॥
पशुदेहीं नाहीं गती ॥ ऐसें सर्वत्र बोलती ॥
म्हणूनि नरदेहींच प्राप्ती ॥ परलोकाची ॥ ५ ॥
यालागीं नरदेह श्रेष्ठ ॥ नाना देहांमध्यें वरिष्ठ ॥
जयाचेनि चुके अरिष्ट ॥ यमयातनेचें ॥ ६ ॥

नरदेह हा पराधीन ॥ नव्हे केवळ स्वाधीन ॥
परंतु परोपकारीं झिजवून ॥ कीर्तिरूपें उरवावा ॥ ७ ॥
सांग नरदेह जोडिला ॥ आणि परमार्था विसरला ॥
तो मूर्ख कैसा भ्रमला ॥ मायाजाळीं ॥ ८ ॥
मृत्तिका खाणोनि गृह केलें ॥ तें माझें ऐसें दृढ कल्पिलें ॥
परि तें बहुतांचें हें कळलें ॥ नाहींच तयासी ॥ ९ ॥
जरी देह म्हणावें आपुलें ॥ तरी हें बहुतांकारणें निर्मिलें ॥
प्राणियांच्या माथा गृह केलें ॥ उवा मस्तक भक्षिती ॥ १० ॥
ऐसें शरीर बहुतांचें ॥ मूर्ख म्हणती तें आमुचें ॥
परंतु खाजें जिवांचें ॥ काळत्रयीं बोलिजे ॥ ११ ॥
देह परमार्थी लाविलें ॥ तरीच याचें सार्थक्य झालें ॥
नाहीं तरी हें व्यर्थ गेलें ॥ नाना अधोगती मृत्युपंथें ॥ १२ ॥
असो जे प्रपंची मूर्ख ॥ ते काय जाणती परमार्थ ॥
त्या मूर्खांचीं लक्षणें कांहीं एक ॥ पुढतीं निक्षेपिजेल ॥ १३ ॥

---

## मूर्खाचीं लक्षणें.

जन्मला जयांचे उदरीं ॥ तयांशीं जो विरोध करी ॥
सखी मानिली अंतुरी ॥ तो एक मूर्ख ॥ १ ॥
परस्त्रियेशीं प्रेमा धरी ॥ श्वशुरगृहीं वास करी ॥
कुळ न जाणोनि कन्या वरी ॥ तो एक मूर्ख ॥ २ ॥
समर्थाशीं अहंता ॥ अंतरीं मानी समता ॥
सामर्थ्यावीण करी सत्ता ॥ तो एक मूर्ख ॥ ३ ॥
आपण आपुली करी स्तुति ॥ स्वदेशीं भोगी विपत्ति ॥
सांगे वडिलांची कीर्त्ति ॥ तो एक मूर्ख ॥ ४ ॥
औषध नघे असून व्यथा ॥ पथ्य नकरी सर्वथा ॥
नमिळे आलिया पदार्था ॥ तो एक मूर्ख ॥ ५ ॥
संगियांवीण विदेशकरी ॥ ओळखीवीण संग धरी ॥
उडी घाली महापुरीं ॥ तो एक मूर्ख ॥ ६ ॥
दंत चक्षु आणि घ्राण ॥ पाणी वसन आणि चरण ॥
सर्वकाळ जयाचे मळिण ॥ तो एक मूर्ख ॥ ७ ॥

धन पुत्र आणि दारीं ॥ इतुकाचि मानूनि पसारा ॥
विसरोनि गेला ईश्वरा ॥ तो एक मूर्ख ॥ ८ ॥
आपणासि राखे नानापरी ॥ शरणागतासि अंव्हेरी ॥
संपत्तीचा भरंवसा धरी ॥ तो एक मूर्ख ॥ ९ ॥
स्वयें नेणे परोपकार ॥ उपकाराचा करी अनुपकार ॥
करी थोडें बोले फार ॥ तो एक मूर्ख ॥ १० ॥
परपीडेचें मानी सुख ॥ परसुखें मानी दुःख ॥
गेले वस्तूचा करी शोक ॥ तो एक मूर्ख ॥ ११ ॥
तस्करासि ओळख सांगे ॥ देखिली ती वस्तू मागे ॥
आपुलें अहित करी रागें ॥ तो एक मूर्ख ॥ १२ ॥
समर्थासीं वैर धरी ॥ अलभ्य वस्तूचा हेवा करी ॥
घरचेघरीं करी चोरी ॥ तो एक मूर्ख ॥ १३ ॥
आपण वाचीना कधीं ॥ कोणास वाचावया नेदी ॥
पुस्तक बांधोनि ठेवी बंदीं ॥ तो एक मूर्ख ॥ १४ ॥
न बोलावितां परगृहा जातो ॥ कोणी न पुसतां मत सांगतो ॥
राजासि मित्र जाणतो ॥ तो एक मूर्ख ॥ १५ ॥
आपले अवगुण न जाणणें ॥ परातें दोष लावणें ॥
हें जयाचें मन जाणे ॥ तो एक मूर्ख ॥ १६ ॥
कांहीं न करी धंदा ॥ परापुढें गाई विपदा ॥
याचना करी सर्वदा ॥ तो एक मूर्ख ॥ १७ ॥
भरोनि वैभवाचे भरीं ॥ जीवमात्रातें तुच्छ करी ॥
पाखंडमत स्वीकारी ॥ तो एक मूर्ख ॥ १८ ॥
नाहीं भक्तीचें साधन ॥ ना वैराग्य ना भजन ॥
क्रियेविण सांगे ज्ञान ॥ तो एक मूर्ख ॥ १९ ॥
ऐशीं हीं मूर्खाचीं लक्षणें ॥ ऐकतां चातुर्य मनीं बाणे ॥
चित्त देऊनि शहाणे ॥ ऐकती सदा ॥ २० ॥
लक्षणें अपार असती ॥ परि कांहीं एक यथामती ॥
त्यागार्थ बोलतां श्रोतीं ॥ क्षमा केली पाहिजे ॥ २१ ॥
मूर्खामाजि परम मूर्ख ॥ जो संसारीं मानी सुख ॥
संसारदुःखा एवढें दुःख ॥ गणीचना जो ॥ २२ ॥

# कविता.

## धेनुहरणआर्या मोरोपंती.

पार्थ म्हणे तो कोण ब्रह्मर्षि असे मनोरमहि म्यां तें ॥
तदेश नसे परिशिलें सांग सख्या तूं तदीय महिम्यातें ॥
गंधर्व म्हणे होता कुशिकतनुज गाधि कान्यकुब्जपती ॥
तत्सुत विश्वामित्र प्रभु यत्सेवेसि नृप सदा जपती ॥ २ ॥
सर्बळसचिव तो भूपति मृगया करितां वनीं बहु श्रमला ॥
दैवें वसिष्ठमुनिचें पुण्याश्रमपद विलोकितां रमला ॥ ३ ॥
स्वपदनतगाधिजातें सत्कारुनि मुनि म्हणे अगा राया ॥
जावें न क्षुधितें त्वां येउनियां आमुच्या अगारा या ॥ ४ ॥
वाल्मीकिच्या जन जसा तृप्तिस पवे कुळासकट कवनीं ॥
मुनिच्या उटजीं तैसा तो गाधिजभूपही सकटक वनीं ॥ ५ ॥
नृपति म्हणे कोठुनि हें आलें साहित्य जेवणीं रानीं ॥
अस्मद्गृहींहि न कधीं वरिली हे तृप्ति जेवणारांनीं ॥ ६ ॥
जें न नृपप्रासादें तें मुनिच्या भुक्तिसुख दिलें उटजें ॥
हें मोठें नवल अहो लाजविला पारिजात कीं कुटजें ॥ ७ ॥
वल्कलरुद्राक्षधर ब्राह्मण अकृतान्ययत्न हा रानीं ॥
बेळें पुजिलें कसें हो बहुमूल्य दुकूलरत्नहारांनीं ॥ ८ ॥
करितां शोध कळे कीं उटजीं सुरधेनुनंदिनी आहे ॥
पाहे तीस नृप म्हणे मग मुनिला गाय मागतों द्या हे ॥ ९ ॥
अर्बुद गाई देतों अथवा देतों स्वराज्य भोगाया ॥
दे गाय काय विनिमेयें हा भवदर्थीन मान्य हो गा यो ॥ १० ॥
मुनिवर म्हणे नृपा हें वचन तुझें मन्मनासि कंपा दे ॥
या धेनुबळें माझा हा आश्रमधर्म सांग संपादे ॥ ११ ॥
कोण ज्ञाता राज्य स्वीकार करील आधि ज्यामाजी ॥
मागों नको न देयों हेयों हे धेनु गाधिजा माझी ॥ १२ ॥
विश्वामित्र म्हणे मी क्षत्रिय आधार जाण तेजाचा ॥
आज्ञामानसभंग न करिती भद्रेच्छु जाणते ज्याचा ॥ १३ ॥
स्वाध्याय तुझें बळ तूं ब्राह्मण कैचें असह्य तेज तुला ॥
पिप्पलजत्व सम असो दहनीं तेजस्विता न ते जतुला ॥ १४ ॥

मानधन प्रभु मी जें वदलों कर्तव्य तें करीन खरें ॥
ऐसा कोण प्राणी ज्यातें न करील वेशीं[128] हरी[129] नखरें[130] ॥ १५ ॥
भगवान्[131] वदे बळी तूं तुझिया चतुरंग[132] सैन्य सांगातें[133] ॥
तुज कर्तव्य असे जें सिद्ध न करिसी अभीष्ट कां गा तें ॥ १६ ॥
कौशिक अनुगांसि[134] म्हणे सोडा हो धेनु ही चला हाका ॥
हा काय रत्नभोक्ता मारू अनुताप[135] पावुनी हाका ॥ १७ ॥
दंडें ताडुनि नेतां फोडी ती धेनु फार हंबरडे ॥
तेव्हां आश्रमवासी द्विजमृगखगदेवताकदंब[136] रडे ॥ १८ ॥
नेतां बळेंचि धांवत येउनि ती मुनिपुढें उभी राहे ॥
आणूनि लोचनीं जळ बहुदीनत्वें मुखाकडे पाहे ॥ १९ ॥
धेनु म्हणे स्वामी त्वां पालन केलें करी न बाप तसें ॥
कां मज उपेक्षिलें हो मी खळ दंडें उदंड तापतसें ॥ २० ॥
साधु[137] म्हणे मज हृदयीं शत तुज बाहेर हे कशा[138] लागे ॥
मी ब्राह्मण क्षमावान् माते रडतीस तूं कशाला गे ॥ २१ ॥
क्षत्रियतेज असें हें जें तुजला पीडितें कशापातें[139] ॥
मत्तेभक्षांति मला म्हणति अहाहा न ओक[140] शापातें ॥ २२ ॥
मन्मतिदरींत[141] न शिरे कोपमतंगज[142] विवेक हरि[143] जागे ॥
म्यां न त्यजितां नेतो भूप बळें तुज रुचेल तरि जा गे ॥ २३ ॥
गाय म्हणे भगवंता आज्ञा नसतां तुझी न मंद[144] रणीं ॥
काळहि बळी किती हा न तृणबळें[145] वन्हि[146] होय बद्ध[147] रणीं ॥ २४ ॥
विप्र म्हणे नेला कीं दृढ बद्ध[147] करूनि वत्स दाव्यानें ॥
स्वबळें नृपें मदाश्रम देह तसा व्यापिला सदाव्यानें[148] ॥ २५ ॥
शक्य असेल तरि रहा ऐसें मुनि बोलतांचि ती क्षोभे ॥
ग्रीष्मगमध्यान्हार्कप्रतिम[149] तिचा देह तेधवां शोभे ॥ २६ ॥
धेनुमिषें[150] त्या मुनिची सुतपस्यासिद्धि कोपली वाटे ॥
फाटे गाधिजबळतम[151] त्या चपळेच्या[152] धरूनियां वाटे ॥ २७ ॥
अंगापासुनि केले प्रकट तिनें म्लेंछ यवन शबर शक ॥
बळ उडाविलें तिहीं[153] खगपतिपक्षांहीं[154] जसें सहज मशक[155] ॥ २८ ॥
जेंवि दिगंताप्रति ने तिमिरें[156] तूळा[157] रविप्रभा[158] वात्या ॥
सेना तसी नृपबळा निर्मूळ म्हणती कविप्रभावा त्या ॥ २९ ॥

पकडो लियो हकालो बे बिसवामितर भागजावेगा ॥
यवन म्हणाति दाखविती शब्दीं [१६१]हरि [१६२]कारिंवरासि ज्या वेगा ॥ २० ॥
मार्गे पाहों न दिलें तीं बारा कोस पळविलीं [१६३]कटकें ॥
यश हारविलें तेथें किति शस्त्रें हार कुंडलें [१६४]कटकें ॥ २१ ॥

---

# अर्थशास्त्र.

## किंमतीविषयीं.

नाणें पाडण्याविषयीं सोनें आणि रुपें ह्या दोन धातु मोठ्या सोईच्या आहेत; कांकीं, त्यांची किंमत फार असून त्याला जागा थोडीच पुरते, ह्यावरून त्या दोन धातूंस मूल्यवान् धातु म्हणतात.

बरें, सोनें, रुपें ह्यांस लोखंडापेक्षां इतकी जास्ती किंमत कां पडते? पाहिलें असतां सोन्यारुप्यापेक्षां लोखंडाचा उपयोग फार आहे. तवे, कुऱ्हाडी, खोरीं, पहारा, वगैरे जिनसा जर नसल्या, तर मनुष्याचें कसें बरें चालेल? ह्या जिनसा लोखंडाशिवाय दुसऱ्या धातूच्या तशा चांगल्या होणार नाहींत. सोन्यारुप्याचीं तर हत्यारें फारच खराब होतील. अशा म्हणण्याचें समाधान असें आहे कीं, पदार्थाची किंमत कमी असणें अथवा ती अधिक असणें हें त्याच्या उपयोगावर नाहीं. उपयोगावरच जर किंमत असेल, तर पाणी व हवा ह्यांप्रमाणें उपयोगी कोणताच पदार्थ नाहीं, सबब त्यांस सर्व पदार्थांत किंमत जास्ती पडावी, परंतु त्या पदार्थांस बहुतकरून कोणत्याही देशांत किंमत मुळींच पडत नाहीं; म्हणजे हवा आणि पाणी ह्यांच्या मोबदला कोणी कांहीं पदार्थ देत नाहीं; कारण ते दोन्ही पदार्थ फुकट पाहिजेत तितके मिळतात.

कांहीं कांहीं ठिकाणीं पाणी दुर्मीळ असतें, तेथें लोक पाणीच खुशीनें विकत घेतात. मोठमोठ्या शहरांमध्यें खाऱ्या पाण्याच्या विहिरी बहुतकरून घरोघर असतात; पण गोडें पाणी म्हटलें म्हणजे कांहीं हौद वगैरे बांधून त्यांत दुरचें आणून सोडिलें असतें. ते हौद दूर दूर असल्यानें तें पाणी थोड्या आयासांनीं पाहिजे तितकें पाहिजे तेव्हां सर्वांस मिळत नाहीं. असें असलें म्हणजे लोक पाणी विकत घेतात. परंतु उपयोगाच्या दृष्टीनें पाहिलें असतां पाणी विकत घेतात तेथें आणि ईश्वरकृपेनें जेथें पाणी फुकट मिळतें तेथें त्याच्या उपयोगांत

कांहीं कमजास्ती नसतें; त्याला किंमत पडते ती कमताईमुळें पडते. ह्याचप्रमाणें लोखंडाची ज्या ठिकाणीं कमताई असते त्या ठिकाणीं त्यालाही पुष्कळ किंमत पडते.

ह्या पृथ्वीवर कांहीं बेटांत लोखंड मुळींच उत्पन्न होत नाहीं; त्या बेटांतले लोक एवढेसे खिळे घेऊन तेथें उत्पन्न होणारें मेंढरूं, शेळी, अथवा दुसरें एखादें जनावर, देखील देतात. तरी लोखंड हें सर्व धातूंमध्यें फारच उपयोगी असून ईश्वराचे कृपेकरून बहुतेक सर्व देशांत पुष्कळ मिळतें. तथापि त्याला कांहीं किंमत म्हणून पडतेच; कारण, तें खाणींतून उकरून काढिलें पाहिजे, भट्टींत घालून शोधिलें पाहिजे, त्याचीं हत्यारें बनविलीं पाहिजेत, तेव्हां मग तें मनुष्याच्या उपयोगीं पडतें. चाकू, कातऱ्या, खिळे, वगैरे पदार्थ जर आयतेच झाडास येते, आणि लोकांस झाडपाल्याप्रमाणें घेतां येते, तर त्यांस किंमत पडतीना; कारण ते सर्वांस फुकटच मिळते; मग किंमतीचें काम काय आहे? परंतु असें जरी असतें, तरी त्यांचा उपयोग आतां होतो त्यापेक्षां कमी झाला असता असें सुतराम् नाहीं.

केवळ कमताईमुळेंच पदार्थास किंमत येते असेंही नाहीं, तर त्या पदार्थाची लोकांस गरज असली पाहिजे. कांहीं एक जातीचे दगड आहेत, त्यांची फार कमताई आहे; पण त्यांस कोणी किंमत देत नाहीं, कारण कीं त्यांचा उपयोग नाहीं, व ते पाहण्यासारखे मौजेचेही नाहींत. तेव्हां पदार्थाची कमताई असून त्याची लोकांस गरज असली पाहिजे, तरच त्याची किंमत होते. हिरे, पाच, वगैरे जातींच्या खड्यांची कमताई असून ते दिसण्यांतही शानदार व तेजस्वी असतात, ह्यामुळें त्यांस किंमत फार पडते; परंतु त्यांचा उपयोगच पाहूं गेलें असतां दागिन्याशिवाय कांहीं नाहीं.

हजारों लोक पराकाष्ठेची मेहनत करून द्रव्य मिळवितात तें केवळ मोटें धोटें अन्नवस्त्र मिळवावें एवढ्याचसाठीं नव्हे, तर चांगलीं चांगलीं वस्त्रें, दागिने, वगैरे अनेक प्रकारचे चैनीचे पदार्थ मिळविण्यासाठीं. असले पदार्थ आपणापाशीं असावे, अशी इच्छा लोक विशेष करितात, ह्याचें कारण एक तर ते नजरेला शानदार दिसतात, आणि दुसरें तें ज्या मनुष्यांजवळ असतात त्यांस लोक श्रीमंत मानितात

केवळ शानदारीलाच पाहिलें असतां फुलांचा झुबका देखील खड्यांच्या दागिन्यापेक्षां शानदार दिसतो; परंतु आपण संपन्न आहों असें लोकांस दाखविण्याकरितां मनुष्यांस खड्यांचे दागिने घालावेसें वाटतें. आणि फुलें म्हटलीं म्हणजे फुकट मिळतात, तेव्हां तीं ज्यापाशीं असतील त्याला संपन्न कोण मानितो?

आतां आपआपल्या स्थितीप्रमाणें चांगले चांगले पोशाख करण्याची व दागिने आंगावर घालण्याची लोक इच्छा करितील तर कांहीं चिंता नाहीं, परंतु आपल्या योग्यतेपेक्षां जास्ती दागिनेदुगिने घालण्याची इच्छा कितीएक लोक करितात, आणि असें करण्यापासून दारिद्र्यांत पडतात, हें फार वाईट. कैकवेळां असें आढळतें कीं लोक दागिन्यांतच अतिशयित पैसा घालितात; तोच पैसा जर चांगलें टिकाऊ वस्त्रपात्र व सामान घेण्याकडे व तें स्वच्छ राखण्याकडे घातला तर चांगलें होईल. आंगावर दागिने पुष्कळ असून आंग मळकें असलें, व आंगावरचीं चिरगुटें फाटकीं असलीं, तर पाहणाऱ्यांस फार वाईट वाटतें.

ह्या सर्व मागील लेखावरून असें समजावें कीं, ज्या पदार्थाला किंमत म्हणून आहे त्याचा उपयोग आहे, किंवा तो शानदार आहे, किंवा तो जवळ असल्यापासून कांहीं आनंद होत आहे, येवढ्याच कारणांवरून त्याला किंमत पडते असें नव्हे; तर त्याची कमताई आहे हें एक त्याला किंमत असण्याचें कारण आहे. कमताई म्हणजे तो पदार्थ थोडा, तेव्हां अर्थातच किंमत दिल्याशिवाय मिळत नाहीं. ज्या पदार्थांची लोकांस गरज आहे, त्यांपैकीं जे अगदीं कमी असतात त्यांची किंमत फार असते; म्हणजे ते पदार्थ मिळण्यास कठीण पडतें.

सोनें व रुपें ह्या पदार्थांस लोखंडापेक्षां फार किंमत पडते ह्याचें कारण हेंच. त्यांचा जर उपयोग नसता, अथवा ते दिसण्यांत शानदार नसते, तर ते घ्यावे असें कोणासही वाटतेंना. पण लोकांस घेण्याची इच्छा असून त्यांस लोखंडापेक्षां किंमत फार पडते, कारण कीं लोखंडापेक्षां त्यांची कमताई आहे, ह्यामुळें ते मिळविण्यास कठीण पडतें. ते थोड्या ठिकाणीं सांपडतात, आणि ज्या ठिकाणीं सांपडतात त्या ठिकाणीं तरी थोडे सांपडतात. सोनें म्हटलें म्हणजे कांहीं नद्या आहेत त्यांची वाळू मोठ्या मेहनतीनें धुतां धुतां तींत त्याचे बारीक बारीक रज सांपड-

तात. सतरा तोळे रुपें मिळविण्यास जितका खर्च लागतो तितकाच सुमारें एक तोळा सोनें मिळविण्यास लागतो. ह्याच कारणामुळें सुमारें एक तोळा सोनें घेणें झालें तर सुमारें सतरा तोळे रुपें द्यावें लागतें.

पदार्थ घेण्याची इच्छा लोकांस असावी, व त्या पदार्थाची कमताई असावी, ह्या दोन गोष्टी किंमतीविषयीं कारण झाल्या; पण आणखीही एक गोष्ट आहे ती त्या पदार्थास लागू असली पाहिजे, तर किंमत येते. ती गोष्ट ही कीं तो पदार्थ लोकांस एकमेकांस देतां घेतां यावा. ह्यास उलट उदाहरण. आरोग्य असावें अशी सर्वांस इच्छा असते, आणि तें सर्वांस मिळतही नाहीं, ह्यावरूनच आरोग्य हा पदार्थ मोठा मूल्यवान् आहे असें लोक कधीं कधीं बोलतात; परंतु येथें मूल्य शब्दाचा अर्थ किंमत नव्हे; कारण कीं दुसरा पदार्थ अथवा किंमत घेऊन आरोग्य हें कोणास देतां येत नाहीं, व घेतां येत नाहीं. जर आरोग्य हें देतां घेतां येतें, तर शेंकडों श्रीमंत लोक हजारों, लाखों, रुपये गरीबगुरिबांस संतोषानें देऊन त्यांजपासून आरोग्य घेते, आणि गरीबगुरीबही खुशीनें ती गोष्ट मान्य करिते. पण तसें करितां येत नाहीं. फार झालें तर गरीब मनुष्य द्रव्याच्या लोभानें आपले हातपाय कापण्यास सिद्ध होईल; परंतु ते हातपाय दुसऱ्या मनुष्याच्या शरीरास लावितां येणार नाहींत. आरोग्य असलें तर खाण्यापिण्याचा बेत सोडल्यानें तें दूर करितां येईल, परंतु तें दुसऱ्या मनुष्यास देतां म्हणून येणार नाहीं.

ज्या विद्यार्थ्यांस हा विषय नवाच आहे त्यांस माहिती करून देण्यास पुढील प्रश्नोत्तरें फार उपयोगी आहेत.

१. हवेचा उपयोग मोठा असतांही तीस किंमत कां पडत नाहीं? हवेचा उपयोग मोठा आहे खरा; परंतु ती फुकट मिळते, सबब तीस किंमत पडत नाहीं.

२. एका जातीचा दगड आहे त्याचा उपयोग लोकांस नाहीं, व तो दिसण्यांतही शानदार नाहीं, परंतु तो फार दुर्मीळ आहे, तर त्यास किंमत कां पडत नाहीं? तो पदार्थ सर्वांस मिळण्यासारिखा नाहीं खरा; परंतु तो घेण्याची कोणास इच्छा नसते, म्हणून त्यास किंमत पडत नाहीं.

३. आरोग्य असण्याची सर्वांस इच्छा आहे, व तें सर्वांस मिळतें असेंही नाहीं, तर त्यास किंमत कां पडत नाहीं ? तें लोकांत एकाला दुसऱ्यास देतां येत नाहीं, व दुसऱ्यापासून घेतां येत नाहीं, म्हणून त्यास किंमत नाहीं, म्हणजे तो मोबदला करावयाजोगा पदार्थ नाहीं.

४. खोऱ्यास किंमत कां पडते ? त्याचा उपयोग आहे ह्यामुळें तें घेण्याची लोकांस इच्छा आहे ; त्याची कमताई आहे, म्हणजे तें पाहिजे त्यास फुकट मिळत नाहीं ; आणि तें एकमेकांस देतां घेतां येतें, म्हणून त्यास किंमत पडते.

५ रुप्याच्या चमच्याचा उपयोग खोऱ्यापेक्षां अधिक नाहीं. असें असतां त्यास खोऱ्यापेक्षां जास्ती किंमत पडते, ह्याचें कारण काय ? त्याचा उपयोग अधिक नाहीं खरा; परंतु त्याची खोऱ्यापेक्षां कमताई फार आहे; म्हणजे रुप्याच्या खाणींतून रुपें काढण्याचे आयास फार आहेत, त्यामुळें रुपें मिळत नाहीं, म्हणून चमच्यास किंमत जास्ती पडते.

कोणत्याही पदार्थाची लोकांस इच्छा असून तो श्रम केल्यावांचून मिळतच नाहीं, असा नेम असला म्हणजे तो मिळविण्याविषयीं लोक श्रम करितात. आणि ज्या पदार्थास किंमत फार पडते तो पदार्थ मिळविण्यास प्रायः श्रम फार पडतात, असा सामान्य नेम आहे. ह्या नेमावरूनच कांहीं लोक असें समजतात कीं कोणत्याही पदार्थाची किंमत तो तयार करण्याविषयीं वगैरे जे श्रम लागले असतील त्यांवरूनच होते. परंतु ही त्यांची मोठी चूक आहे. फार किमतीस जो पदार्थ विकला जातो तो पदार्थ तयार करण्याविषयीं वगैरे श्रम फार पडले ह्यामुळें फार किमतीस जातो, असें नाहीं; तर तो पदार्थ फार किमतीस जातो ह्यामुळें तो तयार करण्याविषयीं लोक श्रम फार करितात असें उलटें आहे. उदाहरण; कोळी लोकांस मासे विकण्यापासून पैसा पुष्कळ मिळतो, म्हणून ते जाळीं घेऊन समुद्रावर जाऊन मासे धरण्याकरितां थंडीवाऱ्यांत श्रम करितात. एका कोळ्यानें समुद्रावर रात्रभर राबून एकच मासा धरिला, आणि दुसऱ्यास डोहो सांपडल्यामुळें तितक्याच श्रमानें त्यानें एक हजार मासे धरिले ; तर दोघांस श्रम सारखे पडले आहेत, तरी दुसऱ्यास हजार माशांची जितकी किंमत येईल तितकी पहिल्यास एकाच

माशाची येणार नाहीं. रस्त्यानें चालतां चालतां सहज एखाद्याच्या नजरेस हिरा पडला. तो हिरा मिळविण्याविषयीं त्या मनुष्यास श्रम मुळींच पडले नाहींत, म्हणून त्याची किंमत कांहीं कमी होणार नाहीं. एखाद्या मनुष्यास आपल्या घराचा पाया खणितां खणितां मोहरांची ठेव सांपडली. त्या मोहरांविषयीं त्यास श्रम पडले नाहींत, तरी मोहरांची किंमत कांहीं कमी होणार नाहीं.

ह्यावरून स्पष्ट दिसतें कीं श्रमाच्याच योगानें पदार्थास किंमत येते असें नव्हे; तर पदार्थास किंमत येते म्हणून लोक पदार्थ तयार करण्याविषयीं श्रम करितात. मनुष्यानें आळशी होऊं नये, म्हणून ईश्वरानें अशी योजना केली आहे कीं, मनुष्यास जेवढे पदार्थ अवश्य लागतात तेवढे बहुतकरून श्रमावांचून त्यास मिळूं नयेत. मनुष्यानें निढळच्या घामानें अन्न मिळवावें असा त्याचा संकेत आहे. आणि अन्नवस्त्र, घरदार, ऐषआरामाचे पदार्थ, वगैरे सर्व कांहीं श्रमापासून मिळतें.

---

## वेतनाविषयीं.

कांहीं काम करणाऱ्या लोकांस वेतन जास्ती मिळतें व कांहीं लोकांस कमी मिळतें. शेतांत खपणारा कुळंबी जें वेतन मिळवितो त्यापेक्षां सुतार जास्ती वेतन मिळवितो; आणि घड्याळें करणारा सुतारापेक्षांही जास्ती मिळवितो. परंतु हें जास्ती मिळणें जास्ती श्रम करण्यावर नाहीं.

शारीरश्रमामध्यें जसे प्रकार आहेत तसेच मानसिक श्रमामध्यें आहेत. पेढीवरच्या कारकुनाला हिशेब चोख राखण्याकरितां फार श्रम करावे लागतात, तरी त्यास वकील अथवा वैद्य ह्यास जें वेतन मिळतें तितकें मिळत नाहीं.

ह्यावरून समजावें कीं, वेतन कमजास्त मिळणें हें कमी अथवा जास्ती श्रमावर नाहीं; तर कामाच्या किमतीवर आहे. आतां कामाची किंमत कशावरून समजावी तें सांगतों.

पदार्थांची जशी किंमत असते तशी कामाचीही किंमत असते. काम करणाऱ्यांची कमताई असल्यास वेतन जास्ती मिळतें; आणि काम करणार पुष्कळ असल्यास वेतन कमी मिळतें. एक तोळा तांबें पैदा करण्याविषयीं जितका खर्च, वेळ, व श्रम लागतात तितकेच एक तोळा

सोनें पैदा करण्याविषयीं जर लागते, तर सोनें आणि तांबें दोन्ही एकाच दरानें विकतीं.

शेतकरी झाले, सुतार झाले, ह्यांजपेक्षां घड्याळें करणाऱ्यांची कमताई कां? म्हणजे, शेतकरी जसे पुष्कळ तयार होतात तसे घड्याळें करणारे कां होत नाहींत? असें म्हणाल तर ऐका.

ह्याचें मुख्य कारण असें आहे कीं, घड्याळें करणाऱ्याला जी विद्या शिकावी लागते तिच्या अभ्यासाला खर्च फार लागतो. घड्याळाच्या विद्येंत किंवा वैद्यविद्येंत तयार होऊन चांगलें काम करूं लागण्यास काळ फार घालवावा लागतो. इतक्या काळांत शिकणाराची उपजीविका चालून विद्या शिकविण्याबद्दल गुरूला द्यावयास द्रव्य पाहिजे. इतका खर्च करण्याचें सामर्थ्य असलें, तर तो शिकणारा त्या विद्येंत तयार होतो. सुतारकाम शिकण्यास खर्च थोडा लागतो, आणि घड्याळें करणाऱ्याचें काम किंवा वैद्याचें काम हें शिकण्यास खर्च फार लागतो, म्हणून तें शिकलें असतां आपल्या मुलास सुतारापेक्षां जास्ती पैसा मिळेल, असें वाटलें तरच बाप मुलास त्या विद्येंत घालील. एरवीं त्याच्या जवळ पुष्कळ पैसा असला तरी देखील तो उगीच रिकाम्या खर्चाखालीं येणार नाहीं. कधीं कधीं असें होतें कीं, मुलगा त्या कामांत घातला असतांही तो मूर्ख अथवा आळशी निघून आपली उपजीविका त्या कामावर त्याला करितां येत नाहीं, त्यामुळें त्याला तयार करण्यासाठीं बापानें केलेला खर्च निष्फळ होऊन बाप निराश होतो. वैद्यानें माणसाचा मोडलेला पाय नीट केला, आणि सुतारानें चौरंगाचा पाय नीट केला, तर वैद्यास वेतन मिळतें जास्ती आणि सुतारास मिळतें कमी. परंतु वैद्य तयार होण्यास खर्च फार लागतो म्हणून लोक त्यास पैका फार देतात असें समजूं नये. तर खर्च फार लागतो ह्यामुळें तें काम थोडेच लोक शिकतात, म्हणजे लोकांत त्यांची फार कमताई असते. आणि कमताईमुळें लोकांस त्यांना वेतन अधिक द्यावें लागतें.

ह्यावरून समजावें कीं, जसें एखादा जिन्नस पुष्कळ असला तर त्याला किंमत थोडी पडते, आणि तो थोडा असला तर किंमत पुष्कळ पडते, तसें शारीरश्रम अथवा मानसिकश्रम करणारे पुष्कळ असले तर

त्या श्रमाबद्दल त्यांस वेतन थोडेंच मिळतें, आणि ते थोडे असले तर वेतन जास्ती मिळतें.

एखाद्या कामांत कितीएक मनुष्यांची बुद्धि चांगली चालते, आणि कितीएक मनुष्यांची मध्यम चालते. त्यांत ज्याची चांगली चालते त्यास लोक पैसा अधिक देतात, आणि मध्यम चालते त्यास कमी देतात. उदाहरण, चितारीकामांत एखाद्याची बुद्धि चांगली चालल्यास तो उत्कृष्ट चितारी होतो, आणि सामान्य चिताऱ्याला तयार होण्यास जो खर्च लागतो तोच मात्र खर्च त्याला लागला असला तरी तो सामान्य चिताऱ्यापेक्षां कदाचित् दसपटही पैसा जास्त मिळवितो. आणि मेहनत पाहिली तर तितकाच वेळ दोघे करितात. ज्याची बुद्धि चांगली चालते त्यास लोक पैसा जास्ती देतात ह्याचें कारण तरी मागें लिहिलें तेंच होय. म्हणजे बुद्धिमान् मनुष्य थोडेच असतात; ह्या कारणानें त्यांच्या कामाला लोक पैसा जास्ती देतात.

कांहीं जातींच्या कामांत तयार होण्यास खर्च लागतो व बुद्धि लागते, ह्यामुळें त्यांत फार लोक तयार होत नाहींत; आणि कांहीं जातींच्या कामांला दुसऱ्या कांहीं गोष्टी प्रतिबंधक आहेत. कांहीं कामें मनुष्याच्या प्रकृतीस मानत नाहींत, अथवा तीं करण्यापासून जिवास धोका असतो, अथवा तीं कामें घाणेरडीं असतात, ह्याकारणांमुळें तीं करणाऱ्यांस पैसा जास्ती द्यावा लागतो. जास्ती न दिला तर लोक त्यांत पडणारच नाहींत. चिताऱ्याचें काम, खाणींतलें काम, दारवेचें काम, वगैरे कामें वर सांगितल्या प्रकारचीं होत.

दोन मनुष्य जर सारखाच श्रम करतील तर त्यांस पैसाही सारखाच मिळावा, कमजास्ती मिळणें हें बरोबर नाहीं, असें कोणी समजतात; परंतु हें रास्त नव्हे. आपल्या मनास येईल तेवढाच पैसा काम करणाऱ्यास देऊन त्याजपासून काम करून घ्यावें, असें जर सर्वांच्या हातीं असतें, तर फार जुलूम होता. ज्या देशांत गुलामांची चाल आहे त्यांत असेंच आहे. म्हणजे यजमानानें त्यांस जनावरांप्रमाणेंच वागवून अन्नवस्त्र मात्र द्यावें, आणि त्यांजकडून पाहिजे तें काम करून घ्यावें, ह्याविषयीं तो मुखत्यार असतो. एखाद्या मनुष्याचा श्रम अथवा त्याचा हरएक जिन्नस घेऊन त्यास आपल्या मनास येईल तीच किंमत देण्याची

मुखत्यारी असणें म्हणजे केवळ जुलुमाची गोष्ट आहे. विकत देणारे व विकत घेणारे ह्या दोघांस ही मुखत्यारी असावी, म्हणजे विकत देणाऱ्यास आपल्या मालाची जी किंमत योग्य वाटेल तीं त्यानें सांगावी, आणि विकत घेणाऱ्यास जी वाटेल ती त्यानें बोलावी. मजूर लोक हे श्रमच विकणारे आहेत, आणि त्यांला ठेवणारा हा श्रम विकत घेणारा आहे, तेव्हां दोघांसही मुखत्यारी असावी हें रास्त आहे.

कोणीही मनुष्यानें आपल्या मालाची किंमत वाटेल ती सांगावी; पण त्याच किमतीस गिऱ्हाइकानें माल घेतलाच पाहिजे अशी सक्ती त्यास करितां येऊं नये. मजुरानें मजुरी पाहिजे ती मागावी, पण अमुकच मजुरी देण्याविषयीं यजमानाची खुशी नसेल, तर त्याजवर जुलूम करण्याचें त्याच्या स्वाधीन नसावें. आपल्या स्वार्थाकरितां लोकांवर जुलूम करण्याचा अधिकार हातीं असेल तर मजुरास बरें वाटेल, हें खरें; पण त्यासही सुतार, शिंपी, लोहार, वगैरे कितीएक कारागीर ह्यांची गरज लागवे; ते लोक आपआपल्या जिनसांची पाहिजे ती किंमत सांगून ती तो खुशीनें न देईल तर ते त्याजवर जुलूम करून ती घेतील, म्हणजे त्या मजुरास वाटेल कीं, पदार्थ विकत देणाऱ्याला व विकत घेणाऱ्याला कोणालाच परस्परांवर जुलूम करितां येऊं नये.

प्राचीन काळीं काम करणाऱ्यांस अमुकच वेतन मिळावें, असे कायदे करीत असत. अमुक काम करणाऱ्यास अमुक वेतन मिळावें ह्यापेक्षां अधिक कोणीं मागूं नये, व कमी कोणीं देऊं नये; दिल्यास दंड पडेल, असा निर्बंध असे. परंतु अशा प्रकारचे कायदे अगदींच हितावह होत नाहींत. उदाहरण; शेतकाम करण्याकरितां ठेविलेल्या मजुरांस जी मजुरी द्यावी असें कायद्यानें ठरलें, ती मजुरी सर्वांस सारखी द्यावी, तर सर्वांचें काम सारखें होत नाहीं म्हणून ह्यांत आपलें नुकसान आहे, असें मनांत आणून जमीनदार चांगले चांगले मजूर थोडकेसे ठेवून बाकीच्यांस फांटा देईल, आणि त्या चांगल्या मजुरांस चांगल्या जमिनींत शेतकाम करण्याकरितां लावून बाकीची जमीन पड टाकील; असें झालें म्हणजे धन्यांचें उत्पन्न कमी होईल, व हजारों मजूरलोक घरीं बसतील; त्यांस मुळींच रोजमुरा मिळेनासा झाला त्यापक्षीं थोडासा कमी मिळाला तर ते खुश होतील. बरें आतां उलटें उदाहरण; शेतांतल्या मजुरांस

मजुरी द्यावयाची ती कायद्यानें फार कमी ठरली; व तशा थोड्या मजुरीवर चांगले मजूर राहणार नाहींत असें जर झालें, तर कांहीं जमीनदार कायद्याप्रमाणें मजुरी देऊन अर्थात् त्यांस आंतून अधिक पैसा वगैरे देतील; म्हणजे त्यांस धान्य कमीदरानें देण्याचें कबूल करितील, व दुसऱ्या कांहीं रीतीनें मदत करितील, आणि कायद्यांतून पळतील. तें समजलें म्हणजे आपल्या पदरचे चांगले मजूर जाऊं नयेत म्हणून दुसरे जमीनदार तसेंच करितील. सारांश, अशा प्रकारच्या कायद्यापासून हित म्हणून कांहींच नाहीं.

उत्कृष्ट रीत म्हटली म्हणजे धनी आणि चाकर, माल विकत देणारे आणि विकत घेणारे, ह्यांस पाहिजे तें मागण्याविषयीं व पाहिजे तें देऊं करण्याविषयीं मुखत्यारी असावी. त्यांनीं आपसांत आपआपल्या खुशीनें जमेल तर व्यवहार करावा, व न जमेल तर न करावा. येथें कायद्याचें काम नाहीं.

मजूरलोक झाले, कारागीरलोक झाले, हे उधळेपणानें पैसा उडवितात; त्या मुळें कितीएक प्रसंगीं त्यांस फार हाल काढावे लागतात. ते पुढचा विचार करून शहाणपणानें चालतील, तर ते हाल त्यांस काढावे लागणार नाहींत. ते हालांत पडले म्हणजे आपआपल्या उधळेपणास दोष न लावितां दुसऱ्याच्या नांवानें उगीच हाका मारितात. वेतनाचा वगैरे पैसा पुष्कळ मिळत असला म्हणजे जे लोक अविचारानें फार खर्च करितात, व्यसनांत पैसा घालवितात, नाना प्रकारच्या अडचणी व संकटें ह्यांसाठीं द्रव्याचा संग्रह करीत नाहींत, अशा लोकांचा रोजगार गेला, अथवा त्यांस पैसा कमी मिळूं लागला, म्हणजे त्यांचे हाल व्हावयाचेच. परंतु ह्या हालांबद्दल त्यांनीं दुसऱ्यास दोष लावूं नये, तर आपल्या उधळेपणासच लावावा. ह्याविषयीं टोळ आणि मधमाशा ह्यांचा काल्पितसंवाद आहे तो पुढें लिहितों.

हिंवाळ्यामध्यें एक टोळ थंडीनें कांकडला होता, आणि भुकेनें व्याकूळ होऊन रानांत फिरत होता. तो फिरतां फिरतां एका मोहळाजवळ आला, आणि माशांचें आर्जव करून त्यांस म्हणाला, कृपा करून मधाचे कांहीं बिंदु मला द्याल तर माझी क्षुधा शांत होईल. हें ऐकून एके माशीनें त्यास पुसिलें, त्वां उन्हाळा कोणत्या रीतीनें घाल-

विला? व त्यांत आम्हांप्रमाणें अन्नाचा संग्रह करून कां ठेविला नाहीं? तो म्हणाला, खावें, प्यावें, नाचावें, बोलावें, फिरावें अशा आनंदांत ते दिवस म्यां घालविले, आणि हिंवाळ्याविषयीं विचार मनांत मुळींच आणिला नाहीं. माशी म्हणाली, आमची रीत अगदीं निराळी. अन्नाच्या संग्रहाची पुढें आपणांस फार गरज आहे, असें समजून आम्ही उन्हाळ्यांत पुष्कळ मेहनत करून अन्नाची बेगमी करून ठेवितों. उन्हाळ्यांत संग्रह नकरितां केवळ खाऊन पिऊन चैनींत जे लोक दिवस घालवितात ते हिंवाळ्यामध्यें भुकेनें मरायाचेच, ह्यांत काय संशय?

## श्रीमंत आणि गरीब.

गरीब लोक काम धंदा, मोलमजुरी करून जो थोडा बहुत पैसा मिळवितात त्याजवर ते उपजीविका करितात; परंतु श्रीमंत असतात त्यांस उपजीविकेकरितां काम धंदा वगैरे करण्याची गरज नसते. तर स्वतां त्यांनीं किंवा त्यांच्या वडिलांनीं संपत्ति मिळवून ठेविलेली असते तिजवर ते उपजीविका करितात. कांहीं श्रीमंत लोकही दप्तरदारी, सदरअमिनी, दिवाणगिरी, वगैरे मोठ्या श्रमाचीं कामें करितात खरीं; परंतु ते उगीच हौसेनें करितात, केवळ उपजीविकेकरितां करीत नाहींत. उपजीविका पूर्वींच्या द्रव्यावर चालते.

उपजीविकेकरितां ज्यांस श्रम करणें प्राप्त आहे असे लोक बहुत असतात; आणि हौसेनें श्रमाचीं कामें करणारे लोक त्यांच्या तुलनेनें पाहिलें असतां थोडेच असतात. ज्यांत सर्व लोकांची, किंवा निदान तरी बहुतेक लोकांची, काम धंदा वगैरे केल्यावांचून उपजीविका होते असा देशच नाहीं. ज्यांत सर्वच लोक गरीब आहेत असे देश बहुत आहेत. ज्या देशांत उपजीविकेकरितां काम धंदा करणें सर्वांसच प्राप्त आहे, त्या देशांतल्या लोकांची स्थिति संपन्न देशांतील मजुरांच्या स्थितीपेक्षां देखील फार वाईट असते. ज्या देशांत शेती वगैरे व्यापार होत नाहीं, आणि लोक केवळ रानटी असतात, त्या देशांतील लोकांस पांघरावयास आंगभर वस्त्र कधीं मिळत नाहीं, व कधीं कधीं असें होतें कीं खावयास पोटभर अन्न देखील मिळत नाहीं. परंतु ज्या देशांत लोकांच्या मालमत्तेवर जुलूम वगैरे होण्याची भीति नसते, व लोक

उद्योगी असतात, त्या देशांत संपत्ति वाढते; आणि जे विशेष उद्योगी व बेताबातानें खर्च करणारे ते आळशी व उधळे ह्या लोकांपेक्षां अधिक पैशांचा आपल्या मुलांबाळांकरितां संग्रह करून ठेवितात. तेणेंकरून त्यांचीं मुलें उपजतांच घरचीं सुखी अशीं होतात.

जीं मुलें वेळ वांया न घालवितां लवकर विद्याभ्यास करितात, उद्योगी व साळसूद निपजतात, तीं वयांत आलीं म्हणजे आपल्या निर्वाहास लागतो त्यापेक्षां जास्ती पैसा मिळवून आपल्या मुलांकरितां कांहीं संग्रह करितात. पुढें त्या मुलांनीं बापानें ठेविलेल्या द्रव्याचा व्यय न करितां प्रामाणिकपणानें चालून शहाणपणानें व बेताबातानें त्यांतच भर टाकिली, तर कालेंकरून तीं संपन्न होतात, असें कधीं कधीं घडतें. हल्लीं जीं आपणांस श्रीमंत घराणीं दिसतात त्यांपैकीं कितीएक मूळचीं अगदीं गरीब होतीं, पण अशा रीतीनें वाढलीं आहेत. पुष्कळ गरीब लोक संपन्न होतील असें घडावयाचें नाहीं. आणि आपण संपन्न व्हावेंच, न झालों तर जिणें व्यर्थ, असें कोणींही मनांत आणूंनये. इतकें आहे कीं आपली स्थिति बरी करण्याची इच्छा सर्वांनीं धरावी; त्याविषयीं कांहीं चिंता नाहीं. स्थिति बरी करण्याचा व आपल्या मुलांस दोन पैसे करून ठेवण्याचा विचार अंतःकरणास आल्हादकारक आहे.

मनुष्य आपल्या मेहनतीच्या योगानें आपला निर्वाह करून आपल्या मुलांकरितां कांहीं संग्रह करून ठेवीत असल्यास, त्यास विघ्न आणणें हा केवळ अन्याय आहे, हें कोणीही सांगेल. परंतु कांहीं देशांत हल्लीं असें चाललें आहे कीं मनुष्यानें कांहीं द्रव्यसंग्रह केला असतां त्याजवर बळजोरी करून तें द्रव्य सरकारांत न्यावें, अथवा तो मनुष्य मरतांच त्याच्या मालमत्तेची जप्ती करावी, आणि त्याच्या पोराबाळांस कांहीं मिळूं देऊंनये. अशा देशांत लोक मोठ्या दुर्दशेंत असतात. आपल्या प्राप्तींतून दोन पैसे मागें टाकण्याचा विचार उपयोगी नाहीं म्हणून कोणीच करीत नाहीं; त्यामुळें कांहीं संकट आलें म्हणजे पैसा नसल्या कारणानें त्यांचे हाल होतात.

प्राचीनकाळीं कांहीं देशांत लोकवस्ती पुष्कळ असून उत्पन्न पुष्कळ होत होतें. परंतु त्यांत अलीकडे तुर्की व दुसरे कांहीं जुलमी लोक

त्यांचा अमल झाल्यामुळें ते बहुतकरून ओसाड झाले आहेत. आफ्रिका खंडाच्या उत्तरेस बार्बरी देश आहे त्यांत पूर्वी रेशमाचें उत्पन्न होतें; परंतु तेथें जुलमी लोकांचा अमल झाल्यामुळें ज्या तुतीच्या झाडांच्या पाल्यावर रेशमाच्या किड्यांचें जीवन होऊन रेशीम उत्पन्न होत होतें तीं झाडें अगदीं वाळून गेलीं. नवीं लावण्याचा विचार तर कोणी मुळीं करीतच नाहीं; कारण कीं लावण्याची मेहनत करून पुढें त्यांचें उत्पन्न म्हणजे आपणास मिळेलच असा भरंवसा कोणासही तिलमात्र नाहीं.

सगळ्या श्रीमंत लोकांची सर्व मालमत्ता घेऊन ती सर्व गरिबांस वांटून देऊन पुढें कोणासही जास्ती श्रीमंत होऊं देऊंनये, असें केलें असतां गरिबांची स्थिति बरी होईल, असें कोणी गरीब लोक समजत असतील; परंतु ही भ्रांति आहे. असें केलें असतां त्यांची स्थिति हल्लींच्या स्थितीपेक्षांही निकृष्ट होईल. ते हल्लीं कामधंदा करितात, तसा त्यांस संपत्तीचा वांटा मिळाला तरी करावाच लागेल; कां तर अन्नवस्त्र हें कोणीं तरी श्रम केल्यावांचून तयार होतच नाहीं. कापडाचे कारखाने, कुणबावा, वगैरे हे हल्लीं चालतात तसे चालविण्याविषयीं त्या स्थितींत कोणाच्या जवळ ऐपत राहणार नाहीं. हल्लीं कोणताही कारखाना म्हटला म्हणजे मजूर लोकांस हजारों रुपये देऊन अगोदर माल तयार करावा लागतो; मग तो माल विकल्यानंतर तो पैसा मालकास परत मिळतो. तसे, हल्लीं सौदागर वगैरे लोक व्यापार करण्यासाठीं ठोक रकमेनें माल खरेदी करितात. अशा गोष्टी त्या स्थितींत कोणी करणार नाहीं, कारण कोणताही व्यापार सुरक्षित चालणार नाहीं. कोणापाशीं मालमत्ता अधिक आहेसें समजलें, म्हणजे ती त्याची बलात्कारानें घेतली जाऊन तिची वांटणी होणार. मग अधिक मालमत्ता करण्याविषयीं झटणार कोण? मजूर लोकांस कामधंदा, चाकरी चुकरी मिळावयाची ती कारखाने, व्यापार, वगैरे चालले तर मिळते, एरवीं मिळत नाहीं. अशी स्थिति झाली असतां प्रत्येक मनुष्य उत्पन्नभक्षी होऊन राहणार, म्हणजे निर्वाहापुरतें धान्य थोडक्याशा जमिनींत उत्पन्न करून तें खाऊन सरासरी जीवरक्षण करील, संग्रह असा मुळींच करणार नाहीं.

एखादे वेळेस एखाद्याचें शेत पिकत नाहीं, अथवा मुलें माणसें दुखण्यास पडतात, आणि तो मनुष्य संकटांत पडतो, असें कधीं कधीं होतें. असें त्या स्थितींत कोणाला झालें असतां जवळ थोडासा संग्रह असेल तेवढा सरला म्हणजे उपाशीं मरण्याचा प्रसंग येणार. तो मनुष्य वेतन घेऊन कोणतेंही काम करण्याला तयार होईल; परंतु त्याला ठेवण्याचें सामर्थ्य कोणास नाहीं. ज्या व्यापारांतील पैसा ताबडतोब परत मिळावयाचा तशा व्यापारांत कोणी ठेविला तर ठेवील, परंतु असा व्यापार फारच थोडा चालेल; कारण कीं कोणापाशींही आस्ती पैसा झाला कीं तो नाहींसा होणार. तशांतून ज्या थोड्याशा लोकांपाशीं यत्किंचित् पैसा असेल त्यांसही भीति वाटेल कीं, हा पैसा सरकारास अथवा लोकांस समजला असतां आपणांवर जुलूम करून हा नेतील. ह्या कारणानें ज्या कोणापाशीं थोडकासा पैसा असेल ते तो जमिनींत पुरून ठेवितील. असें झालें असतां तो देश वर्षानुवर्ष जास्ती आस्ती निकृष्ट दशेस येत जाईल. हरएक मनुष्य तुर्त जेवढ्यावांचून अड-ण्यासारखें असेल तेवढाच पदार्थ उत्पन्न करील. त्या स्थितींत हल्लींच्या प्रमाणें श्रमविभाग राहणार नाहीं, तेणेंकरून मनुष्यास हल्लीं थोड्या श्रमांनीं पुष्कळ फायदा होतो तसा होणार नाहीं, एखाद्या वस्तुचा आस्ती संग्रह करून ठेविला, तर तो आपणास कोणी पचूं देणार नाहींत, ह्या भीतीनें संग्रह मुळींच कोणी करणार नाहीं. ह्या सर्व गो-ष्टींमुळें देशांत जमिनीचें उत्पन्न व लोकांच्या श्रमांचें उत्पन्न आतांच्यापेक्षां फार कमी होईल, आणि असें झालें असतां त्या देशांतल्या लोकांवर अनेक प्रकारचीं संकटें येऊन त्यांची रानटी लोकांप्रमाणें अगदीं दुर्दशा होऊन जाईल. अशा करण्यापासून श्रीमंत असतील ते मात्र दरिद्री होतील; परंतु दरिद्री लोकांची स्थिति पहिल्यापेक्षां बरी न होतां उलटी वाईट होईल. हल्लीं भिक्षेकरी लोकांची जी स्थिति आहे तीच स्थिति ताबडतोब सर्व लोकांची होऊन जाईल, किंबहुना त्यांच्या स्थितीपेक्षां वाईट स्थिति होईल, कारण भिक्षा घालणारा कोणी एक उरणार नाहीं.

श्रीमंत, गरीब, व मध्यम ह्या तिन्ही मतींचे लोकांस हेंच उत्तम आहे कीं त्यांची मालमत्ता सुरक्षित रहावी, त्यांच्या द्रव्यादिकाचें हरण कोणीं करूं नये, त्यांनीं नेकीनें चालून मिळवेल तितकें द्रव्य वगैरे मिळवावें, आणि

त्याचा संचय करणें अथवा व्यय करणें हें त्यांनीं आपल्या इच्छेप्रमाणें करावें. इतकेंच कीं त्यांनीं कोणासही इजा म्हणून देऊं नये. कांहीं श्रीमंत लोक इतर श्रीमंत लोकांपेक्षां आपल्या संपत्तीचा व्यय फार चांगल्या रीतीनें करितात. परंतु कसाही स्वार्थदृष्टीनें चालणारा श्रीमंत असला, तरी त्याच्या संपत्तीच्या व्ययानें त्याच्या शेजाऱ्यापाजाऱ्यांस कांहीं तरी लाभ होतोच होतो. एखाद्या गृहस्थास दहा हजार रुपयांचें सालीना उत्पन्न आहे, तें उत्पन्न घेऊन शंभर गरीब कुटुंबांस वांटून दिलें असतां प्रत्येकास १०० रुपयांचें उत्पन्न होऊन देशांत शंभर कुटुंबांचा निर्वाह जास्ती होईल, असें कोणाकोणास वाटेल; परंतु ही अगदीं चूक आहे. दहा हजारांचें उत्पन्न ज्यास आहे तो जर शंभर कुटुंबांस लागणाऱ्या अन्नवस्त्रांचा उपभोग एकटाच करीत असला, तर त्याचें उत्पन्न शंभर कुटुंबांस दिलें असतां बरें होईल, हें खरें; परंतु तो एवढ्याचा उपभोग करीत नाहीं, हें खचीत आहे. त्याच्या उत्पन्नांतून कांहीं कांहीं चाकर, मजूर, व्यापारी, कारखानदार, वगैरे ह्यांस मिळतें, त्यावर ते आपापल्या कुटुंबांचा निर्वाह करितात. म्हणजे त्याच्या उत्पन्नाचे अनेक विभाग करून अनेकांस वांटून दिल्याप्रमाणेंच फळ झालें. तो स्वार्थदृष्टि असला तर ह्या कुटुंबांचें पोषण आपल्या हातून व्हावें असा त्याचा हेतु नसतो, हें खरें; तथापि साहजिक पोषण होतेंच होतें. पहा, त्यानें असें मनांत आणिलें कीं, सालीना दोन हजार रुपयांच्या तसबिरी घ्याव्या, तर जे चितारी त्या तसबिरींच्या कामास लागतील त्यांस ते रुपये बक्षीस देऊन घरीं स्वस्थ बसावयास सांगितल्याप्रमाणें झालें, आणि त्यांच्या कुटुंबांचें पोषण झालें. ह्यांत भेद इतकाच आहे कीं चिताऱ्यास वाटत असतें कीं, आम्ही लोकांवर आपलें ओझें घालून त्यांच्या धर्मावर उपजीवन करितों असें नाहीं; तर खरेपणानें मेहनत करून भाकरी मिळवितों. परंतु कसें झालें तरी देशांतलें अन्नवस्त्र दोन्हीपक्षीं अधिक झालें नाहीं व कमीही झालें नाहीं, तर आहे तेवढेंच आहे. आतां एखादा श्रीमंत गृहस्थ द्रव्याचा व्यय न करितां सावकारी करील, तर तिजपासून मागच्या उदाहरणांतल्यापेक्षां अधिक सहस्रावधि गरीब उद्योगी लोकांची उपजीविका चालेल. कारण जो सावकारी करितो तो व्याज आपणास मिळावें ह्या हेतूनें चांगले जामीन वगैरे घेऊन लोकांस

पैसा देतो. पहा, मागील उदाहरणांतला मनुष्य सालीना दोन हजार रुपये तसबिरींत न घालितां तितके दर वर्षी सावकारींत घालितो, म्हणजे शेतकऱ्यांस देतो, अथवा कारखानदारांस देतो, अथवा व्यापाऱ्यांस देतो, असें कल्पूं. तर ते लोक तो पैसा आपआपल्या धंद्यांत वापरून त्यांस जें व्याज द्यावें लागतें त्यापेक्षां अधिक नफा मिळवून आपला निर्वाहही चालवितात. शेतकी करणारे असतात ते जमिनीची लागवड वगैरे करण्याकरितां मजूर लावितात; कारखानदार कापड वगैरे पदार्थ तयार करण्याचे कारखाने घालितात; आणि व्यापारी लोक स्वदेशांतला माल परदेशांत नेतात, व परदेशचा माल स्वदेशांत आणितात, आणि तेणेंकरून देशांतील धान्य, वस्त्र, पात्र, वगैरे सर्व पदार्थांची वृद्धि होते.

ह्या सर्व लेखावरून साफ दिसतें कीं, गरीब लोकांपेक्षां श्रीमंत लोकांच्या घरांत द्रव्य फार येतें, तरी त्या सर्व द्रव्याचा उपभोग तेच करितात असें नाहीं. तर तें द्रव्य त्यांजकडे येऊन त्यांच्या हातून दुसऱ्यांस मिळतें. आणि त्यांजपासून हिरावून घेऊन वांटण्याच्या रितीपेक्षां त्यांच्याच हातून वांटलें जाण्याची रीत चांगली.

गरीब लोकांचे इतके हाल होतात ह्यास कारण श्रीमंत लोक आहेत, म्हणजे गरीब लोकांनीं सर्व पदार्थ उत्पन्न करावे आणि श्रीमंतांनीं स्वस्थ बसून त्यांचा आयता उपभोग करावा, ही समजूत अगदीं खोटी आहे, असें इसाप म्हणून जो प्रख्यात विद्वान् ग्रीस देशांत होऊन गेला त्यानें आपल्या ग्रंथांत पोट आणि अवयव ह्यांची गोष्ट कल्पून स्पष्ट दाखविलें आहे.— ती गोष्ट येणेंप्रमाणें आहे.

कोणी एकाकाळीं हात पाय इत्यादि अवयवांनीं विचार केला कीं, आपण मोठा श्रम करून मिळवावें, आणि ह्या पोटानें रिकामें बसून खावें, हें ठीक नाहीं. जिभेनें अवयवांचीं दुःखें तिखट मीठ लावून वर्णिलीं. ती म्हणाली, रे, हे हातपाय खपून जें मिळवितात तें सारें ह्या पोटाकडे जातें. हें पोट कांहींच काम करीत नाहीं, व ह्यापासून आम्हांस कांहीं लाभ नाहीं; असें असतां आम्हीं सर्वदां ह्याची भर करावी, हा आम्हांवर मोठा जुलूम आहे. हें भाषण ऐकून सर्व अवयवांनीं तिची वाहवा केली. हात म्हणाले, इतःपर पोटाकरितां आम्ही कोणत्याही कामास बोट लावणार नाहीं; पाय म्हणाले, ह्या पोटाचें ओझें

आजपर्यंत आम्ही वाहत आलों तें इतःपर वाहणार नाहीं; दांत म्हणाले, त्याच्याकरितां पुढें आम्ही एक दाणाही चावणार नाहीं. हें सर्व बोलणें ऐकून पोट त्यांस म्हणालें, बाबांनो, तुम्ही हें वेडेपण करूं नका, जें करणें तें विचार करून करा. तुम्ही मला जें काय आणून देतां तें मीच भोगितें, असें नाहीं. तुमच्या सर्वांच्या पोषणासाठीं मी जिकडे तिकडे तें वांटून देतें. असें त्यानें सांगितलें, तें फुकट गेलें. कारण कामक्रोधादिकांच्या आवेशापुढें बुद्धीचें कांहीं चालत नाहीं. शेवटीं अवयवांकडून पोटास कांहीं मिळेनासें झाल्यामुळें पोट अगदीं शुष्क होऊन अस्थिपंजर मात्र उरला. मग पोटाकडून अवयवांचें पोषण न घडल्यामुळें तेही अशक्त झाले. अशी त्यांची अवस्था झाली तेव्हां त्यांस पश्चात्ताप होऊन पूर्ववत् पोटाकरितां आपापलीं कामें करण्यास ते राजी झाले; परंतु कांहीं उपाय राहिला नाहीं. ह्या अविचारामुळें मरण येऊन सर्व शरीराचा नाश झाला.

ह्यावरून पहा कीं श्रीमंतानें दुसऱ्याची गरज अगदीं न ठेवितां आपलेच हिताकडे लक्ष दिलें, तरी दुसऱ्याचें हित त्यापासून होतेंच. परंतु दुसऱ्याच्या हिताची इच्छा तो बाळगीत नसला, तर हित झालें तरी त्यांत त्याचा मोठेपणा नाहीं. आतां जे श्रीमंत गृहस्थ, संकटांत पडलेले लोक कोण आहेत, दरिद्रानें व्यापलेले लोक कोण आहेत, हें पाहून द्रव्यादिकेंकरून त्यांस साह्य करितात, ते ह्या क्षणभंगुर नरतनूचा त्याग केल्यानंतर परलोकीं आपणांस चिरकाल सुख प्राप्त होण्याचें साधन आपल्या हातीं आणून ठेवितात. ह्यावरून श्रीमंताच्या घरांत गेलेलें द्रव्य गरिबांकडे कोणत्या तरी प्रकारानें येतें, आणि त्यापासून श्रीमंतास ऐहिक अथवा पारलौकिक सुखाचा लाभ होतो. ही गोष्ट ज्याचें द्रव्य त्याच्या हातून वांटलें जातें म्हणून होते. ह्यावरून आणखी एक गोष्ट सिद्ध होते कीं, संपत्तीचें संरक्षण व्हावें व जुलमानें उगीच कोणीं कोणाचें हरण करूंनये हेंच इष्ट आहे. एरवीं श्रीमंत व गरीब हा भेदच राहताना. श्रीमंतानें गरीबावर कृपा करावी, त्याचा परामर्श घ्यावा, इत्यादि उपदेश श्रीमंतांस करणें हें गरीब आणि श्रीमंत हा भेद नसता तर असंगतच असतें. जी वस्तु ज्या मनुष्याची आहे ती देण्यास अथवा पाहिजे त्या रीतीनें तिचा व्यय करण्यास त्यास

मुखत्यारी नसेल, तर ती त्यानें गरीबास दिली असतां तिचें दान होतें हें म्हणणें असंगतच होईल. पाहिजे त्या रीतीनें व्यय करण्याची मुखत्यारी जर मालकास नसेल, तर तो त्या वस्तूचा मालक असें म्हणणें असंबद्धच होईल. दान ह्या शब्दाचा अर्थ इतकाच आहे कीं जो पदार्थ द्यावयाचा त्याजवर दात्याचें पूर्ण स्वामित्व असलें पाहिजे. त्या पदार्थावर दात्याची मुखत्यारी नसेल तर त्याचें दानच संभवत नाहीं.

ह्याप्रमाणें ज्याची जशी खुशी असेल तसा त्यानें आपल्या द्रव्याचा व्यय करावा, अशी सर्वांस स्वतंत्रता असली, म्हणजे कांहीं लोक केवळ स्वार्थदृष्टीनें आपल्याच उपभोगाकरितां द्रव्याचा व्यय करणारे खचीत आढळतील. अशा प्रकारच्या लोकांचें द्रव्य चाकर, मजूर, व्यापारी, वगैरे असल्या लोकांच्या उपयोगीं पडतें. परंतु आपला पैसा गरीबगुरिबांस मिळावा असा उद्देश नसल्यामुळें लोक त्यांस स्वार्थदृष्टि म्हणतात, व त्यांचा तिरस्कार करितात. तरी कोणाच्या द्रव्याचें हरण करूंनये कोणाशीं कपट करूंनये, व कोणास त्रास देऊं नये, असा नियम आहे त्यांत त्यांचाही संग्रह आहे, म्हणजे त्यांच्याही द्रव्याचें हरण वगैरे करूंनये. तें द्रव्य त्यांनीं परोपकाराकडे न लाविलें तरी तें त्यांचेंच आहे, त्याजवर दुसऱ्याचें स्वामित्व तिलप्रायही नाहीं.

एखादा श्रीमंत गृहस्थ गर्विष्ठ व स्वार्थदृष्टि असा पाहिला असतां आपणास वाटतें कीं, त्या गृहस्था इतका संपन्न मी झालों तर संपत्तीचा व्यय फार उत्तम रीतीनें करीन. आपण कदाचित् तसें करूं, नाहींच असें म्हणतां येत नाहीं; परंतु आपण त्या गृहस्थाइतके संपन्न असलों तर चांगल्या रीतीनें वागूंच, ह्या विषयीं उत्तम प्रमाण म्हटलें म्हणजे आपल्या स्थितीच्या प्रमाणानें आपण तसें वागून दाखविणें हेंच होय. ईश्वरानें मनुष्यांस निरनिराळ्या स्थितींत ठेवून निरनिराळीं कर्में लावून दिलीं आहेत. आणि तो सर्वांच्या पापपुण्याचा निवाडा करील, तो तरी, अमुक मनुष्य अमुक स्थितींत असता तर किती पापपुण्य करिता, हा विचार करून करणार नाहीं, तर तो ज्या स्थितींत होता त्या स्थितींत जें पुण्यपाप त्यानें केलें असेल त्यावरून करील.

---

## भांडवला विषयीं.

श्रीमंत गृहस्थ आपल्याच खर्चाकडे सालीना दोन हजार रुपये लावीत असला, तर तो त्या देशांतील दोन हजार रुपयांची संपत्ति कमी करितो, अथवा नाहींशी करितो, असें नाहीं; तर तो जेवढें कांहीं खातो व वापरतो तेवढी संपत्ति मात्र नाहींशी करितो, असें मागें स्पष्ट दाखविलेंच आहे. बाकीची संपत्ति त्याचे चाकर लोक व मजूर लोक असतात त्यांस तो देतो. मग कदाचित् अन्नवस्त्र देतो, किंवा त्यांस पाहिजे तें घेण्याकरितां रोजमुरा देतो; मिळून तात्पर्य एकच. ज्या लोकांपासून चाकरी घेऊन तो पैसा देतो त्यांस घरींअगदीं रिकामें बसावयास सांगून तितका पैसा त्यानें दिला, तरी देशांत अन्नवस्त्र जास्ती व्हावयाचें नाहीं. इतकेंच कीं, त्या लोकांस पोटाला मिळविण्याची काळजी नाहींशी होऊन ते रिकामे घरांत बसतील, अथवा गांवांत गप्पा मारीत फिरतील; परंतु नवीन संपत्ति मिळविण्याचा उद्योग करणार नाहींत.

त्यांस रिकामें बसावयास न सांपडतां उद्योगांत काळ घालवावा लागतो, हें त्यांस फार हितावह आहे. आतां त्यांचा उद्योग म्हटला म्हणजे बागबगिचे बनवावे, अथवा धन्याच्या मर्जीप्रमाणें एखादी हवेली उठवावी, अशाच प्रकारचा असला तरी कांहींच न करण्यापेक्षां हा फार बरा.

परंतु श्रीमंत लोक जो पैसा मजूर लोकांकडे खर्चितात तो बहुतकरून एखादें नफा होण्याचें काम पाहून त्यांतच खर्चितात; म्हणजे, जें काम करण्यापासून कांहीं दिवसांनीं खर्चिल्यापेक्षां त्यांस अधिक उत्पन्न होतें. ह्याप्रमाणें नेहमीं द्रव्य वाढत जाऊन देशांतील एंकदर संपत्ति वाढते. ह्यावरून पहा कीं, बागबगिचे बनविण्याकरितां, अथवा बंगले, हवेल्या बांधण्याकरितां मजूर लोक न लावितां धान्य उत्पन्न करण्याकरितां किंवा कापड विणण्याकरितां लाविले, तर त्यांत मालकास जितका खर्च करावा लागला असेल तितक्यापेक्षां अधिक उत्पन्न होईल. तें शहाणपणानें लक्ष ठेवून मात्र चालविलें पाहिजे; म्हणजे बागा व बंगले ह्यांच्या कामांत घातलेला पैसा परत होत नाहीं, तसें न होतां

शेतभातांत घातलेला पैसा कांहीं तरी वृद्धि होऊन तिजसुद्धां मालकास परत येतो. ह्या वृद्धीच्या पैशास नफा म्हणतात, व मुद्दल घातलेल्या पैशास भांडवल म्हणतात.

अशा रीतीनें आपला पैसा घालणारा जो मनुष्य त्याचा पैसा त्याज-कडे परत आला कीं तो पुन्हा तशाच कामांत घालितो, म्हणजे वर्षानु-वर्ष मजूर लोकांचें पोषण होऊन त्याचा पैसा फिरता राहून तो वाढत असतो. आणि दरवर्षी तो मनुष्य आपल्या नफ्याचा कांहीं हिस्सा आपल्या भांडवलांत घालीत गेला, तर दरसाल जास्ती मजूर लोक ठेवून स्वदेशांतील संपत्ति वाढवीत जाईल. अशा रीतीनें संपत्ति वाढविणा-ऱ्याच्या मनांत कदाचित् स्वदेशाविषयींचा विचार नसतो, तर आपली संपत्ति वाढविण्याचाच असतो, तरी त्याची वाढली म्हणजे देशाची वाढलीच. आणि देश संपन्न करण्याचा उत्तम व खातरीचा मार्ग म्हटला म्हणजे हाच होय. देशांत जो मनुष्य दुसऱ्याची संपत्ति कमी नकरितां आपल्या संपत्तींत जास्ती भर जितकी घालितो तितकी तो आपल्या देशांत जास्ती संपत्ति वाढवितो, हें उघडच आहे. कधीं कधीं असें होतें कीं एकाची संपत्ति जाते आणि दुसऱ्यास ती मिळते; तर असें झालें असतां देशाची संपत्ति कांहींच वाढली नाहीं. भिक्षा मागून, अगर जुवा खेळून, अथवा चोरी करून जितकें द्रव्य एखादा कोणी मनुष्य मिळवितो तितकेंच द्रव्य दुसऱ्या कोणाचें कमी होतें. परंतु शेतकीच्या कामांत, कापडाच्या कामांत, खाणी खणण्याच्या कामांत चातुर्य असल्यामुळें जितका पैसा एखाद्यास मिळतो, तितका देशाच्या संपत्तींत वाढतो; कारण तो कोणाचा नाहींसा होऊन ह्याजकडे येतो असें नाहीं.

पुष्कळ लोक वर सांगितलेल्या कामांत द्रव्य घालितात. ते जातीनें तीं कामें करितात असेंच नाहीं, तर जे लोक तीं कामें करितात त्यांस कर्जाऊ पैसा देतात. पहा, कोणी एक मजूर आहे, त्याला त्याच्या बापानें पांचशें रुपये ठेविले आहेत, अथवा त्यानेंच आपल्या मिळकतींतून मागें टाकिले आहेत. आणि तो पैसा व्यापारांत घालून नफा कोणत्या रीतीनें करून घ्यावा हें त्यास माहीत नाहीं असें आहे. तो पैसा तो मनुष्य बंदोबस्तानें पेटींत घालून आपल्या मुलाकरितां ठेवील, तर

त्याच्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत त्यापासून त्यास कांहीं सुख होणार नाहीं. आणि पंचवीस तीस वर्षे गेल्यानंतर त्याची पेटी उघडून पाहतील तर त्यांस पांचशांचे पांचशेंच मिळतील. बरें, तो मनुष्य जर दरसाल पंचवीस रुपये खर्चीकरितां काढील तर वीस वर्षांच्या अंतीं त्याचा सर्व पैसा संपून जाईल. परंतु एखाद्या कारखानदारापासून जामीन वगैरे बंदोबस्त करून घेऊन त्यास ते पांचशें रुपये दिले असतां मुदलास अगदीं धक्का न लागतां बारा आणे शेंकडा प्रमाणें व्याज म्हटलें तरी दरसाल ४५ रुपये त्यास व्याजाचे मिळतील. तो कारखानदार कोष्टी असला, तर सूत किंवा रेशीम वगैरे सामान विकत घेईल, व कापड विणण्याकरितां माणसें चाकरीस ठेवून कापड तयार करील. त्या कापडापासून त्यास वर्षाच्या अंतीं खर्चवेंच भागून सुमारें ६०० रुपये मिदान मिळतील. त्यांतून ४५ रुपये व्याजाचे जाऊन मुद्दल रुपये खेरीज करून खुद्द त्यास ५५ रुपये मिळतील, अशा रीतीनें उभयतां-सही लाभ आहे.

व्यापार व मोठमोठे कारखाने ह्यांत लोकांनीं जें बहुत द्रव्य घातलें आहे तें त्यांचें खासगतच आहे असें नाहीं. तर मागें सांगितल्या प्रमाणें व्याजानें घेऊन घातलें आहे. व्यापाऱ्याचें खासगत द्रव्य असतें असें थोडें.

देशांत भांडवल जितकें अधिक असेल तितकें मजूर लोकांस चांगलें. कारण, कारखानदारांपाशीं भांडवल पुष्कळ असलें म्हणजे त्यांस पुष्कळ मजूर लोक चाकरीस ठेवितां येतात, व ठेविलेल्या लोकांस वेतन मिळण्याचा भरंवसा असतो. आणि भांडवल थोडें असलें तर त्यांस पुष्कळ मजूर ठेवितां येत नाहींत, व ठेविलेल्यांस वेतन मिळेलच असा नेम नसतो.

ज्यांत नवीन वसाहत झाली आहे असा देश उदाहरणाकरितां घेऊं. त्या देशांत एक मनुष्य आपली जमीन नांगरण्याकरितां दुसऱ्या मनुष्यास मदतीस बोलावून त्यास आपल्या जमिनींत जें उत्पन्न होईल त्यांतलें निमें देण्यास कबूल झाला, तर दुसरा मनुष्य कदाचित् म्हणेल कीं, बाबा, माझा रोजचा चरितार्थ चालण्याला मजपाशीं कांहीं नाहीं; ह्यास्तव मला तूं आपली जमीन नांगरण्यासाठीं ठेवीत असलास, तर माझ्या मजुरीचें काय देणें तें रोजच्यारोज दिलें पाहिजे. परंतु चाकरीस ठेवणाऱ्यापाशीं जर फक्त आपल्या पुरतीच

बेगमी आहे, आणि मजुरास देण्यापुरतें भांडवल नाहीं, असें असलें, तर धान्य जमिनींतून उत्पन्न होईपर्यंत त्याच्यानें मजुरास कांहीं देवव-णार नाहीं. त्यामुळें त्याच्या मदतीस मजूर न मिळून त्याची अर्धी जमीन पड राहील. जो मनुष्य, मी मजुरीस येत नाहीं, असें म्हणेल त्याला कंदमूळ, फळें, अथवा एखादा भक्ष्य पशु निर्वाहाकरितां मिळवावा म्हणून रानावनांत फिरलें पाहिजे. देश कसाही सुपीक असो, परंतु त्यांतल्या लोकांजवळ कोणतेंही काम चालविण्याकरितां भांडवल नसलें, तर आरंभीं कोणतेंही काम चालवायास वर लिहिल्याप्रमाणें मोठ्या अडचणी पडतात, आणि त्या अडचणींपासून त्यांचे फार दिक्क हाल होतात. बेताबातानें चालून एकदां थोडेंसें भांडवल अथवा संपत्ति त्यांनीं मिळविली, म्हणजे पुढें जास्ती मिळविण्यास त्यांस सोपें पडतें.

संपत्तीपासून संपत्ति मिळते, म्हणजे भांडवलाच्या रूपानें संपत्ति पूर्वीं कारखान्यांत घालावी तेव्हां कारखाना चालतो, एरवीं चालतच नाहीं. उदाहरण, धान्य उत्पन्न होतें तें श्रमापासून होतें, परंतु तो श्रम करणाऱ्यास धान्य उत्पन्न होईपर्यंत पोसण्यासाठीं व जमिनींत पेरण्या-साठीं धान्य पूर्वीं जवळ असलें पाहिजे. ज्या हत्यारांनीं मनुष्य काम करितो तीं दुसऱ्या हत्यारांपासून केलेलीं असतात. ज्या कुऱ्हाडीनें तो लांकडें तोडितो त्या कुऱ्हाडीचा दांडा लांकडाचाच असतो; कुऱ्हाडीचें लोखंड पाहिलें असतां खाणींतून लोखंडाच्याच हत्यारांनीं तें काढिलें असतें, आणि बहुतेक सर्व पदार्थांचें ह्याच प्रमाणें आहे. ह्यावरून आरंभीं ज्यावेळेस हत्यारें पात्यारें नव्हतीं त्यावेळेस लोकांस कोणतेंही काम करण्यास किती श्रम पडले असतील, आणि किती काळ लागला असेल, हें सर्वांनीं मनांत आणावें. त्यांस हत्यारांचीं कामें हातांनीं, लांकडांनीं, अथवा धोंड्यांनीं करावीं लागत असत.

ह्यावरून दिसतें कीं ज्या देशांत भांडवलाची कमताई असते त्या देशांत लोकसंख्या कमी असून तेथील लोक अन्नवस्त्रासाठीं फार खपत असले तरी त्यांस तें पुरतें मिळत नाहीं, व राहण्यास घर चांगलें मिळ-त नाहीं. आणि देशांत भांडवल पुष्कळ असलें म्हणजे त्यांत लोक पुष्कळ असून ते अन्नवस्त्राकरितां फार श्रम करीत नसले तरी त्यांस अन्नवस्त्र, घरदार ह्यांची कमताई नसते.

शेतकरी लोक मजूर व बैल ह्यांस पोसण्याकरितां पैसा अथवा अन्न-वस्त्र वगैरे जें खर्चितात तें, व कोष्टी लोक आपल्या विणणाऱ्यास जो रोजमुरा देतात तो, ह्यांस फिरतें भांडवल म्हणावें; कारण, तें नेहमीं त्या लोकांस आपणाजवळचें देत असतात, आणि धान्य अथवा वस्त्र ह्या रूपानें तें भांडवल त्यांजकडे परत येत असतें. शेतकऱ्याचे नांगर, गाडे, बैल, व धान्य ठेवण्याचीं कोठारें, आणि कोष्टयाचे माग व कापड ठेवण्याच्या वखारी ह्यांस स्थिर भांडवल म्हणावें. कारण, हे पदार्थ यजमानाच्या हातून दूर न जातां त्यांजपासून त्यास नफा होत असतो.

पुष्कळ माणसांचें काम थोड्या माणसांच्या हातून होण्यास साधक एखादें नवीन हत्यार अथवा यंत्र निघून तें व्यवहारांत आलें असतां प्रथमतः कितीएक लोकांस उद्योग नाहींसा होतो; परंतु पुढें त्यापासून पुष्कळ लोकांस उद्योग मिळतो. उदाहरण, छापण्याची युक्ति प्रथमतः निघाली तेव्हां जे लेखक पोथ्या वगैरे लिहून उपजीविका करीत असत त्यांचा उद्योग बुडाला. कारण, चार पांच छापखानेवाले हजारोंहजार लेखकांचें काम करूं लागले. परंतु कांहीं दिवस गेल्यानंतर पुस्तकें फार स्वस्त झाल्यामुळें तीं विकत घेणारे लोक फार झाले. त्यामुळें पूर्वी जितके लेखक होते तितक्यांच्या शेंकडोंपट लोकांस उद्योग लागून ते छापखान्यावर पोट भरूं लागले. आणि कोणत्याही यंत्राची गोष्ट बहुतकरून अशीच आहे.

व्यापारांत भांडवल घालण्याचा एक प्रकार आहे त्याविषयीं लोक फार कुरकूर करितात; त्या प्रकारापासून आपली हानि होते असें ते समजतात. परंतु वास्तविक पाहिलें असतां त्यापासून लोकांस जसा उपयोग घडतो तसा दुसऱ्या थोड्याच प्रकारांपासून घडतो. धान्य वगैरे खाण्याच्या जिनसांचा व्यापार करणारे लोक ते जिन्नस स्वस्त होण्याची संधि पाहत असतात, आणि स्वस्त झाले म्हणजे त्यांची खरेदी करून ते नफ्यानें विकितां यावे म्हणून ते महाग होत तोंपर्यंत तसेच राखून ठेवितात. आतां, धान्य महाग झालें म्हणजे, महागाईचें कारण दाणेवालेच आहेत, असें समजून अविचारी लोक त्यांच्या नांवानें उगीच हाका मारितात. परंतु खरोखर पाहिलें असतां, धान्य कमी पिकून दुकाळ पडला तर त्यांत लोकांचा बचाव ते दाणेवालेच

करितात, असें दिसतें. दाणेवाल्यांची तशा प्रसंगीं लोकांवर परोपकार करण्याची बुद्धि असते असें नाहीं; तर इतर व्यापाऱ्यांप्रमाणेंच ते आपण दाण्याच्या खरेदींत घातलेल्या भांडवलावर नफा मिळविण्याच्या बुद्धीनें विचार करीत असतात. धान्य स्वस्त झालें म्हणजे तें घ्यावें, आणि महाग झालें म्हणजे विकावें, अशी त्यांची रीत आहे. हिजपासूनच ज्या वर्षी धान्याची समृद्धि असते त्या वर्षीचें धान्य ज्या वर्षी त्याची न्यूनता असेल त्या वर्षी उपयोगीं पडावें असें अर्थात होतें. म्हणजे धान्य पुष्कळ असलें म्हणजे लोकांनीं पाहिजे तशी नासधूस करावी, आणि कमी झालें म्हणजे दुकाळांत मरावें, असें होत नाहीं; आणि थोडें धान्य पुष्कळ दिवस पावेतों पुरतें. हें सर्व दाणेवाले असल्यामुळेंच होतें, एरवीं होत नाहीं.

गलबतांत बसून सफर करणाऱ्या लोकांस अशा प्रकारचे प्रसंग वारंवार पडतात. म्हणजे एखादे वेळेस त्यांच्या गलबतांत धान्याची सामग्री तीनवार पावेतों पुरण्यासारखी असून मुकामास जाऊन पोहोंचण्यास एक महिना लागेल असें धोरण असतें. तेव्हां गलबतावरचा मालीम सर्व लोकांस नेहमींप्रमाणें शेरभर धान्य नदेतां पाऊणशेर देतो, आणि प्रत्येकाचा पावशेर शिलक ठेवून चवथ्या आठवड्या पुरतें धान्य शिलक पाडितो. परंतु पाऊणशेर धान्यानें आमचें पोट भरत नाहीं, तर आम्हांस शेरभर धान्य द्यावें, असाच आग्रह धरून सर्व लोक मालिमाशीं दांडगाई करतील, तर तीनवारांच्या अंतीं सर्व धान्य संपून ते उपाशीं मरतील. देशाचीही गोष्ट अशीच आहे; म्हणजे धान्य कमी पिकलें असतां लोक नेहमीं प्रमाणें त्याचा खर्च करतील, तर अखेरीस ते उपाशीं मरतील.

एखादे देशामध्यें पावसाच्या कमताईमुळें धान्य केवळ नऊ महिन्यां पुरतेंच पिकलें, आणि लोक धान्याचा खर्च नेहमीं प्रमाणेंच करीत गेले, तर अखेरच्या तीन महिन्यांस धान्य मुळींच न उरून मोठा दुष्काळ पडेल, आणि लोक उपाशीं मरतील हें स्पष्टच आहे.

गलबतांवरच्या लोकांस कमी धान्य देऊन बंदोबस्त करण्यास मालीम असतो तसा सर्व देशांत बंदोबस्त करणारा कोणी नसतो आणि सर्व देशाच्या हिताकरितां हरएक मनुष्य आपला थोडथोडा आहार

कमी करण्यास कबूल होईल असा संभवही नाहीं. धान्याचा भाव नेहमीं प्रमाणें असला तर सर्व लोकही नेहमीं प्रमाणेंच खर्चीत जातील, आणि अखेरीस कांहीं उरणार नाहीं. परंतु धान्याचा तोटा येईल असें दिसलें, म्हणजे शेतकरी, दाणेवाले, व दुसरे कितीएक व्यापारी हे धान्याला चांगला दर आला म्हणजे विकूं, अशा बुद्धीनें अवळचें धान्य राखून ठेवितात, आणि स्वदेशांत व परदेशांत आणखी मिळाल्यास विकत घेतात; आणि कमताईच्या मानानें त्यांस ज्यास्ती किंमत मिळाल्याशिवाय ते आपलें धान्य मुळींच विकत देत नाहींत; त्यामुळें महागाई फार होऊन लोक धान्य कमी खर्चूं लागतात. तेणें करून गलबता वरच्या प्रमाणेंच सर्व देशांमध्यें दुसऱ्या सालचें धान्य पिके पर्यंत तेंच धान्य पुरवतें; आणि सर्वांनीं थोडथोडे हाल सोस-ल्यामुळें दुष्काळापासून सर्वांचाच बचाव होतो.

ह्या वरील गोष्टीवरून पाहतां जगत्कर्त्याची योजना अशी अद्भुत दिसते कीं मनुष्य केवळ स्वलाभाच्या दृष्टीनें जो उद्योग करितात तो सर्व लोकांस लाभप्रद होतो. ही गोष्ट दाणेवाल्यांच्या व्यापारांत घडते तशीच बहुतेक सर्व व्यापारांत घडते. व्यापारांत पाहिजे त्या रीतीनें भांडवल घालण्याविषयीं हरएक मनुष्यास मोकळीक असली म्हणजे त्याच्या करण्यापासून बहुधा लोकांचें हित होतेंच. मग त्याचा लोक-हित करण्याचा उद्देश नसला तरी तें झाल्याशिवाय राहत नाहीं.

---

## सरकार देणें ह्याविषयीं.

याहुदी लोकांविषयीं एक चमत्कारिक गोष्ट लिहिली आहे. ते आपल्या शहराला तट बांधीत असतां त्यांजवर शत्रूंनीं अशी गर्दी करावी कीं त्यांस सर्वकाळ हत्यारबंद होऊन सावध रहावें लागत असे. शत्रु कोणत्यावेळेस चालून येऊन अकस्मात् हल्ला करतील कोणजाणे, अशा भीतीनें सर्व लोक एका हातानें तटबंदीचें काम करीत आणि दुसऱ्या हातानें हत्यार धरीत. अशा रीतीनें एका माणसाचें काम करण्यास दोन माणसें लागलीं, हें स्पष्टच आहे. परंतु त्यांनीं शत्रूंचें निवारण करण्यासाठीं ही अडचण पतकरेली.

आशिया खंडांतील किती एक देशांची स्थिति अद्यापि अशीच आहे. त्यांत लुटारू लोक लुटण्याच्या हेतूनें चोहोंकडे नेहमीं फिरत असतात, त्यांची भीति लोकांस अशी असते कीं हत्यारबंद असून सावध असल्याखेरीज आपला बचाव होईल असा भरंवसाच नसतो. तिकडे फिरलेले लोक असें सांगतात कीं, शेतकरी जमिनींत बीं पेरण्यास निघाला म्हणजे आपलें बीं कोणीं लुटून नेऊं नये म्हणून तो आपणाबरोबर एक असामी हत्यारबंद घेतो. ह्यामुळें असल्या ठिकाणीं जमिनीची लागवड करणें म्हणजे मोठ्या प्रयासाचें व खर्चाचें काम आहे; कारण एका असामीच्या कामाला दोन असामी लागतात, म्हणजे एक असामी पेरण्याला आणि दुसरा असामी एखादा शत्रु आला असतां त्या बरोबर लढण्याला. त्या देशांतलें उत्पन्नही दोन असामी मेहनत करणारे असल्यामुळें अर्थात दोघांस अर्धें अर्धें मिळतें. जर लुटीचें भय नसतें तर सगळें उत्पन्न एकासच मिळतें. इतकें करूनही लोकांच्या मालमत्तेचें रक्षण म्हटलें म्हणजे सरासरीच होतें. कारण, एखाद्या वेळेस असें होतें कीं लुटारू लोकांच्या मोठमोठ्या टोळ्या येऊन मालकास हाणमार करून त्याची सर्व मालमत्ता लुटून नेतात. अशी स्थिति असल्यामुळें त्या देशांत अगदीं थोड्याशा जमिनीची लागवड होऊन बाकीची पड राहते. लोकवस्ती म्हटली तर ज्या प्रदेशाचे उत्पन्नावर वीस लाख लोकांचा निर्वाह होण्यासारखा आहे त्या प्रदेशांत एक लाख देखील लोक नसतात, इतकी कमी असते; व त्यांस देखील अन्न असलें तर वस्त्र नसतें, आणि वस्त्र असलें तर अन्न नसतें, असें त्यांला दारिद्र्य असतें. हें सर्व मालमत्तेचें संरक्षण बरोबर होत नसल्यामुळें होतें. ज्या देशांतले लोक रानटी असतात त्या देशांतली स्थिति अशीच असते, तेथें माणसाचा बहुतेक सर्व काळ आपलें रक्षण कसें करावें ह्या काळजींत आणि रक्षणाच्या तजविजी करण्यांत जातो. ज्यांजबरोबर लढण्याची त्यास हिंमत असते, त्यांजबरोबर लढण्यासाठीं तो हत्यारें जमवितो, आणि जे त्यास भारी असतील त्यांच्या हातीं नलागावें म्हणून लपून राहण्यास जागा पाहतो. न्यूजीलंद नांवाच्या बेटांत किती लोकांनीं एकत्र जमून एखाद्या उंच टेंकडीवर खोपटीं बांधावीं आणि शेजारच्या लोकांनीं आपणावर चालून

येऊं नये म्हणून टेंकडी सभोंवतीं खंदक खणून मेढी पुराव्या असा बंदोबस्त करावा लागतो. इतका बंदोबस्त केला असतांही त्यांजवर केव्हांकेव्हां अकस्मात् घाले पडतात. अशा देशांत लोकसंख्येच्या मानानें आणि दुसऱ्या देशाच्या तुलनेनें पाहिलें असतां दरसाल पुष्कळपट लोक अधिक मारिले जातात; कारण त्यांत दंगे धोपे फार होतात. तेथले लोक गरीबच असतात ह्यामुळें मालमत्ता फार थोडी असते, तेव्हां अर्थातच माणसें मारलीं जातात त्याप्रमाणें मालमत्तेचा नाश होत नाहीं. त्यांचा अर्धा अधिक काळ आपल्या रक्षणाचे उपाय करण्यांत जातो, आणि इतका काळ जाऊनही रक्षण चांगलें होत नाहीं, त्यामुळें आपल्या श्रमाच्या फळाचा उपभोग आपणांस घडेलच असा भरंवसा त्यांस तिळमात्र नसतो; तेव्हां मालमत्ता त्यांजपाशीं जमावयाचा विशेष संभव नसतो.*

अशा प्रकारच्या बंडाळीचा बंदोबस्त व्हावयास सरकार आवश्यक आहे. सरकारचें काम हेंच कीं रयतेचें संरक्षण करावें, म्हणजे रयतेमध्यें कोणी कोणावर जुलूम करूं नये, व कोणीं कोणाशीं कपट करूं नये, असा बंदोबस्त ठेवावा. असा बंदोबस्त ठेवण्यासाठींच सरकार समुद्रावर मोठमोठीं आरमारें व जमिनीवर फौजा ठेवितें, आणि त्यांच्या हातून परचक्र, चांचे लोक, लुटारू, व बंडवाले ह्यांचा बंदोबस्त करितें. चोर, चहाड, भामटे, उचले, वगैरे लोकांस पकडून शिक्षा करण्याकरितां चौकीदार, हवालदार, नायबफौजदार, फौजदार, असे अधिकारी नेमितें; लोकांच्या देण्या घेण्याच्या खटल्यांच्या चौकशी करितां अमीन, सदरअमीन, जज्ज, वगैरे अधिकारी नेमितें; कैदी लोकांस ठेवण्याकरितां तुरुंग बांधितें; सारांश, रयतेच्या सुखाकरितां आणि बंदोबस्ताकरितां जें जें आवश्यक आहे तें तें करितें.

फौज फांटा, आरमारें, कोर्टें, वगैरे सर्व गोष्टींबदलचा खर्च सरकारास रयतेपासून मिळतो. आणि रयतेच्या कल्याणासाठीं ह्या गोष्टी होतात म्हणून त्यांचा खर्च रयतेनें द्यावा हें रास्तच आहे. रयत लोक अनेक प्रकारचें सरकारदेणें देतात, तें सरकार आपलें पालन वगैरे

---

* न्युझीलंडाची गोष्ट अलीकडे बदलून पुष्कळ बंदोबस्त तेथें झाला आहे.

करितें म्हणूनच देतात. मागें लिहिल्याप्रमाणें आशिया खंडांतच किती एक देशांमध्यें लोक शेत पेरतेवेळीं आपणा बरोबर हत्यारबंद असामी घेऊन जाऊन त्यास आपल्या शेताच्या उत्पन्नाचा कांहीं हिस्सा ज्याप्रमाणें देतात, त्याप्रमाणेंच हें सरकारदेणें होय.

किती एक लोकांस ही गोष्ट समजत नाहीं. त्यांस वाटतें कीं, सरकार देण्याचा खर्च हा इतर खर्चाप्रमाणें नव्हे, तर अगदीं व्यर्थ आहे. ते सरकारदेणें देतात त्यांस ह्याबद्दल कितीएक गोष्टी मिळतात, हें त्यांच्या ध्यानांत मुळींच येत नाहीं. परंतु वास्तविक विचार करून पाहतां, एक पदार्थ देऊन त्याच्या मोबदला दुसरा घ्यावा, ह्या प्रमाणेंच कर देऊन त्याच्या मोबदला दुसऱ्या कितीएक गोष्टी घ्याव्या, हें होय. सर्व लोक दाणा, तेल, तूप, वगैरे ह्यांबद्दल भुसारी व वाणी ह्यांस पैसा देतात आणि कापडाबद्दल कापडकऱ्यास पैसा देतात; तसाच आपणांस कोणीं लुटूं नये, मारूं नये, फसवूं नये, म्हणून सरकार बंदोबस्त करितें, त्या बद्दल त्यास देतात. हा बंदोबस्त सरकाराकडून नसला, तर लोकांस निमें काळ अन्नाच्छादन मिळविण्याकडे, आणि निमें काळ त्या अन्नाच्छादनाच्या संरक्षणाकडे, अथवा त्याचें रक्षण करण्याकरितां ठेवलेल्या मनुष्याचे अन्नवस्त्राची तजवीज करण्याकडे घालवावा लागेल. सरकारदेण्यापेक्षां हें देणें फार पडेल, व त्यास मेहनतही फार पडेल. इतकें पडूनही लोकांचें संरक्षण कितपत होईल, हें मागें रानटी लोकांचें उदाहरण लिहिलें आहे त्यावरून स्पष्टच आहे. देशांमध्यें मुळींच सरकार नसण्यापेक्षां कसेंही वाईट सरकार असलें तरी तें फार बरें. आणि तें नसतां जो लोकांस खर्च पडतो त्यापेक्षां तें वाईट सरकार असलें तरी थोडा खर्च पडून जास्ती काम होतें. प्राचीनकाळीं रोमन लोकांत किती एक बादशाह अत्यंत दुष्ट होऊन गेले, त्यांनीं नाहक सहस्रावधि लोकांस मारावें, व सहस्रावधि लोकांस लुटावें, असें चालत असे. तरी त्यांच्या राज्यांतील लोकांच्या संख्येच्या मानानें न्युजीलंद वगैरे बेटांतील रानटीलोकांत एका वर्षामध्यें जितके लोक लुटिले व मारिले जातात, तितके लोक त्यांच्या राज्यांत दहा वर्षांमध्यें लुटिले व मारिले जात नव्हते.

मागील लेखावरून लक्षांत येईल कीं, सरकारास बंदोबस्त करण्याबद्दल जें देणें तें शिपायास चाकरीबद्दल पगार द्यावा, अथवा व्यापाऱ्यापासून एखादा जिनस घेऊन त्यास त्याची किंमत द्यावी, त्याप्रमाणेंच होय.

परंतु दुसऱ्या देण्यामध्यें आणि सरकार देण्यामध्यें हा मोठा भेद आहे कीं, दुसरें देणें मनुष्याच्या खुशीवर आहे, आणि सरकार देणें हें मनुष्यास नाप्राप्त आहे, म्हणजे मनुष्यानें आंगरखा शिंप्याकडे न टाकितां तो घरींच शिवला, अथवा मुळींच आंगरख्यावांचून निर्वाह केला, तर त्यास शिंप्याला दाम द्यावा लागणार नाहीं. दुसऱ्याही बहुतेक सर्व गोष्टींचें असेंच आहे. आणि असें करण्यास तो मुखत्यार आहे. परंतु सरकारास देणें हें मनुष्याच्या खुशीवर नाहीं, तें दिलेंच पाहिजे. एखादा मनुष्य जर म्हणेल कीं, माझ्या शरीराचें व मालमत्तेचें संरक्षण मीच करीन; फौज फांटा, आरमार, न्यायाधीश, वगैरे ह्यांपासून जो बंदोबस्त होतो त्याची मला गरज नाहीं, व त्याबद्दल मी सरकारास कांहीं देणार नाहीं; तर त्यास उत्तर हेंच कीं, तूं येथून निघून जाऊन एखाद्या अरण्यांत किंवा जेथें राजरक्षण नाहीं अशा एखाद्या देशांत रहा, आणि मग पाहिजे तसें कर. परंतु येथें रयतेस राजाचें रक्षण आहेच, ह्यास्तव तूं येथें आहेस तोंपर्यंत, राजापासून आपलें रक्षण व्हावें, अशी इच्छा तुला असो अगर नसो पण तुझें रक्षण होतेंच, आणि त्याबद्दल तुला सरकारदेणेंही दिलेंच पाहिजे. समुद्रावर आरमारें ठेवून ह्या देशावर परचक्र येऊं नये म्हणून जो बंदोबस्त केला आहे त्यापासून इतर लोकांचें संरक्षण होतें तसेंच तुझेंही होतें, कायदाकानू व फौजदार वगैरे अधिकारी, ह्यांच्या योगानें चोर, मारेकरी वगैरे लोकांपासून येथील इतर लोकांचें संरक्षण होतें तसें तुझेंही संरक्षण होतें. कायदा वगैरे नसतें तर चोरांनीं सर्वांस त्रासवून सोडिलें असतें. तूं ह्या देशांत आहेस तोंपर्यंत तुझेंच संरक्षण करण्याची इच्छा ह्या सरकारास असो अगर नसो, तरी त्याकडून तें होतेंच. तसेंच ह्या सरकारास बंदोबस्ताबद्दल खर्च देण्याची इच्छा तुला असो अगर नसो पण तो तुजपासून घ्यावा हें रास्तच आहे. आतां, हें आपणास पतकरतच नाहीं, असें तुला वेडेपणानें वाटत असलें, तर तूं हा देश

सोडून जाऊन एखाद्या अरण्यांत रहा, म्हणजे तेथें तुला सरकार देणें द्यावें लागणार नाहीं.

ह्यावरून समजावें कीं जोंपर्यंत कोणी मनुष्य एखाद्या देशांत राहतो तोंपर्यंत त्यानें तेथल्या सरकारास वश होऊन रहावें, व त्या सरकारचें देणें द्यावें, हें रास्तच आहे. आतां, प्रत्येकानें किती द्यावें, हें सरकार ठरवितें. सरकार देणें हें इतर मनुष्यांपासून चाकरी वगैरे घेऊन त्यांस वेतन देण्याप्रमाणेंच आहे, असें मागें लिहिलें आहे; परंतु त्यांत एक मोठा भेद आहे. तो हा कीं, कोणा मनुष्यास एखादा चाकर ठेवावयाचा असल्यास, तो त्या चाकराशीं बोली करितो; आणि त्या बोलींत त्याचें जमलें तर त्यास ठेवितो, नाहीं तर दुसऱ्यास ठेवितो. परंतु सरकारची गोष्ट निराळी आहे. सरकार राजा असो, राणी असो, हल्लीं गवर्नर आहेत तसें असो, किंवा पार्लमेंतासारखी मंडळी असो, तरी सरकार म्हटलें म्हणजे त्यास सर्व रयतेवर हुकूम करण्याचा व तो बजाविण्याचा अखत्यार असला पाहिजे; नाहीं तर रयतेचें संरक्षण त्याचे हातून होणारच नाहीं. ह्याकरितांच आपल्या संरक्षणाबद्दल सरकारास काय द्यावें हें ठरविण्याचें दरएक मनुष्याच्या इच्छेवर नाहीं, तर तें सरकारच ठरवितें, आणि रयतेपासून घेतें.

देशाचें संरक्षण करण्यास जितका खर्च वास्तविक लागतो त्यापेक्षां पुष्कळ अधिक पैसा रयतेपासून घ्यावा असें मागें सांगितलेल्या अखत्याराच्या जोरावर कितीएक सरकारें करितात. इंग्लंद वगैरे कितीएक देशांत अशी गोष्ट होत नाहीं; कारण तेथील रयत लोक आपले प्रतिनिधि पार्लमेंत म्हणून जी सभा आहे तींत पाठवितात. ते प्रतिनिधि रयतेवर कर वगैरे बसविण्याच्या व कायदे करण्याच्या बाबतींत जसें मत देतात तसाच ठराव होतो. तो अर्थात् रयतेच्या इच्छेप्रमाणेंच होतो.

देशाच्या रक्षणास जितकें द्रव्य अवश्य लागतें त्यापेक्षां अधिक सरकारानें रयतेपासून घेऊं नये, व रयतेपासून घेतलेल्या द्रव्याचा उधळेपणानें रिकामा खर्च सरकारानें करूं नये, ह्याचा बंदोबस्त करणें हें रास्त आहे. तरी सरकाराच्या अमलांत राहिल्यानें आपलें संरक्षण होऊन सर्व प्रकारें हित होतें, त्याबद्दल लोकांनीं त्या सरकारचे उपकार मानावे,

ते कितीएक लोक मानीत नाहींत. कारण जेथें सरकार नाहीं तेथल्या लोकांचे हाल किती होतात, व ते विपत्ति किती भोगीत असतात हें त्यांस समजत नाहीं, व ते कधीं ह्याचा विचारही करीत नाहींत. मनुष्यें द्रव्य देऊन अनेक पदार्थ विकत घेतात त्यापेक्षां राजरक्षणाची योग्यता पाहिली असतां तें मनुष्यास फार स्वस्त पडतें. मनुष्यें आपापलें रक्षण करूं लागलीं तर त्यांस अतोनात खर्च पडूनही तसें रक्षण होणार नाहीं. कोष्ट्यापासून कापड व कासारापासून भांडीं हीं विकत नघेतां आपणाकरितां मनुष्यें आपणच तयार करूं लागलीं, तर हल्लींच्यापेक्षां तीं फारच वाईट होतील, आणि खर्च व मेहनत ज्यास्ती पडतील, तरी त्यांजपासून निर्वाह होईल, परंतु आपल्या शरीराचें व मालमत्तेचें संरक्षण, मनुष्यें स्वतः आपणच करूं लागलीं असतां त्यांस अतिशयित त्रास पडूनहीं संरक्षण होणार नाहीं, आणि त्यांस खर्च पराकाष्ठेचा पडेल.

इंग्लंदामध्यें ह्या सरकारच्या उत्पन्नाचा कांहीं हिस्सा चालू वर्षाच्या खर्चाकडे जातो, आणि पुष्कळ हिस्सा त्या देशांत पूर्वीं झालेल्या कर्जाची फेड करण्याकडे जातो. पूर्वीं सरकारास मोठमोठीं युद्धें वगैरे करावीं लागलीं त्यावेळेस सरकारास उत्पन्नापेक्षां खर्च फार अधिक करावा लागला. त्या खर्चाकरितां सरकारानें श्रीमंत सावकार वगैरे लोकांपासून पैसा घेऊन तो त्यांचा परत होई पर्यंत त्यांस व्याज देण्याचें कबूल केलें. तो पैसा अद्यापि परत झाला नाहीं, आणि पुढेंही होणें कठीण आहे. ह्यास्तव सरकारानें सावकार वगैरे लोकांस त्यांच्या त्यांच्या रकमांचे मानानें उत्पन्नाच्या जमेंतून अमुकास अमुक रकम मिळेल अशीं वर्षासनें करून दिलीं आहेत. हीं वर्षासनें मिळण्याविषयीं सरकारांतून मिळालेले हक्क लोकांत एकमेकांस विकितां येतात, अथवा दुसऱ्या मालमत्तेप्रमाणेंच अनेक असामींस वांटून देतां घेतां येतात कितीएक लोक आपला खर्च चालून अधिक राहण्यासारखा पैसा असला, तर तो देऊन सरकारी नोती विकत घेतात, किंवा सेविंग बांकेंत, म्हणजे सरकारी पेढींत, ते ठेवितात; म्हणजे ते सरकारचे सावकार होऊन त्यांस सरकारी जमेंतून व्याजाऐवजीं कांहीं वर्षासन मिळतें. ह्यावरून पहा कीं, पूर्वीं सांगितलेलें देशास झालेलें कर्ज द्यावयाचें नाहीं असा कायदा सरकारानें केल्यास, ज्या लोकांनीं सरकारास

पैसा दिला आहे ते अगदीं सफाई बुडतील, आणि ह्या करण्यापासून देशाचें हित झालेंसें होणार नाहीं; कारण कांहीं एक लोकांच्या बऱ्यासाठीं कांहीं एक लोकांस बुडाविलेंसें होईल.

पूर्वीं मोठमोठीं युद्धें करावीं लागलीं त्यांत दारूगोळा व शिपायांचे पोषाक ह्यांत अतोनात द्रव्य खर्चावें लागलें. तो दारूगोळा उडून गेला, व ते पोषाक वापरून नाहींतसे झाले, आणि कर्ज काढिलें तें मात्र रयतेच्या शिरावर बसलें, हें वाईट झालें; परंतु आतां कांहीं जरी केलें तरी झालेली गोष्ट परत येत नाहीं; खर्च व्हावयाचा तो होऊन गेला. इतकें एक बरें आहे कीं युद्धाकरितां काढलेल्या पैक्याच्या व्याजाबद्दल सरकारी उत्पन्नाच्या जमेंतून जो पैसा जातो तो सर्वच देशाबाहेर जात नाहीं; तर ज्या कितीएक लोकांनीं सरकारास कर्ज दिलें आहे त्यांच्या घरांत कांहीं येतो. म्हणजे रयतेच्या घरांतून जातो आणि रयतेच्याच घरांत येतो, त्यापक्षीं देशास ती बूड नव्हे; बाहेर जातो ती मात्र बूड होय. आतां सरकार देणें देणाऱ्या लोकांस आणि व्याजा ऐवजीं पेढीवरून वर्षासनें घेणाऱ्या लोकांस हा सूक्ष्म विचार समजत नाहीं.

सरकारी पेढींत पैसा ठेवण्याची चाल कलकत्ता, मुंबई, मद्रास वगैरे मोठमोठ्या शहरांमध्यें राहणाऱ्या लोकांत फार आहे. इतर ठिकाणीं राहणाऱ्या लोकांत ती विशेष नाहीं.

---

## भाड्यानें देणें घेणें.

एक मनुष्य आपला खासगत कोणता एखादा पदार्थ पुन्हा न घेण्याच्या इरायानें दुसऱ्यास देऊन त्यापासून त्या पदार्थाची किंमत घेतो, त्या व्यापारास क्रय विक्रय, म्हणजे विकत घेणें व विकत देणें, असें म्हणतात. मनुष्य आपला पदार्थ दुसऱ्यास कांहीं काळपावेतों देऊन त्याजबद्दल कांहीं पैसा वगैरे घेतो, त्या व्यापारास भाड्यानें देणें व भाड्यानें घेणें असें म्हणतात.

अशा प्रकारच्या व्यापारांत निरनिराळ्या संबंधानें निरनिराळे शब्द लावितात. एखादा मनुष्य कांहीं पैसा वगैरे घेण्याचा ठराव करून घेऊन आपला बैल, गाडी, घोडें, घर, बाग, अथवा चिरगुट पांघरूण, वगैरे पदार्थ देतो, त्या पैशास भाडें म्हणतात. एखादा मनुष्य, अमुक

वेळेचें अमुक घेईन, असें ठरवून तितकी वेळ दुसऱ्याचा अंकित होतो, म्हणजे त्याचें काम धंदा वगैरे करणें असेल तें करितो, त्यास जें मिळतें त्यास मजुरी, रोजमुरा, पगार, वेतन, असें म्हणतात. एखादा मनुष्य आपला पैसा लोकांस वापरण्याकरितां देऊन त्याबद्दल त्या लोकांपासून जो कांहीं पैसा घेतो त्यास व्याज म्हणतात. असे अनेक संबंधांनीं अनेक शब्द जरी व्यवहारांत चालू आहेत तरी त्यांचा अर्थ एकच आहे. थोडासा विचार केला असतां सर्वांच्या ध्यानांत येईल कीं, भाडें, मजुरी, रोजमुरा, वेतन, व्याज, पगार, ह्या सर्व शब्दांचा अर्थ कांहीं वेळपर्यंत कांहीं पदार्थ लोकांस देऊन त्याजबद्दल जो कांहीं पैसा घेतात तो. निरनिराळे पदार्थ असले म्हणजे निरनिराळ्या शब्दांचा प्रयोग करावा अशी ही फक्त भाषेची रीति आहे. एखाद्यापासून पैसा घेऊन त्याबद्दल व्याज दिलें काय, आणि घर वगैरे घेऊन त्याबद्दल भाडें दिलें काय, एकच आहे. उदाहरणावरून हें चांगलें लक्षांत येईल. मजपाशीं एक हजार रुपये आहेत, ते देऊन मीं एक घर अथवा एखादी पागा विकत घेतली, आणि ती एका मनुष्यास देऊन त्याजपासून वर्षाचे १२० रुपये घेण्याचें ठरविलें; अथवा तें घर किंवा ती पागा विकत घेण्याकरितां त्या मनुष्यास १००० रुपयेच देऊन त्याजपासून वर्षाचे १२० रुपये घेण्याचें ठरविलें; तरी फळ एकच आहे. परंतु घराच्या किंवा पागेच्या संबंधानें १२० रुपये आले असतां त्यांस भाडें म्हणतात, आणि रुपयांच्या संबंधानें आले असतां व्याज म्हणतात.

आपलें घर, जमीन, अथवा कोणताही एखादा आपला जिन्नस विकण्यास अथवा भाड्यानें देण्यास, किंवा त्याचें चाहील तें करण्यास, हर एक मनुष्यास मुखत्यारी असावी. तार्तरी वगैरे कांहीं देशांतील लोक पुरते सुधारले नाहींत, तर अद्यापि मध्यमस्थितींत आहेत, त्या देशांत अमुक जमिनीवर अमुक एकाची सत्ता आहे असें मुळींच नाहीं, तर सर्व लोकांची सामाजिक सत्ता असते; तिजवर सर्व लोक आपआपलीं गुरें ढोरें चारितात, ते लोक बारमहा भटकत फिरत असतात; राहणें झालें म्हणजे तंबू देऊन राहतात; जिकडे जिकडे गुरांस चरावयास पुष्कळ मिळतें तिकडे तिकडे ते जातात. ज्या जमिनीवर एका मनुष्याचा वारसा नाहीं तिची लागवड वगैरे करण्याचें कोणीच

मनांत आणीत नाहीं. कारण, एकानें लावणी केली म्हणजे दुसऱ्यानें येऊन बेलाशक कापणी करावी, असें होणार; मग कोण करितो?

किती एक देशांत अशी चाल आहे कीं मनुष्यानें एकदां जमीन नांगरून तींत लागवड केली, म्हणजे तींतलें उत्पन्न तो काढून घेईपर्यंत तिजवर त्याची मालकी असते. त्यानें उत्पन्न काढून घेतल्याबरोबर दुसरा भलता कोणी ती आपल्या ताब्यांत घेण्यास मुखत्यार आहे. अरबस्तानांत किती एक ठिकाणीं ही गोष्ट हल्लीं चालू आहे.

ज्या ठिकाणीं अशा प्रकारची स्थिति आहे त्या ठिकाणीं शेताला कुंपण करणें, त्यांत पाट काढणें, आणि खत घालणें, ह्यापासून कोणासही फायदा होणार नाहीं; कारण, एखाद्यानें तसें केलें, आणि पुढें तोच आजारी पडल्याकारणानें तें शेत नांगरणें त्याच्या हातून झालें नाहीं, किंवा तो मरून त्याचीं बायकापोरें अनाथ होऊन राहिलीं, तर शेत जाणार दुसऱ्याच्या हातीं, आणि त्या मनुष्याचा पैसा जायाचा व जमीनही जायाची, तेव्हां अशा प्रकारचीं कामें कोण करितो? कोणीच करणार नाहीं.

जमिनीची सर्वप्रकारें दुरुस्ती होऊन तींत नेहमीं लागवड व्हावी, असें जर असेल, तर तिजवर कोणातरी एकाची मालकी असावी; म्हणजे ती जमीन पाहिजे त्यानें वहिवाटावी असें नसावें. आणि आपल्या इतर मालमत्तेप्रमाणें त्या जमिनीची पाहिजे तशी व्यवस्था करण्यास मालकास मुखत्यारी असावी; म्हणजे ती एखाद्यास विकण्यास, अगर तींत आपण जातीनें मेहनत करून शेत करण्यास, अगर गडी माणसें चाकरीस ठेवून त्यांच्या हातून तींत शेतभात करण्यास, अगर एखाद्या शेतकऱ्याला साऱ्यानें देण्यास, त्यास प्रतिबंध नसावा.

कोणत्याही देशांत लोकसंख्येच्या मानानें जमीन कमी असली, तर तींत शेत करणारें कूळ शेताच्या मालकास त्या जमिनीचें भाडें म्हणजे सारा देतें तो सामान्यतः जास्ती पडतो. असें होण्याचें कारण स्पष्टच आहे, त्यामुळें सहज ध्यानांत आणून देतां येईल. कोणत्याही जिनसाची कमताई असून तो घेण्यास इच्छिणारे लोक फार असले, तर त्या जिनसाची किंमत वाढते, असा नियम आहे. त्या प्रमाणेंच जमिनीचें आहे. म्हणजे जमीन थोडी आणि घेणारीं कुळें फार, असें झालें

म्हणजे तिची किंमत म्हणजे सारा वाढतो. बाजारांत घोड्यांची कमताई असून त्यांस गिऱ्हाइकें फार असलीं, तर त्यांची किंमत चढते. सर्व पदार्थांचें असेंच आहे. तेव्हां अर्थात् जमिनीसही तोच नियम लागू आहे. जमिनींत धान्य, भाजीपाला, फळ फळावळ, वगैरे उत्पन्न करून तें विकून त्याच्या नफ्यावर आपला संसार चालवावा, ह्या हेतूनें शेतकरी जमीन घेण्याची इच्छा करितो. ती जमीन त्यास भाडें म्हणजे सारा दिल्या खेरीज मिळतच नाहीं. म्हणून तो सारा देण्याचें कबूल करितो. जितक्या जिनसा आपण विकत घेतों अथवा भाड्यानें घेतों तितक्यांचें असेंच आहे. म्हणजे ज्या मानानें ज्या पदार्थाचा उपयोग कोणा मनुष्यास असतो त्या मानानें त्या पदार्थाची किंमत अगर भाडें, गरज असून तो पदार्थ किंमत अगर भाडें दिल्याशिवाय मिळत नाहीं असें झालें, म्हणजे तो मनुष्य देतो. जमिनींत धान्य वगैरे उत्पन्न होतें म्हणून तिची गरज लोकांस लागते, आणि सारा दिल्याखेरीज ती मिळत नाहीं, म्हणून ते तिजबद्दल सारा देतात. अरबस्तानामध्यें रेतीच्या मैदानांत साऱ्यावांचून पाहिजे तितकी जमीन मिळते; परंतु तिजमध्यें कांहीं उत्पन्न होत नाहीं, त्यामुळें ती घेण्याची इच्छा कोणी करीत नाहीं. अमेरिकाखंडामध्यें मोठमोठ्या झाडांनीं वगैरे व्यापलेलीं अशीं अरण्यें पुष्कळ आहेत, त्यांतली जमीन खाशी व सुपीक असूनही सारा दिल्याशिवाय मिळते, परंतु तेथें म्हटलें म्हणजे जमीन पुष्कळ आणि लोक फार थोडे, त्यामुळें झाडें वगैरे तोडून जमीन साफ करण्यास जो तयार असेल त्यास जमीन पाहिजे तितकी मिळते. आतां इंग्लंद देशामध्यें उत्पन्नाची जमीन पुष्कळ नाहीं, म्हणून जींत कांहीं तरी उत्पन्न होतें तिला किंमत पडते म्हणजे तिजवर सारा बसतो. अमेरिकेंतील अरण्यांतल्या जमिनीस मुळींच सारा पडत नाहीं. अरबस्तानांतील रेतीच्या मैदानाप्रमाणें त्या जमिनींत कांहीं उत्पन्न होत नाहीं, म्हणून सारा नाहीं, असें नाहीं; तर ती चांगली सुपीक आहे, परंतु लोकांस पाहिजे तितकी जमीन असून आणखी फार अधिक आहे, त्यामुळें सारा नाहींसा होतो. आतां अमेरिकेंत देखील जेथें नवीन वसाहती झाल्या आहेत तेथें एखाद्यानें अरण्य तोडून जमीन साफ केली असतां, व तींतून जाण्यायेण्यास रस्ते वगैरे बांधिले असतां, तिजला कांहीं तरी किंमत पडते.

एकीकडे अरण्यामध्यें पुष्कळ जमीन साऱ्याशिवाय मिळत असली तरी ती नघेतां लोकांच्या वस्तीला जवळ झाडें वगैरे तोडून साफ केलेली जमीन सारा भरून लोक मोठ्या खुशीनें घेतात. कारण, एखादें अरण्यच घेतलें तर त्यांतलीं झाडेंझुडें तोडून जमीन साफ केली पाहिजे; तींत उत्पन्न केलेलें धान्य वगैरे बाजार शेंकडों कोस दूर असला तरी तेथें पाठविलें पाहिजे, आणि तेथें राहणाऱ्यास जे जिन्नस लागतील ते त्या बाजारांतून आणिले पाहिजेत, अशा अनेक अडचणी असतात.

कोणत्याही देशांत लोक कमी असतात तोंपर्यंत तेथली जमीन पुरते; परंतु लोक दिवसानुदिवस अधिक अधिक वाढत जातात तसतशी तीच जमीन त्यांस पुरेनाशी होते, आणि असें झालें असतां त्या जमिनीचे मालकांस अधिक अधिक सारा मिळत जातो. ह्याचें कारण मागें सांगितलेंच आहे कीं, जो पदार्थ उपयोगी असून कमी असतो त्यास त्याच्या कमताईच्या मानानें कमी अथवा जास्ती किंमत पडते.

कांहीं लोक असें म्हणतात कीं, जमिनीस सारा पडतो ह्याचें कारण हेंच आहे कीं तिजपासून धान्य वगैरे लोकांस अत्यंत उपयोगी जे पदार्थ ते उत्पन्न होतात; परंतु ही भ्रांति आहे. हवा ही अन्नाप्रमाणेंच जीवनाला उपयोगी आहे, तथापि हवेस कोणी एक छदाम देखील देत नाहीं; आणि असा नियमच आहे कीं जो पदार्थ फुकट मिळतो त्याबद्दल कोणी किंमत देत नाहीं. ह्या देशामध्यें लोकसंख्येच्या मानानें सुपीक जमीन अमेरिकाखंडांतल्या अरण्याप्रमाणें पाहिजे तितकी फुकट मिळण्यासारखी जर असती, तर सर्व लोक सारा न देतां तशीच पाहिजे तितकी घेते. आणि तींत आतांच्या प्रमाणेंच धान्य वगैरे उत्पन्न व्हावयाचें तें होतें, तरी उत्पन्न करणाऱ्यास श्रमाखेरीज पैसा मुळींच द्यावा लागताना. हल्लीं इकडे ज्या जमिनींत कांहींच उत्पन्न होत नाहीं, व जिचा दुसराही कांहीं उपयोग नाहीं, त्या जमिनीला मात्र कोणी सारा देणार नाहीं. ज्या जमिनीचा अथवा दुसऱ्या एखाद्या पदार्थाचा उपयोग नाहीं त्याची कितीही कमताई असली तरी त्यास कोणी किंमत देत नाहीं. आणि कितीही उपयोग असला तरी तो पदार्थ फुकट मिळत असला तर मुळींच त्यास किंमत कोणी देत नाहीं. ह्यावरून पदार्थास किंमत पडते ती केवळ कमताईमुळें पडत नाहीं, व केवळ उप-

योगामुळेंही पडत नाहीं; तर मागें सांगितल्याप्रमाणें ह्या दोन गोष्टी एकत्र असल्यामुळें पडते.

कांहीं लोक असें म्हणतात कीं, जमिनीस सारा पडतो ह्याचें कारण हेंच आहे कीं जमिनीच्या मालकानें जमिनीला कुंपण घालण्याकरितां, तींत खत घालण्याकरितां, व ती लागवडीस आणण्याकरितां, जो पैसा खर्चिला असतो त्याचें उत्पन्न त्यास झालें पाहिजे. आणि खरेंच पाहिलें असतां किती एक लोक आपली जमीन लागवडीस आणण्याकरितां पुष्कळ पैका खर्चितात; त्यांस सारा मिळण्याची आशा नसती तर ते तींत पैका घालितेचना. परंतु लोक सारा देतात ह्याचें कारण मालकानें खर्च केला असतो त्याचें उत्पन्न झालें पाहिजे हें नव्हे. कारण, एखाद्या मालकानें जमीन चांगल्या दशेस आणण्याकरितां पुष्कळ पैका खर्चिला, परंतु तेणेंकरून जमिनींत पहिल्यापेक्षां जास्ती उत्पन्न होत नसलें, तर त्यानें केलेल्या खर्चाबद्दल त्यास जास्ती सारा कोणी देणार नाहीं. आतां ह्याच्या उलटें उदाहरण पहा. एखाद्यानें आपल्या जमिनीकडे मुळींच पैका खर्चिला नाहीं, परंतु त्याची जमीन मुळचीच चांगली ह्यामुळें तींत उत्पन्न होत आहे, आणि जमिनीची कमताई असल्यामुळें सारा दिल्याखेरीज जमीन मिळत नाहीं असें आहे, तर त्या मालकास कांहीं तरी सारा खास मिळतो. ह्या देशांत कोठें कोठें मोठमोठीं माळरानें आहेत त्यांत मालकांनीं पैसा म्हटला तर मुळींच घातला नाहीं, तरी त्यांमध्यें साहजिक गवत उत्पन्न होतें त्याबद्दल धनगर लोक त्यांस सारा देतात

ह्यावरून पहा कीं, जमिनीपासून धान्य उत्पन्न होतें, किंवा तिचा मालक तींत पुष्कळ पैसा घालितो, म्हणून लोक तिजबद्दल सारा देतात असें नाहीं. कारण, माळरानांत धान्य उत्पन्न होत नसतें, आणि मालकानें तीं लागवडीस आणण्यासाठीं वगैरे खर्चही केला नसतो; तरी त्यांबद्दल त्यास सारा मिळतो.

कधीं कधीं जमिनींत गवत देखील उगवत नाहीं; परंतु ती नदीच्या अथवा समुद्राच्या किनाऱ्यास चांगल्या ठिकाणीं असते तेवढ्यावरूनच कोळी वगैरे कोणी लोक तिचें भाडें देतात. कोळ्यांस अशा ठिकाणीं

आपले मचवे आणून ठेवण्यास, जाळीं वाळत घालण्यास, व तेथें झोंपडीं बांधून राहण्यास, फार चांगली सोय असते.

धान्य व दुसरे पदार्थ ह्यांस कधीं कधीं किंमत फार पडते ह्याचें कारण जमिनीवर सारा फार पडतो हेंच होय, असें कोणी म्हणतात. परंतु ही भ्रांति आहे. फार सारा पडतो म्हणून धान्यास मोठी किंमत पडते असें नाहीं; तर धान्य वगैरे जे जिन्नस जमिनीपासून होतात त्यांस फार किंमत पडते ह्यामुळें जमिनीस सारा जास्ती पडतो, असें उलटें आहे. सारा जास्ती पडतो म्हणून बाजारांत धान्य कमी येतें, असें होत नाहीं हें तर उघड आहे. आणि किंमत म्हटली म्हणजे गिऱ्हाइकांच्या संख्येच्या मानानें धान्य जसें कमी अथवा जास्ती बाजारांत असेल तशी किंमत जास्ती अथवा कमी पडेल. जमिनीच्या सर्व मालकांनीं एकमतेंकरून निमे सारा घ्यावयाचा, म्हणजे रुपयाच्या ठिकाणीं आठ आणे घ्यावयाचे, असें ठरविलें, तरी जमीन आहे तितकीच राहील, व तींत धान्य हल्लीं उत्पन्न होतें तितकेंच होईल, आणि धान्य घेणारीं गिऱ्हाइकेंही तितकींच होतील. तेव्हां शेतकऱ्यास धान्याची किंमत हल्लींप्रमाणेंच मिळेल. हल्लींच्या वेळेपेक्षां त्यावेळेस विशेष इतकाच होईल कीं, सारा देणारा शेतकरी सारा कमी द्यावा लागतो ह्या कारणानें अमळसा श्रीमंत होईल, आणि जमिनीच्या मालकास निमे सारा मात्र मिळतो म्हणून तो तितक्या मानानें गरीब होईल. मजूरलोक व दुसरे सुखवस्तु लोक ह्यांच्या स्थितींत तिळमात्र अंतर पडणार नाहीं.

कांहीं लोक असें म्हणतात कीं, जमिनीच्या मालकांस सारा कमी देऊन शेतें केल्यास, शेतकरी लोकांला मजूर लोकांस जास्ती वेतन देण्यास सांपडेल; परंतु असें म्हणणारे वेतन व बक्षीस ह्या दोहोंचा अर्थ एकच समजून बोलतात असें दिसतें. वेतन म्हणजे मनुष्यानें अमुक काम केलें असतां त्यास त्याच्या श्रमाचे योग्यतेप्रमाणें अमुक द्यावयाचें असें ठरवून जें देतात तें. जोंपर्यंत धान्याच्या किंमतींत फरक नाहीं तोंपर्यंत शेतकरी पहिल्यापेक्षां पैकेकरी झाला तरी त्यास मजुराच्या कामाची योग्यता वाढत नाहीं; होती तितकीच आहे म्हणून तो जास्ती वेतन देणार नाहीं. शेतकरी श्रीमंत असला, तर त्यास एखाद्याला बक्षीस द्यावेसें वाटल्यास त्यास सोय असते. मग तें बक्षीस तो

आपल्या गडीमाणसांस देवो, इष्टमित्रांस देवो, शेजाऱ्यापाजाऱ्यांस देवो, अथवा ज्यांशीं व्यापार वगैरे करीत असतो त्यांस देवो. आणि जसज-शी त्याची संपत्ति अधिक असते तसतशी बक्षीस देण्याची सोय अधिक असते. ही त्याच्या मेहरबानीची गोष्ट आहे. पण तो श्रीमंत आहे म्हणून जो बाजारांत रुपयाच्या योग्यतेचा जोडा आहे तो कांहीं त्यास श्रीमंतीमुळें दोन रुपयांच्या योग्यतेचा होतो असें नाहीं. आतां त्याला त्या चांभाराची दया येऊन धर्मबुद्धीनें तो एक रुपया बक्षीस देईल तर ती धर्माची गोष्ट झाली, व्यापाराची नव्हे. ह्याप्रमाणें मजुराचें एका दिवसाचें काम शेतकरी श्रीमंत झाला म्हणून त्यास अधिक योग्यतेचें झालें असें नाहीं. आतां पूर्वीं सांगितल्याप्रमाणें तो आपण ठेवलेल्या मजुरांस कांहीं बक्षीस देईल तर त्याची खुशी आहे. शेतकरी श्रीमंत झाले आणि जमिनीचे मालक गरीब झाले तरी मजूर लोकांस जें वेतन मिळत असतें त्यांत कांहीं फेरफार होत नाहीं. आपण लोकांस जास्ती पैसा द्यावा, असें शेतकऱ्याला वाटल्यास, त्यास पहिल्यापेक्षां विशेष ऐपत असते, आणि जमिनीच्या मालकास कमी असते, इतकें खरें. परंतु तसें झालें असतां आतांच्या पेक्षां मजूर लोकांस शेतकरी लोक जास्ती पैसा देतील असें म्हणण्यास कांहीं आधार नाहीं.

जमिनीवरचा सारा मुळींच नाहींसा केला असतां, म्हणजे शेतकऱ्यानें जमिनीच्या मालकास कांहीं एक न देतां त्याची जमीन खुशाल वापरावी असें केलें असतां, एकाच्या हातून जमीन घेऊन दुसऱ्यास द्यावी इतकें-च केलेंसें होईल. म्हणजे एका मनुष्याची संपत्ति चोरून घेऊन दुसऱ्यास बक्षीस दिलीसें झालें. पण असें झाल्यानें धान्य जितकें उत्पन्न व्हावयाचें तितकेंच होऊन तितकें बाजारांत येऊन त्याची किंमत हल्लींच्या इतकीच राहील, तींत अगदीं फेरफार होणार नाहीं.

अथवा असा जर कायदा केला कीं, जमिनीच्या मालकांनीं सारा कमी करून दर बिघ्यास अमुकच सारा घ्यावा, ह्याजपेक्षां अधिक घेऊंनये, तर हल्लींच्याप्रमाणें त्यांच्या जमिनीवर त्यांची मालकी राहील; परंतु ह्यापासून इतकेंच होईल कीं जमिनीचे मालक आपली जमीन साऱ्यानें शेतकऱ्यांस नदेतां गडीमाणसें चाकरीस ठेवून आपण शेतभात करितील.

असें करण्याची चाल हल्लीं कोठें कोठें आहे; परंतु तिजपासून मालकाचा शेतकऱ्यांस सान्यानें जमीन दिल्याप्रमाणें फायदा होत नाहीं. कारण शेतकरी लोक जन्मापासून त्या कामांत फार तरबेत झाले असतात, व त्यांची उपजीविकाही जमिनीवरच असते, तेव्हां त्यांजप्रमाणें चाकर लोकांस तें काम साधत नाहीं.

---

## श्रमविभाग.

एखाद्या सामान्य गरीब मजुराचा संसार पाहून सूक्ष्म रीतीनें विचार केला असतां ध्यानांत येईल कीं, ह्याचा संसार अगदीं गरिबीचे रीतीचा आहे खरा, तरी त्यांतील सर्व सामान वगैरे पाहिलें असतां तें तेवढेंच उत्पन्न करावयास किती लोकांचे श्रम अंशतः अंशतः लागले आहेत ह्याची गणती करणें कठीण आहे. त्याच्या आंगावरची एक घोंगडीच आपण उदाहरणार्थ घेऊं. ती अगदीं जाडीभरडी आहे, व तिची किंमतही थोडी आहे. तरी ती शेंकडों लोकांच्या श्रमापासून उत्पन्न झाली आहे. आतां आरंभापासून पहा; मेंढ्या पाळणारा धनगर तो लोंकर कातरून जमवितो, मग दुसरा व्यापारी ती विकत घेऊन निरनिराळ्या रंगाची निरनिराळी काढितो; पिंजारी ती पिंजितो; रंगारी तिला तऱ्हतऱ्हेचा रंग देतो; सूत काढणारा तिचें सूत काढितो; कोष्टी विणून घोंगडी तयार करितो; व्यापारी त्याजपासून विकत घेऊन बाजारांत आणून विकितो; हे इतके व आणखीही कितीएक लोक ह्यांचे हात मध्यें पडतात तेव्हां घोंगडी तयार होऊन ती मजुरास विकत मिळते. आतां ह्या असल्या घोंगड्या धारवाडाकडे तयार होतात, तर त्या इकडे आणण्याविषयीं कितीएक व्यापारी व माल आणणारे नेणारे भाडेकरी लागले असतील, त्यांनीं इकडे आणून इकडच्या एखाद्या व्यापाऱ्यास त्या विकल्या असतील. ज्या गाड्यांवरून हा माल आला असेल त्या गाड्या करण्यास सुतार लागले असतील, घिसाडी लागले असतील, व दोऱ्या वळणारे महार लागले असतील. ह्या घोंगडीच्या पदराला रंगीत लोंकरीची रेवड घातली आहे, तिच्या रंगाचें सामान कोठून कोणीं आणिलें असेल हें कांहीं सांगवतच नाहीं. कांहीं सामान तर दूर देशांहून देखील आलेलें असतें. आतां ती तयार करण्याच्या कामांत जे मनुष्य

असतात म्हणून मागें सांगितलें त्यांपैकीं कितीएकांचीं तऱ्हतऱ्हेचीं साधनें तयार करणारे लोक कितीएक प्रकारचे निरनिराळे असतीलच. आतां माग वगैरे मोठालीं बिकट यंत्रें तर राहूंच द्या, पण धनगराची कातर, ही अगदीं साधी आहे हें सर्वांस ठाऊकच आहे, तीसुद्धां तयार करण्याविषयीं किती कारागिरांचे श्रम लागले असतील ह्याचा विचार करून पहा. ती कातर लोखंडाची असते, तें लोखंड खाणींतून काढावें लागतें; तर खाणींतून काढणारा, तें गाळण्याकरितां भट्टी लागते, ती बांधणारा, भट्टीला कोळसे पाहिजेत ते पाडणारा लोणारी, कोळशांस लांकडें पाहिजेत तीं तोडणारा, विटा करणारा कुंभार, भट्टीचा मालक, लोहार, व आणखीही कितीएक कारागीर इतक्यांचे श्रम अंशतः अंशतः एकत्र मिळतात तेव्हां एक कातर तयार होते.

ह्याप्रमाणें एका घोंगडीविषयीं विचार केला असतां इतक्या कारागीर लोकांचे श्रम लागतात. ह्याप्रमाणें त्याचें पागोटें, बंडी, कांच्या, धोतर, जोडा, किंवा कडदोरा, अथवा त्याच्या घरांतला कोणताही पदार्थ घेऊन त्याचा विचार केला असतां असेंच सिद्ध करून दाखवितां येईल कीं, प्रत्येक पदार्थ तयार करण्यास साक्षात् व परंपरेनें पुष्कळ कारागिरांचे श्रम लागले आहेत. कधीं कधीं असें दृष्टीस पडतें कीं, येवढासा पदार्थ तयार करण्यास अनेक देशांतलें सामान लागतें, व अनेक देशांतल्या कारागिरांचे श्रम लागतात.

ह्याप्रमाणें सर्व पदार्थांचा विचार करून पाहिला असतां, व प्रत्येकाच्या उत्पत्तीविषयीं किती कारागिरांचे श्रम लागले आहेत ह्याचा विचार केला असतां, ध्यानांत येईल कीं, अगदीं गरीब मनुष्य आणि त्याचा अगदीं गरिबीचा संसार असें धरून चाललें तरी त्यास जितके पदार्थ अवश्य लागतात तितके तयार करण्यास हजारों मनुष्यांची मदत आणि हजारों मनुष्यांचे श्रम लागतात, एरवीं तयार होतच नाहींत. मोठमोठ्या श्रीमंत लोकांच्या ऐषआरामीच्या पदार्थांशीं त्या गरिबांच्या पदार्थांची तुलना केली असतां त्या गरिबांचे अगदींच क्षुल्लक असतात खरे; तरी इकडच्या एखाद्या गरीब मनुष्याच्या संसारांतील पदार्थांची आणि श्रीमंताच्या संसारांतील पदार्थांची तुलना केली असतां त्या दोहोंमध्यें जितकें अंतर दिसतें त्याहून अधिक अंतर आफ्रिका खंडांतील एखादा

राजा, आपल्या हजारों रानटी लोकांवर अमल करणारा, त्याच्या संसारांतील पदार्थांची आणि इकडच्या गरिबाच्या संसारांतील पदार्थांची तुलना करून पाहिलें असतां दिसतें; म्हणजे गरिबाच्या संसारांतले पदार्थ त्या राजाच्या पदार्थांपेक्षां फारच चांगले असतात.

हे वर सांगितल्या प्रकारचे सर्व नफे लोकांत श्रमविभाग असल्यापासून होतात. नाहीं तर, जर हरएक मनुष्य आपलें वस्त्र आपणच विणूं लागला, आपलें घर आपणच बांधूं लागला, आपलीं हत्यारें आपणच करूं लागला, आपलीं भांडीं आपणच घडूं लागला, तर कोणीं इतक्या धंद्यांपैकीं कोणत्याही एका धंद्याकडे लक्ष देऊन त्यांतच बहुत काळ घालविला असतां तो जसें नीटनेटकें काम करील, तसें त्याच्या हातून एक देखील काम व्हावयाचें नाहीं. प्रत्येक धंद्यास तो थोडथोडा वेळ देणार त्यापासून त्यास कोणताच धंदा चांगला साधणार नाहीं; कारण, दरएक धंद्यांत तरबेत होण्यास अभ्यास व काळ हीं फार लागतात. ह्यामुळें सर्व पदार्थ आपणच करूं लागला असतां ते सर्वच ओबडधोबड होतील.

एका मनुष्यानें एकाच धंद्यांत बहुतकाळ घालविला असतां तो त्यांत मोठा पटाईत होतो, ह्याशिवाय दुसराही श्रमविभागापासून एक फायदा होतो. तो असा; बहुतेक गोष्टींविषयीं असें दृष्टीस पडतें कीं एकाच प्रकारचें थोडकेंसें काम करण्याला व पुष्कळ काम करण्याला, आणि एकाच प्रकारचा एक पदार्थ करण्याला व अनेक पदार्थ करण्याला, काळ व श्रम बहुतकरून सारखेच लागतात.

उदाहरणासाठीं असें धरूं कीं पांच पन्नास ब्राह्मण करनाटकांतून रामेश्वराकडे जात आहेत, ते परस्परांचा संबंध नसतांही सर्वांस सोबत व्हावी म्हणून जमून चालले आहेत. तर ते संध्याकाळीं मुकाम करण्याकरितां एके ठिकाणीं उतरले म्हणजे परस्परांमध्यें कामें वांटून घेतात. तीं अशीं कीं, कांहीं असामींनीं जनावरांवरचीं ओझीं उतरून त्यांच्या जाग्याजुग्याची व्यवस्था करावी; कित्येकांनीं त्यांच्या दाण्यावैरणीचा बंदोबस्त करावा; कित्येकांनीं बाजारांतून शिधासामग्री आणावी; कित्येकांनीं पाणी आणावें; कित्येकांनीं सर्वांचा सैंपाक तयार करावा; आणि कित्येकांनीं काटक वगैरे लोक येऊन कदाचित् अकस्मात् लूट करितील

म्हणून हत्यारबंद होऊन खटलें उतरलें असेल त्याच्या आसमंतात् नाक्यांनाक्यांनीं पहारा करावा. अशी व्यवस्था त्यांजमध्यें नसती तर वर सांगितलेल्या कामांपैकीं प्रत्येक काम आपआपणापुरतें त्या जुटींतील प्रत्येकास करावें लागतें. आणि पाहिलें असतां एका मनुष्यास आपला एकट्याचा सैंपाक करण्यास जितकी मेहनत व जितकी वेळ लागते तितकीच वेळ प्रायः पांच चार असामींचा सैंपाक करण्यास लागते. कोणी बाजारांत गेला म्हणजे त्यास एकट्याचें शिधासामान आणण्यास जितकी मेहनत व जितकी वेळ लागते तितकीच दहापांच असामींचें आणिलें तरी लागते. तेव्हां सगळीं कामें कोणी एकटाच करूं लागला, म्हणजे वेळ व मेहनत पुष्कळ लागून सर्वदां त्यास हत्यारबंद रहावें लागतें. नाहीं तर, कोणत्या वेळेस कोणत्या ठिकाणीं चोर वगैरे लोक गांठून मारतील व लुटतील कोण जाणे, अशी शंका असते.

श्रमविभागापासून थोड्या मेहनतीनें, व थोड्या काळानें, व थोड्या खर्चानें, सर्वांचें बहुत हित होतें, हें डांकेच्या खात्याचा विचार करून पाहिला असतां फारच चांगलें लक्षांत येईल. पहा, डांकवाल्यास एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणास एक पत्र नेणें व शंभर पत्रें नेणें ह्याविषयीं श्रम बहुतेक सारखे पडतात; वेळ तर अगदीं सारखीच लागते. आणि श्रम व वेळ सारखी लागून एका मनुष्याचें काम होण्याच्या वेळांत शंभर मनुष्यांचीं कामें होतात. ही तजवीज नसली तर प्रत्येक मनुष्यास कांहीं गरज पडली म्हणजे आपलें पत्र दूरच्या गांवीं आपल्या इष्टमित्रांकडे नेण्याकरितां जासूद करून पाठवावा लागेल, म्हणजे ह्या दोन प्रकारांमध्यें तफावत किती आहे ती पहा.

---

## तीन राक्षस.

कल्याण मुकामीं हणमंतराव म्हणून एक देशस्थ ब्राह्मण राहत होता. तो एकेदिवशीं संध्याकाळीं पांच वाजतां काम करून येऊन दाराच्या तोंडीं बसला होता, आणि त्याचीं मुलें तेथें जवळच खेळत होतीं. तितक्यांत एक फिरिस्ता म्हातारा, हुशार गोष्टी सांगणारा, तिकडे आला. तो सकाळपासून चालत असल्यामुळें अगदीं थकलासा दिसत होता, म्हणून हणमंतरावानें त्यास अमळसें बसवून घेऊन पाणी

प्यावयास आणून देवविलें. फिरिस्ता म्हणाला, मी आज फार लांबून आलों आहें; आतां रात्रीची रात्र राहण्यास कोठें जागा मिळेल कोण जाणे. हणमंतराव म्हणाला, माझ्या घरांत जर जागा असती तर मीं खुशीनें दिली असती; परंतु माझ्या कुटुंबांतल्या माणसांसच ही जागा पुरत नाहीं. तथापि ह्या गोठ्यांत तुम्ही राहत असल्यास, तुम्हांस एक घोंगडी आणि एक फाटकें जाजम देतों; तुमची खुशी असली तर रहा. तेव्हां फिरिस्ता म्हणाला, ईश्वर तुमचें कल्याण करो. नंतर तो पाणी पिऊन अमळसा शांत झाला, आणि त्या मुलांस हाक मारून म्हणाला, तुमचा वेळ मौजेनें जावयाकरितां तुम्हांला एक चांगली गोष्ट पाहिजे तर सांगतों. तें ऐकतांच गोष्ट सांगा! गोष्ट सांगा! म्हणून त्याच्या भोंवतीं सगळीं मुलें जमलीं. दामू म्हणाला, बावा, मोठी मौजेची गोष्ट असली तर सांगा. तींत कांहीं राक्षस, भुतें ह्यांचा मजकूर असावा. जनी म्हणाली, अं:, मला भलत्याच खोट्या गोष्टी आवडत नाहींत. लहानशी असली तरी चिंता नाहीं; पण खरी पाहिजे. हणमंतराव म्हणाला, खरी असो अथवा खोटी असो, इतकेंच कीं तिज-पासून ऐकणाऱ्यांस कांहीं तरी ज्ञान व्हावें, म्हणजे झालें. बजी म्हणाली, अहो बावा, तुम्ही मला इसापनीतींतल्या गोष्टीसारखी गोष्ट सांगा, पण तें शेवटलें तात्पर्य असतें तसलें सांगूं नका, त्यांत मौज नसते. तो म्हातारा म्हणाला, तुम्हां सर्वांस खुश करणें हें काम मोठें कठीण आहे. कोणाला राक्षस, भूतें ह्यांची गोष्ट पाहिजे, कोणाला ज्ञान होण्याजोगी गोष्ट पाहिजे, आणि ह्या मुलीला इसापनीतींतल्या गोष्टीसारखी गोष्ट पाहिजे. बरें असो, कांहीं चिंता नाहीं. तुम्हां सर्वांस गोड लागेल अशी गोष्ट सांगतों. असें बोलून, एक वेळ चूळ भरून टाकून तो गोष्ट सांगूं लागला; ती येणेंप्रमाणें.

कांहीं वर्षांमागें मद्रास इलाख्यांत एका गांवीं जानू म्हणून एक गरीब मनुष्य होता. त्याच्या पदरीं लहान मुलांबाळांचा परिवार मोठा होता, आणि प्राप्ति फार कमी होती, ह्यामुळें त्रासून त्यानें असा बेत केला कीं हा देश सोडून एखाद्या बेटांत जाऊन तेथें निर्वाह करून रहावें. त्याचे कितीएक शेजारीपाजारी त्याजप्रमाणेंच संकटांत होते तेही त्याच्या मसलतीप्रमाणें करण्यास राजी झाले. त्या सर्वांनीं बरोबर नेण्यासारख्या

जिनसा ठेवून घेऊन, बाकीच्यांचा लिलांव करून, एका बेटांत जाण्याविषयीं सर्व प्रकारची तयारी केली. कारण त्यांस कोणीं असें सांगितलें होतें कीं, तेथें सारा दिल्याशिवाय पाहिजे तितकी जमीन फुकट मिळते. जानूनें असा विचार काढिला कीं, आपलीं मुलेंमाणसें घेऊनच तिकडे जावें; मागें त्यांस ठेवणें नीट नाहीं. तो विचार सर्वांस मान्य होऊन सर्वांनीं आपापलीं मुलें माणसें घेण्याचें ठरविलें. नंतर एके दिवशीं ते सर्व लोक गलबतांत बसून सिंहलद्वीपास जाण्याकरितां निघाले. ते समुद्रांत बरेच दूर गेल्यानंतर एकाएकीं वारा पडून त्यांस कांहीं दिवस पावेतों समुद्रांतच कुचंबावें लागलें; जिकडे पहावें तिकडे पाण्याशिवाय दुसरें कांहीं नाहीं असें झालें. नंतर एके दिवशीं अकस्मात् मोठें वादळ होऊन त्यांचें गलबत भडकलें, तेव्हां खलाशी वगैरे लोकांचें कांहींएक नचालतां चार दिवसांनीं तें एका बेटाच्या खडकाळ किनाऱ्यावर जाऊन आपटलें, आणि फुटलें. मग त्या गरिब लोकांस आपले प्राण वांचविण्याविषयीं मोठे प्रयास पडले. परंतु ते त्या जमिनीवर गेले, आणि ती चांगली सुपीक आहे, व तींत झाडें झुडें चांगलीं आहेत, असें पाहून त्यांस कांहीं आनंद झाला. ते म्हणाले, ह्या बेटांत वसाहत मुळींच नाहीं हें बरें आहे; कारण सगळेंच बेट आपणांस मिळालें. आपलें गलबत फुटलें आहे ह्यांतून आणलेल्या जिनसांपैकीं शेतकीचीं कांहीं आउतें व कांहीं पांघरुणें येवढें मिळेल, तर सिंहलद्वीपांत वसाहत झाली आहे तेथें आपण जाऊन राहिलों असतां जें सुख व्हावयाचें तें आपणांस येथें होईल. तितक्यांत कांहीं बायका म्हणाल्या, स्वैंपाकाचीं कांहीं भांडींकुंडींही मिळालीं पाहिजेत. नंतर ज्या ठिकाणीं गलबत फुटलें होतें त्या ठिकाणीं काय जिन्नस सांपडतात ते पहावे म्हणून कांहीं पुरुषमंडळी जाण्यास निघाली. तितक्यांत एक मूल त्यांस हाक मारून म्हणालें,- अहो, आमची तेवढी कोंबडी आणायास विसरूं नका हो. दैववशात् त्या लोकांस गलबतांतून आणल्यापैकीं पुष्कळ माल सांपडला, आणि आपली तजवीज करून तेथें ते सर्व राहिले. एका वर्षाच्या आंत प्रत्येक असामीनें आपणाला राहण्यास घर बांधून त्याच्या आसपासच्या जाग्यांत कांहीं भाजीपाला व फळफळावळीचीं झाडें लाविलीं. त्या सर्व बेटांत अनेक प्रकारचीं रानफळें जिकडे तिकडे

विपुळ होतीं. तेथली हवा उष्ण होती ह्यामुळें तेथें द्राक्षें, अंजीर, नारळ पुष्कळ होते, व आणखीही कितीएक जातींचीं फळें होतीं, त्यांचीं नांवें देखील ह्या नवीन गेलेल्या लोकांस माहीत नव्हतीं. त्यांनीं तेथली जमीन नांगरून तींत धान्य पेरिलें, तें सर्वोत्कृष्ट आलें. धान्याची म्हणून कोणास ददात उरली नाहीं; परंतु दळावें कसें, ही सर्वांस मोठी पंचाईत पडली, कारण जातें कोणापाशींच नव्हतें. कांहीं दिवस पर्यंत ते लोक धान्य वाटून त्याच्या भाकरी करीत असत. वाटण्याला दळण्यापेक्षां वेळ फार लागतो, व मेहनतही फार लागते. जानूचें कुटुंब मोठें होतें तेव्हां सर्वांस पुरे इतकें पीठ रोजच्यारोज वाटून देण्यामुळें तो अगदीं थकला. दुसऱ्या कामास त्याला अगदीं बनेनासें झालें, आणि धान्य वाटण्याचें काम तर त्याजवांचून कोणास होईना. अशी त्याची स्थिति होऊन तो मोठ्या विचारांत पडला.

फिरिस्त्याचें बोलणें येथवर ऐकून दामू म्हणाला, अहो बाबा, ह्या गोष्टींत कांहीं मौज दिसत नाहीं, राक्षस, भुतें, वेताळ ह्यांचें कांहीं तरी सांगा.

फिरिस्ता म्हणाला, मुला, तूं दमधर, म्हणजे हींत सर्व कांहीं आहे. एकदम कसें बरें सर्व सांगतां येईल! आतां पुढें तेंच आहे. असें म्हणतांच सर्व मुलें आणखी पुढें सरून चित्त देऊन ऐकूं लागलीं. फिरिस्ता बोलूं लागला, एके दिवशीं जानू रानांत लांकडें आणण्याकरितां नेहमींच्यापेक्षां अमळसा दूर गेला होता, पीठ वाटण्याच्या मेहनतीनें थकून गेल्यामुळें रात्रंदिवस त्याच्या मनांत असा विचार येत असे कीं, माझीं मुलें मोठीं होऊन मला हात कधीं लावूं लागतील? असा विचार मनांत करितां करितां तो एका दऱ्यांत गेला, तो त्यानें पूर्वीं कधीं पाहिला नव्हता. तेथें एक नदी वाहत होती, तिच्या काठानें झाडी मोठी शानदार होती, त्या योगानें तें स्थळ असें रम्य दिसत होतें कीं तेथून परत जावें असें जानूस वाटेनाच. तो अमळसा पुढें गेला तेव्हां एकाएकीं त्याच्या दृष्टीस कांहीं एक भयंकर पदार्थ पडून तो एकदम डचकला.

दामू म्हणाला, हां, आतां आलें खरें. जने, आतां मोठी गंमत आहे बरें का. बाबा, तो भयंकर कोण होता तो सांगा.

फिरिस्ता म्हणाला, अरे पण हो, कांहीं दम धर. तो कोण होता तुला सांगतों. तो मोठा थोरला प्रचंड राक्षस होता. हात पाय लांबवून येथून तेथवर जमिनीवर पसरला होता. हें अरिष्ट पाहतांच जानू पळाला असता, परंतु त्या राक्षसानें डोळे झांकले होते त्यामुळें असें दिसत होतें कीं, त्यास जशी झोंपच लागली आहे. त्याच्या मुद्रेवरून असें स्पष्ट दिसत होतें कीं, हा अगदीं गरीब निरुपद्रवी प्राणी असावा. त्यामुळें जानू हा त्याजकडे टक लावून पाहत उभा राहिला. त्याचा पोशाख चकचकीत होता, त्यामुळें त्यावर ज्या ठिकाणीं ऊन पडलें होतें त्या ठिकाणीं पाहिलें असतां डोळेच दिपत असत, आणि बहुतेक भाग अनेक रंगांच्या वृक्षांच्या छायेनें आच्छादित होता, त्या सर्व वृक्षांचीं प्रतिबिंबें त्या पोशाखांत दिसत होतीं. तो सर्व चमत्कार पाहण्यांतच जानू अगदीं गरक होऊन गेला होता ; इतक्यांत राक्षस डोळे उघडून सुप्रसन्न वदनानें जानूकडे पाहूं लागला.

बजी म्हणाली, तर तो राक्षस दुष्ट नव्हता, असें ह्यावरून वाटतें.

फिरिस्ता म्हणाला दुष्ट तर नव्हताच, पण उलटा मोठा परोपकारी होता. तथापि तो जागा झाला आहे, आणि आतां उठण्याच्या रंगांत आहे, असें पाहून जानू पळूं लागला. परंतु राक्षसानें स्वस्थ पडल्यापडल्याच संथपणानें त्यास हाक मारिली, त्यावरून जानू तेथेंच थांबला. राक्षस म्हणाला, मी मोठा बलिष्ठ आहें म्हणून तूं मला भिऊं नको. मी दुष्ट नाहीं, तेव्हां मजपासून तुला उपद्रव काडीमात्र होणार नाहीं. जानू अमळसा अनमान करूं लागला; परंतु राक्षस मोठा दयाळू दिसत होता, त्यामुळें त्याच्या बोलण्यावर विश्वास ठेवून जानू हळूहळू त्याच्या जवळ गेला.

राक्षस त्याला म्हणाला, मी शरीरानें मोठा असलों तरी त्वां मला भ्यावें काय म्हणून ! हा जवळचा डोंगर मजपेक्षां देखील मोठा आहे, त्याला तूं कां भीत नाहींस ? जानू म्हणाला, डोंगर जिवंत नाहीं, आणि तूं जिवंत आहेस, म्हणून मी भ्यालों. आणि दुसरें कारण असें कीं, राक्षस स्वभावानें दुष्ट आहेत, अशा गोष्टी मीं पुष्कळ ऐकिल्या आहेत; परंतु राक्षस म्हणून कसा तो आजपर्यंत मीं पाहिला नव्हता. खरोखर आजपर्यंत माझी अशी समजूत होती कीं राक्षसांच्या गोष्टी मुलांस

उगीच मौज वाटण्याकरितां रचिल्या आहेत. राक्षस म्हणाला, राक्षस दुष्ट असतात अशा गोष्टी त्वां ऐकिल्या त्या खऱ्या आहेत; परंतु कांहीं राक्षस असे आहेत कीं त्यांच्या आंगीं क्रूरपणा अगदीं नसतां मनुष्य-मात्रावर शक्त्यनुरूप होईल तितका उपकार करण्याविषयीं ते उद्युक्त असतात. माझा स्वभाव असाच आहे. तें ऐकून जानू म्हणाला, तूं भीमाप्रमाणें बळकट आहेस, तुझ्याहातून परोपकार पाहिजेत तितके होतील. त्यानंतर, हा राक्षस परोपकार करण्याविषयीं इतका सिद्ध आहे, तर ह्याजपासून आपण काय करून घ्यावें? असा विचार जानू मनांत करूं लागला. तो मनांत म्हणाला, ह्यानें खुशीनें काम केलें तर मला जेवढें करण्यास महिना लागतो तेवढें हा एका दिवसांत करील. मग एकदां धीर करून त्यानें राक्षसास त्याप्रमाणें विचारिलें. राक्षस म्हणाला, तूं जें काम मला लावून देशील तें करण्यास मी राजी आहें. परंतु ह्या ओसाड बेटांत मला कधीं संवय नसल्यामुळें काम कसें करावें वगैरे कांहीं माहीत नाहीं; ह्यासाठीं आरंभीं कसें करावें हें मला त्वां शिकविलें पाहिजे. जानू म्हणाला, अंः, इतकेंच असलें तर मी तुला पाहिजे तें काम शिकवीन. मग जानूला अशी चिंता पडली कीं, हा राक्षस ज्याप्रमाणानें काम करील त्या प्रमाणानें हा वेतनही मागेल. त्याजवर त्यानें त्यास विचारिलें कीं, तूं वेतन काय घेशील? राक्षस म्हणाला, वेतन म्हणजे काय तें मला मुळीं ठाऊकच नाहीं; आणि तें मला नकोही तेव्हां शंभर माणसांचें काम करणारा मनुष्य जानूस मिळून त्यास मजुरी कांहींच द्यावी लागत नाहीं असें झालें. मग जानूच्या आनंदास काय विचारावयाचें आहे? तो तें आनंदाचें वर्तमान बायकोस सांगावें म्हणून लवकर उठून आतां चालूं लागणार तों इतक्यांत राक्षस त्याला म्हणाला, मीं जर तुला तुझ्या घरापर्यंत वाहून नेलें, तर तुझे श्रम वांचून तूं फारच लवकर तेथें पोहोंचशील. जानूच्या मनांत अमळसा संशय आला; परंतु आपणावर येवढे उपकार करण्याविषयीं जो उद्युक्त त्याच्या बोलण्यावर संशय धरावा हें अयोग्य, असें वाटून त्यानें रुकार दिला. नंतर राक्षस म्हणाला, मीं आजपर्यंत कोणास वाहून नेलें नाहीं, त्यामुळें मला माहीत नाहीं; म्हणून तूं प्रथम मला शिकीव. जानू मनांत म्हणाला, हा कांहींसा

मूर्ख दिसतो. हा आपण होऊन करूं लागत नाहीं, परंतु शिकण्यास तयार आहे, हें एक चांगलें आहे. राक्षसानें विचारिलें, तूं माझ्या पाठीवर बसतोस, किंवा तुला पोटाशीं धरून नेऊं? जानू म्हणाला, दोन गोष्टी विचारल्या हें बरें आहे, एखादें पोर पोटाशीं धरून नेतात तसें जाण्यापेक्षां स्वाराप्रमाणें वर बसून जावें हें फार चांगलें. आणि खरेंच पुसाल तर जानूला आणखी एक भीति होती, ती अशी कीं, येवढा थोरला राक्षस नीट उभा राहिला म्हणजे त्याचें शरीर अकटोविकट भयंकर दिसेल, आणि आपण त्याच्या हातांत एखाद्या उंदराप्रमाणें रहावें हें ठीक नाहीं; असा विचार मनांत आणून त्यानें राक्षसास सांगितलें कीं, मी तुझ्या पाठीवर बसतों. मग चांगलें बसतां यावें म्हणून प्रथमतः त्यानें त्याच्या पाठीवर तेथलीं लांकडें दोरीनें बांधून ठेविलीं. घोड्यावर बसलें म्हणजे घोड्यानें लवकर चालावें म्हणून हातांत काठी घ्यावी लागत असते त्याप्रमाणें गरज पडल्यास काठी असावी म्हणून जानूनें एक लांब काठी तोडून हातांत घेतली. मग तो त्याच्या पाठीवर बसून त्याला म्हणाला, चल आतां घराकडे. राक्षस निघाला, तो सरळ चालीनें अथवा दुडकीचालीनें चालला नाहीं; तर अगदीं भुईसरपट घसरत गेला, त्यामुळें तो खूबच जलदीनें गेला, तरी आपण खरोखर जात आहों कीं नाहीं हें जानूस बहुतेक समजलेंच नाहीं. थोडक्याच वेळानें तो राक्षस जानूच्या घरास पोहोंचला. जानू एवढ्या प्रचंड राक्षसाच्या पाठीवर बसून आलेला पाहून त्याच्या बायकामुलांस फारच भय वाटलें. तीं मुलें जसें एखादें रानचें जनावर पाहून भ्यावें तशीं भिऊन, किंकाळी फोडून दूर पळालीं. बायको उरावर हात मारून घेऊन, निराश होऊन, तेथल्या तेथें रडत ओरडत पडली. मग त्या रासक्षाच्या पायांपाडून म्हणाली, तुम्हीं मजवर दया करून आमच्या कारभाऱ्याला सोडून द्या. राक्षस म्हणाला, तो मोकळाच आहे; त्यास सोडायाचें काय आहे? त्याचे चालत घरीं येण्याचे श्रम वांचवावे म्हणून मीं त्याला पाठीवर बसवून आणिलें. आणि बाई, आतां तुझें जर कांहीं काम करावयाचें असलें तर सांग, म्हणजे मी करितों. मला कामाशिवाय दुसरें कांहीं नको. हें ऐकून तिला अमळसें अवसान आलें, आणि डोळे पुसून, त्याजकडे पाहून ती थोडकीशी हंसली. परंतु

त्याची आकृति मोठी व भयंकर असून त्याचा स्वभाव फारच शांत आहे असें पाहून तिला कांहीं विलक्षण चमत्कार वाटून, मी शुद्धींत आहें किंवा नाहीं कोण जाणे, अशी भ्रांति पडली. नंतर राक्षसाबरोबर झालेलें संभाषण वगैरे सर्व वृत्तांत सांगून जानू बायकोस म्हणाला, आपणांवर मोठे उपकार करण्याचें ह्यानें पतकरिलें आहे. तें ऐकून ती म्हणाली, बरें आहे, ईश्वराची कृपा आहे. हें सर्व खरें असलें तर बरें; पण खरें किंवा खोटें ह्याविषयीं मला मोठी शंका आहे. मुलें दूर पळून गेलीं होतीं तीं आपले आईबाप राक्षसाबरोबर निर्भयपणें बोलत आहेत असें पाहून हळूहळू जवळ आलीं. जगू म्हणाला, त्याचे पाय पहा; माझें डोकें त्याच्या गुडघ्यांस देखील लागणार नाहीं. विठू म्हणाला, हा जर नीट उभा राहिला तर ह्या नारळीचे नारळ सहज तोडील; ह्यास वर चढण्याचें कारण नाहीं. तीं जवळ आलीं तशीं अगदीं एकमेकांस लगटून उभीं राहिलीं; तीं अशा घाटानें कीं राक्षस कदाचित् आंगावर आलाच, तर सर्वांनीं सर्वांस जपावें. परंतु तो राक्षस त्यांजकडे पाहून हंसला, व त्यांचे आईबाप म्हणाले, मुलांनो, तुम्ही भिऊं नका; भिण्याचें कांहीं कारण नाहीं. हें त्यांनीं ऐकिलें तेव्हां त्यांची भीति पळाली. कारण, आईबाप कधीं खोटें बोलणार नाहींत, असें त्यांस ठाऊक होतें. मग त्यांस त्या राक्षसाचा मोठा चमत्कार वाटून तीं अगदीं जवळ आलीं. तो राक्षस अद्यापि गवतावरच पसरला होता. तीं मुलें कांहीं त्याच्या पायावर चढलीं, व कांहीं हातावर चढलीं, आणि त्याला अगदीं खेळगड्याप्रमाणें समजून लागलींच त्याशीं खेळूं लागलीं.

इतक्यांत तीं नवराबायको आपणाशींच विचार करीत होतीं कीं, ह्या राक्षसाच्या जेवणाची व राहण्याची सोय कशी करावी? बायको म्हणाली, ह्याला आमचें सगळें घर रहायास दिलें तरी पुरणार नाहीं; व ह्याला पाहिजे तेवढें घर ह्याजवांचून दुसऱ्या कोणास बांधितांही येणार नाहीं. ह्याच्या खाण्याचें म्हटलें तर घरांत जेवढा दाणा गोटा आहे व परड्यांत जेवढा भाजीपाला आहे तेवढा सगळा ह्याच्या एका भुकेस देखील पुरणार नाहीं. ही गोष्ट जानूच्या मनांत पूर्वीं आलीच नव्हती. आणि आपणाला आज मोठी नफ्याची युक्ति सांपडली म्हणून तो जो हर्ष

मानीत होता त्याविषयीं त्यास संशय वाटूं लागला. तो म्हणाला, चल, आपण जाऊन त्यालाच विचारूं कीं, तुझ्या खाण्यापिण्याचें व राहण्याचें कसें काय? ह्याप्रमाणें त्याला जाऊन विचारिलें, तेव्हां तो म्हणाला, एक घोटभर पाणी झालें म्हणजे झालें, दुसरें कांहीं नको. जानू म्हणाला, अं, ह्यांत काय, थोडेंच आहे. बायको म्हणाली, हें पिण्याविषयीं झालें; पण तूं खाणार काय? राक्षस म्हणाला, मी कधीं कांहीं खात नाहीं; मी पुष्कळ बळकट आहें खरा, तरी मला खावयास लागत नाहीं; म्हणून त्याविषयीं तू कांहीं काळजी करूं नको. आतां राहण्याचें अथवा निजण्याचें म्हणाल, तर उद्योग नसला म्हणजे मी गवतावर पडून राहतों. हें ऐकून जानू व त्याची बायको ह्या उभयतांस फार आनंद झाला असेल, हें उघडच आहे. कारण, त्यांस मोठा बलाढ्य चाकर मिळून त्यास खाणें, पिणें, मजूरी, वगैरे देण्याचें लचांड मुळींच नव्हतें. तीं दोघेंजणें म्हणालीं, ह्याची तबियत सर्वकाळ खुश राहून हा काम करण्यास तयार असा राहिला, म्हणजे आपणांस कोणत्याही गोष्टीची कमताई पडणार नाहीं. बायको म्हणाली, आपणांस ह्याशीं घिसघिस मात्र अगदीं करितां कामास नये. तो जेणेंकरून नेहमीं खुश राहील असेंच केलें पाहिजे. त्याप्रमाणें तीं उभयतां त्याकडे जाऊन त्याला म्हणालीं, जें काम करण्यापासून तुला दगदग होईल तें काम करावयास आम्ही तुला सांगणार नाहीं; आणि कोणतें काम झालें तरी तुझी जेव्हां खुशी असेल तेव्हां करीत जा, नाहीं तेव्हां स्वस्थ बसत जा, असें आमचें तुला सांगणें आहे. राक्षस म्हणाला, हें सर्व तुमच्याकडे आहे; तुम्ही ज्या ज्या वेळेस जें मला काम सांगाल त्या त्या वेळेस तें मी करण्यास तयार आहें. आतां दगदग होईल असें तुम्ही म्हणतां, पण दगदग म्हणजे काय हें मला मुळींच ठाऊक नाहीं. हें ऐकून जानू म्हणाला, ह्याची एकेक गोष्ट ऐकावी तों तों विशेषच चमत्कार वाटतो. तर मग रात्रीच्या झोंपेशिवाय दुसरी विश्रांति घेण्याची तुला गरज नाहीं. राक्षस म्हणाला, मी कधीं झोंप घेत नाहीं. आणि दुसरें, मला एक क्षणभर काम करणें आणि आठ प्रहर काम करणें हीं दोन्ही सारखींच आहेत. हें ऐकून तर जानूला जो आनंद झाला तो सांगतां येत नाहीं. नंतर त्या राक्षसाला कोणत्या

प्रकारचें काम सांगावें ह्याविषयीं उभयतांचा विचार होऊन जानू म्हणाला, रोज धान्य वाटतां वाटतां मला कंटाळा आला आहे; तर प्रथमतः त्याला हेंच काम करावयास सांगावें. त्याप्रमाणें, त्यानें वाटावें कसें हें प्रथम त्यास दाखविलें. राक्षसाला हें काम म्हणजे केवळ पोरखेळाप्रमाणें झालें. तें पाहून जानू म्हणाला, मोठ्या घिरटाच्या तळ्या प्रमाणें मोठ्या धोंड्याच्या दोन तळ्या करून दिल्या, तर हा राक्षस मनस्वी पीठ दळील. पण धोंड्यांची खाण येथून फार लांब आहे, तेथें धोंडे तयार केले तरी ते घरीं आणण्याची मोठी अडचणच आहे. राक्षस म्हणाला, ते धोंडे आणणें म्हणजे मला ओझें होईल असें नाहीं. चला, आपण दोघेजण खाणीकडे जाऊं. जानूनें आपली हत्यारांची पिशवी आणून ती एका रिकाम्या पेटींत ठेवून ती पेटी राक्षसाच्या खांद्यावर ठेविली. त्या पेटींत स्वतः त्याला बसण्यालाही जागा झाली. पूर्वी सांगितल्या प्रमाणें एक लांब काठी घेऊन जानू बसला, आणि ते दोघे निघाले. ते ताबडतोब खाणीशीं जाऊन पोहोंचले. तेथें मोठाले दोन दगड पाहिजे होते तसे फोडून राक्षसाच्या खांद्यावरच्या पेटींत घालून जानू त्यासुद्धां घरीं निघून आला. नंतर त्या दोन दगडांच्या दोन तळ्या करून त्या जुळवून देतांच राक्षसानें दळण्याचा एकसारखा धोशा लाविला. त्याची त्या कामांत हुशारी अशी दिसूं लागली कीं तो जसा जन्मापासून तेंच काम करण्यांत तरबेतच झाला आहे. रात्र पडतांच त्या नवऱ्याबायकोनें त्याला पुष्कळ सांगितलें कीं, आतां काम ठेवून थोडकीशी विश्रांति घे; पण त्यानें तें ऐकिलें नाहीं. निजावयाच्या अगोदर तीं उभयतां देवाचें स्मरण करून म्हणालीं, देवा, रात्रंदिवस पाहिजे तिकडे व पाहिजे तें काम करणारा मोठा बळकट चाकर त्वां आम्हांस देऊन त्याला अन्नवस्त्राची गरज मुळींच ठेविली नाहीं, हे तुझे आम्हांवर केवढे उपकार आहेत! इतक्यांत दामू त्या फिरिस्त्याला मध्येंच म्हणाला, अहो बावा, त्या असल्या चमत्कारीक राक्षसाचें नांव तरी काय, तें सांगा बरें. फिरिस्ता म्हणाला, जलौघ हें त्याचें नांव.

बजी म्हणाली, कसलें तरी हें नांव बाई! मीं नाहीं कधीं ऐकिलें असलें नांव! तो फिरिस्ता म्हणाला, आपलीं माणसांचीं नांवें आणि

राक्षसांचीं नांवें सारखींच नसतात. पण तुला सांगतों, मुली, ह्या नांवाला अर्थ आहे. असो, सध्यां तुम्हांला गोष्ट पुढें सांगतों.

तो राक्षस दळीत होता, त्याची घरघर चालली होती, तिजमुळें मुलें मध्यानरात्रीं जागीं होऊन भ्यालीं, आणि आईस विचारूं लागलीं कीं, ही गडबड कशाची? ती म्हणाली, बाबांनो, राक्षस दळीत आहे त्याची गडबड ही. नंतर दादल्याला गाढ झोंप लागली आहे असें पाहून ती मनांत म्हणाली, ह्याचे किती श्रम वांचले! देवा, ह्या राक्षसाचें कल्याण कर! असें म्हणून ती पुन्हा झोंपीं गेली. उजाडेपर्यंत जलौघानें सगळे दाणे दळून जानू उठतांच, आतां दुसरें काम कोणतें आहे? म्हणून त्यास विचारिलें. आतां ह्यास काय काम सांगावें असा विचार जानू करीत होता, इतक्यांत जलौघानें सर्व घरांत सडा वगैरे घालून जिकडेतिकडे स्वच्छ केलें. त्यानंतर तीं सगळीं मुलें नदीवर नेऊन त्याशीं कांहींवेळ खेळला; नंतर त्यांस नदींत पोहावयास शिकविलें. त्यामुळें त्यांस मोठी गमत वाटली. त्यांचीं अांगें स्वच्छ व थंड झालीं, व व्यायामामुळें त्यांस भूकही चांगली लागली; मग त्यांनीं घरीं येऊन त्या राक्षसाची वाहवा केली. इतक्यांत जानूनें राक्षसाकरितां एक नवीन उद्योग काढिला होता. तेथली हवा फार सर्द ह्यामुळें त्याच्या घरांत ओल येत असे, म्हणून त्यांत चोहोंकडे तक्तपोशी करून टाकावी असें त्याच्या मनांत होतें. आणि रानांत एक मोठें झाड वाऱ्यानें पडलें होतें तें त्यानें पाहून ठेविलें होतें. स्वतः त्याच्यानें तें झाड घरीं आणण्यासारखें नव्हतें, व त्याच्यानें तक्तेही पाडण्यासारखे नव्हते. आतां राक्षस मिळाल्यानंतर कांहींच कठीण वाटलें नाहीं. त्यानें त्या राक्षसाच्या खांद्यावर तें झाड आडवें घालून त्याजकडून तें सहज घरीं आणविलें. नंतर जानूनें हातांत करवत घेऊन तुळई कशी करावयाची हें त्यास दाखविलें; तें पाहून कांहीं थोडासा वेळ जातांच तो जानूपेक्षां देखील तें काम चांगलें करूं लागला. आपलें काम आतां खूब जलद आणि चांगलें चाललें आहे, असें जानूस वाटलें. तो मनांत म्हणाला, एका शेजारीं एक असे समांतर आठ दहा करवत एका लांकडाच्या चौकटींत बसविले असतां हा राक्षस तितकेही करवत एकदम चालवील, आणि आठ आठ दहा दहा तक्ते एकदम पडतील,

आतां इतके करवत कसे मिळतात ही पंचाईत पडली. जानूनें शेजाऱ्या पाजाऱ्यांस करवतांच्या भाड्याच्या ऐवजीं कांहीं तक्ते द्यावे, असें मनांत आणून त्यांजपाशीं करवत मागितले. त्यानें आणलेल्या राक्षसाच्या कामाची, बळाची, व मेहनतीची ख्याती त्या लोकांत जिकडेतिकडे पसरलीच होती. त्यामुळें, करवताच्या भाड्याबद्दल तक्ते मिळाले तर बरेंच आहे, असें सर्वांस वाटून सर्व लोक देण्यास राजी झाले. एक मनुष्य सुतारकाम शिकला होता त्यानें लांकडांची चौकट करून तींत सगळे करवत बसविण्याचें कबूल केलें. तें काम करण्यास एक खळी लागते ती खळी खणण्याचें कोणाएकानें पतकरिलें. अशा प्रकारची तयारी होण्यास कांहीं वेळ लागला. नंतर तो राक्षस काम करूं लागला तों एका तासांत सगळें झाड कापून जिकडेतिकडे तक्तेचतक्ते झाले.

करवतांच्या भाड्याबद्दल तक्ते लोकांस दिल्यानंतरही जानूचे घरीं तक्तपोशी करण्याला, घराला दारें करण्याला, धान्य वगैरे ठेवण्याकरितां घडवंच्या करण्याला, माचे करण्याला, पुष्कळ तक्ते उरले. सुतार जानूस म्हणाला, ह्या सर्व जिनसा मी करून देईन; परंतु माझ्या घरचें धान्य राक्षसाकडून त्वां दळवून दिलें पाहिजे. ही गोष्ट कबूल करण्यापासून दोघांसही नफा होता, त्यामुळें दोघांस तात्काळ ती मान्य पडली. पुढें जानूचें घर मोठें टुमदार व सोईचें दिसूं लागलें, तेव्हां आपलीं घरें अशीं बांधावीं, अशा बुद्धीनें सर्व लोक रानांत जिकडेतिकडे मोठमोठीं झाडें तोडूं लागले. झाडें तोडल्यानंतर तीं घरीं आणून त्यांचे तक्ते पाडणें ह्या दोन गोष्टी जलौघाकडून करविण्याबद्दल जानूस कांहीं दिलें पाहिजे असें होतें. कारण, त्यास कांहीं तरीं मोबदला दिल्याशिवाय तो आपल्या चाकराकडून काय म्हणून लोकांचीं कामें करून देववील? जानूस उपयोगीं पडेल अशा प्रकारचा जो जिन्नस ज्याजपाशीं होता तो त्यानें आणून जानूस द्यावा, असा सपाटा चालला. एक मनुष्य त्याजकडे आपल्या बागेंतलीं पाटीभर नारिंगें घेऊन आला; एका मनुष्यानें त्याच्या मुलांकरितां एक शेळी आणिली; दुसऱ्या एकानें कांहीं कोंबडीं आणिलीं, अशा रीतीनें कोणीं कांहीं कोणीं कांहीं असें आणितां आणितां जानूचें घर अनेक प्रकारच्या जिनसांनीं एखाद्या मोठ्या दुकानाप्रमाणें भरून गेलें. आरंभीं गलबत फुटलें तेव्हां एका गृहस्थानें बरोबर आणिलेले

कांहीं रुपये त्याजपाशीं राहिले होते ते घेऊन तो जानूकडे आला आणि म्हणाला, माझें काम तुम्ही आपल्या राक्षसाकडून करवाल, तर मी हे रुपये तुम्हांस देईन. जानू म्हणाला, दादा, तुमच्या रुपयांचा उपयोग ह्या ठिकाणीं कांहीं नाहीं. अशा ठिकाणीं म्हटलें म्हणजे राणूजीनें आणिलेल्या नारिंगांस जी योग्यता आहे ती तुमच्या एका सगळे मोहरेला देखील नाहीं. बरें असो, सध्यां सर्व जिनसांचा भरणा घरांत पुष्कळच झाला आहे, त्यापक्षीं ह्या एवढ्या वेळेस तुमचा पैसा पतकरितों; कारण, नजाणो, एखाद्या दिवशीं त्याचाही उपयोग पडेल. शेवटीं एक गरीब बायको जानूकडे आली. तिचा नवरा गलबत फुटलें त्यावेळेसच मेला होता. आपल्या मुलांबाळांस थंडीपासून विकार न व्हावा म्हणून आपल्या घराच्या भुईला व भिंतींला तक्तपोशी करावी असें तिच्या मनांत होतें; परंतु तिजपाशीं राक्षसाच्या चाकरीबद्दल जानूस द्यावयास म्हटलें तर तिच्या परड्यांत झालेले थोडकेसे बटाटे मात्र होते, दुसरें कांहीं नव्हतें, बटाट्यांचें टोपलें जानू पुढें ठेवून राक्षसाकडून जें काम करवायाचें होतें तें तिनें त्यास सांगितलें. तें ऐकून जानू बोलला, मथुराबाई, मी तुमचे बटाटे घेत नाहीं. ते तुम्ही आपले माघारे न्या. मथुराबाई म्हणाली, अहो जानबा, मजपाशीं तुम्हांस द्यायाला दुसरें कांहीं एक नाहीं. माझी गरिबी किती आहे हें तुम्हांस ठाऊकच आहे. जलौघ जर रानांत तोडलेलें झाड घरीं आणून त्याचे तक्ते पाडून देत असला, तर मी तुम्हांला रानांतलें झाड तोडून देतों, असें जगोबानें मजपाशीं म्हटलें आहे. आणि नागू सुतार एखाद्या दिवशीं रिकामा झाला म्हणजे माझ्या घरीं येऊन तक्तपोशीचें काम करणार आहे. जानू म्हणाला, असें जर असलें तर मी नाहीं का मोल घेतल्याशिवाय, शेजारीणबाई, तुमचें काम करणार? तुम्ही आपले बटाटे माघारे न्या; आणि जगोबाला झाड तोडावयास सांगा. तें तोडलें म्हणजे जलौघ तें आणून त्याचे तक्ते पाडून देईल हें ऐकतांच त्या बाईला फार आनंद होऊन ती बोलली, जानबा, असें केलें तर तुमचे मजवर मोठे उपकार होतील. असें बोलून बटाट्यांचें टोपलें डोईवर घेऊन ती माघारी निघाली. तिच्या मुलांकरितां बटाटे पाहिजेच होते ते हे आयतेच नवीन मिळाल्याप्रमाणेंच झाले, त्यामुळें फार संतोष होऊन तिला त्यांचें ओझें मुळींच वाटलें नाहीं.

आणखी दोन मनुष्य जानूच्या दारा बाहेर जानूकडे येण्याकरितां घोटाळत होते. त्यांच्या मनांत राक्षसाच्या हातून काम करून घ्याव-याचें होतें; परंतु ते फार आळशी होते ह्यामुळें आजपावेतों त्यांनीं मोठ्या प्रयासानें सरासरी अन्न वस्त्र मात्र मिळविलें होतें; त्याकरितां त्यांजपाशीं जानूस मोबदला देण्यास कांहीं एक नव्हतें. ही आपली सर्व हकीकत त्यांनीं जानूपाशीं सांगितली. ती ऐकून घेऊन जानू म्हणाला, असें तुमचें वर्तमान असलें तर तुम्ही आलां तसे माघारे जा. अशा तुम्हांसारख्यांचीं कामें राक्षस करूं लागला म्हणजे सगळे लोक आळशी होतील, हें खचीत आहे. त्या दोघांपैकीं एकजण म्हणाला, आम्हीं काय करावें बरें! आम्हांजवळ कांहींच नाहीं तेव्हां आम्हीं द्यावें कोठलें! जानू म्हणाला, तुम्हां दोघांसही हात आहेत व पाय आहेत. तुम्ही आजपावेतों चांगल्या रीतीनें जपलां खपलां असतां, तर आज रिकाम्या हातानें माझ्या घरीं येण्याचा प्रसंग तुम्हांस येताना. त्या दोघांसही बायकामुलें होतीं, त्यांविषयीं जानूच्या बायकोच्या मनांत दया येऊन ती त्या दोघांस म्हणाली, अझून तुमचे हातपाय तुमच्या स्वाधीन आहेत. तुम्ही आमचें जर कांहीं काम कराल, तर आमचे कारभारी आपल्या राक्षसाच्या हातून तुमचें काम खास करवितील. जानू म्हणाला, अगे, आपलें काम करण्याला येवढा राक्षस तयार असतांना तें करण्याला दुसऱ्या माणसांची गरज आपणांस काय आहे? बायको म्हणाली, ह्या राक्षसाच्या हातून होत नाहींत अशीं कामें पुष्कळ आहेत. तुम्ही नेहमीं म्हणतां, हा काम इतकें जलद आटपतो कीं ह्यास नव्या कामाची तयारी करून देतां देतांच मला पुरे पुरे होतें. तर त्यास नव्या कामाची तयारी करून द्यावयाची ती ह्यांस करूं द्या, आणि तुम्ही कांहीं विसांवा घ्या. जानू म्हणाला, तूं म्हणतेस तें खरें आहे. आज आपली स्थिति चांगली आहे; आपणांस कोणत्याही गोष्टीची कमताई नाहीं. तर आतां इतकी मेहनत करण्याची गरज मला काय आहे? परंतु ह्या आळशी मनुष्यांवर इतबार ठेवण्याची मोठी अडचण आहे. बायको म्हणाली, त्यांस सांगितलेलें काम ते मन लावून करितात अगर करीत नाहींत ह्यावर तुम्ही देखरेख ठेवा, म्हणजे झालें. हे शेजारीपाजारी लोक जे जिन्नस आणितात ते ठेवण्यासाठीं पांट्यांचा

खोळंबा फार आहे, ह्याकरितां ह्यांस त्या करण्यास सांगा. त्यानंतर असें ठरलें कीं त्या दोघांचें दळण राक्षसाकडून दळवावें, आणि त्याच्या मोबदला त्यांनीं जानू व त्याची बायको हीं जीं कामें सांगतील तीं करावीं. मग एका झाडाची साल काढून तें करवतण्याकरितां आणून लाडून ठेवण्याचें होतें तें काम एकास सांगितलें, आणि दुसऱ्यास पांट्या करण्याकरितां चिंच वगैरे झाडांचे फोक आणण्यास पाठविलें.

त्या सर्व वसाहतींतील लोकांस ह्या राक्षसाच्या कामापासून किती नफा झाला हें किती सांगितलें तरी संपायाचेंच नाहीं. आतां जानू त्या राक्षसाचा धनीच होता, त्यामुळें त्यास जसा नफा होत होता तसा दुसऱ्यांस होत नव्हता, हें उघडच आहे. त्याचे शेजारी पाजारी लोक फावेल त्या दिवशीं त्या बेटांतला जो न पाहिलेला प्रदेश असे तो पाहण्याकरितां जात, आणि जानूप्रमाणें आपणासही एखादा राक्षस चाकरीस राहणारा आढळेल अशा आशेनें चोहोंकडे हिंडत. ते जलौघाला विचारीत कीं, ह्या बेटांत आणखी कांहीं राक्षस आहेत किंवा नाहींत? तो एके दिवशीं म्हणाला, माझा एक भाऊ आहे; पण त्याची आणि माझी गांठ क्वचित् पडते; मला दऱ्यांत राहणें बरें वाटतें, तसें मी करितों. आणि त्याला नेहमीं डोंगरावर व पर्वतावर राहणें बरें वाटतें, तसें तो करितो. त्यांनीं विचारिलें, तो तुझ्या इतकें काम करितो काय? जलौघ म्हणाला, होय, तो खुशींत असला तर करितो. पण त्याच्या तबियतीचा कांहीं नियम नाहीं. ती जाऊं लागली म्हणजे एका क्षणांत जाते. तो एखाद्या वेळेस फारच दांडगाई करितो. मी स्वस्थ असतां एखाद्या वेळेस मशींच तो दांडगाई करितो कीं मला तीपासून अत्यंत संताप येऊन माझें देहभान सुटतें अशी स्थिति होते.

पूर्वीं सांगितल्याप्रमाणें ते लोक नेहमीं अरण्यांत पुष्कळ दिवस पावेतों शोध करीत असत. अखेरीस एके दिवशीं जगू ह्या नांवाचा मनुष्य एका रानडुकराच्या मागें लागून पळतां पळतां एका उंच टेंकडीवर चढला. तेथून त्यानें एका डोंगराच्या माथ्यावर बसलेला एक मोठा राक्षस पाहिला. त्याच्या तेजस्वीपणामुळें जगूचे डोळे अगदीं दिपून गेले, त्या कारणानें त्याचें स्वरूप त्याच्या दृष्टीस साफ पडलें नाहीं. त्याला गलबताच्या अवजारांप्रमाणें पंख होते; ते माशीच्या पंखाप्रमाणें अगदीं

पातळ आणि भिंगाप्रमाणें पारदर्शक असे होते. ते पाहून जगूस मोठा अचंबा वाटला. जलौघानें माझा एक भाऊ आहे म्हणून सांगितलें आहे तो हाच, अशी जगूची खातरी झाली. त्याच्या तबियतीचा कांहीं नियम नाहीं, असें जगूनें ऐकिलेंच होतें, त्यामुळें एकाएकीं जवळ जाण्याचा दम होईना. तरी, हा मिळाला असतां आपला नफा फार आहे, असें त्यास वाटतच होतें, म्हणून छाती करून जगू अमळसा जवळ गेला, तों राक्षस हंसतमुख त्याच्या दृष्टीस पडला. तेव्हां धैर्य धरून तो पुढें गेला, आणि रामराम करून म्हणाला, मी आज बहुत दिवस जलौघाच्या भावाचा शोध करीत आहें, तर तूं तोच आहेस किंवा दुसरा कोणी आहेस हें मला सांग, व तूं मजपाशीं चाकरीस राहशील अगर नाहीं हेंही सांग. तो राक्षस म्हणाला, होय, मी त्याचा भाऊच आहें, व माझें नांव मारुत. मी तुझें काम करीन; पण माझ्या तबियतीप्रमाणें मी करीन. माझ्या भावाचा स्वभाव अगदीं थंड आहे. तो नेहमीं एकसारखा मंदगतीनें चालतो, व फार गरीब आहे; तसा मी नाहीं; माझा स्वभाव कडक आहे. त्याची मंदगति पाहून मला एखाद्या वेळेस असें हंसें येतें कीं तें कांहीं केल्यानें आवरतच नाहीं. त्यानें अमळसें जलदी चालावें म्हणून मी मौजेनें त्यास क्षोभ आणण्याची तजवीज करितों. त्याला एखादें मोठें ओझें वाहण्याचा प्रसंग आला तर मी कधीं कधीं त्यास हात लावितों. मी त्याच्या कमरेला मिठी घालितों. आणि मग आपले पंख पसरून अशा भराऱ्या मारितों कीं माझ्या भावाचे जमिनीचे पाय सुटून तो जसा अधांतरीं येतो. जलौघ अगदीं मंद आहे, असें मारुत राक्षसाचें भाषण जगूनें जेव्हां ऐकिलें, तेव्हां त्यास मोठें आश्चर्य वाटलें. तो म्हणाला, आम्हां सर्व लोकांचें काम तो मनस्वी करितो, आणि तूं तर त्यास मंद म्हणतोस, तेव्हां आतां काय म्हणावें,! मारुत मोठी प्रचंड गर्जना करून म्हणाला, अरे, कसेंही असलें तरी मजपुढें तो केवळ गोगलगाय आहे. नंतर जगूला आपली त्वरा दाखवावी म्हणून त्यानें पंख पसरले, आणि जो उडाला तो एकाएकीं दिसेनासा झाला. आतां हा परत येतो का नाहीं कोण जाणे, म्हणून जगू अगदीं भिऊन गेला. परंतु तो लागलाच परत आला, आणि जगूस म्हणाला, तूं जर मला

उंच ठिकाणावर नेऊन ठेवशील तर मी तुजबरोबर येईन. जगू म्हणाला, माझें घर डोंगराचे माचीवर आहे, आणि तुला जें ठिकाण बांधून देईन तें अगदीं माथ्यावर देईन. मारुत म्हणाला, तूं जर मला घिरटाच्या दोन तळ्या आणून देशील तर जलौघ दोन घटकांत जितके दाणे दळितो तितके मी एका घटकेंत दळीन. जलौघाप्रमाणें मलाही जेवणाची व वेतनाची गरज नाहीं; परंतु माझें एवढें आहे कीं मी स्वच्छंदानें चालेन. मला कोंडून ठेविलें असतां मी काम करणार नाहीं. मला वाटेल त्या वेळेस मी काम करीन; दुसऱ्याच्या मताप्रमाणेंच चालणार नाहीं, तर आपल्या मताप्रमाणें चालेन. जगू मनांत म्हणाला, जलौघास जें काम सांगावें, तें तो लक्ष्य देऊन शिकून चांगलें करितो, तसें करणारा हा राक्षस दिसत नाहीं, परंतु हा त्याजपेक्षां अधिक बळकट आहे, एवढ्यानें आपला पुष्कळ फायदा होईल; ह्यासाठीं होईल तितकें जपून ह्याची तबियत संभाळावी. त्या राक्षसाची आकृति चमत्कारिक व पंख फारच हलके हें पाहून जगूला मोठाच चमत्कार वाटला. राक्षसानें मी येतों म्हणून सांगितल्यानंतर, जगू आणि तो, दोघे बरोबर निघाले. जगू हळूहळू चालत घरीं गेला, आणि पीठ दळण्याकरितां मारुताला उंच ठिकाणीं घरट वगैरे घालून देण्याच्या तजविजीस लागला. मारुत मागून स्वच्छंदानें येत होता, त्यानें एकदां भरारी मारिली, आणि भावाची भेट घेण्याकरितां दऱ्यांत उतरला. जलौघ हा मोठ्या तुळवटाचे तक्ते पाडून त्यांचें ओझें पाठीवर घेऊन धन्याच्या घराकडे हळूहळू चालला होता. एकमेकांच्या दृष्टीस पडतांच ते परस्परांस अगोदर भेटले. मारुत त्यावेळेस खुशींत होता, तो जलौघाला म्हणाला, दादा, मी तुझ्या ओझ्याला जरा हात लावितों. तूं अशीं मंदपणें पावलें मोजीत चाललास, तर तूं कधीं पोहोंचशील कोण जाणे? जलौघाच्या पाठीवरच्या तक्त्यांवर कांहीं मुलें बसलीं होतीं त्यांतलें एक मूल म्हणालें, मंदपणें असें हा काय म्हणतो? कोणत्याही मनुष्याच्या आंगीं ह्याच्या जलदीचा दहावा हिस्सा देखील दृष्टीस पडत नाहीं. मारुत म्हणाला, हें खरें मुला, परंतु तुम्ही खुरट माणसें आहां तसे आम्ही नव्हों. नंतर त्याच मुलांच्या जवळ तो बसला, आणि पंख पसरून मोठ्या झपाट्यानें चालला. तीं मुलें पहिल्यानें भ्यालीं, परंतु त्यांस अगदीं

इजा झाली नाहीं, त्यामुळें कांहीं वेळानें स्वस्थ होऊन एखाद्या पक्ष्याप्रमाणें जलद घरीं गेलीं. तीं घरीं पोहोंचल्यानंतर तक्त्यांचें ओझें उतरलें. मग जलौघ मारुतास म्हणाला, तूं आतां मला माघारा घेऊन चल. मारुत म्हणाला, मी नाहीं माघारा येणार. मी आतां नीट पुढें जाणार आहें. तुला जर पुढें यावयाचें असलें तर चल, म्हणजे बरेंच झालें; आणि नसलें तर मग तुला जिकडे पाहिजे तिकडे जा. हें जलौघास वाईट वाटून तो मारुता बरोबार भांडूं लागला. मग बोलतां बोलतां ते दोघे विकोपास गेले. मारुतानें जलौघाशीं झोंबाझोंबी करून मोठी भयंकर गर्जना केली. जलौघाचें देहभान अगदीं सुटून त्याचें मन अगदीं खवळून गेलें. जीं मुलें नुकतींच उतरलीं होतीं तीं ह्या दोघांची झोंबी पाहून फार भ्यालीं, आणि दूर जाऊन उभीं राहिलीं. जलौघाचें असें भयंकर स्वरूप त्यांनीं कधीं पाहिलें नव्हतें इतकें तें क्रोधाच्या आवेशानें बदलून गेलें होतें. तो एकदम आपणा सर्वांस उचलून तोंडांत टाकील, अशी त्याची मुद्रा त्या मुलांस दिसली. शेवटीं मारुत जलौघाच्या हातांतून सुटून जो उडाला तो जलौघास दिसेनासा झाला. तथापि त्याचे सुसकारे दुरून ऐकूं येत होते. त्यानें आपणाशीं झोंबाझोंबी केली म्हणून जलौघही मोठमोठ्यांनीं सुसकारे टाकीत होता. परंतु कांहीं वेळ गेल्यानंतर तो अमळसा शांत झाला, आणि मुलांस पाठीवर घेऊन पुन्हा खेप करण्याकरितां निघाला. मारुत कोठें आहे? असें जगूनें मुलांस विचारिलें; तेव्हां एका मुलानें झालेला सर्व वृत्तांत त्यास सांगितला; तो ऐकून, मारुत पुन्हा येतो किंवा नाहीं कोण जाणे, म्हणून तो अगदीं भिऊन गेला. त्यानें दळण्यासाठीं जागा देखील बांधून तेथें धान्य ठेवून तयारी केली होती, त्यामुळें त्यास फारच वाईट वाटत होतें. तो निजल्यानंतर रात्रीं मारुत त्या ठिकाणीं आला, आणि जगू सकाळच्या प्रहरीं त्यास कामाला लावणार तों अगोदरच त्यानें अर्धेमुर्धे धान्य दळून टाकिलें होतें. मारुत इतकें जलद काम करीत असे ही गोष्ट मोठे आश्चर्याची खरी, तरी एकंदरीनें पाहतां त्या बेटांतल्या लोकांचें जलौघापासून जितकें हित झालें तितकें मारुतापासून झालें नाहीं. एखादा माल वगैरे नेणें झाल्यास, मारुत अतिशयित त्वरेनें नेई, हें खरें, परंतु त्याच्या मनास येई तिकडे तो नेई, ह्या

करितांच त्याजवळ एखादा जिन्नस सोंपून देणें झाल्यास, त्याच्या मनांत ह्या वेळेस कोणत्या दिशेस जावयाचें आहे, ह्या गोष्टीचा निश्चय अगोदर करावा लागे. बरें इतकें करून, मारुत जलदीनें जात आहे तेव्हां जिन्नस अर्थात् सुरक्षितपणें पोहोंचेलच अशा खातरीनें मनुष्यानें स्वस्थ बसावें, आणि मारुतानें एकदम मागें फिरावें, अथवा भलत्याच दिशेकडे जाऊं लागावें, अथवा तेथेंच घोटाळावें, असें होत असे. त्यामुळें त्याचे जवळ दिलेला माल नेमलेल्या ठिकाणीं न पोहोंचतां भलत्याच ठिकाणीं जाऊन पडे, अथवा जेथून रवाना झाला तेथेंच पुन्हा परत येई, अशी मोठी अव्यवस्था व नुकसान होई. धान्य दळण्याच्या कामांत अशी अव्यवस्था होत नसे, हें खरें, तरी दुसरी मोठी अडचण होत असे, म्हणजे मारुताच्या मनांत काम करण्याचें नसलें तर तो एकाएकीं नाहींसा होई, आणि मग किती जरी शोधिला तरी कोठें सांपडत नसे.

हे दोन राक्षस काम करूं लागल्यापासून त्या बेटांतल्या लोकांची स्थिति पुष्कळ सुधारली. त्यांच्या घरांतील भुयांस तक्तपोशी झाली, वर कडीपाट झाले, व जिकडे तिकडे दारें चांगलीं झालीं. ह्याशिवाय माचे, पलंग, चौरंग, मेजें, खुरच्या, पेट्या, कपाटें, वगैरे सर्व जिन्नस पाहिजेत तितके झाले. मेहनतीचीं कामें राक्षसांनीं उचलल्यामुळें सर्व बायकां पुरुषांस पुष्कळ फुरसत सांपडूं लागली. त्या फुरसतीच्या वेळेंत तीं अनेक प्रकारचीं कळाकुसरीचीं व चतुराईचीं कामें करूं लागलीं. अशी स्थिति होत चालली तेव्हां अर्थातच प्रत्येक मनुष्यास नवीन राक्षस शोधून आणावा अशी मोठी उत्कंठा झाली. त्यांनीं हमेष जलौघास जाऊन पुसावें कीं, आणखी कांहीं राक्षस ह्या बेटांत आहेत किंवा नाहींत? एके दिवशीं जलौघ म्हणाला, आम्हांपैकींच आणखी एक राक्षस ह्या बेटांत आहे. तो कोण म्हणाल तर माझाच मुलगा आहे. तो नेहमी कोठें तरी भटकत फिरत असतो. मजपासून तो गेल्याला फार वर्षें झालीं. त्या दिवसापासून आज पावेतों मीं त्यास कोठें पाहिलेंच नाहीं. त्याची आई ही विस्तवाची मुलगी होय. तो नेहमीं आजोळच्या मनुष्यांकडे असतो; कारण लहानपणापासून त्यांचाच लळा त्याला फार आहे; त्यामुळें तो आम्हांकडे मुळींच राहत नाहीं. उन्हाळ्यामध्यें एके दिवशीं तो उन्हांत बसला होता, आणि तेथून

जो एकाएकीं उडाला तो दिसेनासा झाला. हें ऐकून ते लोक जलौघास म्हणाले, तर त्याचा शोध करून आपणांस उपयोग नाहीं; तो प्रायः हें बेट सोडून गेला असेल.

त्यांजमध्यें संताजी वाघमाऱ्या ह्या नांवाचा एक मनुष्य मोठा धीट, मेहनती, व युक्तिमान् होता. तो ही गोष्ट ऐकून इतरांप्रमाणें निराश झाला नाहीं. तो सगळ्या लोकांबरोबर उठून गेला, परंतु अमळशानें एकटाच त्या जलौघाकडे फिरून येऊन त्याच्या मुलाची हकीकत पुसूं लागला. त्यावरून जलौघानें त्यास सांगितलें कीं, तो पोर हें बेट अगदीं सोडून गेला असें मला वाटत नाहीं. कारण, येथून दूर एक मोठा दरा आहे त्यांत खडकांत एक उन्हाळें आहे त्यांत कधीं कधीं तो स्नान करितांना आढळतो, असें म्हणतात. परंतु तुम्हांपैकीं कोणी लोक आज पावेतों त्या दऱ्यांत गेले नाहींत. त्याचें सर्व कांहीं त्याच्या आईप्रमाणेंच आहे, त्यामुळें ज्या ठिकाणीं पुष्कळ उष्णता असते त्या ठिकाणीं मात्र तो राहतो, दुसऱ्या ठिकाणीं राहत नाहीं. वर सांगितलेल्या उन्हाळ्याचें पाणी नेहमीं कढत असतें, त्यांत स्नान केल्यानें त्याचें बळ अधिकच होतें. वाघमाऱ्यानें त्यास विचारिलें, तो काम करण्याविषयीं बहादर आहे काय? जलौघ म्हणाला, त्याजविषयींच्या गोष्टी माझ्या ऐकण्यांत आहेत त्यांवरून पाहिलें असतां असें वाटतें कीं, मी व मारुत हे दोघे मिळून जितकें काम करूं त्यापेक्षां अधिक तो एकटा करील. मारुत जर मोकळ्यावर असला तरच काम करितो; परंतु त्या पोराचें उलटें आहे; म्हणजे त्याला धरून कोंडून ठेवावें तेव्हांच तो काम करितो, आणि त्याला धरून कोंडण्याचें काम मोठें कठीण आहे. आम्हां दोघांपेक्षां त्याचें हें एक निराळें आहे कीं त्यास खाणें फार लागतें, वाघमाऱ्या म्हणाला, अरेरे! असें असलें तर मोठेंच लचांड आहे. तो तुम्हां दोघां भावांप्रमाणें जर शरीरानें असला, तर त्याला लागेल तितकें खावयास घालण्याची मोठी अडचण पडेल, आणि तो काम करण्यास मिळाल्यापासून जेवढी कमाई होईल तेवढी त्याच्या पोटाला घालण्यांतच जाईल. मग मला नफा तो काय? जलौघ म्हणाला, अंः, ह्याविषयीं तूं भिऊं नको, ह्याचें अन्न म्हणजे कोळसे, लांकडें हें होय. हें अन्न अगदीं जळत असतां तो खातो. हें अन्न

जसजसें जास्ती घालावें तसतसें तो काम जास्ती करितो. इतकेंच कीं, पूर्वीं सांगितल्याप्रमाणें त्याला कोंडून मात्र ठेविलें पाहिजे. वाघमाऱ्या म्हणाला, एवढा राक्षस कोंडून ठेवण्यासारखा मोठा तुरुंग आहे कोठें? जलौघ म्हणाला, त्याच्या आकृतीविषयीं इतकें मनांत आणावयास नको. कारण, जरी त्याचें डोकें कधीं कधीं गगनास जाऊन पोहोंचतें, तरी त्याच्या शरीराचा संकोच झाला म्हणजे लहानशा भांड्यांत देखील तो मावतो. राहण्याची जागा जितकी लहान असेल तितका अधिक जोर करून तो काम करितो. वाघमाऱ्या म्हणाला, कोंडून राहण्यापासून त्याला मौज तर वाटत नसेलना? जलौघ म्हणाला, मौज कशाची? आपली सुटका करून घेण्याच्या आशेनें मात्र तो काम करीत असतो. कारण त्यालाही मारुताप्रमाणें स्वच्छंदानें वागण्याचा शौक मोठा आहे. वाघमाऱ्या म्हणाला, तूं जर मला मदत करीत असलास, तर मी कदाचित् त्यास धरीन. जलौघानें बरें म्हणून सांगितलें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं वाघमाऱ्यानें जानूस दोन मोठाले कापे फणस नेऊन देऊन त्याजपासून जलौघास मागून घेतलें. नंतर वाघमाऱ्या त्याच्या पाठीवर बसून त्याच्या मुलाला शोधण्याकरितां चालला. वाटेंत त्यानें विचारिलें, जलौघा, तुझा मुलगा जर कर्मधर्म संयोगें करून आढळलाच, तर त्यास धरून कोंडण्याची युक्ति काय ती सांग. जलौघ वाघमाऱ्यास शिसा दाखवून म्हणाला, त्याला कोंडण्याकरितां हा शिसा आणिला आहे. तो पाहून वाघमाऱ्या पोट धरून हंसूं लागला आणि म्हणाला, तूं माझी थट्टा करीत आहेस असें भासतें. नंतर अमळशानें ते उन्हाळ्यापाशीं जाऊन पोहोंचले. अगदीं जवळ गेले तेव्हां त्या उन्हाळ्यांतून वाफ वर जात होती ती पाहून जलौघ म्हणाला, अरे, हाच माझा मुलगा; त्वां पाहिला? वाघमाऱ्यानें पाहिलें तों वाफेचा लोळ मात्र दिसला, दुसरें कांहीं नाहीं. एक पाव घटका गेल्यानंतर त्याच लोळाचा मोठा राक्षस झाला. त्याचें डोकें मेघमंडळास जाऊन पोहोंचलें. तो आकार हळूहळू वाढत चालला होता, आणि दिसण्यांत अस्पष्टही होत चालला होता. असें होतां होतां शेवटीं अगदीं दिसेनासा झाला. मग वाघमाऱ्या म्हणाला, तुझा मुलगा येथें होता खरा; पण तो गेला, आणि आतां पुन्हा येणार

नाहींसें वाटतें. जलीष म्हणाला, अं:, येणार नाहीं असें व्हावयाचें नाहीं. त्याची येण्याची जागा आपणांस सांपडली आहे; आतां आज नाहीं तर दुसऱ्या एखाद्या वेळेस आपलें कार्य होईल. पुढें दुसऱ्या वेळेस ते तेथें आले; पण राक्षस तेथें नव्हता. जलीष म्हणाला, अझून तो पाण्यावर येऊं लागला नाहीं हें एक बरेंच आहे. तो वर येऊं लागला म्हणजे ताबडतोब धरण्याची तयारी करून ठेवूं. असें बोलून त्यानें शिसा काढिला; आणि उन्हाळ्यावर उलटा धरिला. आणि वाघमाऱ्याच्या हातीं बूच देऊन त्यास म्हणाला, वाफेनें शिसा पुरता भरलासें दिसलें म्हणजे तोंडीं घट्ट बूच बशीव. एवढ्या थोरल्या राक्षसाला एवढ्याशा शिशांत कोंडून धरावयाचा यत्न जलीष करीत आहे म्हणून वाघमाऱ्यास जें हंसें आलें तें दाबण्यास त्याला पुष्कळ श्रम पडला. परंतु आपला उद्देश शेवटास जावा हें त्याच्या मनांत फार होतें, त्यामुळें तो हंसला नाहीं. कांहीं वेळ जातांच वाफ वर येऊं लागली. जेथें मोठा लोळच वर येत होता तेथें तो शिसा खालीं तोंड करून जलीषानें धरिला. शिसा भरतांच वाघमाऱ्यानें बूच घट्ट बसविला. आपण आजपर्यंत ज्याविषयीं बोलत होतों तो हा आज आपल्या हातीं लागला, असें जलीषानें वाघमाऱ्यास किती सांगितलें तरी त्यास तें खरें वाटेना. तो म्हणाला, तुझा मुलगा ह्या शिशांत जर असला, तर मला असें वाटतें कीं त्यास कोंडून ठेविलें असतां तो खुशीनें राहतो, व तो फार गरीब आहे. जलीष म्हणाला, हां, असें मानूं नको. तो आतां मात्र गरीब आहे; परंतु कांहीं वेळानें त्याचें स्वरूप तुला समजेल. ते उभयतां घरीं आल्यानंतर जलीषानें वाघमाऱ्यास सांगितलें कीं, तूं ह्याला चुलीपाशीं अगदीं विस्तवाजवळ नेऊन ठेव. कारण विस्तव त्याचें जीवन होय; म्हणून त्याला नेहमीं जळजळीत विस्तवापाशीं ठेविल्याशिवाय तो तुझ्या उपयोगीं अगदीं पडणार नाहीं वाघमाऱ्यानें चुलीवर अधणाच्या पाण्याचा हंडा होता त्यांतच तो शिसा ठेविला. अमळशानें असा चमत्कार झाला कीं त्या शिशाचा बूच फटकन निघून गेला. शिशांतून राक्षस बाहेर पडून चोहोंकडे पसरला, आणि दिसेनासा झाला. त्यावरून वाघमाऱ्या फार भिऊन ती गोष्ट जलीषास सांगण्याकरितां गेला. जलीष म्हणाला, त्या पोरानें तुला मोठ्या चमत्कारानें फसविलें.

बरें, कांहीं चिंता नाहीं, तूं भिऊं नको; आपण त्यास पुन्हा धरूं. वाघमाऱ्या म्हणाला, त्याला राखवत नाहीं तर धरण्याचा तरी उपयोग काय? जलैाघ म्हणाला, सगळ्या गांवांत कोणाच्या घरीं लोखंडाचा अथवा पितळेचा जाड चांगला करंडा आहे काय, असा शोध कर, म्हणजे त्यांत तो पोरगा धरिला जाऊन त्यांतून काम करण्यास त्याला ठीक पडेल. त्याप्रमाणें चौकशी करितां करितां एका मनुष्यापाशीं एक पितळेचा वाटोळा करंडा अढळला, तो वाघमाऱ्यानें विकत घेतला. आणि जलैाघाजवळ येऊन म्हणाला कीं, पहा हा करंडा किती जाड आहे! हा तो कसा फोडितो तो पाहूं बरें. जलैाघ म्हणाला, तो फार तापला म्हणजे ह्याजपेक्षांही जाड भांडीं फोडितो असें सांगतात, परंतु तें हातांत घेऊन पाहिल्यानंतर तो म्हणाला, हें आपल्या कामीं पडण्यासारखें आहे. ह्याचें तोंड चोहोंकडून बंद असून मध्यें एक बारीक भोंक आहे त्यावर झांकण आहे. तो तापला असतां हें झांकण उचलण्यास त्यास श्रम पडणार नाहींत; परंतु हें उचललें तरी ह्यांतून त्यास बाहेर पडतां येणार नाहीं. आणि त्याचा संताप तेवढ्यापासून कमी होऊन तो बेताबातानें राहील. दुसऱ्या दिवशीं ते उभयतां निघून तेथें गेले. राक्षस पाण्यावर येऊं लागला तसा त्यास पुन्हा धरून घरीं आणिलें. त्याचें नांव बाष्प.

ह्याप्रमाणें बाष्प संताजी वाघमाऱ्याच्या कबजांतच अगदीं सांपडला, तेव्हां त्याशीं तो आर्जवानें बोलूं लागला, आणि पाहिजे तें काम करण्यास राजी झाला. परंतु एवढें मात्र त्यानें मागून घेतलें कीं, पीठ दळणें आणि तक्ते पाडणें हीं अप्रतिष्ठेचीं कामें मला सांगूं नका. कापसाचीं अथवा लोंकरीचीं वस्त्रें विणण्याचें काम मी करीन, किंवा खाणींतून विलायती कोळसे अगर पाणी काढीन. संताजी म्हणाला, ह्या बेटांत लांकडें पुष्कळ आहेत, तेव्हां विलायती कोळशांवांचून आमचा खोळंबा नाहीं; आणि खाणीचें काम म्हटलें तर तें आम्हांला यावयाचें नाहीं. परंतु ह्या बेटांत कापूस पुष्कळ पिकतो तर त्याचीं वस्त्रें करण्याची तजवीज झाली असतां फारच चांगलें होईल. कारण आम्हां सर्व लोकांस कापडाचा मोठा तोटा आहे, व आमचीं बायकापोरें उघडीं वाघडीं आहेत. ह्यासाठीं बाकीच्या लोकांस विचारून कापूस

पिंजण्याचीं, सूत काढण्याचीं, वस्त्रें विणण्याचीं यंत्रें तयार होतील किंवा नाहीं ह्याविषयीं त्यांचीं मतें घेतलीं पाहिजेत. वस्त्रांची गरज सर्वांसच फार होती, त्यामुळें सर्व लोक आपल्या हातून होईल तितकी मदत करण्यास सिद्ध झाले. सुतार व लोहार ह्यांचा तर उपयोग ह्या कामाविषयीं विशेष होता. पुष्कळ मेहनत करून तीं यंत्रें लोकांनीं तयार केलीं. निरनिराळ्या कामांकरितां निरनिराळीं ठिकाणें बांधिलीं. त्या कारखान्यापासून त्या वसाहतींतील लोकांचें बहुत हित झालें. दिवसानुदिवस त्या लोकांची संख्या पुष्कळ वाढली, व त्यांची संपत्तिही वाढली.

दामू म्हणाला, संपत्ति कोठून आली? तुम्ही मघाशीं म्हणालां होतां कीं त्या ठिकाणीं रुपये चालत नव्हते, आणि ते त्यांची गरज बाळगीत नव्हते. फिरिस्ता म्हणाला, तें खरें, परंतु संपत्ति म्हणजे धान्य, गुरें, ढोरें, बागा, झाडें, घरें, घरांतलें सामान सुमान, होड्या, वगैरे अनेक प्रकारच्या अनेक जिनसा ह्या होत. त्या जाग्याची पहिली स्थिति व अलीकडची स्थिति ह्यांच्यामध्यें इतका भेद झाला होता कीं, कोणी मनुष्य पहिली स्थिति पाहून गेल्यानंतर कित्येक वर्षांनीं परत आला असता, तर ती जागा त्यास ओळखितां येतीना, इतकी सुधारणा थोड्या वर्षांमध्यें लोकांनीं केली होती. इतके उपकार म्हटले म्हणजे जलौघ, मारुत, व बाष्प ह्या तीन राक्षसांचे झाले होते. त्यांतही विशेषतः बाष्पाचे उपकार होते. राक्षस इतकीं कामें करीत होते म्हणून मनुष्यें आळशी बसत, असा अर्थ नाहीं. राक्षसांस काम लावून द्यावयाचें, व त्यांनीं काम केलें म्हणजे तें आटोपून ठेवायाचें, ह्यांतच त्यांचा बहुत काळ जाई. जलौघानें तक्ते पाडिले म्हणजे त्यांचीं घरें बांधायाचीं, पेट्या, मचवे, व गाड्या करावयाच्या ह्यांत वेळ जाई. मारुतानें दळावयाकरितां धान्य उत्पन्न करणें, व त्यानें तें दळून पीठ केलें म्हणजे त्याच्या भाकरी करणें, हीं कामें त्यांस करावीं लागत. बजी म्हणाली, बायकांस कामें बरींच असतील, म्हणजे सैंपाक करावा लागत असेल, चोळ्या व पोरांचीं अंगडीं, टोपडीं शिवावीं लागत असतील, नाहीं बरें? फिरिस्ता म्हणाला, होय, लागत होतीं तर. त्या लोकांनीं तेथें एक शाळा घालून तिजवर एक हुशार पंतोजी ठेविला होता. तो सर्व

मुलांस व मुलींस लिहिणें वाचणें शिकवीत असे; व मुलींस हल्लीं मुंबईत शिकवितात त्याप्रमाणें शिवण काम कोणी बाई शिकवीत असे. त्या मुली आपल्या आयांस शिवण काम करूं लागत. त्या लोकांनीं तेथें एक लहानसें व साधें असें देऊळ बांधिलें. सर्व लोक मोठ्या भक्तीनें प्रत्यहीं तेथें जमून मनापासून देवाची प्रार्थना करीत, आणि, हे तीन राक्षस त्वां आम्हांस दिल्यामुळें तुझ्या उपकारास पारावार नाहीं, असें म्हणत. दामू म्हणाला, त्या लोकांस बनातीच्या टोप्या व फलानिलाच्या बंड्या असले जिन्नस मिळत नसतील, नाहीं बरें? फिरिस्ता म्हणाला, कांरे बाबा, असें कां म्हणतोस! कापसाचीं वस्त्रें चांगलीं निघूं लागलीं तशीं लागलींच लोकरीचीं वस्त्रें काढण्याचा कारखाना त्यांनीं काढिला, व त्याप्रमाणेंच तागाचीं वस्त्रें काढण्याचाही कारखाना काढिला, आणि तितकेही सर्व कारखाने एकट्या बाष्पानें चालविले.

कांहीं दिवस गेल्यानंतर त्या लोकांनीं एक मोठें तारूं बांधिलें. तें तारूं चालविण्याविषयीं त्या तीन राक्षसांचा मोठा वाद लागला. जलौघ म्हणाला, माझ्या साह्यावांचून तें हालायाचेंच नाहीं. मारुत म्हणाला, तुझ्यानें तें तरेल मात्र, पण चालण्याविषयीं जर म्हटलें तर मी त्याजवर बसून पंख पसरीन तेव्हांच चालेल. आणि माझ्या साह्यावांचून जरी चाललें तरी मुंगीच्या पायांनीं चालावें त्याप्रमाणें चालेल. बाष्प म्हणाला, काका, तें खरें; परंतु जिकडे जिकडे तुझा जाण्याचा कल असेल तिकडे तिकडे तें तारूं गेलेंच पाहिजे, आणि मी तर त्यास त्याच्या यजमानास पाहिजे तिकडे नेईन. फार तर काय पण, तुम्ही दोघे एका विचारानें एकीकडे त्यास ओढूं लागलां, तरी मी एकटा त्यास दुसरीकडे ओढून नेईन. हें ऐकतांच जलौघानें वाद सोडून दिला, कारण, नदीच्या मुखापर्यंत तारूं नेण्याचें सामर्थ्य जरी त्याच्या आंगीं होतें तरी समुद्रांत चालविण्याचें सामर्थ्य नव्हतें; त्यामुळें त्यास वाद सोडून देणें प्राप्तच झालें. आतां मारुत व बाष्प हे दोन असामी राहिले त्यांनीं एक विचारानें आपसांत तारवावरचें काम वांटून घेतलें. मारुत खुशींत असून नेमलेल्या ठिकाणीं तारूं नेत असला, तर त्यानें त्याचा मालीम व्हावें; आणि तो रागावला असतां बाष्पानें मालीम व्हावें, असें ठरलें.

अशा प्रकारचें गलबत तयार झालें, व त्याजवरचे मालीम नेमिले, तेव्हां सिंहलद्वीपास जाण्यास अथवा मद्रास इलाख्यांत परत येण्यास त्या लोकांस अगदीं सोपें झालें होतें. परंतु त्या बेटांत जाऊन राहि-ल्यास त्यांस वीस वर्षे होऊन गेलीं होतीं, तितक्या काळांत त्यांनीं तेथें घरेंदारें वगैरे सर्व गोष्टींची योजना उत्तम प्रकारें केली होती, त्यामुळें त्या ठिकाणीं त्यांची प्रीति इतकी जडली होती कीं तें सोडून जाण्याचें त्यांच्या मनांत मुळींच येत नव्हतें. ह्या खेरीज तेथें येऊन राहण्या-च्या वेळेस जे लोक तरुण उमेदवार होते त्यांचें वय उतार झाल्यामुळें त्यांस सफर करण्याची उमेद नव्हती. परंतु जे तेथें आले त्या वेळेस बाल्यदशेंत होते, व जे तेथेंच जन्मले त्यांनीं हिंदुस्थानाविषयीं आपल्या आईबापांच्या तोंडून पुष्कळ गोष्टी ऐकिल्या होत्या त्यांवरून तें पाहण्या-विषयीं त्यांस मोठी उत्कंठा झाली होती. त्यांनीं इकडे येण्याचा विचार ठरवून म्हाताऱ्या लोकांच्या संमतानें त्या बेटांतला अनेक प्रकारचा माल हिंदुस्थानांत आणण्याकरितां तारवांत भरिला, आणि ते निघाले ते कांहीं दिवसांनीं हिंदुस्थानांत येऊन पोहोंचले. ते येथें आपला माल विकून बेटांत खपण्याजोगा माल भरून पुन्हा बेटांत गेले. ह्याप्रमाणें एक दोन वेळां आल्या गेल्यानें मार्गाची माहिती चांगली होऊन इकडचा माल तिकडे न्यावा आणि तिकडचा इकडे आणावा ह्याप्रमाणें मोठा व्यापार सुरू होऊन त्या लोकांचा मोठा भरभराटच होत गेला. ह्या-प्रमाणें गोष्ट झाली. संपली गोष्ट बरें, मुलांनो! असें म्हणून तो फिरि-स्ता लांब गोष्ट सांगितल्यामुळें दमून उगीच बसला. दामू म्हणाला, छानदार गोष्ट आहे. तींत राक्षस वगैरे पुष्कळ आहेत. हणमंतराव म्हणाला, राक्षस पुष्कळ असून उपयोग काय? हींत हांशील काय आहे तें सांगा बरें. ईश्वरानें अशा प्रकारचे राक्षस आम्हांस दिले नाहींत, तेव्हां ज्या गोष्टी मिळण्यासारख्या नाहींत त्या मिळण्याची इच्छा करणें आणि हलीं जें जवळ आहे तेवढ्यानें असंतुष्ट होणें ह्यांत काय नफा आहे बरें!

फिरिस्ता हंसून म्हणाला, असे राक्षस ईश्वरानें तुम्हांस दिले नाहींत, हें खास आहे काय? मी आपल्या गोष्टीचें तात्पर्य तुम्हांला सांगेन; पण ही बजी म्हणेल कीं हें तात्पर्य खराब आहे, हें शेवटीं नको. ह्याचें

तात्पर्य मी सांगतों पण सर्व मुलें निजावयास जाऊं द्या. त्यानें असें म्हटलें तों बजी आणि यमी जांभया देऊं लागल्या होत्या त्या उठून निजायास गेल्या, परंतु बाकीचीं मुलें बापाचें आर्जव करून तात्पर्य ऐकण्यास बसलीं.

फिरिस्ता म्हणाला, ऐका तर आतां चित्त देऊन. मीं सांगितले ते राक्षस ईश्वरानें मनुष्यमात्राचें काम करावें ह्या हेतूनें सर्वत्र उत्पन्न करून ठेविले आहेत. हें ऐकून त्या मुलांस वाटलें कीं, येथें आतांच एखादा राक्षस येतो किंवा काय कोण जाणे! आणि भयानें तीं इकडे तिकडे पाहूं लागलीं. फिरिस्ता म्हणाला, हणमंतराव, तुम्ही काशी, प्रयाग, वगैरे ठिकाणीं कधीं गेलां होतां काय? हणमंतराव म्हणाला, होय, गेलों होतों. फिरिस्ता म्हणाला, आणि मुंबईस गेलां होतां? हणमंतराव म्हणाला, होय, मुंबईस तर माझें जाणें येणें नेहमीं आहे. फिरिस्ता म्हणाला, गंगेच्या कांठच्या मोठमोठ्या चक्क्या कोण फिरवितें? तें सांगा बरें. हणमंतराव म्हणाला, त्या पाण्याच्याच जोरानें फिरतात. दुसरें कोण फिरवितें? फिरिस्ता म्हणाला, त्या पाण्याला जेवायास अन्न, रहावयास जागा, अथवा उक्ता पगार ह्यांपैकीं कांहीं द्यावें लागतें काय?

**हणमंतराव.**— नाहीं, त्यास काय द्यावयाचें आहे?

**फिरिस्ता.**— बरें, तर, ह्यावरून आतां समजा माझ्या गोष्टीचें तात्पर्य काय तें. (हें ऐकतांच हणमंतराव मनांत समजला).

**हणमंतराव.**— हें एवढा वेळपर्यंत माझ्या मनांत आलें नाहीं हें मला मोठें नवल वाटतें?

**फिरिस्ता.**— जलौघ ह्याचाच अर्थ पाण्याचा प्रवाह, म्हणजे पाण्याचा ओघ असा आहे.

हणमंतरावापेक्षां त्याचीं मुलें मोठीं बुद्धिमान् होतीं, व शाळेंत शिकलेलीं होतीं, त्यामुळें त्यांच्या ध्यानांत सर्व राहिलें होतें तें आठवून त्याची सर्व संगति जुळली त्यामुळें त्यांस मोठा आनंद झाला.

**जनी.**—हां, पाण्याचा ओघ खरा, म्हणून त्यानें जानूचें घर स्वच्छ करून मुलांस पोहण्यास शिकविलें, व त्यांस आंगधुणें घातलें. पण

अलीघ तक्ते आणावे व न्यावे हीं कामें करीत असे म्हणून तुम्ही बोललां, बाबा, तेवढें कसें तें सांगा बरें!

**दामू.**—अगे, मी सांगतों तुला, ऐक. होडींत किंवा मचव्यांत तक्ते घालून नेतां आणितां येतीलच. ह्यांत काय कठीण आहे? आणि ह्यांनीं पूर्वी सांगितलें, नाहीं बरें, कीं त्याच्या पाठीवर एक रिकामी पेटी ठेवून तींत जानू आपली हत्यारांची पिशवी घेऊन बसला; ही पेटी म्हणजे होडीच, दुसरें काय!

**जनी.**—हां, खरेंचरे दादा, खरेंच! आणि ती लांब काठी राक्षसानें लवकर चालवें म्हणून जानूनें घेतली होती म्हणून सांगितलें तें वल्हेंच असेल असें मला वाटतें.

**हणमंतराव.**—खरेंच बावा, तुमच्या गोष्टींत जेवढें खोटें वाटत होतें तेवढें सारें खरें आहे, अशी माझी आतां खातरी झाली.

**फिरिस्ता.**—आतां मारुत—(ह्याप्रमाणें बोलूं लागतो इतक्यांत.)

**दामू.**—थांबा हो बावा, अमळ विचार करून मारुत म्हणजे काय हें सुचतें किंवा काय तें पाहतों. (अमळ विचार करून) हां मारुत म्हणजे वारा असें वाटतें, कारण, बाबा मला फार दिवसांमागें एकदां कुलाब्यास तांब्याच्या बंगल्यांत घेऊन गेले होते तेथें वाऱ्यानें फिरणारी एक चक्की होती. पाणी आणि वारा हे दोघे भाऊच आहेत खरें. आणि वारा पाण्याशीं भांडला म्हणजे खाडीच्या व समुद्राच्या पाण्याला मोठाल्या लाटा येतात, व फेंस येतो, हेंही समजतें, नाहीं बरें, बाबा!

**हणमंतराव.**—खरेंच आहे. वाऱ्याचाही सर्व लोकांस पाण्या प्रमाणेंच उपयोग आहे, आणि पाण्यापासून जशीं मोठमोठीं कामें होतात तशींच वाऱ्यापासूनही होतात; परंतु आपल्या मनांत ह्याविषयीं कधीं येत नाहीं इतकेंच आहे. बरें, असो, वाटसरू बावा, पाणी आणि वारा ह्या दोन द्रव्यांपासून मोठमोठीं कामें होतात हें तर तुमच्या गोष्टी वरून ह्या मुलांस देखील समजलें, आणि हें तीं विसरणारही नाहींत, परंतु ह्या दोहोंपेक्षांही प्रबळ असें तिसरें द्रव्य कोणतें तें सांगा बरें.

**फिरिस्ता.**—हें तुम्हास फारसें माहीत नसेल खरें. बाष्प ह्यास मराठी भाषेंत वाफ म्हणतात. ही वाफ कोंडण्याकरितां वाफेच्या यंत्रांत मोठा नळा केलेला असतो त्यांत ती कोंडून एकदां यंत्र चालू झालें म्हणजे त्याबवर पाहिजे तो कारखाना चालतो. वाफ पाणी आणि विस्तव ह्या दोहोंपासून उत्पन्न होते, म्हणून तो बाष्पराक्षस पाण्याचा व आगीचा मुलगा असें मीं म्हटलें. वाफेच्या योगानें समुद्रावर गलबतें सारखीं बेतानें चालतात. वाराच म्हटला म्हणजे तो कांहीं मनुष्याच्या अमलांत नसतो, त्यामुळें त्याच्या योगानें गलबतें सारखीं चालत नाहींत. आतां वर सांगितल्या द्रव्यांपासून मनुष्यांचें इतकें काम होतें तरी मनुष्यांस काम करण्यास नाहींसें होत नाहीं. उलटें यंत्राच्या साहाय्यानें कारखाने वाढतात तों तों काम लोकांस जास्ती मिळतें. पूर्वी सांगितलेल्या बेटांत कापड काढण्याचा कारखाना वाफेच्या यंत्रापासून आला, आणि तेणेंकरून सर्व लोकांस पुष्कळ काम मिळूं लागलें. त्या बेटांत त्या लोकांचें दळण जर पवनचक्कीनें दळलें न जातें, तर त्या लोकांस स्वतः हातानें दळावें लागतें, आणि असें झालें असतें तर त्यांच्या हातून इतकें धान्य उत्पन्न न होतें. कारण दळण्याचा वेळ वांचला म्हणून तो दुसऱ्या कामाकडे, म्हणजे पाहिजे तशा रीतीनें शेतकी वगैरे करण्याकडे लावण्यास सांपडला. एरवीं कसा सांपडता?

**दामू.**—अहो बावा, पाण्याच्या ओघानें चक्की कशी चालते व तुळया कशा करवततात, हें मला कांहीं समजत नाहीं. तुम्ही मला तें सांगतां बरें!

**फिरिस्ता.**—तें सांगण्यास मोठें अवघड आहे. तें कोठें तरी तुझ्या दृष्टीस पडेल तेव्हां तुला समजेल.

**हणमंतराव.**—त्या लोकांचीं हीं कामें परस्पर झाल्यामुळें त्यांस दुसरीं अनेक कामें करण्यास पाहिजे तितका वेळ सांपडूं लागला, एवढेंच पुरे. रिकामें बसून काय करावयाचें आहे!

हणमंतरावाचा भाऊ, नारोपंत, एवढा वेळपर्यंत आपलें काम करीत होता, त्यानें फिरिस्त्याची गोष्ट मधुनमधुन ऐकिली होती, आणि मधूनमधून नव्हती ऐकिली, तो मध्येंच एकदां बोलूं लागला.

**नारोपंत.**— एवढाले राक्षस सांपडून लोकांस जर काम करावें लागत असलें, तर मग ते सांपडल्यापासून फायदा तरी काय! हें समजत नाहीं.

**हणमंतराव.**— वा:, रिकामें बसावयास सांपडलें तर फायदा आहे, नाहीं तर फायदा नाहीं, हा समज कोणत्या प्रकारचा बरें! माझें मत असें आहे कीं मनुष्याला काम करायाला असलेंच पाहिजे, आणि काम करण्यापासून त्यास सुखोत्पत्ति व्हावी म्हणजे झालें. आपल्या देशांतच पहा. अलीकडे यंत्रानें कामें होऊं लागल्यापासून तीं कामें किती सवंग झालीं आहेत! छापील पुस्तकें किती सवंग मिळतात बरें! पंचांग दोन किंवा तीन पैशांस मिळतें. लेखकाला आठ आणे दिले तरी देखील तो असें शानदार पंचांग लिहून देणार नाहीं. विलायतेहून कापड येतें तेंही असेंच सवंग पडतें. सारांश, राक्षसांपासून म्हणजे यंत्रांपासून काम झालें असतां फायदा मोठा आहे. मग आपणांस काम करण्यास पडलें तरी चिंता नाहीं.

अशा रीतीनें त्यांचें भाषण चाललें आहे इतक्यांत घरांत जेवणाची तयारी होऊन हणमंतरावाच्या बायकोनें त्यास पाय धुण्यास उठावें म्हणून सांगितलें. हणमंतराव त्या फिरिस्त्याची गोष्ट ऐकून फार खुश झाला होता, त्यामुळें तो त्यास म्हणाला, अहो बावा, तुम्ही सकाळपासून चालून थकलां आहां, तर आतां आम्हां सर्वांबरोबर एक अर्धीभाकर खाऊन निजा, म्हणजे तुम्हांस स्वस्थपणें झोंप येईल. आणि तुम्हां एकट्याकरितां नवें अन्न करावयास लागत आहे असें नाहीं. फिरिस्ता म्हणाला, तें आपलें म्हणणें सारें खरें आहे, व तुम्ही कृपाकरून मला जेवायास बोलावितां, तर यावयास माझें काय जातें! पण तुम्हांस सांगतों कीं म्हातारपणामुळें प्रकृतीस रात्रीं जेवण सोसत नाहीं. हें त्यानें सांगितलें तरी हणमंतरावाचा आग्रह फारच पडल्यामुळें तो त्याजबरोबर जेवायास गेला. हणमंतरावाच्या मनांत त्यानें सांगितलेली गोष्ट घोळतच होती, तो मध्येंच म्हणाला, अलीकडे ह्या दहा वर्षांत वाफेचीं यंत्रें इकडच्या लोकांस माहीत झालीं; पूर्वी मुळींच माहीत नव्हतीं. मला वाटतें कीं वाफेच्या वेगाप्रमाणें दुसरा वेग नाहीं. आणि यंत्राच्या

कामांत वाफेचा जसा उपयोग असेल तसा दुसऱ्या द्रव्याचा उपयोग नसेल. फिरिस्ता म्हणाला, मीं ह्या देशांत चोहोंकडे फिरलों आहें; म्हणजे रामेश्वरापासून गंगोत्रीपर्यंत, आणि हरिद्वारापासून गंगेच्या मुखापर्यंत, अमुक एक ठिकाण म्हणजे पहायाचें ठेविलें आहे असें नाहीं. हजारों गोष्टी नव्या व जुन्या ऐकिल्या आहेत; सर्व प्रकारच्या लोकांशीं संभाषण केलें आहे; व साहेब लोकांच्या तोंडून पुष्कळ गोष्टी ऐकिल्या आहेत. त्यांच्या म्हणण्यांत असें आलें कीं, वाफेपासून मोठमोठीं कामें होतात हें कोणाला समजलें नव्हतें तोंपर्यंत अर्थात् तीस कोणी विचारीत नव्हतें. परंतु ती गोष्ट समजल्यापासून अलीकडे बहुतेक सर्व यंत्रें वाफेच्या योगानें लोक चालवितात. आणि यंत्रें चालविण्याविषयीं तिजप्रमाणें दुसऱ्याचा वेग नाहीं हें खरें. अहो, फार कशाला पाहिजे. तुम्ही विचार करून पहा, म्हणजे तुमच्या ध्यानांत येईल कीं, पाणी, वारा, विस्तव, व वाफ ह्यांवांचून कांहीं होत नाहीं. आतां हें अन्नच पहा. पाणी, वारा, विस्तव, वाफ ह्यांच्या साह्यानेंच शिजून तयार झालें आहे. हणमंतराव म्हणाला, वास्तविकच आहे. असें म्हणून मग ते दोघेजण व नारोपंत जेवायास बसले, आणि दामू व जनी दिवसासच जेवलीं होतीं तीं दोघेंजणें जाऊन निजलीं.

---

कविता.

## भीष्म प्रतिज्ञा.

श्लोक.

प्रतिज्ञा जे केली यदुकुळवरें युद्ध न करीं ॥
धरींना शस्त्रातें कदनसमयीं मी निजकरीं ॥
घडेना हें मिथ्या जरि तरि न मी भागवत रे ॥
प्रतिज्ञेतें भीष्में मनिं अवथिलें या दृढतरे ॥

आर्या.

भीष्म पुढें करुनि उठे प्रथम सुयोधन करावया कंदन ॥
विजय पुढें करुनि उठे धर्म प्रभु जो सुकीर्तिचें सदन ॥

वृद्धतरुण भीष्मार्जुन परि न रणीं न्यून अधिक ते गमले ॥
सम लेखर्षि तयांतें जाणुनि तद्भुज पराक्रमीं रमले ॥

श्लोक.

भीष्मा कडे रवें भयानक दुंदुभीचा ॥
होतां वदे तनय आनकदुंदुभीचा ॥
दुश्चिन्ह आजि गमतें मज सव्यसाची ॥
जाती शिवा अशिव ती अपसव्य साची ॥

श्लोक.

गर्वोक्ति फाल्गुन वदे जमदेकरांया ॥
आहे मशीं कवण तो झगडा कराया ॥
म्यां कालखंज वधिला अतुलप्रतापी ॥
पौलोमही असुर गोसुरविप्रतापी ॥

---

पितामह वदे तदा प्रबळ तूं पृथानंदना ॥
रमेश रथिं सारथी चतुर वागवी स्यंदना ॥
स्वयें गतवयस्क मी सरस वीर तूं रे नवा ॥
भिडें रणधुरंधरा जय घडो सुखें वा न वा ॥

---

पारीक्षितां मग शरासन पांडवानें ॥
ओढूनियां हुतवहार्पितखांडवानें ॥
तो भीष्मदेह खचिला शरतांडवानें ॥
ज्यांच्या क्रिये सकल पद्मभवांड वानें ॥

---

गांगेय तापा चढला कसा रे ॥
ज्या मानिती हाच कृतांत सारे ॥
गर्जोनियां सिंहरवें जयांतें ॥
पाहे जणो मारिल आज यातें ॥

---

त्वां काय कर्म करिजे लघु लेंकरानें ॥
बोलोनियां मग धनू धरिलें करानें ॥
तों व्यापिलें सकल सैन्य महाशरांनीं ॥
ग्रीष्मीं जसा पतित होय हुताश रानीं ॥

तो स्तोमें येतां बहुसायकांचा ॥
झालाचि पार्थव्यवसाय काचा ॥
काचोंवला वीर पुढें धसेना ॥
झाली नृपा सर्व भयांध सेना ॥

आर्या.

शांतेनव सिंह गमला पळतां नररथहि तो पळे ससोंच ॥
ससेख भैभुहि वसंतीं बहु फुलला होय हो पळस साच ॥

---

जिकडे जिकडे पळती तिकडे तिकडे महाजेवन तो बीं ॥
बहु हायहाय म्हणती प्राकृत बुधें हंत हा यत्न तोंबीं ॥

श्लोक.

पुष्पवर्ण नटलें पळसाचा ॥
पार्थ सावध नसे पळ साचा ॥
पाहिलें जंव मिर्दान तयाचें ॥
तों दिसे वदन आनंत याचें ॥

आर्या.

भीष्म ग्रीष्म तरणिसा अर्जुन हेमंततरणिसा गमला ॥
देव म्हणे बहु आला वृद्धाहुनि जिष्णुचाच राग मला ॥

---

हो पांडवासि भस्मचि करिल उपेक्षा करूंनये याची ॥
पदरीं अकीर्ति आश्रितसुहृदनवन पथकरून येयोंची ॥

श्लोक.

प्रतोद मग ठेविला उतरला रथाधः स्थळीं ॥
म्हणे प्रबळ भीष्म हा जय घडे न या दुर्बळीं ॥
करीं कमलनेत्र तो पतित चक्र तें स्वीकरी ॥
प्रमोद यमनंदना बहु तया यशस्वी करी ॥

श्लोक.

असा येतां देखे रथनिकट तो श्यामल हरी ॥
नृपा गांगेयाच्या हृदयिं भरल्या प्रेमलहरी ॥
शरातें चापातें त्यजुनि वदला गद्गद रवें ॥
जगन्नाथें केलें मज सकल लोकांत बरवें ॥

ये रथावरि झणीं यदुराया ॥
खेंडु देइन विकोशी कराया ॥
तोडिं मस्तक पडो चरणीं या
धन्य होइन सदाच रणीं या ॥

आर्या.

तूं हरिसीं हरिसाचा हरिणी सुरसिंधु मीहि पौंडससा ॥
पौंडें ससाभसें हो अरि हरिचा पावेल काय पाड ससा ॥

श्लोक.

मारावें मजला असेंच असलें चित्तीं तुझ्या केशवा ॥
तैं मातें मग कोण रक्षिल पहा विश्वेशें नाकेशें वा ॥
हा मुख्यार्थ जनार्दना मज गमे भक्तप्रतिज्ञा खरी ॥
कीजे सर्वजनांत होइल मृषा हो आपुली वैखरी ॥

श्लोक.

हें भीष्मवाक्य परिसोनि जगन्निवासें ॥
केलें विलोकन मृदुस्मित पीतवासें ॥
वेगें फिरोनि चढला मग तो रथातें ॥
पार्थाचिया पुरविणार मनोरथातें ॥

---

कविता.

## कुशलवाख्यान.

श्लोक.

तें यज्ञकंकण करांबुजिं राघवातें ॥
शत्रुघ्न ते भरत बांधिति आत्महातें ॥
सोडूनि भूमिवरि त्या मग श्यामकर्णा ॥
झांकी रवी नयन देखुनि कांतिवर्णा ॥१॥.

---

रामासि वंदुनि सहोदर ते निघाले ॥
वाजी गजारुढ रथी दळभार चाले ॥
पादाति चालति नव्हे गणना तयाची ॥
कीं काढिली वरुनि कांति हिमालयाची ॥२॥

तो श्यामकर्ण मग चालतसे पुढारा[255] ॥
मागून सैन्य[256]रज पाडित अंधकारा ॥
सोडूनियां चमु[257] तुरंगम[258] वेगें[259]राशी ॥
आला त्वरें करुनि वाल्मिकिआश्रमाशी ॥३॥

---

क्रीडा तिथें करितसे लहु बाळ[260]वेशें ॥
गेला असे वनफळां कुश तो अवेशें[261] ॥
त्या बाळका[262]जवळ अग्रज[263] तो नसोनी ॥
पाहे हयासि[264] लव निर्भयतेकरोनी ॥४॥

चामरवृत्त.

अश्व देखतांचि बाळकासि[265] चोज[266] वाटलें ॥
हेमरत्न[267]भूषणीं म्हणे कसें सुशोभलें ॥
तेक्षणींच देखिली शिरीं[268] सुवर्णपत्रिका ॥
पाहे बाळ वाचुनी बहूत अर्थ नेटका[269] ॥५॥

---

सूर्यवंशिराघवेंचि हा तुरंग सोडिला ॥
यासि जो धरील तो नृपांत वीर आगळा ॥
सैन्य हें करील युद्ध सोडिना तयांवरी[270] ॥
मीच राम येउनी करीन शत्रु[271]मोहरी ॥६॥

---

पत्रिकार्थ पाहुनी लहू कुमार हांसला ॥
सोडुनी करांबुजें चुरा करोनि टाकिला ॥
अश्वकंठिची करें सुरम्य माळ काढिली ॥
जानकीसुनंदनें[272] गळ्यांत शीघ्र घातिली ॥७॥

---

अश्वकंठ वेष्टुनी सुरम्य-वस्त्र[273]-पल्लवें ॥
कर्दळीवनांत आणुनी तयास गौरवें ॥
बांधुनी रणांगणांत संगरा[274]शि ठाकला[275] ॥
अश्व तो न देखतांचि सैन्यभार लोटला ॥८॥
अश्वपाळ तेथ येउनी कुमार पाहती ॥
चाप सज्जुनी उभा लहान फार आकृती ॥

दीसतो कुमार हा जसा सकाळच्या रवी ॥
धाकुटा परंतु हावभाव[२७६] फार दाखवी ॥९॥

कामदाछंद.

एक जाउनी सांगती सिते ॥ अनर्थ मांडिला तूझिया सुतें ॥
कर्दळीवनीं अश्व बांधिला ॥ त्यानिमित्य सैन्यभार लोटला ॥१०॥

---

प्रार्थिलें अम्ही बाळकोत्तमा ॥ देइं सोडुनी या तुरंगमा[२७७] ॥
नायकेच तो हट्ट मांडिला ॥ चापसज्जुनी[२७८] बाण लाविला ॥११॥

श्लोक.

रुदन[२७९] तैं करिती जनकात्मजा[२८०] ॥
कुमति[२८१] हे उपजे ममआत्मजा[२८२] ॥
धरुनि अश्व जिवावरि ऊठला ॥
पडतसे धरणीवरि[२८३] व्याकुळा[२८४] ॥१२॥

---

दीर्घ रोदन वनीं लहु आयके ॥ कोण गांजित असे ममअंबिके[२८५] ॥
बाण तीक्ष्णचि शिरीं[२८६] धनुतें करीं ॥ येउनी नमुनि बोलत सुंदरी[२८७] ॥१३॥

---

कासया[२८८] धरियला हय तो तुवां ॥ काय होय नकळे तुझिया जिवा ॥
येरु[२८९] वीनवि तुझा सुत मी जरी ॥ आज कां करुनि घेइन मोहरी[२९०] ॥१४॥

---

आत्मजें[२९१] जननिसी[२९२] समजावुनी ॥ सैन्य बाहिर असे मठ वेष्टुनी ॥
अश्व हींसति बळें घनगर्जना ॥ किंकळ्या द्विरद[२९३] फोडिति आनना[२९४] ॥१५॥

सवाई.

एकें[२९५] गजावरि एक हयावरि एक रथावरि बैसुनि आले ॥
घालुनियां कवचें[२९६] धरुनी बरच्या वर सव्यकरा[२९७]प्रतिभाले ॥
गर्जति वीर धुधाटसमीरण[२९८] ते रणधीर उतावीळ झाले ॥
वस्त्र संवारुनि[२९९] शस्त्र विकल्पुनि[३००] अस्त्रहि मंत्रुनि युद्धि निघाले ॥१६॥

---

दुर्बळ[३०१] सैन्य विलोकुनियां लहुशीं मग तो मुनि वाल्मिकि बोले ॥
हे चमु फार लहू सुकुमार तुं राहिं उगा तुजलागिं न तोले ॥
येरु वदे चमु मारिन आजि ऋषी तुमचे निववीन मि डोळे ॥
ऐकुनि शब्द ऋषी मग स्तब्धचि होउनियां हृदयांतरिं डोले ॥१७॥

देखुनियां अति मार दयाकुळ वाल्मिकि सांगतसे लहुवातें ॥
संनिध साह्य नसे कुश तो तुज मास्तव सोडुनि दे तुरगातें ॥
येरु म्हणे मज साह्य कृपा तुमची मग काय असे भय मातें ॥
धन्य म्हणे ऋषि जानकिच्या कुशिं जिंकुनि ये रिपुशी निजहातें ॥१८॥

श्लोक.

बोले लहू त्या भरतानुजासी ॥
मी धाकुटा अद्भुत रे तुम्हांसी ॥
भक्षीतसे कीं वडवाग्नि सिंधू ॥
कीं तो करी हस्तिं अगस्ति बिंदू ॥१९॥

---

ऐकोनी शब्द त्याचे मग निजहृदयीं काय शत्रुघ्न बोले ॥
पृथ्वीमाजी दिसेना लहुसम परि हा मीपणें फार डोले ॥
शिक्षा मी यास देऊं परि लघु मुल हें काय होईल कीर्ती ॥
यालागीं स्तब्ध झाला मग लहु उठला संगरा शूरमूर्ती ॥२०॥

---

सांभाळीं बाण माझा म्हणुनि लहु तया नाम गर्जोनि कर्णीं ॥
वोढोनी सोडि तेव्हां गगन गडगडी जेंवि वीजा सुवर्णी ॥
जाती झांकोनि डोळे पडति हय तळीं वीर मूर्छीत यानें ॥
शत्रुघ्ना थोर चिंता मृतिसमयिं म्हणे रक्षिजे राघवानें ॥२१॥

---

असंख्या बाणांचे करुनि तुकडे पाडवि शरें ॥
तैंळीं भेदी वीरां गगनिं उडवी तो किति शिरें ॥
कृतघ्नें शत्रुघ्नें प्रबल रिपु पाहोनि नयनीं ॥
अपांही मार्तंडास्त्रांहि शर धनुष्या चढवुनी ॥२२॥

---

त्यजी त्या अस्त्रातें मग रवि नभीं कोटि दिसती ॥
लहू तें मेघास्त्रा त्यजि दिनमणी सर्व लपती ॥
बुजाले ते भानू न दिसति कदा अभ्रपटळीं ॥
तयीं त्या शत्रुघ्ना कुतुहल दिसे नेत्रकमळीं ॥२३॥

सुचिंता शत्रुघ्ना हृदयिं पडली त्यासि बघतां ॥
विलोकोनी बंधू भरत मग बोले नृपसुता ॥
त्यजीं निर्वाणींस्त्रा अजुनि नयनीं काय बघशी ॥
रिपू हा नाटोपे यश मज गमे तूं न पवशी ॥२४॥

---

सार्थं ज्या असति छत्तिस विद्या ॥ केंवि बांधिल तयासि अविद्या ॥
शस्त्र अस्त्र न चले मग बुध्या ॥ तो करीं करु म्हणे मल्लयुध्या ॥२५॥

---

ते करें धरिति हस्तक वोढुनी ॥ पाडिती मग परस्पर मेदिनी ॥
लाविती रंगें बहू करपंकजीं ॥ हाणिती दुरुनि धांवुनियां भुजीं ॥२६॥

---

लहु लघू दशरथात्मज मोठा ॥ फिरुनि जाउनि धरी करिं पोटीं ॥
उचलुनी मग रथावरि घाली ॥ सकळही चमु सुशीघ्र निघाली ॥२७॥

---

हर्ष मानिति नृपात्मज दोघे ॥ जाहलों म्हणति आजि अमोघे ॥
घेउनी निघति राघवपुत्रा ॥ चालली निजपुरा चमुयात्रा ॥ २८ ॥

रथोद्धता छंद.

भूमिजे ऋषीकुमार सांगती ॥ तूझिया सुतें मारिले किती ॥
शस्त्रिं अस्त्रिं तो अजिंक जाहला ॥ मल्लसंगरीं बंध पावला ॥२९॥

---

बांधुनी तया रथींच घालुनी ॥ वीर गेछले सैन्य घेउनी ॥
वृत्त ऐकतां जानकी पडे ॥ वक्ष भाळ ही ताडुनी रडे ॥ ३०॥

---

शोक तें करी रामअंगना ॥ दाखवा म्हणे आत्मनंदना ॥
यावरी कुठें पाहुं लेंकरूं ॥ येकली वनीं काय मी करूं ॥३१॥

विबुध प्रियावृत्त.

शत्रुनें तुज बांधितां रथिं हुंबरा सम वासरा ॥
फोडिला असशील तूं मज लागला जिविं झांजरा ॥
आह्मुनी कुश कां नये तुजलागिं सोडवुं या क्षणीं ॥
अश्रु ते स्रवती महीवरि दुःख दाटतसे मनीं ॥ ३२ ॥

### पंचचामरवृत्त.

तदा ऋषी वदे मुखें अचिंतें[३३४] तूं वसें सुखें ॥
कुमारें[३३५] पैल पातला दुरूनि कुश कौतुकें ॥
कुशास देखुनी सिता रडोनि आळवी[३३६] शुरा ॥
कुमार होय घाबरा पुसे नमूनि सुंदरा ॥ ३३ ।

---

वृत्तांत सर्व सांगती लहूसि फार वानिती[३३७] ॥
निदानिं बंध पावला म्हणूनि त्या अभिमानिती[३३८] ॥
सुसैन्य तेंधि ओसरे[३३९] परंतु जानकी [३४०]झुरे ॥
बहूत आम्हि सांगतों रडों नको कृपाकरे ॥३४॥

### वसंततिलकवृत्त.

नेला असेल जरि बाळ महीतळीं[३४१] तो ॥
ओढूनि काढिन बळें स्वकरें गडी तो ॥
मारीन पन्नंगें[३४२] मि फोडिन शेषटाळू[३४३] ॥
भूगोल हा उलथितां[३४४] मज नाहीं वेळू ॥३५॥

---

माता म्हणे न [३४५]वधि कैकइआत्मजां[३४६]सी ॥
बांधोनियां रथिंच घालुनि आण त्यांसी ॥
जा शीघ्र सोडविं सहोदर येश घेई ॥
ऐकोनि ठेवि निजमस्तक मायपांई ॥३६॥

### घनाक्षरी.

देखतांचि कुश वीर ॥ लहू रथीं धरी धीर ॥
जेंवि सूटतां समीर[३४७] ॥ नीरदांस[३४८] घालवी ॥१॥
युद्ध द्यावया उदार ॥ रणीं करी शूर मार ॥
सूर्यकुळीं अवतार ॥ धरी रिपू खालवी ॥२॥
सैन्यामाजी हाहाकार ॥ झाला वीरघोषें[३४९] फार ॥
आतां कैंचें घर दार ॥ नाहीं थार जावया ॥३॥
हाय बोलती वदनिं ॥ विघ्न आलें हें कुठूनि ॥
कोणीं जावें रणांगणिं ॥ यासीं सम व्हावया ॥४॥—३७

कुश म्हणे रे शत्रुघ्न ॥ थोर होसि रे कृतघ्न ॥
करूनियां थोर विघ्न ॥ लहूबाळ आणिला ॥१॥
आतां करूं दंत भग्न ॥ बाणीं लावूं तुझें लग्न ॥
दुःखसिंधु माजि मग्न ॥ होशी जिवा वेगळा ॥२॥
बहू जाहलासि शूर ॥ आतां करीन मी चूर ॥
सैन्य सोडूनियां दूर ॥ जासि कुठे संगरीं ॥३॥
टांग धरूनियां गगनीं ॥ तूज झोंकुं फीरवूनि ॥
स्वर्ग दाखवूं नयनीं ॥ याच क्षणामाझारी ॥४॥३८

कामदावृत.

युद्ध तें कधीं तुम्हीं दुणावलें ॥ म्हणुनि राघवें तुम्हांसि धाडिलें ॥
भ्याड ते तुम्ही ठावके मला ॥ व्यर्थ नाम शत्रुघ्न हें तुला ॥३९॥

---

यावरी करीं नाम सार्थक ॥ सांहिं सोडितों तीव्र सायकें ॥
बाण लावुनी चांप ओढिलें ॥ मंत्र बोलुनी अस्त्र सोडिलें॥४०॥

शार्दूलविक्रीडित.

ऐकोनी मग कैकईसुत म्हणे कां धीट होशी मुला ॥
ओंठाच्या वरचा हि जार अजुनी नाहीं तुझ्या वाळला ॥
हे तूझे बहु शब्द तोंचि समरीं जों गांठि नाहीं मशीं ॥
गर्जोनी मग काळदंड त्यजिला घालोनियां आकर्शी॥४१॥

---

देखोनी लहुबांग्रजें निजशरें शस्त्रासि त्या तोडिलें ॥
टाकोनी दृढ पाशजाळ भरता पृथ्वीवरी पाडिलें ॥
बांधोनी समरांगणीं उभंयतां घेऊनियां चालिले ॥
तेजस्वी लहुकूश ते यशभरें त्या आश्रमा पातले ॥४२॥

---

शत्रुघ्नाभरतासि देखुनि दुरी सीता वदे वाल्मिका ॥
लज्जेनें जिव सांडितील नयना सन्मूख आणूं नका ॥
सांगोनी कुशनंदनासि तुरगींपाशींच रे बांधणें ॥
बोले वाल्मिकि तें कुशास तुरगासंनीध त्यां ठेवणें ॥४३॥

आज्ञेनें गुरुच्या सैंद्दोदर कुशें नेवोनियां बांधले ॥
येऊनी लहु तो निवेदुनि नमी सीताऋषीपावलें ॥
आलिंगूनि लवांकुशांसि बसवी मांडीवरी भूमिजा ॥
बोले त्यां श्रम हारिले म्हणउनी चुंबीत वैक्रांबुजा ॥४४॥

---

# यूरोपांतील कांहीं लोकांच्या गोष्टी.

## ग्रेस दार्लिग हिची गोष्ट.

इंग्लंद देशाच्या उत्तर भागीं नार्थंबरलन्द ह्या नांवाचा प्रांत समुद्र-किनाऱ्यास आहे. त्या किनाऱ्यापासून थोड्या अंतरावर समुद्रांत किती एक बेटें आहेत. त्या बेटांमधून समुद्राचें पाणी मोठ्या जोरानें व वेगानें वाहतें. त्या बेटांवर गलबतें फुटण्याचें मोठें भय आहे. वारंवार गलबतें फुटतात, म्हणून रात्रीस उजेड पडून हीं बेटें आहेत असें गलबतांवरील लोकांस समजण्याकरितां त्यांपैकीं कितीएक बेटांवर दिवे लावण्याचीं घरें बांधिलीं आहेत. त्या बेटांपैकीं लांगस्तोन ह्या नांवाचें बेट आहे, तेथील दिवा लावण्याच्या घरावर विल्यम दार्लिग ह्या नांवाच्या मनुष्याची नेमणूक इ॰ स. १८२६ त झाली. ह्या मनुष्याचें सातवें मूल ग्रेस ह्या नांवाची मुलगी होती. ती मुलगी भिडस्त व संकोचवृत्तीची होती. ती आपल्या आईबरोबर घरांतील झाडलोट वगैरे कामें करीत असे. ती बेवीस वर्षांची झाली तेव्हां तिनें जें कृत्य केलें त्यावरून तिचें नांव जितक्या देशांत इंग्रेज़ी भाषा चालते तितक्या देशांत प्रसिद्ध झालें, व तिची कीर्ति अक्षय्य राहील ह्यांत संशय नाहीं. ती गोष्ट अशी.

फोरफारशायर ह्या नांवाची आगबोट, इ. स. १८३८ सांतील सप्तेंबर महिन्याच्या पांचव्या तारिखेस इंग्लंदांतील हल्ल नांवाच्या बंदराहून स्कात्लन्दांतील दंदी नांवाच्या बंदराला जावयास निघाली. त्या आगबोटीवर पुष्कळ किमतीचें कापड व लोखंड भरलें होतें, व शिवाय ४१ उतारकरू आणि गलबतावरील नाखवा व त्याची बायको व त्याच्या हाताखालचे वीस खलाशी मिळून एकंदर ६३ मनुष्यें वर होतीं.

ह्या आगबोटींवरच्या आगीच्या यंत्रांच्या सामानाची मरामत बरोबर नव्हती, त्या गलबतावर जो अनर्थ गुदरला त्याचें कारण हेंच. ती आगबोट चालत असतां वारा मोठा सुटल्यामुळें, व लाटा मोठाल्या उसळूं लागल्यामुळें, गलबतास भोंक पडून पाणी आंत शिरूं लागलें. त्या पाण्यानें आग विझून यंत्रें चालतनाशीं झालीं. वरील मनुष्यांचा कांहीं एक उपाय न चालून ती आगबोट वाऱ्याच्या व लाटांच्या जोरानें वाहत चालली. सेवटीं दुसऱ्या दिवशीं तिसरे प्रहरीं ती आगबोट एका खडकावर लागली. त्यावेळेस त्या बोटीवरील लोकांपैकीं नऊ मनुष्यें एक होडी खालीं टाकून तीवर बसून आगबोट सोडून गेलीं. हीं नऊ मनुष्यें दुसरे दिवशीं दुसऱ्या एका गलबतावरील मनुष्यांनीं पाहून आपल्या गलबतावर घेतलीं, ह्यामुळें तीं निभावलीं.

बाकीच्या लोकांची हवाल काय सांगावी! बायका होत्या त्या दुःखाच्या व निराशेच्या किंकाळ्या फोडीत; इकडे गलबतावरचा अधिकारी नाखवा घाबरून विचारांत पडला, त्याला पुढें काय करावें तें सुचेना; त्याची बायको होती ती त्याला मिठी मारून दीनवाणीनें, मला तारा, मला तारा, म्हणूं लागली; किती एक लेंकुरवाळ्या बायका आपल्या मुलांस उराशीं धरून स्तब्ध राहिल्या होत्या; इकडे कितीएक स्त्रीपुरुषें, ही आपली शेवटची भेट म्हणून, परस्परांस मिठ्या मारूं लागलीं; किती एक धिराचीं मनुष्यें ईश्वराची इच्छा ती चांगलीच आहे असें समजून, शांतपणें मरणाची प्रतीक्षा करूं लागलीं.

इतक्यांत गलबत पहिल्यानें खडकावर लागलें त्यावर लवकरच एक मोठी उंच लाट मोठ्या जोरानें येऊन गलबताच्या बाजूवर पडली, त्यामुळें तें गलबत वर उचलून खडकावर आपटलें, त्यासरसें फुटून त्याचे दोन तुकडे झाले. ह्यावेळेस गलबतावरील बहुतेक मनुष्यें पाण्यांत पडून प्राणास मुकलीं. गलबत फुटण्याच्या सुमारास वरील कांहीं लोक गलबताच्या नाळीकडील भागावर भय कमी होईल म्हणून तेथें जाऊन बसले. ते नऊ होते, म्हणजे चार उतारू आणि गलबतावरील काम करणारे पांच. ते लोक दिवस उजाडेपर्यंत तसेच तेथें राहिले. त्यांस मोठी दहशत पडली कीं, वारंवार जी लाट येते ती आपण गलबताच्या ज्या तुकड्यावर बसलों आहों त्याला खोल पाण्यांत

घेऊन जाईल. दुसऱ्या दिवशीं, म्हणजे सातव्या तारिखेस, उजेडतांच लांगस्तोन नांवाचें बेट त्या खडकापासून अर्ध कोसाच्या अंतरावर होतें, तेथील दिवा लावण्याच्या घरांत विल्यम दार्लिंग व त्याची बायको आणि त्याची ग्रेस नांवाची मुलगी अशीं त्यावेळेस तीन मनुष्यें मात्र होतीं, त्यांनीं तें फुटलेलें गलबत तेथून पाहिलें, आणि त्याजवर कांहीं लोक राहिले आहेत असें दुर्बिणींतून त्यांच्या दृष्टीस पडलें.

त्यावेळेस जरी वाऱ्याचा जोर थोडासा कमी झाला होता तरी वारा बऱ्याच जोरानें वाहत होता, आणि समुद्र तर फारच खवळला होता. अशा समुद्रांत होडी घालणें म्हटलें म्हणजे वापरलेला, धिराचा, बळकट, व शूर असा दर्यावर्दी पुरुष देखील तें काम करण्यास धजणार नाहीं; तरी तें काम करण्याचा धीर बायको मनुष्यास आला, व तिच्या पराक्रमानें ती गोष्ट सिद्धीस गेली, हा मोठाच चमत्कार आहे. अशा समुद्रांत होडी हाकारण्याचें धैर्य दार्लिंग ह्यास येईना. त्यास वाटलें कीं, त्या लोकांचे जीव न वांचतां आपले मात्र जातील. परंतु त्याची मुलगी ग्रेस हिनें आग्रह धरून बापाची फारच विनवणी केली कीं, आपण त्या गरिबांस वांचविण्यास जाऊं. बापानें बहुत प्रकारें मोडा घातला, तरी ती मुलगी ऐकेना तेव्हां शेवटीं तो जाण्यास कबूल झाला. मग त्या तिघांनीं एक होडी पाण्यांत लोटून बाप व मुलगी तिजवर चढलीं. बापानें एक वल्हें घेतलें, व मुलीनें एक वल्हें घेतलें. त्या दिवसापर्यंत त्या तरुण मुलीनें कधीं वल्हें हातीं घेतलें नव्हतें; कांकीं कधीं काम पडलें तर तिचे भाऊ असत ते करीत; ह्यासमयीं तीच मात्र जवळ होती.

मग दोघांनीं मोठी मेहनत करून ती होडी त्या खडकापाशीं नेली. मग तेथें पोहोंचल्यावर त्यांस एक दुसरें मोठें भय पडलें. तें कोणतें, तर त्या खडकाला तीक्ष्ण धारेसारख्या कडा होत्या त्यांवर आपली होडी लाटांसरसी जाऊन आपटली, तर तिचाही चुराडा होईल. परंतु फार संभाळून संभाळून आपली होडी खडकावर न आपटूं देतां त्यांनीं त्या गलबतावरील मनुष्यें आपल्या होडींत घेतलीं, आणि त्यांसुद्धां त्यांनीं आपल्या दिवा लावण्याच्या घरास सुरक्षित येऊन पोहोंचलीं.

त्या नऊ मनुष्यांपैकीं एकानें आपण तेथें कसे निभावलों हें वर्त्तमान पुढें आपल्या मित्रांला सांगितलें तेव्हां त्याच्या डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या. तो म्हणाला, आपणाकडे होडी येत आहे असें पाहून मला जो आनंद झाला तो सांगतां पुरवत नाहीं; पण ती होडी जवळ जवळ आली तेव्हां त्या होडींतील दोन मनुष्यांपैकीं एक स्त्री आहे, असें जेंव्हां मीं पाहिलें तेव्हां तर आनंदापेक्षां पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें.

ग्रेस दार्लिंग हिनें जें कृत्य केलें तें लागलेंच चोहोंकडे प्रसिद्ध झालें. तिला पाहण्यासाठीं त्या दिवा लावण्याच्या घरास हजारों मनुष्यें गेलीं. त्यांपैकीं कितीएक बडेलोक व श्रीमंत लोक होते त्यांनीं तिला पुष्कळ बक्षिसेंही दिलीं. तिची दया व शूरपणा ह्या गुणांला आपण किती कृतज्ञ आहों हें दाखविण्याकरितां लोकांनीं पट्टी करूनही तिला बहुत पैसा पोहोंचविला.

आपली कीर्ति फार झाली, व आपणास लोकांनीं बक्षिसेंही पुष्कळ दिलीं, म्हणून ग्रेस दार्लिंग हिला गर्व किमपि झाला नाहीं. लज्जा व भिडस्तपणा हे जे स्त्रीचे स्वभाविक गुण ते तिचे काईम राहिले. माझी बायको होशील तर मी करीन, असें कितीएक गृहस्थांनीं तिला विचारिलें, परंतु तिनें एकच उत्तर दिलें कीं, जोंपर्यंत माझीं आईबापें जिवंत आहेत तोंपर्यंत मी कोणाची बायको होणार नाहीं, आईबापांच्या समागमें राहून त्यांची सेवा चाकरी करीन. पुढें कांहीं दिवसांनीं त्या उदार, शूर, आणि दयाळू स्त्रीस क्षयरोगाची भावना होऊन ती आई बापांच्या देखत मरण पावली, तरी तिचें नांव अमर राहिलें. परोपकाराचें वर्णन कोणी करूं लागला तर ग्रेस दार्लिंग हिचें स्मरण झाल्या वांचून राहणार नाहीं.

---

## हेलन वाल्कर हिची सत्यावर निष्ठा.

स्कात्लन्द देशांत थोड्या वर्षांमागें वाल्कर ह्या नांवाचा शेतकरी दंफ्रीस शहराजवळ ऐरनग्रे ह्या गांवीं राहत असे. त्याच्या कुटुंबांत त्याची बायको व त्याच्या दोन मुली अशीं तीन मनुष्यें होतीं. त्याच्या वडील मुलगीचें नांव हेलन् आणि धाकटीचें नांव इजाबेला. वडील मुलगी हेलन् ही फार सदाचरणी, धर्मशील, व सद्गुणी होती. कांहीं

वर्षांनीं तिचा बाप वारल्यानंतर तिनें मोठी मेहनत करून व अतिशयित दुःख सोसून आपली वृद्धमाता व आपली धाकटी लहान बहीण ह्या उभयतांचा चरितार्थ चालविला. पुढें कांहीं काळानें ती वृद्ध आई वारली. मग धाकट्या मुलीला ती हेलनच आईच्या ठिकाणीं होऊन तिची ममता त्या धाकट्या बहिणीवर पराकाष्ठेची लागली; आणि तिनें आईप्रमाणें आपल्या बहिणीला लिहिणें वाचणें वगैरे शिकविलें.

इजाबेला मोठी झाल्यावर, ती वयानें लहान व अज्ञान असतां कोणे एका तरुण गृहस्थाच्या फुसलावणीच्या बोलण्यावर फसून गैरवाटेंत तिचें पाऊल पडलें. मग ती गरोदर झाली, परंतु तिनें लाजेमुळें आपली वडील बहीण हेलन हिजपाशीं कांहीं एक सांगितलें नाहीं. तिचे महिने भरल्यावर ती गुप्तपणें कोणीकडे जाऊन बाळंत झाली. तेव्हां तें मूल त्याच गृहस्थानें त्या इजाबेलेची अब्रू बचावण्याकरितां नेलें. पुढें अमूक स्त्री बाळंत झाली, पण मूल कोठें नाहीं, असें सरकारास समजल्यावर बालहत्येचा दोष तिजवर ठेवून चौकशी चालविण्याकरितां तिला तुरुगांत ठेविलें.

मग सेशनांत तिची चौकशी होणार तों कैदीचा वकील येऊन हेलनेपाशीं बोलला कीं, जर तूं इतकी साक्ष देशील कीं, इजाबेलेनें बाळंतपणाची तयारी केली होती हें मला ठाऊक आहे, किंवा मी गर्भार आहें, बाळंतीण होणार, असें तिनें मला दर्शविलें होतें, तर ह्या साक्षीनें तुझ्या बहिणीचा जीव वांचेल. हें ऐकून हेलनेला मोठें संकट पडलें, कारण तिच्या बहिणीनें बाळंतपणाची कांहींच तयारी तिच्या देखत केली नव्हती, व बाळंतपणाची कांहीं एक गोष्ट तिला दर्शविली नव्हती. तिला केवढें संकट कीं, आपण चार शब्द खोटे बोललों तर आवडत्या बहिणीचा जीव वांचतो खरा, पण तेवढ्या चार शब्दांनीं खोटें बोलण्याचा दोष पदरीं येऊन सत्याचा नाश होणार. मग हेलनेनें त्या वकिलास साफ सांगितलें कीं, शपथ वाहून खोटें बोलणें माझ्यानें होणार नाहीं. कांहीं होवो, पण जें खरें असेल तेंच मी इमानानें बोलेन. मग इजाबेलेची चौकशी होऊन बालहत्येचा दोष तिजवर शाबीत झाला, आणि तिला फांशीं देण्याचा हुकूम झाला.

आपल्या आवडत्या बहिणीवर असा प्रसंग गुदरला हें पाहून हेलनेस फार दुःख झालें. आपल्या आवडत्या बहिणीचा जीव वांचविण्याकरितां देखील ती खोटें बोलण्याचें पाप आचरण्यास कबूल झाली नाहीं; पण तिच्या जिवाकरितां कितीही मोठे श्रम झाले व कितीही दुःखप्रसंग पडले तरी ते सोसण्यास कबूल होती. नंतर तिनें असा निश्चय केला कीं, बहिणीचा जीव वांचविण्याविषयींचा अर्ज घेऊन आपण स्वतां लंदन शहरास जाऊन तो अर्ज सरकारांत द्यावा. मग वाटखर्ची पुरता पैसा उसना मिळवून, अर्ज घेऊन ती त्याच दिवशीं लंदनास जाण्याकरितां पायीं अनवाणी निघाली. तिच्या गांवापासून लंदन शहर फारच लांब होतें, तरी ती श्रम घेऊन व हाल सोसून तेथपर्यंत पायांनींच गेली. लंदनास पोहोंचतांच तेथें स्कात्लंद देशाचा एक ड्यूक आफ् आर्गयल हा मोठा उदार व दयाळू सरदार राहत होता त्याजपाशीं जाऊन तिनें आपला अर्ज सरकारांत गुदरविण्याविषयीं फार नम्रतेनें व आग्रहानें त्याची विनवणी केली. तेव्हां त्याला तिची दया येऊन, तिच्यासाठीं फार श्रम घेऊन व सरकारांत रदबदली करून, तिच्या बहिणीचा जीव वांचविण्याचा हुकूम त्यानें मिळवून तिजपाशीं आणून दिला. तो हुकूम हातीं पडतांच ती तशीच माघारी फिरली, आणि फांशीची मुदत दीड महिन्याची होती ती उद्यां संपणार तों आदले दिवशीं जाऊन त्या गांवीं पोहोंचली. ह्याप्रमाणें मोठे श्रम भोगून व हाल सोसून त्या धिराच्या व कृपाळू स्त्रीनें आपल्या बहिणीचा जीव वांचविला. पुढें ज्या गृहस्थानें इजाबेलेला फुसलावून फसविलें होतें त्याजबरोबरच त्या इजाबेलेनें लग्न लाविलें. नंतर पुष्कळ वर्षे तीं उभयतां सुखानें नांदलीं.

ह्या हेलन वाल्करेची गोष्ट वाचून सर्वांस चमत्कार वाटावा, आणि तिनें जी सत्यावर निष्ठा ठेविली ती पाहून तोच कित्ता सर्वांनीं घ्यावा, अशी ही गोष्ट आहे. जे लोक थोड्या लाभासाठीं देखील खोटें बोलावयास सिद्ध होतात त्यांनीं तर ही गोष्ट वाचून मान खालीं घालावी, हें योग्य आहे.

सर वाल्तर स्कात ह्या नांवाचा फार नामांकित कवि, गद्यपद्यात्मक उत्तम ग्रंथ करणारा, स्कात्लंद देशांत होता, त्यानें हेलन वाल्करेच्या गोष्टीच्या आधारावरून एक सुंदर ग्रंथ रचिला आहे.

# उदार मित्र.

मागें इंग्लिश सरकार व हैदरअली ह्यांची लढाई चालत असतां कितीएक इंग्रेज लष्करी अमलदार पाडाव होऊन श्रीरंगपट्टण शहरांतील तुरुंगांत पडले होते, आणि त्यांत कांहीं असामी फार जखमी झालेले होते. ह्या बंदीवानांस त्या तुरुंगामध्यें पुष्कळ दुःखें भोगावीं लागलीं. शत्रूंनीं त्यांस नानाप्रकारचा धाक दाखवावा, नेहमीं त्यांचा अपमान करावा, आणि त्यांस पुरतें अन्न वस्त्र देखील देऊंनये. अशा संकटावस्थेंत त्यांनीं पुष्कळ वर्षें काढिलीं. त्या बंदीवानांपैकीं एका बंदीवानानें दुसऱ्या एका बंदीवानाचा प्राण मोठ्या औदार्यानें वांचविला. हलक्या मनाचे लोक आहेत ते संकटसमयीं आपणां विषयीं मात्र काळजी करितात, परंतु मोठ्या मनाचे लोक आहेत ते संकटांत अधिक औदार्य दाखवितात.

हे इंग्रेज अमलदार तुरुंगांत पडले असतां एके दिवशीं कांहीं लोहारांनीं बिड्यांचीं ओझीं तुरुंगामध्यें आणून ठेविलीं, आणि आपण निघून गेले. तेव्हां बंदीवान झालेले अमलदार फार घाबरून जाऊन मोठ्या काळजींत पडले. पुढें कांहीं वेळानें तेथील किल्लेदार पुष्कळ लष्करी लोक घेऊन तेथें आला, आणि त्यानें सर्व बंदीवानांस बिड्या घालण्याचा हुकूम दिला.

प्रत्येक बिडीचें वजन पक्के चार साडेचार शेरांचें होतें. मोठा बळकट मनुष्य ज्वानींत असतां त्याच्या पायांत ह्यांतली एखादी बिडी घातली असती तर तिजपासून त्याला देखील मोठें दुःख झालें असतें, मग श्रीरंगपट्टनच्या तुरुंगांत पडलेले इंग्रेज लोक अशक्त व दुखणाईत असून त्यांच्या पायांत असल्या बिड्या घातल्या तेव्हां त्यांची अवस्था कशी झाली असेल, हें सहजच लक्षांत येईल.

बेर्द साहेब ह्या नांवाचा एक लष्करी अमलदार त्या बंदीवानांत होता. तो पुढें बंदींतून सुटल्यावर मोठ्या प्रसिद्धीस आला; आणि लार्द हारिस ह्याचे हाताखालीं असतां ज्यांत आपण बंदींत पडला होता तें श्रीरंगपट्टन शहर काबीज करून घेतलें, पण तो तुरुंगामध्यें होता तेव्हां ह्या शौर्याचा काय उपयोग? पुढें आपणास कितीएक लढायांमध्यें यश मिळून

आपण प्रसिद्धीस येणार, हें त्यावेळीं त्याच्या स्वप्नीं देखील नव्हतें. मोठमोठाल्या बिड्या सर्वांच्या पायांत घालण्याचा हुकूम झाला तेव्हां ह्याजकडे पाहून इतर लोक फार हळहळले; आणि ह्या बिड्या पायांत घातल्यावर त्या दुःखांतून हा वांचेल, असें त्यावेळीं कोणासही वाटलें नव्हतें; कारण त्याला मोठमोठया जखमा झाल्या होत्या. उजवे पायाला लागलेली गोळी नुकतीच कापून काढिली होती, ह्यामुळें तो पाय अगदीं जायबंदी झाला होता, ह्यामुळें एवढ्या बिड्याचें ओझें सोसण्याची त्याला अगदीं शक्ति नव्हती.

बेर्द साहेब अशा संकटावस्थेंत असतांही ते लष्करी लोक त्याच्या पायांत बिडी घालूं लागले; इतक्यांत त्या बंदीवानांपैकीं कपतान लूकस ह्या नांवाचा मनुष्य होता तो पुढें येऊन त्या किल्लेदारास म्हणाला कीं, बेर्द साहेबाच्या पायांत बिडी घालाल तर तो फार लवकर मरेल ह्यांत संशय नाहीं; ह्याकरितां त्या गरिबावर आपण दया करून त्याला जीवदान द्यावें.

कपतान लूकस ह्याचे केंस अगदीं पांढरे होऊन गेले होते. तो तेरा ठिकाणीं जखमी होऊन जन्माचा लंगडा झाला होता. वास्तविक पाहिलें असतां त्याचे जातीचें दुःख त्याला पुष्कळ होतें; इतकें असून त्यानें आपल्या मित्राचें संकट दूर करण्याचें मनावर घेऊन त्याकरितां तो इतका झटला, हा मोठा चमत्कार आहे.

कपतान लूकसाचे बोलण्यावर किल्लेदारानें असें उत्तर केलें कीं, जितके बंदीवान येथें आहेत तितक्या बिड्या आमच्या धन्यानें पाठविल्या आहेत, तेव्हां त्या सर्वांच्या पायांत घातल्या पाहिजेत. मग हें ऐकून कपतान लूकस आपले मित्राचा प्राण वांचविण्याकरितां, दोन्ही बिड्या माझेच पायांत घाला, असें म्हणाला.

ह्याचें हें औदार्य पाहून त्या किल्लेदारास कळवळा आला, मग कांहीं वेळानंतर तो कपतान लूकसाचे बोलण्यास मान्य झाला, आणि सहा महिनेपर्यंत बेर्द साहेबास बिडीपासून दुःख भोगावें लागतें तें लागलें नाहीं, ह्यामुळेंच त्याचा प्राण बहुतकरून वांचला असावा. बेर्द साहेब वांचून त्यानें पराक्रम केल्यामुळें त्याची चोहोंकडे कीर्ति झाली, आणि लूकस साहेब तर जेथें त्याचें एवढें औदार्य दिसून आलें त्याच तुरुंगांत मरण पावला.

## जान काक्रनाच्या खऱ्या शौर्याची गोष्ट.

आजपर्यंत शूर पुरुष पुष्कळ होऊन गेले, तेव्हां शूर कोणास म्हणावें ह्याचा विचार करण्याची गरज नाहीं; तथापि वास्तविक जो शूर आहे त्यासच आपण शूर म्हणतों असा नियम नाहीं. आजपर्यंत शौर्याचे ज्या कामांची वाखाणणी झाली आहे तीं कामें बहुतकरून शिपाई लोकांकडून झालीं आहेत, ह्यावरून त्यांसच लोक शूर असें समजतात. आतां ही लोकांची समजूत खरी आहे किंवा नाहीं, ह्याचा विचार मी करीत नाहीं; परंतु लोकांनीं ज्यांस आजपर्यंत शूर हा किताब दिला नाहीं त्यांस देखील तो असावा, इतकें मात्र येथें सांगतों. वास्तविक म्हटलें असतां, धर्म आणि नीति ह्यांवरील श्रद्धेपासून उत्पन्न होणारी आणि ऐहिक सुखाची आशा अगदीं मोडून टाकणारी अशी मनोनिग्रहशक्ति ज्यास आहे त्यास शूर असें म्हणावें. आपला धर्म म्हणून जी गोष्ट आपणास अवश्य केली पाहिजे ती करणें प्राप्त झाल्यास जो आपल्या जिवाकडे सुद्धां पाहत नाहीं, आणि मी घोडा मिळवीन, हत्ती मिळवीन, राज्य मिळवीन अशा ज्या मोठमोठ्या आपल्या तारुण्याच्या हिमतीमुळें आशा उत्पन्न होत असतात त्या सर्व एकीकडे ठेवून कोणतेंही परोपकाराचें काम करण्यास जो मागें सरत नाहीं, आणि असें करण्यांतच जो आपलें आयुष्य घालवितो, त्यास शूर असें म्हणावें. लोक ज्यांस शूर म्हणतात त्यांत असले शूर थोडेच निघतील.

ह्या प्रकारचा शूर जान काक्रन ह्या नांवाचा एक पुरुष विलायतेंत होऊन गेला. ह्या गृहस्थासारखा लोकोपकारार्थ जिवावर उदार होणारा दुसरा क्वचितच सांपडेल. हा क्लैद नांवाची खाडी आणि अयर्लंद बेटाचा पश्चिम किनारा ह्यांच्यामध्यें जाणाऱ्या येणाऱ्या एका आगबोटीवरचा सुकाण्या होता. एके दिवशीं संध्याकाळीं सुमारें सत्तर पाऊणशें लोक आगबोटींत घेऊन तो आगबोट हाकारून निघाला, तों अमळशानें कांहीं जळाल्याची घाण आली; तेव्हां ती कोठून आली ह्याचा शोध तो करूं लागला. शेवटीं पाहतो तों आगबोटीच्या चाकांवरच्या लांकडी पेटींतून ज्वाला निघाल्या त्या त्याच्या दृष्टीस पडल्या. तेव्हां एक हात आपल्या छातीवर मारून घेऊन, दुसरा हात डोकीवर ठेवून, आणि

आकाशाकडे डोळे लावून, तो ईश्वराची प्रार्थना करूं लागला कीं, हे सर्वशक्तिमान ईश्वरा, आतां जो माझा धर्म म्हणून मला केला पाहिजे तो मला करण्यास शक्ति दे, आणि माझी बायको, आई, आणि मुलें, ह्यांचें तूं पालन कर. अशी प्रार्थना करून त्यानें सुकाणू हातीं घेतलें, आणि जिकडे आगबोट नेऊन लावायाचें मनांत होतें तिकडे, मनांतील तळतळ अगदीं बाहेर पडूं न देतां एकसारखी नजर लावून, जो तेथें एकदां उभा राहिला तो तेथून ढळला नाहीं. इकडे आग विझवावयासाठीं गलबतावरच्या लोकांनीं पुष्कळ यत्न केला, परंतु तो व्यर्थ होऊन आग कमी न होतां उलटी अधिकच वाढली. त्यामुळें वाफेचा विलक्षण जोर होऊन आगबोट मोठ्या झपाट्यानें चालली. आगबोटीच्या अतिशयित वेगामुळें तिच्या तोंडाकडचे भागाला आग लागली नाहीं, म्हणून सर्व लोक तेथेंच जमून बसले होते. परंतु जान काक्रन आपल्या जिवावर उदार होऊन ज्या ठिकाणीं उभा राहिला होता तिकडे त्याच वेगामुळें ज्वाला आणि धूर पुष्कळच चालला होता. तेथें पाण्याचा वर्षाव करावा म्हणून मालिम व नावाडी लोक ह्यांनीं करावयाचें तितकें केलें; परंतु उत्तरोत्तर तें करण्याचें कठीण पडून जितकें त्यांनीं केलें तितकें व्यर्थ जाऊन आग भडकली, आणि त्याच्याखालीं जी केबीन होती तीस आग लागून ज्या जागीं तो उभा होता ती जागा अगदीं तापून गेली. वाहवा! शाबास त्याची! इतकें झालें तरी तो डगला नाहीं. ज्वाला व धूर हीं त्याच्या आणि लोकांच्या मध्यें आड येत असत, तरी मध्यें मध्यें वारा येऊन त्यांस एकीकडे नेई, त्यामुळें लोकांस त्याची सरासरी झुळूक दृष्टीस पडे. आणि जेव्हां तो धैर्य धरून एकसारखा टक लावून बसला आहे असें त्यांच्या दृष्टीस पडे, तेव्हां, तो आपणास वांचवील, अशी त्यांस आशा वाटून ते आनंदानें ओरडत असत, आणि त्यास दुवा देत असत.

त्या रात्रीं अंधार होता, आणि आगबोट तर सर्व पेटलेली होती; त्यामुळें तिचा उजेड चोहींकडे पसरून ती किनाऱ्यावरच्या लोकांच्या दृष्टीस पडली. तेव्हां ह्यांना खडकामध्यें सुमारें बारा यार्दीचे रुंदीची एक खिंड होती तिचे जवळच्या उंचवट्यावर जमून, मशाली पेटवून, आणि दुसऱ्या कांहीं खुणा करून, त्यानें आपणांकडे आगबोट

आणावी, असें त्यास सुचविलें. त्या सर्व खुणा काक्रन ह्यास समजल्या. त्यावेळीं त्याचे पाय अगदीं भाजून गेले होते, आणि आग अगदीं भडकली होती, त्यामुळें वाफेचा जोर वाढून आगबोट मोठ्याच वेगानें चालली होती. इतक्यांत काक्रनानें ती आगबोट त्या खिंडींत खडक पुढें आला होता त्याचे जवळ नेऊन उभी केली. तेव्हां सर्व लोक सुखरूपपणें वरतीं चढून गेले. कोणासहीं कांहीं एक झालें नाहीं. ज्यानें आपल्या जिवाकडे न पाहतां त्यांचे जीव वांचविले त्याला मात्र पुष्कळ इजा झाली; ती जन्मपर्यंत त्यानें भोगिली. जरी त्याला ज्वाळा साक्षात् लागल्या नाहींत, तरी त्याचे आजूबाजूंला इतकी आग होऊन गेली होती कीं त्याचे पाय जळाले इतकेंच नाहीं, त्याचे-केंस, त्याची टोपी, व त्याचा डगला हीं इतकीं होरपळून गेलीं कीं, हात लावल्याबरोबर त्यांचा चुराडा होऊन तीं खालीं पडत. तो तरुण होता, परंतु त्या एका भयंकर रात्रींत त्याच्या तोंडावरचें तारुण्य जाऊन तो म्हातारा दिसूं लागला. त्याचे केंस पांढरे झाले; आणि त्याचें शरीर पहिलवानासारखें होतें तें अगदीं शुष्क व रोड होऊन गेलें. जर त्या आगीला अमळ भिऊन त्यानें मागें घेतलें असतें तर त्या दिवशीं आगबोटीवरचे सर्व लोक मेले असते. आगबोटीस आग लागली तेव्हां सर्वांस धीर देऊन, अफाट समुद्रांत ती नीट चालवून मी सर्वांस पार पाडीन, असें जर त्या आगबोटींतल्या लोकांस कोणी म्हटलें असतें, तर त्यांनीं त्यावेळेस त्याला काय दिलें नसतें! परंतु ते सुखरूपपणें कडेस लागल्यावर त्यांनीं काक्रनाचे आभार मानिले काय? मनुष्यस्वभावास काय म्हणावें! त्यांनीं त्याचे आभार मानिले नाहींत. ज्यानें त्यांचे जीव वांचविले त्यास ते सर्व विसरून गेले! त्याच्या शरीरास इजा झाली ती झालीच; पण विशेष इतकाच कीं त्याच्या गरीब बिचाऱ्या आठ मुलांची उपजीविका त्याच्याच श्रमावर व्हावयाची, परंतु तो श्रम करण्यास त्याला कधीं सामर्थ्य येईल असा संभव नव्हता, ह्यामुळें त्यास दुःख होत असे.

---

# कोपर्निकस ह्याची गोष्ट.

पूर्वी यूरोपामध्यें कोपर्निकस म्हणून एक मोठा विद्वान् पुरुष होऊन गेला. त्यानें ज्योतिषशास्त्रामध्यें पुष्कळ शोध करून एक नवीनच मत स्थापिलें. हल्लीं सर्व यूरोपामध्यें त्याचेंच मत ग्राह्य आहे. त्याचा वृत्तांत येणेंप्रमाणें.

प्रश्या देशामध्यें विस्त्युला नदीच्या कांठीं यार्न म्हणून एक गांव आहे, तेथें इ० स० १४७३ त कोपर्निकस जन्मला. त्यानें आपले घरींच चांगला विद्याभ्यास करून लातिन व ग्रीक ह्या भाषांचें बरेंच ज्ञान संपादिलें; मग त्याची विद्या पुरी होण्यासाठीं त्याच्या आईबापांनीं त्यास क्राको नांवाच्या गांवास पाठविलें. तेथें त्यानें तर्कशास्त्र व वैद्यशास्त्र ह्यांजवर पुष्कळ परिश्रम केला, ह्यामुळें त्या विषयांत तो बराच प्रवीण झाला. लहानपणापासून त्याला गणितविद्या फार आवडत असे, म्हणून तो ती मोठ्या उत्साहानें शिकत असे. त्यानें ज्योतिषशास्त्राचाही अभ्यास केला, आणि त्या शास्त्रासंबंधी यंत्रांच्या प्रयोगाचा अभ्यास चालविला. आपले वयाचे तेविसावे वर्षीं तो इताली देशांत गेला, आणि बोलोना व रोम ह्या शहरांत जाऊन तेथें त्यानें आपलें ज्योतिषशास्त्राचें ज्ञान वाढविलें. मग तो तेथील लोकांस गणितविद्या शिकवूं लागला, ह्यामुळें त्याची फार कीर्ति झाली. पुढें कांहीं वर्षांनीं तो स्वदेशास परत आला; मग त्याचे चुलत्यानें त्याला फ्रानेनबर्ग येथील क्यार्थीड्रल देवळांतील कानन नांवाच्या अधिकाऱ्यांत जागा दिली.

तो आपला वेळ मुख्य तीन कामांकडे लावीत असे. आपले हुद्याचें धर्मसंबंधी काम करण्यांत तो कांहीं वेळ घालवीत असे; कांहीं वेळ तो गरिबांवर कृपा करून त्यांस औषधें देण्याकडे घालवीत असे; आणि बाकीचा वेळ आपले आवडीचे विद्येकडे लावीत असे. तो लोकांत फारसा मिसळत नसे, आणि धर्माचे व विद्येचे विषयांशिवाय संभाषण करणें निरर्थक आहे असें समजून तो धार्मिक व विद्वान् अशा लोकांचा मात्र स्नेह संपादीत असे. ह्याप्रमाणें तो लोकांशीं मिळून नसतां त्याला त्या देवळासंबंधी कारभाराचा एक मोठा अधिकार मिळाला. तेव्हां

तो आपलें काम मोठ्या धैर्यानें व खरेपणानें बजावीत असे. पुढें तो ह्या कामांतून मोकळा झाला तेव्हां पुन्हा ज्योतिषशास्त्राचा अभ्यास चालवून त्यानें आपलें सगळें मन अंतरिक्षांतील मुख्य मुख्य सृष्ट पदार्थांच्या विचाराकडे लाविलें.

कोपर्निकसाचे वेळेच्या पूर्वीच्या २००० वर्षांत ग्रहमालेविषयीं यूरोपखंडांतील पुष्कळ लोकांनीं निरनिराळीं अनुमानें केलीं होतीं; पण त्यांत तालमी आणि आरिस्तातल् ह्यांचें मत लोकांमध्यें फार प्रसिद्ध होतें. पृथ्वी अचल असून तिच्या सभोंवतीं सूर्य व इतर ग्रह फिरतात, हें त्यांच्या मतांचें मूल बीज होतें. हें मत लोकांस आवडत होतें ह्याचें मुख्य कारण हेंच कीं, केवळ इंद्रियांच्या योगानें मनुष्यांस जें ज्ञान होतें त्याचा व ह्या मताचा मिलाफ आहे पृथ्वी फिरते ह्याचा मनुष्यास अनुभव येत नाहीं; ती अचल अशी दिसते, ह्यामुळें ती अचल आहेच असा लोकांचा सिद्धांत होता; आणि असेंच, सूर्य पूर्वेकडून पश्चिमेकडे जातोसा दिसतो ह्यामुळें तो वास्तविकच पृथ्वी सभोंवता फिरतो, असें त्यांस वाटत होतें. असल्या अयुक्तिक विचारांनीं यूरोपखंडांतील पूर्वीचे लोक आपले मतांचा ग्रह सिद्ध करीत असत. हें मत खरें वाटण्यास दुसरें असें कारण होतें कीं ह्या मतास ख्रिस्ती धर्मशास्त्राचा आधार आहे अशी त्यांची समजूत असे; पण वास्तविक पाहिलें असतां लोकांस सन्मार्ग कोणता व नीति कोणती हें दाखविण्याचा त्या धर्मशास्त्राचा उद्देश आहे; विद्यावृद्धि करण्याचें त्याचें काम नव्हे. ह्यामुळें त्या ग्रंथाच्या कर्त्यांनीं ह्या गोष्टीविषयीं कांहींच लिहिलें नाहीं, आणि त्यांचा लेख त्यावेळच्या लोकांच्या मतास अनुसरून मात्र आहे. ही कल्पना जरी आतां सर्व लोक मानितात तरी कोपर्निकसाच्या वेळच्या लोकांस पाखंड वाटत असे. पृथ्वी फिरते असें म्हणणें हें नास्तिकाचें काम होय, असें ते लोक समजत असत.

ह्या गहन विषयावर तीक्ष्णबुद्धीनें फार परिश्रम केल्यावरून कोपर्निकसाची खातरी झाली कीं, सूर्य हा ग्रहमालेचा मध्य होय, मंगळ आणि शुक्र ह्यांच्या सारखा पृथ्वी ही एक ग्रह आहे, आणि सूर्यासभोंवते सर्व ग्रह फिरतात ते येणेंप्रमाणें: बुधाची प्रदक्षिणा ८७ दिवसांत होते, शुक्राची २२४ दिवसांत, पृथ्वीची ३६५ दिवसांत, मंगळाची ६८६

दिवसांत, गुरूची ११ वर्षांत, आणि शनीची २९ वर्षांत होते. ह्याप्रमाणें सूर्यमालेची खरी रचना कशी आहे हें कोपर्निकसानें शोधून काढिलें. कोपर्निकसाजवळ दुरबिनी नव्हत्या. त्याची युक्ति त्याच्या मागून शंभर वर्षांनीं निघाली. त्याचेजवळ ओबडधोबड लांकडी यंत्रांशिवाय दुसरें कांहीं साधन नव्हतें, आणि त्या यंत्रांवर शाईच्या मात्र रेघा काढिल्या होत्या. ह्या गोष्टींचा विचार केला म्हणजे कोपर्निकसानें जो शोध केला त्याचा फारच चमत्कार वाटतो. त्याची विद्वत्ता लोकांच्या फार उपयोगीं पडावयासारखी होती, ह्यावरून कोणाचे मनांत येईलच कीं, येवढ्या विद्वानाला आपल्या उपयुक्तश्रमाचें योग्य फळ प्राप्त झालें असेल; पण असें न होतां उलटे लोक त्याचा फार द्वेष करीत असत. अज्ञानी लोकांसारखे उन्मत्त व अभिमानी कोणी नसतात. कोणे गोष्टीचा सत्यपक्ष लोकांस कोणी दाखवूं लागला असतां त्यापासून त्यांच्या मताला धक्का लागत नसला तर ते उपेक्षा करून तिकडे लक्ष देत नाहींत; परंतु एखाद्या गोष्टीविषयीं भलताच ग्रह त्यांस पुष्कळ दिवस झाला असेल तो काढून टाकण्याची जर कोणाची इच्छा असली तर त्यांना राग येतो; कारण कीं फार दिवसांपासून जो ग्रह आपण धरिला तो खोटा आहे असें आपण कबूल केलें असतां आपणांकडे अज्ञान येतें; आणि आपणांस ज्यानें सत्यपक्ष दाखविला तो आपणांपेक्षां विद्वान् आहे असें होतें. कोपर्निकसाची अशीच अवस्था झाली. त्यावेळचे मोठमोठाले विद्वान् लोकांनीं कोपर्निकसाचें नवीन मत मान्य केलें, तरी इतर सर्व लोकांनीं त्याचा उपहास मांडिला; ह्याचें कारण इतकेंच कीं असल्या गोष्टी विद्वानांशिवाय इतरांस कळावयाच्या नाहींत. पृथ्वी फिरते असें लोक मानूं लागले तर ईश्वराचा क्षोभ होऊन पोटीं अरिष्टें उत्पन्न होतील, असें धर्मवेडे लोकांस वाटूं लागलें; ह्यामुळें रोम शहरांतील मुख्य धर्माधिकाऱ्यानें कोपर्निकसास बहिष्कार घातला. पुढें आपले वयाचे ७१ वे वर्षी कोपर्निकस मरण पावला. नेहमीं आकाशांतील ग्रहांकडे पाहतां पाहतां तो फार थकला होता, आणि आपण कांहीं अपराध न करितां लोकांचे कल्याणासाठीं इतके श्रम केले असून त्यांनीं आपले फार हाल केले हें पाहून तो फार दुःखी झाला होता; हींच कारणें त्याचे मरणाचीं असावीं.

## गालिलियो ह्याची गोष्ट.

कोपर्निकस मेला, आणि त्याचें मत पाखंडी असें ठरलें; आतां त्याचे मागें कोणी तसा पुरुष होऊन सर्व पाठशाळांमध्यें जें प्राचीन काळचें ज्योतिषशास्त्र चालू आहे त्याचा अव्हेर करील असें होणार नाहीं, असें त्यावेळच्या लोकांस वाटलें; परंतु सत्यपक्ष जो आहे तो दाबण्याविषयीं लोकांनीं कितीही यत्न केला तरी तो कधींना कधीं तरी बाहेर पडेलच. कोपर्निकस मरण पावल्यानंतर थोडकेच वर्षांनीं, म्हणजे इसवी सन १५६४ त इताली देशांतील पिजा नामक शहरांत गालिलियो ह्या नांवाचा पुरुष जन्मला. तोही कोपर्निकसाप्रमाणें लोकांचे भ्रांतीचे मताला विरुद्ध झाला. तो लहान असतांनाच, हा मोठा हुशार व उद्योगी होईल, असें लोकांस वाटत होतें. त्यावेळीं त्यानें मोठ्या युक्तीनें चमत्कारिक खेळ उत्पन्न केले, आणि नानाप्रकारच्या यंत्रांची रचना चांगल्या रीतीनें केली. ह्या कामांत ग्रंथाची माहिती नसल्यामुळें तो कधीं आडला, तर नवीन युक्ति काढीत असे. ह्यावेळेचे जे त्याचे सोबती होते त्यांच्याशीं तो सामोपचारानें वागून त्यांच्या उपयोगीं पडत असे, आणि नेहमीं कोणत्यातरी उपायांनीं त्यांस रमवीत असे, ह्यामुळें सर्वांची प्रीति त्याजवर जडली. त्याचा बाप गरीब होता, तरी जें ज्ञान प्राप्त करून घेण्यास इतरांस मोठा खर्च पडावयाचा तें गालिलियो ह्यानें एकसारखा उद्योग करून लवकरच प्राप्तकरून घेतलें; आणि त्याला फार गैरसोय होती तरी लातिन व ग्रीक ह्या भाषांची थोडीशी माहिती करून घेऊन, त्यावेळेस ज्या विद्या शिकविण्याचा संप्रदाय होता त्यांमध्यें तो बराच प्रवीण झाला. तो फावल्यावेळीं वाद्यें वाजवावयास व चित्रें काढावयास शिकत असे. तो जसजसा मोठा होत चालला तसतसा हा मोठा बुद्धिमान् आहे, अशी त्याचे बापाची अधिक अधिक खातरी होत चालली. तेव्हां त्यानें असें मनांत आणिलें कीं, आपलें कांहीं नुकसान झालें तरी होवो, परंतु आपला पुत्र, गालिलियो, ह्यास पढण्याकरितां मोठे विद्यालयांत घातलें पाहिजे. ह्याप्रमाणें इ० स० १५८१ त पिजा येथील मोठे विद्यालयांत तो अभ्यास करूं लागला.

ह्याच वेळेचे सुमारें गालिलियो ह्यानें एके प्रकारचें यंत्र चालविण्याची युक्ति शोधून काढिली; असली युक्ति त्यानें ह्याचे पूर्वी कधीं काढिली

नव्हती. एके दिवशीं तो देवळामध्यें असतांना, एक हंडी हेलकावत होती तिजकडे त्याचें लक्ष गेलें; तेव्हां त्यास असें दिसून आलें कीं, हेलकावे लहान असोत किंवा मोठे असोत, ते होण्यास सारखा वेळ लागतो, इतकेंच कीं जितकी जितकी हंडी लांबवर हेलकावते तितका तितका हेलकाव्याला वेळ जास्ती लागतो. मग गालिलियो ह्यानें आपल्या नाडीचे ठोके पाहून त्यांवरून हंडीच्या हेलकाव्याचें अनुमान बसविलें, आणि पुढें पुष्कळ वेळां प्रतीति पाहून एक नियम काढिला. त्याच नियमावरून हल्लींचीं लंबकाचीं घड्याळें चालतात.

ह्या वेळेस गालिलियो ह्यास गणितविद्या येत नव्हती; कारण कीं त्याकाळीं त्या विद्येचा अभ्यास सगळ्या यूरोपखंडांतच कमी होत असे; पण पुढें तो गणितविद्येमध्यें चांगला प्रवीण झाला, तेव्हां ती विद्या शिकविण्याचे कामावर पिजा येथें त्याची नेमणूक झाली. ह्या कामावर असतां ह्या सृष्टींत जे जे चमत्कार दृष्टीस पडतात त्यांचा पुरता शोध करण्याकडे तो आपला पुष्कळ वेळ घालवीत असे. शिल्पशास्त्राविषयीं जीं आरिस्तातल् ह्याचीं मतें होतीं त्यांची तो प्रतीति पाहूं लागला, तेव्हां त्यांतील बहुतेक मतें खोटीं असें त्याचे नजरेस आलें. ज्या मताचा खोटेपणा आपणास सिद्ध करून दाखवितां येईल असें त्यास वाटत असे, त्या मतास तो प्रसिद्धपणें दोष देत असे. ह्यामुळें आरिस्तातलाचे मताचे अभिमानी लोक पुष्कळ होते त्यांचें व ह्याचें फार वांकडें आलें. शिल्पशास्त्राचे सिद्धांत आपले मताप्रमाणें त्यानें प्रत्यक्ष सिद्ध करून दाखविले असतां लोक त्याच्या मताचा स्वीकार करीतना, तेव्हां अर्थात्च ते लोक फार मूर्ख होते ह्यांत संशय नाहीं. तो पुढें आपलीं ज्योतिषशास्त्रांतील मतें स्थापूं लागला, त्यावेळेस लोक त्याचा द्वेष करूं लागले, तरी त्यांनीं इतका मूर्खपणा केला असें कोणी समजणार नाहीं; कारण, आकाशांतील नवीन तारे मीं शोधून काढिले असें कोणाचें बोलणें अज्ञानी लोकांनीं मान्य केलें नाहीं, तर कांहीं आश्चर्य नाहीं; कांकीं ही गोष्ट खरी आहे किंवा खोटी आहे हें पाहण्याजोगी बहुतेकांस बुद्धि नसते, आणि यंत्रेंही नसतात; परंतु ज्या गोष्टींचा खरेपणा मुलांस देखील प्रत्यक्ष प्रतीतीनें समजेल, त्याही गोष्टी जे प्राचीन पुस्तकांच्या आधारावांचून खऱ्या मानीत नाहींत

त्या लोकांच्या मूर्खपणाचें वर्णन कोणासही करितां येणार नाहीं. आरिस्तातल् ह्याचें म्हणणें होतें कीं एक जड व एक हलका असे दोन एके जातीचे पदार्थ सारखे उंचीवरून एकदम सोडिले, तर जड पदार्थाचें वजन हलक्या पदार्थापेक्षां जितकें अधिक असेल तितक्या प्रमाणानें तो जड पदार्थ हलक्या पदार्थाच्या पूर्वीं भुईवर पडेल. ही गोष्ट खरी किंवा खोटी हें सिद्ध करणें फारसें कठीण नसतां कोणासही प्रतीति पहावी असें वाटलें नाहीं; आरिस्तातलाच्या वाक्यावरच विश्वास ठेवून लोक, सिद्धांत खरा आहे, असें पूर्वींपासून मानीत आले. आपणास जें प्रत्यक्ष दिसेल तें खरें असें समजून गालिलियो ह्यानें ह्या गोष्टीची प्रतीति पाहिली. आणि त्याचें मत असें ठरलें कीं, पदार्थ खालीं बहुतकरून सारखे वेळांत पडतात. जड पदार्थापेक्षां हलके पदार्थाला हवेचा प्रतिबंध अधिक होतो ह्यामुळें कांहीं भेद पडतो, पण तो भेद फारच थोडा असतो. आरिस्तातलाचे मताकडल्या विद्वान् लोकांनीं, गालिलियोचें हें मत न स्वीकारितां, त्याचा उपहास मात्र केला. गालिलियो ह्यानें त्यांच्या देखत पिज़ा येथील प्रसिद्ध मनोऱ्यावरून पुन्हा प्रतीति पाहिली, त्यावेळेस निरनिराळ्या वजनांचे अनेक पदार्थ एकदम खालीं पडले. हें प्रत्यक्ष त्यांच्या दृष्टीस पडलें असतां, त्यांच्या मनांतला पूर्वींचा ग्रह जाईना. ते असें म्हणत असत कीं, दहा शेर वजनाचा पदार्थ खालीं पडण्यास जितका वेळ लागतो तितक्याच्या दसपट वेळ एक शेर वजनाचा पदार्थ तितक्याच उंचीवरून पडण्यास लागेल. हें कशावरून तुम्ही म्हणतां? असें कोणीं त्यांस विचारिलें, तर, आरिस्तातलाचें हें वचन आहे, असें ते ग्रंथ काढून दाखवीत असत. असला त्यांचा स्वभाव होता ह्यामुळें गालिलियोनें त्यांचा मूर्खपणा प्रसिद्धीस आणिला, तेव्हां त्यांच्या मनांत त्याजविषयीं फार द्वेष वागूं लागला ह्याचें आश्चर्य नाहीं. आणि त्यांनीं त्याला पिज़ा येथून इ० स० १५९२ त हांकून दिलें, तेव्हां तो पाद्युआ येथें जाऊन राहिला.

इ० स० १६०९ त गालिलियो ह्यानें दुरबीन ह्या यंत्राची युक्ति काढिली, आणि ह्या यंत्राच्या योगानें तो आकाशांतील तारे नीट बारकाईनें पाहूं लागला; मग लवकरच एका मागून एक नवीन ताऱ्यांचा

शोध लागून त्याच्या उद्योगाचें सार्थक्य झालें. बृहस्पतीजवळ तीन लहान तारे त्याच्या दृष्टीस पडले; त्यांची स्थिति इतर ताऱ्यांपेक्षा कांहीं चमत्कारिक होती ह्यामुळें ते दररोज गालिलियो रात्रीं पाहूं लागला; तेव्हां त्यास असें समजून आलें कीं नेहमीं त्यांचीं स्थानें बदलतात; पुढें चवथाही तारा त्याच्या दृष्टीस पडला, आणि थोडके दिवसांनीं त्याची अशी खातरी झाली कीं, चंद्र पृथ्वीसभोंवता फिरणारा जसा एकटा उपग्रह आहे तसे बृहस्पतीच्या सभोंवते फिरणारे हे चार उपग्रह आहेत. मग दुरबिनींतून जें त्याच्या दृष्टीस पडलें होतें त्याच्या निरूपणाविषयीं एक निबंध लिहून त्यानें त्याचें नक्षत्रदर्पण हें नांव ठेविलें. तो निबंध लोकांमध्यें प्रसिद्ध झाला तेव्हां जो त्यांचा संभ्रम झाला त्याचें वर्णन करितां येत नाहीं. पुष्कळ लोकांस त्या निबंधांतल्या लेखाविषयीं संशय आला, आणि कितीएक तर साफ म्हणाले कीं, आम्हीं ह्या नवीन गोष्टी कधींही खऱ्या मानणार नाहीं.

मग गालिलियोनें पुष्कळ मोठमोठाले शोध केले; त्यांविषयींही बृहस्पतीच्या उपग्रहांप्रमाणें पुष्कळ वादविवाद झाला. दुरबिनीवरून त्याला असें समजलें कीं, चंद्राचा पृष्ठभाग सपाट व गुळगुळीत आहे असें जें आरिस्ताताचें मत आहे तें खोटें आहे. तो पृष्ठभाग पृथ्वीच्या पृष्ठभागासारखा उंच नीच आहे, व त्याजवर पृथ्वीप्रमाणेंच डोंगर वगैरे आहेत. पुष्कळ तारे नुसत्या डोळ्यानें दिसत नाहींत ते गालिलियोनें दुरबिनीच्या योगानें शोधून काढिले, आणि त्यांची लोकांमध्यें प्रसिद्धि केली. आकाशामध्यें जें धुक्यासारखें दिसतें तें पुष्कळ सूक्ष्म ताऱ्यांचा समुदाय असून, ते तारे फारच एकमेकांच्या जवळ आहेत ह्यामुळें निरनिराळे दिसत नाहींत, असें त्यानें शोधून काढिलें. त्यानें असें सिद्ध केलें कीं, शनि हा केवळ एकटाच ग्रह नाहीं. म्हणजे त्याच्या सभोंवते उपग्रह वगैरे आहेत; तरी त्याची दुरबीन उत्तम प्रकारची नव्हती ह्यामुळें त्याला शनीची स्थिति नीट समजली नाहीं. शुक्राच्या कला अधिक उण्या होतात हेंही त्याच्या दृष्टीस पडलें, व सूर्यावरचे डागही त्याच्या नजरेस आले. हे सर्व शोध मोठ्या धैर्यानें त्यानें प्रसिद्ध केले, ह्यामुळें त्याला पुष्कळ शत्रु उत्पन्न झाले. प्राचीन मताचे सर्व विद्वान् लोकांस असें वाटलें कीं, आतां गालिलियोचें मत पसरत गेलें म्हणजे

आपले ज्ञानाचा कांहीं उपयोग नाहीं असें होऊन आपली अप्रतिष्ठा फार होईल; आणि आतां आपण नवीन मतें शिकूं लागलों तर त्यांतही अब्रू नाहीं; तर आपण गालिलियोची फजिती करावी हेंच बरें. रोमन काथोलिक धर्माचे अधिकारीही ह्यांस मिळाले. त्यांस असें वाटलें कीं, लूथर व त्याचे अनुयायी ह्यांच्याप्रमाणेंच गालिलियो नवेंच मत काढणारा आहे असें त्याच्या लेखावरून दिसतें; आणि त्यापासून तर आपलें नुकसानच होणार. ह्याकरितां त्या दोहों प्रकारच्या लोकांनीं असें मनांत आणिलें कीं, आपण एकत्र होऊन कोणते तरी प्रकारें गालिलियोचा नाश केला पाहिजे. मग कोपर्निकसाचीं मतें काढूं नयेत व शिकवूं नयेत, अशी गालिलियोस निक्षूण ताकीद झाली.

ज्योतिषाविषयीं जो नवा पंथ कोपर्निकसानें काढिला होता तो सर्व लोकांस कळवावा, अशी गालिलियोस फार उत्कंठा होती; परंतु त्याच्या शत्रूंचे मनांत जे ग्रह झाले होते ते एकाएकीं निघण्याजोगे नव्हते, आणि त्या शत्रूंचा अमल मोठा होता, ह्यामुळें त्याला उघडपणें आपला उद्देश सिद्धीस नेतां येईना. ह्याकरितां त्यानें आपल्या मताची प्रसिद्धि करण्याविषयीं एक युक्ति काढिली, ती अशी कीं, त्यानें एक प्रश्नोत्तररूप ग्रंथ केला, त्यांत एके मनुष्यानें कोपर्निकसाचें मत स्वीकारिलें होतें, दुसऱ्यानें आरिस्ततलाचें स्वीकारिलें होतें, आणि तिसरा दोहोंकडील प्रमाणें घेऊन ताडीत असे, अशा रीतीनें कीं त्यांत कोणाचें मत खरें ह्याचा निर्णय झालासें वाटूंनये; तरी शहाण्या मनुष्यानें थोडासा विचार करून पाहिला म्हणजे कोपर्निकसाचें मत ग्राह्य आहे असा त्या ग्रंथाचा भाव दिसून यावा. त्या वेळेस सर्व ग्रंथ लातिन भाषेंत लिहिण्याची चाल होती, असें असतां हा ग्रंथ गालिलियोनें आपल्या देशभाषेंत लिहिला. तो बोलला कीं, मीं हा ग्रंथ इतालियन भाषेंत लिहिला ह्याचें कारण इतकेंच कीं मी जें लिहितों तें सर्व लोकांस वाचतां यावें व समजावें.

हा सर्व लोकांच्या कल्याणाकरितां केलेला ग्रंथ घेऊन इ० स० १६३० त गालिलियो रोम शहरास गेला, तेव्हां त्याचें वय ६६ वर्षांचें होतें. मग लागलेंच त्या ग्रंथावर आरिस्ततलाचे मताचे पक्षपातीं लोकांचा हल्ला सुरू झाला. धर्माधिकारी, विद्वान्, आणि गणिती,

ह्या लोकांची सभा भरून त्यांनीं एकदम असें ठरविलें कीं, हा ग्रंथ वाचल्यानें लोक अगदीं बिघडून जातील. तेव्हां रोम शहरांत पाखंडी लोकांची चौकशी करण्याकरितां इन्‌क्विजिशन ह्या नांवाची सभा नेमली होती तिनें गालिलियोस बोलावून आणिलें; आणि त्याला कित्येक दिवसपर्यंत तुरुंगांत ठेवून मग त्या सभेनें त्याची चौकशी करून शेवटीं त्याला असा हुकूम केला कीं, आमच्या पुढें हात जोडून, मी आजपर्यंत अज्ञानामध्यें होतों, पण आतां मी त्यांतून मुक्त झालों, असें कबूल कर; कारण ह्या अज्ञानापासून तुला फार पातक असून त्याच्या योगानें लोकांचाही नाश होईल. गालिलियो स्वभावतः धिराचा मनुष्य होता, परंतु म्हातारा झाला होता म्हणून त्याला जे शब्द बोलावयास सांगितले होते ते शब्द त्यानें उच्चारिले. मग लागलेंच, माझे मनाची खातरी एके प्रकारची व मी बोललों एके प्रकारचें, असें त्यास वाटून तो भुईवर रागानें पाय आपटून म्हणाला, मी येथें बोललों तरी पृथ्वी फिरतच आहे. मग त्या सभेनें त्याला तुरुंगांत घालण्याची शिक्षा ठरविली, व त्याचें मत अगदीं खोटें ठरवून त्याचा ग्रंथ कोणी वाचूंनये, असा हुकूम दिला. पण तो म्हातारा झाला आणि फार अशक्त झाला हें पाहून सभेनें त्यास तुरुंगांत न टाकितां त्याला आपले गांवीं जाण्यास परवानगी दिली.

ह्या ठिकाणीं इ० स० १६३४ त त्याची फार आवडीची कन्या मरण पावली, तेणेंकरून त्याला फार दुःख झालें; आणि तो पूर्वींपासून अशक्त होता असें असतां हल्लीं त्याचे डोळे अगदीं गेले, ह्यामुळें त्याची फार दशा झाली. देवाची अत्युत्तम देणगी जी दृष्टि तिचें सार्थक्य जे लोक करीत नाहींत त्यांचे डोळे गेले तर त्यांस देखील अंधत्वाच्या दुःखाचें सहन होणें कठीण पडतें; मग ज्यानें असा निश्चय केला होता कीं, देवानें आपणास जीं इंद्रियें दिलीं आहेत त्यांचें यथायोग्य सार्थक्य केल्यावांचून मी कधींही राहणार नाहीं, आणि देवानें जे ह्या सृष्टीमध्यें चमत्कार केले आहेत ते मी स्वतां पाहून लोकांस समजावून देण्याचा यत्न करीन, आणि ज्यानें ह्या कामांत चांगले रीतीनें आपलें आयुष्य घालविलें, अशा मनुष्याची डोळे गेल्यावर कशी बरें अवस्था झाली असेल? एके विद्वानानें गालिलियोचे अंधत्वावर असें लिहिलें आहे कीं, ह्या

सृष्टीमध्यें सर्वांत अत्युपयोगी जें नेत्रद्वय तें नाहींसें झालें. तें इतक्या गुणांनीं संपन्न होतें कीं वास्तविक पाहिलें असतां पृथ्वींतील पूर्वींच्या सर्व लोकांच्या नेत्रांनीं संपादिलेलें ज्ञान एकेठिकाणीं मिळविलें तर त्या सर्व ज्ञानापेक्षां ह्या नेत्रद्वयानें अधिक ज्ञान प्राप्त करून घेतलें, आणि त्या ज्ञानाच्या योगानें पुढें होणारे लोकांचे डोळे उघडण्याची तयारी करून ठेविली, असें म्हणण्यास चिंता नाहीं. डोळे जाऊन गालिलियो संकटांत पडला असतांही त्याची धैर्यवृत्ति व समाधानवृत्ति जी त्यावेळेस लोकांच्या दृष्टीस पडली ती तर फारच चमत्कारिक! एखाद्या वेळीं त्याचे तोंडांतून दुःखाचा शब्द निघाला तर तो फार सौम्य असे. तो त्या वेळीं असें म्हणत असे कीं, काय करावें, मला अगदीं दिसेनासें झालें. आतां ह्या जन्मांत तर माझ्या दृष्टीस कांहींच पडणार नाहीं. मीं नवीन चमत्कारिक शोध केले, ह्यामुळें हें विश्व पूर्वींच्या लोकांस माहीत होतें त्यापेक्षां हजारोंपट अधिक हल्लींच्या लोकांस माहीत झालें आहे. येवढें मोठें विश्व असून माझ्या शरीरानें जेवढी जागा भरली जाते तेवढी खेरीज करून बाकीच्या सर्व विश्वास मी मुकलों. असो, ज्यापक्षीं ईश्वरास आवडलें त्यापक्षीं मलाही आवडलें.

गालिलियोस पुष्कळ प्रतिबंध होता तो डोळे गेल्यावर कमी होत चालला; आणि पुढें त्याला आपल्या मित्रांना भेटण्याची परवानगी मिळाली. मग त्याचा समाचार घेऊन आदरसत्कार करावा ह्या बुद्धीनें मोठमोठाल्या योग्यतेचे पुष्ळक लोक त्याच्या भेटीस येत असत.

गालिलियोस मंडळीमध्यें बसणें उठणें फार आवडत असे; आणि त्याची वर्तणूक सौम्य असे, व तो लोकांशीं गोडीगुलाबीनें वागत असे, ह्यामुळें तो सर्वांस आवडत असे. त्याच्यापाशीं पुस्तकें थोडीं होतीं, पण तीं चांगलीं निवडक होतीं. त्याचे जे स्नेही असत ते नेहमीं आपले जवळच असावे असें त्यास वाटत असे. आणि त्याचे जातीचे खाण्यापिण्याचा खर्च बाताबेताचा असे, तरी तो त्यांस चांगल्या रीतीनें मेजवानी करीत असे. ते नेहमीं ह्याच्या घरचे पाहिजेत ते ग्रंथ घेऊन वाचीत असत. तो बाताबेतानें खर्च करीत असे, म्हणजे तो कद्रु नव्हता व उधळ्याही नव्हता. त्याला शास्त्रीय विषयांची प्रतीति पाहण्याकरितां जो पैसा लागत असे तो खर्चण्यास तो अगदीं मागें पुढें पाहत

नसे. तो दानधर्म पुष्कळ करीत असे, आणि कोणी पाहुणे आल्यास त्यांचें कांहीं कमी पडूं देत नसे. कांहीं विद्येमध्यें कोणी गुणवान् असून दरिद्री आहेत असें त्यास समजून आलें, तर त्यांस तो पैशाचें साह्य करीत असे; आणि असले पुष्कळ लोक तो आपले घरींच बाळगीत असे. त्याला अगदीं दिसत नव्हतें, व नीट ऐकूं येत नव्हतें, तरी मरणकाळपर्यंत त्याची बुद्धि जशीची तशीच राहिली; परंतु त्याला असें मात्र वाटूं लागलें होतें कीं, आपला श्रम आपल्या शक्तीचे बाहेर आहे. आणि मोठ्या दुःखानें असें म्हणत असे कीं, काय करूं? माझ्या बुद्धीच्या योगानें जे बेत माझें मन करितें ते तडीस नेण्याचें सामर्थ्य माझ्या शरीराला राहिलें नाहीं. त्यानें पदार्थांच्या गतीवर प्रश्नोत्तररूप ग्रंथ कांहीं केला होता तो पुढें चालविण्याचा उद्योग तो एका मित्राचे साह्यानें करीत असतां एकाएकीं त्याला ज्वर आला, आणि उरांत धडकी बसली; ह्या रोगानें फार दिवसांचें, व फार मेहनतीचें, व फार उपयोगाचें, असें जें त्याचें आयुष्य तें इ० स० १६४२ त जानुवारी महिन्याचे ८ वे तारखेस संपलें.

ह्या विलक्षण पुरुषाचें चरित्र व त्याचे उद्योग वर लिहिल्या प्रकारचे होते. त्यानें आपल्या तीक्ष्ण बुद्धीच्या बळानें बहुत प्रकारच्या युक्ति काढिल्या, दुरबिनीच्या योगानें पुष्कळ नवीन ताऱ्यांचा शोध लाविला, शिल्पशास्त्राचे नियम कोणते कसे आहेत हें पुष्कळ विचार करून व अनुभव घेऊन फार धिमेपणानें शोधून काढिलें, आणि देशभाषेंत ग्रंथ लिहिण्याची चाल सुरू केली; हीं जीं त्याचीं कृत्यें ह्यांवरूनच त्याची स्तुति करावी असें नाहीं. हीं कृत्यें त्याच्या मनाचीं व बुद्धीचीं लक्षणें होत. त्यावेळेस अज्ञानाचा अमल सर्व लोकांवर सर्वत्र बसला होता तो उडविण्याचा गालिलियोनें मोठा प्रयत्न केला; वाडवडील जें सांगत आले तेंच खरें मानावें असें सर्व लोकांचें मत असतां तो कोणास न भितां, हें मत फार अयोग्य, असें नेहमीं लोकांमध्यें प्रसिद्धपणें बोलत असे; आणि हरएक गोष्टीचा विचार करावा, नीट शोध करावा, आणि मग ती खरी किंवा खोटी मानावी, असें तो म्हणत असे; अशी त्याची विलक्षण बुद्धि होती. हा त्याचा मुख्य गुण होता, ह्यावरून त्याची स्तुति करावी. ईश्वरानें जे ह्या सृष्टीमध्यें मोठमोठाले अद्भुत चमत्कार करून

ठेविले आहेत त्यांची चांगली समजूत करून घेण्याकरितां आपण आपली बुद्धि पाहिजे तितकी चालवावी, हा आपला धर्म होय, व असें करण्याचा आपला हक्क आहे, असें तो भांडत असे. त्यानें असें केलें म्हणून तेथील लोकांचा हक्क अझून शाबूत आहे. गालिलियोचे स्नेही त्याचें देव्हारें करीत असत; आणि ह्या गोष्टीला तो पात्र होता, कां कीं तो त्यांच्यावर पुष्कळ उपकार करीत असे, त्यांशीं गोडी गुलाबीनें वागत असे, आणि त्यांचें कल्याण करण्याकरितां फार झटत असे. त्याला स्वतां थोडीच प्राप्ति होती, तरी आपल्या मित्रांस विद्या यावी आणि त्यांचा उत्कर्ष व्हावा ह्याकरितां त्या प्राप्तीचा बहुतेक अंश तो खर्च करीत असे. लोकांचें कल्याण करण्याविषयीं कोणाची अतिशयित उत्कंठा जर सर्वत्र सर्वांस मान्य आहे, व त्या उत्कंठेला विलक्षण बुद्धीची संगत असल्यामुळें तिची योग्यता जर फारच वाढते; आणि असल्या मनुष्यास लोकांनीं नाहक छळिलें असतां त्याची दया आपणांस यावी असें जर आहे, तर आपले दयेला, व चमत्काराला, व कृतज्ञतेला पात्र असा गालिलियोपेक्षां कोणीच नाहीं.

---

## न्यूतन ह्याची गोष्ट.

पूर्वी इंग्लंद देशांमध्यें न्यूतन म्हणून एक मोठा बुद्धिमान् व विद्वान् पुरुष होऊन गेला. सिद्धपदार्थविज्ञानशास्त्र, व ज्योतिषशास्त्र, व दर्शनानुशासनशास्त्र ह्या विषयांमध्यें त्यानें फार श्रम केला. त्याचा वृत्तांत येणेंप्रमाणें आहे.

इ० स० १६४२ त, म्हणजे गालिलियो मरण पावला त्या वर्षी, इंग्लंद देशांत लिंकनशयर ह्या प्रांतामध्यें कोल्स्तर्वर्थ ह्या गांवीं न्यूतन जन्मला. आपले आईचे हाताखालीं कांहीं कांहीं विद्या प्राप्त करून घेऊन तो आपले वयाचे बारावे वर्षी ग्रांथम येथील शाळेंत गेला. तेथें यंत्रांच्या रचनेविषयीं त्यानें आपलें कौशल्य दाखविलें, तेव्हां सर्वांस त्याचा मोठा चमत्कार वाटला. इतर मुलें खेळत असतां तो आपला वेळ पवनचक्की, पानचक्की, किंवा कसलें तरी यंत्र बनविण्याच्या उद्योगांत घालवीत असे. एक जुनी पेटी होती तिचें त्यानें एक घड्याळ केलें, तें असें कीं त्यानें त्या पेटीला एक लहानसें भोंक पाडिलें, आणि त्यांत

पाणी भरून आंत एक काठी ठेविली, आणि वरल्या बाजूस एक कांटा व भागांची तबकडी अशा बेतानें लावून ठेविली कीं त्या भोंकावाटें जसजसे पाण्याचे थेंब पडत तसतसें तें लांकूड खालीं जाई, आणि वरला कांटा फिरे, तेणेंकरून किती वाजले हें सहज तबकडीवर समजत असे. त्या वेळेस त्यानें आपले घराच्या भिंतीला छायायंत्र लाविलें होतें तें अद्यापि आहे. इ० स० १६६० त तो केमाब्रिज नामक शहरास गेला, आणि तेथील विद्यालयांत अभ्यास करीत असतां त्यानें प्रकाशाची उपपत्ति शोधून काढण्याकडे आपलें लक्ष दिलें. ह्यावेळेपर्यंत कोणालाही ती उपपत्ति समजली नव्हती. कांहींवेळां मोठ्या युक्तीनें आपणांस ज्या कल्पना सुचल्या होत्या त्यांची प्रतीति पाहिल्यावर त्याचा असा सिद्धांत झाला कीं, शुभ्र प्रकाशाच्या प्रत्येक किरणामध्यें निरनिराळ्या रंगांचे सात किरण असतात, आणि प्रत्येकाच्या आंगीं वक्र होण्याची शक्ति अधिक उणी असते. पुढें दर्शनानुशासनशास्त्राची जी वृद्धि झाली आणि प्रकाश व रंग ह्यांचे गुण समजून आले त्यांस हा वरचा सिद्धांत फार उपयोगीं पडला.

इ० स० १६६५ त कांहीं रोगाची सांत आली तेव्हां सगळे विद्यार्थी आपआपल्या घरीं गेले; त्यावेळीं न्यूतनही आपले घरीं गेला. तेथें असतां त्यानें गुरुत्वाकर्षणाचा नियम शोधून काढिला, ह्यामुळें त्याची चोहोंकडे फारच कीर्ति झाली. ह्या शोधाचे योगानें लोकांचें ज्ञान पुष्कळ वाढलें, ह्यास्तव त्यावेळेस विद्येनें अवतार घेतला असें म्हणण्यास चिंता नाहीं. एके दिवशीं न्यूतन आपले बागेंत बसला असतां झाडावरून एक फळ पडतांना त्याच्या दृष्टीस पडलें; तेव्हां पदार्थ खालीं कशानें पडतात ह्या गोष्टीचा विचार करून त्याचे पडण्याचे नियम तो शोधूं लागला. मग त्याला असें समजलें कीं, ज्या कारणानें फळ जमिनीवर पडलें त्याच कारणानें चंद्र व इतर ग्रह नेहमीं आपआपल्या कक्षेमध्यें फिरतात; आणि हें कारण फार साधें असून ह्याचे आंगीं शक्ति मोठी आहे, कां तर ह्याच्याच योगानें आकाशांतील सर्व गोलांच्या गति होतात.

तो इ० स० १६६७ त केमब्रिज येथें परत आला, तेव्हां तेथील विद्यालयांत त्याला एक मोठी पदवी मिळून त्याची, गणितविद्येचे मो-

फेसराच्या, म्हणजे गुरुच्या, जागेवर नेमणूकही झाली. मग त्यानें आपली प्राप्ति बहुतकरून आईच्या खर्चाकडे लावून दिली. त्याच्या जातीच्या खर्चाला अगदीं थोडा पैसा लागत असे, म्हणून पैसा नाहीं ह्याचें दुःख तो मानीत नसे. पुस्तकें व यंत्रें विकत घ्यावयास, आणि लोकांच्या दुःखांचें निवारण करावयास, जितका पैसा पाहिजे तितका नाहीं ह्याचा मात्र त्याला खेद वाटे. इ० स० १६८३ च्या सुमारें त्यानें एक ग्रंथ छापून प्रसिद्ध केला, त्याचें नांव प्रिन्सिपिया, म्हणजे पदार्थविज्ञानशास्त्राचे मूळतत्वांचा गणिताशीं संबंध. मग हा मोठ्या योग्यतेचा मनुष्य आहे असें सरकारचे लक्षांत आल्यामुळें त्याला टांकसाळेच्या अधिकाऱ्याची जागा मिळाली. तो दमदार मनुष्य असून त्याचा स्वभाव फार चौकस होता, आणि तो गणितविद्येंत व रसायनशास्त्रांत चांगला प्रवीण होता, ह्यामुळें तो हें काम करण्यास योग्यच होता. त्यानें मरे तोंपर्यंत हें काम करून त्यांत प्रतिष्ठा मिळविली.

न्यूतन सुशील होता म्हणून सर्व लोकांशीं भलेपणानें वागण्याकडे नेहमीं त्याचें लक्ष फार असे. तो मोठा विद्वान् असतां आपला मोठेपणा मिरवीत नसे; परंतु अभिमानाबांचून उल्हासवृत्तीनें तो सर्वांशीं बोले, म्हणून त्याची संगत लोकांस फार आवडत असे. तो आपल्या वेळाची योग्यता मोठी मानीत असे, तरी लोक भेटीस आले असतां त्यांचा त्रास न करितां तो त्यांच्याशीं संतोषानें बोलणें चालणें करीत असे. तो नित्य पहाटेस उठे, आणि अमुक वेळेस अमुक काम करावें असा त्यानें नेम बांधिला होता, ह्यामुळें त्याला अभ्यास करण्यास व नवीन ग्रंथ करण्यास वेळ सांपडत असे. दुसऱ्या कामाकडे गुंतला नाहीं अशा वेळेस त्याच्या हातांत लेखणी व त्याच्यापुढें पुस्तक असेच. त्याचा स्वभाव किती गरीब व शांत होता हें पुढील गोष्टीवरून लक्षांत येईल. त्याच्या आवडीचा एक लहानसा कुत्रा होता त्यानें त्याच्या कागदांवर जळती मेणबत्ती पाडिली, ह्यामुळें ते कागद जळून त्याचे पुष्कळ वर्षांचे श्रम व्यर्थ गेले. येवढा नाश झाला तरी त्याची शांतवृत्ति जशीची तशीच राहिली. तो इतकें मात्र म्हणाला, मोत्या, तुझ्या हातून केवढा नाश झाला तो तुला माहीत नाहीं. न्यूतन हा फार उदार व धर्मशील असे. तो असें म्हणत असे कीं, जे जिवंत असतांना धर्म

करीत नाहींत ते वास्तविक पाहिलें असतां कधींच करीत नाहींत. कांहीं लोकांस असें वाटत असतें कीं, आपले द्रव्याचा भोग करण्याची शक्ति जोंपर्यंत आपल्या आंगीं आहे तोंपर्यंत आपण तें द्रव्य कोणास देऊं नये; आपण मेल्यावर आपणांस त्याचा भोग करितां येणार नाहीं म्हणून मृत्यु-पत्रांत तें कोणास लिहून दिलें असतां त्याबद्दल लोक आपणांस उदार व दाते असें म्हणतील. पण त्यांनीं असें समजावें कीं आपण मेल्यावर जें द्रव्य राहील तें आपलें नव्हे, आपण मरतांच त्याजवरचा आपला वारसा नाहींसा होईल. ह्या लोकांनीं न्यूतनाचें वर सांगितलेलें बोलणें आपले मनावर ठसवून घ्यावें. न्यूतन फार वृद्ध झाला होता तेव्हां देखील त्याची बुद्धि फारशी कमी झाली नव्हती. तो नेहमीं आनंदी असे, व त्याचें खाणें पिणें बाताबेताचें असे, आणि त्याची शरीरप्रकृति मूळची चांगली होती, ह्यामुळें इतर लोकांस अशक्तता येते त्याप्रमाणें त्याला आली नाहीं. त्याला शेवटपर्यंत अजाराचें दुःख माहीत नव्हतें, मरणकाळच्या दुखण्यानें मात्र त्याचे पुष्कळ हाल झाले, त्यावेळेस देखील त्याचा धीर व त्याची समाधानवृत्ति हीं खचलीं नाहींत. तो इ० स० १७२६ त मरण पावला, त्यावेळेस त्याचें वय ८४ वर्षांचें होतें.

न्यूतन ह्याची बुद्धि फारच लोकविलक्षण होती. ग्रहांच्या गति अमुक प्रकारच्या आहेत असें त्यानें सिद्ध करून दाखविलें; धूमकेतूच्या कक्षा त्यानें काढिल्या; आणि समुद्रास भरती येण्याचें कारण शोधून काढिलें, प्रकाश व रंग ह्यांचे धर्म व गुण त्यानें शोधून काढिले, हे धर्म व गुण ह्या पदार्थांच्या आंगीं असतील असें पूर्वीं कोणाच्या स्वप्नांत देखील नव्हतें. सृष्टीचे चमत्कार जे वास्तविक आहेत ते लोकांस समजावून देण्याविषयीं तो फार तत्पर असे, आणि तो त्या कामांत चतुरही असे. ईश्वराची शक्ति मोठी, त्याचें चातुर्य मोठें, व त्याची सर्व लोकांवर कृपा मोठी, हें न्यूतनाचे सर्व शोधांवरून दिसून आलें. न्यूतनाची बुद्धि येवढी मोठी व त्यानें इतकें ज्ञान संपादिलें असें असून तो इतका निरभिमान होता कीं आपल्या गुणांचें त्याला कांहींच वाटत नव्हतें. तो म्हणत असे कीं, माझ्या आंगीं धैर्य आहे म्हणूनच हें सर्व प्राप्त झालें. त्याच्या तोंडचीं अक्षरें लोकांमध्यें प्रसिद्ध आहेत त्यांचें भाषांतर येणें-

प्रमाणें, मीं जे श्रम केले त्यांविषयीं लोकांस काय वाटेल तें नकळे, मला तर असें वाटतें कीं, एखादा मुलगा समुद्राच्या कांठीं खेळत असतां एखादे वेळीं चांगली गारगोटी त्याच्या दृष्टीस पडते, आणि एखाद्या वेळेस चांगली शिंप त्याला आढळते, त्याप्रमाणें मीं खेळत होतों. ज्ञानाचा महासागर तर अद्यापि माझ्या पुढेंच असून त्याचा मला कांहींच थांग लागला नाहीं.

---

## आलफ्रेद् धि ग्रेत

### ह्याची गोष्ट.

हा एथल्वुल्फ म्हणून जो इंग्लंदचा राजा होता त्याचा तिसरा मुलगा. ह्याचें जन्म इसवी सन ८४९ वे सालीं झालें. विद्यासंपादन करण्यास मनुष्याच्यानें काय काय करितां येईल हें आलफ्रेदाचा वृत्तांत वाचिला असतां समजेल. ह्याचे वेळेस लिहिणें वाचणें लोकांस फारसें माहीत नव्हतें. ह्याला खुद्द बारा वर्षेपर्यंत वाचायाला येत नव्हतें. ह्याचें चित्त पहिल्यानें विद्येकडे कसें लागलें ह्याविषयीं एक चमत्कारिक गोष्ट बुकांतून लिहिली आहे. ती अशी कीं, त्याचे आईपाशीं आंग्लो साक्सन भाषेंतील कवितेचें वेलबुट्टी वगैरे काढलेलें असें छानदार एक पुस्तक होतें. तें तिनें एके दिवशीं आपल्या मुलांस दाखविलें. तेव्हां जो तो, मला पाहिजे, मला पाहिजे, असें म्हणूं लागला. तेव्हां, जो तें पहिल्यानें वाचायाला शिकेल त्याला तें मी देईन, असें तिनें सांगितलें. आलफ्रेद सर्वांमध्यें लहान होता, तथापि त्याचीच एकट्याची तें बक्षीस मिळविण्याविषयीं उद्योग करण्याची छाती झाली, त्यानें लागलाच एक शिकविणारा आणिला, आणि लवकरच वाचायाला शिकून तें पुस्तक आईपाशीं मागण्याचा अधिकार संपादिला.

ह्याचा वडील भाऊ एदल्रेद हा मेल्यावर हा इंग्लंदचे गादीवर बसला. एदलरेद गादीवर होता तेव्हांपासून जे दंगे चालत आले होते ते हा गादीवर बसला तेव्हांही तसेच चालले होते, ह्यामुळें ह्यास लवकरच मोठमोठीं संकटें प्राप्त झालीं. देन्स म्हणून मोठे कडवे लोक होते, ते चांचेपणाचें, म्हणजे समुद्रांत गलबतें लुटण्याचें, काम करीत

असत. त्यांनीं बाल्तिक् समुद्राकडून ब्रितन देशामध्यें येऊन पुष्कळ दिवस मोठमोठ्या लढाया करून, तो देश आपल्या हस्तगत करून घेतला. तेव्हां आलफ्रेद राजास पळून जाणें प्राप्त झालें. परंतु आपल्या बरोबरचे सर्व लोक घेऊन गेलें तर ती गोष्ट उघडकीस येईल, म्हणून त्यानें त्या सर्वांला रजा देऊन आपण एका गुराख्याचें सोंग घेऊन एका धनगराचे घरीं जाऊन राहिला. तो तेथें असतांना त्याची एक गोष्ट झाली, ती अशी कीं, त्या धनगराचे बायकोस हा राजा हें माहीत नव्हतें, म्हणून एके दिवशीं त्याला कांहीं भाकरी भाजूं सांगून ती कोठे बाहेर कामाला गेली, परंतु त्याचें मन मोठमोठ्या गोष्टींच्या विचारांत मढलें होतें त्यामुळें तिकडे दुर्लक्ष होऊन भाकरी जळून गेल्या. मग तिनें परत आल्यावर तें पाहिलें, तेव्हां, तुला ऊन ऊन भाकरी खायाला पाहिजेत, परंतु भाजायाला नकोत, असा तिनें त्याला टोमणा मारिला. पुढें राजाला चांगले दिवस आले तेव्हां त्यानें त्या धनगराला विद्याभ्यास करूं सांगून नंतर त्याला विंचेस्तर येथील बिशपची, म्हणजे धर्माधिकाऱ्याची, जागा दिली.

ह्यावेळची आणखी एक ह्या राजाची गोष्ट बुकांतून लिहिलेली आहे, ती ऐकिली म्हणजे त्यास किती दशा आली होती आणि तो किती परोपकारी होता, ह्याविषयीं खातरी होईल. एके दिवशीं एक आंधळा भिकारी ह्याच्या झोंपड्याजवळ येऊन भीक मागूं लागला, तेव्हां, आमचे पाशीं एकच लहानशी भाकर राहिली आहे, ती आम्हांसच पुरणार नाहीं, असें त्याला राणीनें सांगितलें; परंतु राजा म्हणाला कीं, ज्यानें पांच भाकरी आणि दोन मासे ह्यांजवर पांच हजार मनुष्यांचा निर्वाह केला तोच अर्ध्या भाकरीवर आमचा निर्वाह करील; कांहीं चिंता नाहीं; त्याला अर्धी भाकर दे. असें राजानें सांगितल्यावर त्यास तिनें अर्धी भाकर दिली.

देन्स लोकांनीं सर्व देश आपले ताब्यांत करून घेतला, परंतु आलफ्रेद त्यांच्या हातीं लागला नव्हता. तो अथेलनी नांवाच्या बेटांत पळून जाऊन राहिला होता; तेथें साक्सन लोकांतले कांहीं सरदार हळू हळू पुन्हा जमवून तो तेथून देन्स लोकांवर अकस्मात् जाऊन वरचेवर घाले घाली. असें करून त्यानें आपल्या लोकांस हुरूप आणिली.

एकदां किनरीवाल्याचें सोंग घेऊन तो देन्स लोकांच्या लष्करांत शिरला, आणि सर्व ठिकाणीं मुकाट्यानें फिरून ते बेफाम आहेत अशी आपली पक्की खातरी करून घेऊन त्यानें आपले सरदार बरोबर घेऊन त्यांज-वर स्वारी केली. ते तर त्यावेळेस अगदीं गैरसावध होते. त्यांनीं अकस्मात् इंग्लिशांची फौज पाहिली तेव्हां ते अगदीं थक्क होऊन गेले. ह्यावेळीं आलफ्रेदानें त्यांचा अगदीं मोड करून टाकिला. आलफ्रेद असा शूर होता तसाच उदारही होता. जे त्यावेळीं समरांगणांत त्याचे हातीं सांपडले त्यांस त्यानें जीवदान दिलें, आणि शेतकी करायाला त्यांस जमिनी दिल्या.

आलफ्रेदानें ह्याप्रमाणें देन्स लोकांचा अगदीं पराजय केल्यावर तो आपले फौजेची व दिवाणीची व्यवस्था करण्यास, तसाच आपल्या प्रजेस उद्योग आणि न्याय हीं काय आहेत हें समजावून देण्यास, आणि पहिल्याप्रमाणें पुन्हा संकटें न येतील असा बंदोबस्त करण्यास, लागला. देन्स लोकांनीं जीं शहरें जमिनीस मिळविळीं होतीं तीं त्यानें पुन्हा बांधिलीं, आणि आपले राज्याचे बंदोबस्ताकरितां शिबंदीची चांगली व्यवस्था करून ठेविली. बेटांत लढाऊ गलबतें असलीं म्हणजे त्याचा चांगला बचाव होतो, असें त्यास ठाऊक होतें, म्हणून त्यानें आपणाकरितां नवीं गलबतें बांधून आरमारांची तयारी करून ठेविली. ह्याचा पूर्वी समुद्रावर अमल नव्हता, परंतु हा आपलीं आरमारें घेऊन देन्स लोकांवर गेला तेव्हां त्यांचें एकही गलबत त्यानें समुद्रावर राहूं दिलें नाहीं. तेव्हांपासून समुद्रावरचें वर्चस्व इंग्लिशांकडे आलें तें अद्यापि तसेंच आहे.

ह्याप्रमाणें आलफ्रेद राजानें आपल्या राज्याच्या बंदोस्ताकरितां सर्व तजवीज केली. ह्यावरून तो शूर आणि राजकारस्थानी होता येवढीच त्याची योग्यता होती, असें समजूं नये. त्यानें नवे कायदे केले, आणि तो विद्या आणि कला ह्यांची वृद्धि करण्याकरितां मनापासून झटत असे, ह्या कांहीं लहान गोष्टी नव्हत. आपले राज्यांत न्याय अगदीं बरोबर चालावा म्हणून त्यानें पहिले कायदे होते त्यांत वाढविण्यासारखे होते ते वाढविले, आणि फेरफार करण्यासारखे होते त्यांत पुष्कळ फेरफार केला, आणि काईम करण्यासारखे होते ते काईम केले. त्यानें आपल्या

राज्याचे विभाग, व त्या विभागांचे पोटविभाग करून प्रत्येक ठिकाणीं कायद्यांत वाकबगार आणि इमानानें काम करणारे असे न्यायाधीश नेमिले, आणि गुन्ह्यांस यथायोग्य शिक्षा लावून देऊन बंदोबस्त केला. त्यानें विद्यावृद्धीस पुष्कळ उत्तेजन दिलें; म्हणजे त्यानें शाळा घालून त्यांत सर्व गृहस्थ लोकांनीं आपलीं मुलें पाठवावीं असा कायदाच केला; आणि कोणाला कांहीं असामी द्यावयाची झाल्यास विद्येंत जो हुशार असेल त्यासच तो देई. परंतु विद्याभ्यासास जें उत्तेजन आलें तें तो खुद्द विद्याभ्यास मोठी मेहनत घेऊन करी ह्यामुळें आलें. त्याला पुष्कळ काम पडे, व त्यास पुष्कळ गोष्टींचा विचार करायाचा असे, व समुद्रावर आणि खुष्कीवर मिळून एकंदर ५६ लढाया तो खुद्द लढला, असें असतां त्यानें थोड्या वेळांत एकसारखा अभ्यास करून, विद्याभ्यासाची सोय चांगली असून ज्यांनीं आपला सर्वकाळ विद्याभ्यासाकडे घालविला त्यांचेपेक्षां अधिक ज्ञान संपादिलें, आणि त्यांचेपेक्षां नवे ग्रंथ सुद्धां अधिक रचिले. हें इतकें त्यानें केलें, तें कसें म्हणाल, तर आपल्या कालाचा मोठ्या व्यवस्थेनें खर्च करून केलें. दर तासास त्याचें नेमलेलें कांहीं तरी काम असे. दिवस आणि रात्र मिळून २४ तास होतात, त्यांचे त्यानें आठ आठ तासांचा एक एक विभाग असे तीन विभाग केले होते. त्याची प्रकृति पुष्कळ बिघडलेली असे, तरी झोंप, जेवण, आणि व्यायाम ह्यांस तो आठच तास देई, आणि बाकीच्या राहिलेल्या १६ तासांत ८ तास वाचणें, लिहिणें, आणि ईश्वराची प्रार्थना ह्यांजकडे लावी, आणि दुसरे आठ तास राजकीय कारभाराकडे लावी. तो इतका समंजस होता कीं वेळ हवी तशी खर्चावी असें नाहीं, ती आपणास ईश्वरानें देणगी दिली आहे, आणि तिचा हिशोब आपणास त्याला दिला पाहिजे, असें तो समजत असे. आपल्या अशिक्षित प्रजांस विद्येची गोडी लागावी, आणि त्यांचीं मनें सदाचरणाकडे वळावीं, म्हणून त्यानें पुष्कळ तऱ्हेच्या कविता आणि गोष्टी रचिल्या होत्या. ज्या उपयुक्त कला आहेत त्यांचा प्रसार करण्याकडेही त्याचें लक्ष्य कमी नव्हतें. त्यानें सर्व प्रकारचें शिल्पकाम आपले राज्यांत चालू करून, कोणी उपयुक्त कलेची सुधारणा केली, किंवा कोणी नवीन युक्ति काढिली, तर त्यास बक्षीस दिल्याशिवाय त्यानें कधीं जाऊं दिलें नाहीं.

कोणत्याही देशांत आजपर्यंत जे राजे होऊन गेले त्यांमध्यें आलफ्रेदापेक्षां शहाणा आणि नीतिमान् असा कोणी झाला नाहीं. हा २९ वर्षे चांगल्या रीतीनें राज्य केल्यावर धट्टा कट्टा असतां मरण पावला. घरांत आणि बाहेर जशी ह्याची चांगली वर्तणूक होती, तशी प्राचीन आणि अर्वाचीन राजांमध्यें कोणाची नसेल. ह्याचे सारखा शूर असून दयाळू असा कोणी बहुतकरून सांपडणार नाहीं. हा लढाई करण्यांत हुशार असून आपल्या राज्यांत स्वस्थता राखण्यास दक्ष असे. असला राजा कोणत्याही काळीं आणि कोणत्याही देशीं असला, तरी लोकांस चमत्कारच वाटावा; परंतु सर्व लोक दांडगे आणि रानटी असतां त्यांमध्यें असला राजा उत्पन्न झाला ह्यामुळें फारच चमत्कार वाटतो. लढाया चालल्या असतां आणि ह्याच्या शरीराला व्याधि झाल्यामुळें एकसारखी इजा होत असतां, ह्याचा विद्याभ्यास चालत असे; तथापि त्या विद्याभ्यासामुळें सरकारी कामांत त्याचे हातून हयगय होत नसे; म्हणून हयगय न करितां अगदीं बरोबर न्याय करणारा कोणी राजा झाला असतां त्याला ह्याची उपमा देत असत ; असें शेंकडो वर्षेपर्यंत चाललें होतें. ह्याची धर्मावर निष्ठा असे, परंतु एखादा धर्मवेडा असतो त्याप्रमाणें नसे. सर्व लोक ह्यास देशाला संकटांतून मुक्त करणारा असें म्हणतात. हा इ० स० ९०१ ह्या सालीं मरण पावला, त्यावेळीं ह्याचें वय ५३ वर्षांचें होतें.

---

## रूस देशचा राजा पीतर धि ग्रेत
## ह्याची गोष्ट.

हा इसवी सन १६७२ ह्या सालीं जन्मला. हा गादीवर बसला तेव्हां ह्याचें वय दहा वर्षांचें होतें. हा गादीवर होता, परंतु हा लहान म्हणून त्याची बहीण, सोफया, ती सर्व राज्याचा कारभार पाहत असे. असें कितीएक दिवस चाललें होतें; परंतु पुढें त्यास हें पारतंत्र्य न आवडून त्यानें तें अमळ मोठा होतांच काढून टाकिलें. नंतर तो आपल्या लोकांच्या ज्या फार दिवसांच्या चाली आणि वेड्या वेड्या समजुती होत्या त्या अगदीं फिरवून त्यांस शहाणें करून सोडावें ह्या कामास

लागला. रूस देशचे लोक वास्तविक म्हटलें तर ह्या वेळेस, म्हणजे पीतर राजा उत्पन्न झाला त्यावेळेस, बहुतकरून रानटी लोकांसारखेच होते. खुद्द पीतर राजा देखील रानटी स्थितींत उत्पन्न झाला. आणि त्याच स्थितींत तो लहानाचा मोठा झाला; त्यामुळें जे दुर्गुण व जीं दुर्व्यसनें त्याला लागलीं होतीं तीं शेवटपर्यंत तशींच बळकट होतीं. परंतु तो रानटी लोकांतला असून आपणास आणि आपल्या लोकांस चांगल्या स्थितींत आणण्यासाठीं झटला, ह्यावरून तो विलक्षण बुद्धिमान् होता असें स्पष्ट दिसतें.

पीतर राजा राज्य करूं लागला तेव्हां रूस देशामध्यें व्यापार अगदीं नव्हता, आणि शिल्पकामही बहुतकरून नव्हतें, म्हणून ह्या गोष्टी आपल्या राज्यांत असाव्या असें त्यास वाटलें; परंतु गलबतांशिवाय परमुलखाशीं व्यापार होणार नाहीं, असें पाहून त्यानें हालंद देशांतला गलबतें बांधणारा एक मनुष्य आपणास गलबतें बांधून घेण्याकरितां मिळविला. परंतु रूस देशचे शिल्पी अडाणी होते, ह्यामुळें त्याला ह्या कामांत, आणि पहिल्या पहिल्यानें जे त्यानें दुसरे उद्योग केले त्यांत, मोठी अडचण पडत असे. ह्यामुळें त्यानें हुशार हुशार असे नव्या उमेदीचे मनुष्य पाहून त्यांस परदेशीं उपयोगी कला शिकण्यासाठीं पाठविलें.

आपल्या राज्याला आरमार करून ठेवावें असें पीतर राजाला वाटण्यास जें कारण झालें तें ऐकिलें म्हणजे तो कोणत्या प्रकारचा मनुष्य होता हें समजेल. एके दिवशीं जुनी अडगळ पडली होती ती सहज पाहतां पाहतां इंग्लंदांत बांधलेल्या एका लाहानशा गलबताचा सांगाडा दोरखंडासुद्धां तेथें पडला होता त्यावर त्याची नजर गेली. ह्याचा बाप आलेक्सिस हाही मोठा हुशार होता, त्यानें हें गलबत पुष्कळ वर्षांचे पाठीमागें आणिलें होतें. आपला देश चांगल्या स्थितींत आणण्याविषयीं त्याचेही मनांत पुष्कळ बेत झाले होते. त्या गलबताची कोणालाच आठवण नव्हती, आणि तें कशासाठीं आणिलें होतें ह्याचेंही कोणास स्मरण नव्हतें. परंतु त्याजवर पीतराची दृष्टि गेली तों त्याचें मन वेधलें. त्याच्या जवळ जे कोणी परदेशांतले लोक होते त्यांस डोलकाठी आणि अवजारें ह्यांचा उपयोग काय म्हणून त्यानें विचारून शोध

केला, आणि त्यांनीं त्यांचा उपयोग सांगितल्यावर त्या जुन्या सांगाड्या-कडे पहायाला त्यास अधिकाधिकच आनंद वाटे. येवढ्यावरून त्याचे मनांत आपल्या देशाला गलबतांची सामग्री असावी असें आलें. तो जुना सांगाडा नीट करवून पाण्यांत चालू करीपर्यंत त्यास चैनसुद्धां पडलें नाहीं, आणि तें गलबत पाण्यांत सोडिल्यावर चालूं लागलें तेव्हां जो त्याला आनंद झाला तो त्याच्या अंतःकरणांत मावेना इतका झाला. नंतर मोठ्या आनंदानें तें गलबत स्वतां चालवायाला शिकून तो त्या कामांत लवकर मोठा हुशार झाला. पुढें कित्येक वर्षेंपर्यंत त्यानें गल-बतें बांधण्याचे कामांतच लक्ष घातलें, त्यामुळें पुष्कळ गलबतें तयार झालीं. आणि सेंतपीतर्सबर्ग म्हणून जें रूसदेशाचें मुख्य शहर होतें तेथें इ० स० १७२३ सालीं आगस्त महिन्याचे १२ व्या तारखेस राजाचे हुकुमावरून सर्व गलबतें पाहण्यासाठीं एके ठिकाणीं जमविलीं होतीं त्यावेळीं पहिलें जें गलबत होतें, त्यामुळें इतकीं गलबतें झालीं म्हणून त्याच्या सन्मानार्थ बावीस गलबतांवरून तोफा सोडिल्या. ह्या-वेळेपासून रूस देशाला आरमाराचें बळ मोठें झालें आहे.

इसवी सन १६९७ सालीं सुधारलेल्या लोकांतील सर्व कलांची माहितगारी होऊन त्याप्रमाणें आपणास हातानें काम करितां यावें, ह्याकरितां पीतर ह्यानें आपल्या वकिलाच्या बरोबरचे मंडळींत परदेशीं जावें असा बेत करून तो त्याप्रमाणें जाऊं लागला. तो आम्स्तरदाम म्हणून हालंद देशाचें जें मुख्य शहर तेथें गेल्यावर तेथील अधिकारी त्याचा आदर सत्कार करूं लागले, परंतु त्यानें तें सर्व टाकून, गांवांतील चार लोक आहेत त्यांप्रमाणें मला मोजावें, असें बोलला. तेथें त्यानें पहिल्यानें कित्येक दिवसपर्यंत शहराचे सर्व रस्ते फिरून तेथील व्यापार व शिल्पाचीं कामें आणि तेथील तऱ्हेतऱ्हेचे पदार्थ ह्यांची माहिती करून घेतली. नंतर तो सार्दम शहरीं गेला. तेथें ईस्त इंदिया कंप-नीची गोदी होती, आणि हाच काय तो हालंद देशामध्यें गलबतें बांध-ण्याचा मुख्य कारखाना होता. तो पाहून तर त्यास तेथें रहावेंसें वाटलें. मग तेथें सुतार वगैरे कारागीर होते त्यांत शिरावें असा निश्चय करून तो त्यांत शिरला आणि त्यांतला अगदीं बनून गेला. त्याचा पोशाक, त्याचें खाणें, त्याचें राहण्याचें घर हें सुद्धां सर्व त्यां-

त्याच प्रमाणें अगदीं गरिबीचें असे. ह्याप्रमाणें त्यानें तेथें कित्येक महिने घालविले, आणि तेथें एक गलबत बांधण्याचें काम चाललें होतें त्यांत बरीच मदत केली. मग तें गलबत सर्व तयार झाल्यावर त्यास सेंत पीतर असें नांव प्राप्त होऊन त्यानें आपणच तें विकत घेतलें.

ह्याप्रमाणें पीतर हा नेहमीं कामांत गुंतलेला असे तरी त्यानें राज्यकारभार पाहण्याचें जें आपलें मुख्य काम तें सोडिलें नव्हतें. दिवसाचें काम झालें म्हणजे संध्याकाळीं बहुतकरून रूस देशीं ज्या प्रधानांकडे आपल्या राज्यकारभाराचें काम सोपिलें होतें त्यांस तो पत्रें लिही, अथवा तहाविषयींचीं जीं बोलणीं चाललीं होतीं त्यांविषयीं आपल्या वकिलाला घेऊन विचार करी.

पुढें तो इंग्लंदास गेला, आणि हालंद देशांत जसे त्यानें दिवस घालविले तसेच तेथें लढाईचीं हत्यारें ठेवण्याची जागा, टांकसाळ, आक्सफर्द येथील विद्यालय, आणि असले जे आणखी चमत्कार होते ते पाहण्यांत दिवस घालविले. एकदां पोर्त्समौथ बदरीं मौजेनें समुद्रांत गलबतांची लढाई लाविली होती ती पाहून त्यास फार आनंद झाला, आणि, रूस येथील राजापेक्षां इंग्लिश लोकांच्या आरमारावरचा मुख्य अधिकारी धन्य आहे, असें त्यानें धडधडीत चौघांत बोलून दाखविलें. ज्या शिल्पाच्या कामाची त्याच्या मनांत चांगली माहिती करून घ्यावयाची होती तें हलकें असलें तरी त्याच्या हलकेपणाकडे लक्ष्य न देतां तें मन लावून शिकण्याला त्यानें आरंभ केला. त्याच्या मनांत हरएक कामाची चांगली माहिती करून घ्यावयाची होती, म्हणून कागद करण्याचा कारखाना, कर्वतीनें तुळया कापण्याचा कारखाना, गलबतांसाठीं दोरखंडें तयार करण्याचा कारखाना, व आणखी असले हलके कारखाने ह्यांमध्यें सामान्य कामकरी लोकांबरोबर काम करायाला त्याच्या मनांत बिलकूल शंका येत नसे. तो घड्याळ करण्याचें काम मन लावून फार चांगलें शिकला. तो इंग्लंदांत गेल्यावर त्याला रहायाला तेथील सरकारानें चांगलें घर दिलें होतें, त्यांत पहिल्यानें होता; परंतु गलबतें बांधायाचें काम चांगलें शिकावें म्हणून तेथें गेला होता त्या कामाला तें सोईचें नव्हतें, म्हणून त्यानें तेथून देतफर्दगांवीं जाऊन कितीएक महिने तेथल्या गोदींत काम केलें. तेथें ज्या रीतीनें गलबतांचें काम करीत ती

रीति पाहून त्याला बरें वाटलें, आणि, इंग्लंदास आलों नसतों तर ह्या कामाची मला कधीं माहिती झाली नसती, असें तो बोलून दाखवी.

पीतर हा जरी गोदीमध्येंच फार करून असे तरी फावल्या वेळेंत बहुतकरून गणित, नौकानयन, आणि शारीर, ह्या विद्या शिकत असे. आणि प्रतिष्ठित लोकांची ओळख करून घेण्याचा प्रसंग आला असतां तो प्रसंग फुकट जाऊं देत नसे. त्यांपैकीं कितीएक त्यानें येतांना आपल्या बरोबर रूस देशांत सुद्धां आणिले होते. त्यानें पुष्कल चमत्कारिक, पदार्थ खरीद केले आणि जे कृतीचे पदार्थ लोकांनीं पाहिले असतां तसले पदार्थ आपल्या देशांत उत्पन्न करावे अशी त्यांस ईर्षा उत्पन्न होईल असें त्यास वाटलें, तसले पदार्थही त्यानें पुष्कळ पैसा खर्च करून विकत घेतले.

पीतर ह्यानें रूस देशीं परत गेल्यावर यूरोपखंडांतील दुसऱ्या देशांत ज्या चाली पाहिल्या होत्या त्यांसारख्या आपल्या देशांतल्या चाली कराव्या म्हणून त्यांत पुष्कळ फेरफार करायाला आरंभ केला, तो सर्व येथें सांगत नाहीं. इतकेंच येथें सांगतों कीं त्यानें फार मेहनत घेऊन व कधीं कधीं मोठा जुलूमही करून, फार जुने कायदे होते त्यांतून कितीएक कायदे अगदीं फिरवून टाकिले, आणि लोकांच्या चाली देखील फिरविण्यास त्यानें उद्योग चालविला; त्यामुळें तो देश अगदीं अडाणी लोकांचा होता तरी त्यांत पुढें हळू हळू पुष्कळ चांगल्या चाली चालू झाल्या. पीतर राजानें आपल्या लोकांस पुष्कळ चांगल्या गोष्टी शिकविल्या. त्यानें त्यांला नौकाशास्त्र आणि व्यापार हीं शिकविलीं. त्यानें त्यांस शेतकीचें काम सुद्धां शिकविलें. तसेंच साक्सनी आणि सिलिश्या ह्या देशांतून मेंढ्यांचे कळप आणि मेंढके आणून आपल्या लोकांस मेंढ्या राखण्याचें सुद्धां काम शिकविलें. त्यानें सर्व प्रकारचे हुशार लोक दुसऱ्या देशांतून बोलावून आणून आपल्या देशाला चांगली स्थिति येण्याला जीं साधनें ईश्वरानें दिलीं आहेत तीं कोणत्या रीतीनें उघडकीस आणितां येतील ह्याविषयीं प्रत्येकास आपआपल्या कामांत तजवीज काढायाला सांगितलें. त्यानें एक नवीन शहर बांधिलें, आणि तें तर जी जागा पीतर गादीवर बसला तेव्हां त्याचे राज्यांत मोडत देखील नव्हती, आणि जीवर शहर बांधितां येईल

असें दिसत नव्हतें, अशा जागेवर बांधिलें. रूस देशामध्यें यूरोपखंडाचे चालीप्रमाणें जें शहर पहिल्यानें बांधिलें तें हेंच बांधिलें. हें नवें शहर लवकर बांधून केव्हां तयार होईल असें पीतर राजास झालें होतें; म्हणून तो अमुक तऱ्हेनें शहर बांधावें इतकेंच कारागिरांला सांगून राहिला नाहीं; तर कामकऱ्यांस उत्तेजन येण्यासाठीं पहिल्यानें जें घर बांधिलें तें बांधण्यास त्यांला हात लावायाला तो आपण खुद्द जाई. ह्या शहराचें नांव सेंतपीतर्सबर्ग असें ठेविलें. हें शहर सर्व यूरोपखंडामध्यें जीं उत्कृष्ट शहरें आहेत त्यांमध्यें मोडतें, आणि पूर्वींचें मास्को म्हणून रूस देशाचें जें मुख्य शहर होतें तेथून गादी काढून ह्या नव्या शहरांत घातली. शेवटीं पीतर ह्यानें शाळा, विद्यालयें, पुस्तकशाला, वैद्यशाला, औषधें मिळण्याचा कारखाना, आणि वेधशाला, हीं घातलीं. तसेंच चमत्कारिक पदार्थ जमवून ते लोकांस दाखविण्यासाठीं एके ठिकाणीं ठेविले, आणी तशीच सर्व वनस्पतींची लोकांस माहिती व्हावी म्हणून त्या जमवून त्यांची एक बाग तयार केली. लोकांची सुधारणा उत्तरोत्तर वाढावी म्हणून त्यानें ह्याप्रमाणें उत्कृष्ट तजवीज ठेविली होती. बागेवर ठेवलेले कामगार इतर लोकांस बागेंत येऊं देत नाहींत, असें त्याला समजल्यावर तो म्हणाला कीं, काय, ही बाग मीं इतका पैसा खरचून तयार केली, ती आपल्यासाठींच केली, आणि लोकांनीं ती पाहून त्यांस सुख होऊन तींतील झाडांची माहिती व्हावी ह्यासाठीं नाहीं, असें ते लोक समजतात काय?

रूस देशामध्यें इ० स० १५५० चे सुमारास पुस्तकें छापण्याची कळा सुरू झाली होती, परंतु पुढें तिची खूण बहुतकरून राहिली नव्हती. पीतर राजा गादीवर बसला तेव्हां लोकांपाशीं पुस्तकें नाहींत असें त्यास समजल्यावरून सर्वांस पुस्तकें मिळावीं ह्या हेतूनें त्यानें आपल्या भाषेंतील वर्ण नवे सोपे करून पीतर्सबर्ग शहरांत जागोजाग छापखाने घातले, आणि त्यांत बहुतकरून परभाषेंतून रूसचे भाषेंत तर्जुमा करून तयार केलेलीं पहिल्यानें शिकण्याजोगीं पुष्कळ पुस्तकें छापून प्रसिद्ध केलीं. तेव्हांपासून रूसचे भाषेचा इतका विस्तार झाला कीं त्या भाषेंत १३२४९ ग्रंथ सन १८१३ पर्यंत तयार झाले.

इसवी सन १७१७ ह्या सालीं पीतर राजा आपल्या योग्यतेप्रमाणें इतमाम बरोबर घेऊन दुसऱ्यानें परदेशांत जाण्यासाठीं निघाला. त्यानें ज्या कला पूर्वीं पाहिल्या होत्या त्या हातानें करण्यास तो ह्यावेळीं लागला नाहीं; त्याचे शिकण्याचे दिवस होऊन गेले होते; तथापि ज्या कारखान्यांत नवीन एखादी चमत्कारिक गोष्ट पाहण्यासारखी असे त्या कारखान्यांत जाऊन ती पाहण्याची त्याची उत्कंठा कमी झाली नव्हती.

ह्या मोठ्या मनुष्याला लहानपणीं कोणीं चांगली शिक्षा लाविली नाहीं, परंतु ह्याच्या उलट्या वाईट गोष्टी त्याला शिकविल्या होत्या; ह्यामुळें त्याला मुळींच शिकविलें नसतें तर जो परिणाम झाला असता त्यापेक्षां फार वाईट परिणाम झाला. ह्याची बहीण आणि तिचे मंत्री हीं फार वाईट चालीचीं होतीं. ह्यांनीं त्याला फार दुष्ट संगत लावून भुरळ घातली, तेव्हां त्याचे मनास विकार होऊन तें विद्येवरून उडालें ह्यांत काय सांगायाचें आहे? त्याचे आंगीं जे कांहीं दुर्गुण होते ते लहानपणीं त्याला जसें वागविलें पाहिजे होतें तसें वागविलें नाहीं ह्याचेंच बहुतकरून फळ होतें. त्याचे कामक्रोधादिक दुष्ट मनोविकार लहानपणीं न आवरल्यामुळें शेवटपर्यंत फार कडक राहिले, त्यामुळें कोणाचें न ऐकून तो रागानें वेडे झालेल्या रानटी लोकांपेक्षां देखील अधिक क्रूर कर्म करी. तथापि त्याच्या वाईट खोडीपैकीं ज्या एके खोडीनें आपल्या मोठमोठ्या बेतांला अडथळा होईल असें त्यास वाटलें, ती खोड त्यानें टाकिली. म्हणजे लहानपणीं त्याला दारूपिण्याचें व्यसन फार होतें, परंतु तो प्रौढ झाल्यावर त्यानें तें व्यसन अगदीं सोडून दिलें. त्याच्या दुसऱ्या ज्या खोडी होत्या त्याही त्याला समजत होत्या, परंतु त्यांविषयीं त्याचा उपाय चालत नसे. रागाचा झटका येऊन गेल्यावर तो कधीं कधीं म्हणत असे कीं, मीं आपल्या लोकांला वाटेवर आणिलें, परंतु मला आपणाला वाटेवर आणितां येत नाहीं. हाय, हाय, काय करावें! लहानपणीं विद्याभ्यास नकेल्यामुळें जे वाईट परिणाम होतात ते घालविण्याविषयीं ह्या पीतर राजानें जितके श्रम केले तितके, विद्या संपादण्याची गोष्ट पाहिली असतां, कोणींच केले नसतील असें वाटतें. गणितशास्त्र, यंत्रशास्त्र, नौकाशास्त्र, वैद्यशास्त्र, आणि शारीरक ह्या विद्या त्याला येत असून यूरोपखंडांतील एक दोन अर्वाचीन भाषांचें ज्ञान त्यानें चांगलें संपादिलें

होतेंसें दिसतें. त्यानें फ्रेंच भाषेंतील पुष्कळ ग्रंथांचें भाषांतर केलें; ते त्याचे हातचे लेख सेंतपीतर्सबर्ग शहरीं अद्यापि ठेविले आहेत. त्याचें मन लहानपणीं विद्याभ्यासाकडे कोणीं लाविलें नाहीं, आणि मन तर लहानपणापासून तिकडेच लाविलें पाहिजे हें त्याला पक्कें समजत होतें, ह्याविषयीं त्याची गोष्ट आहे ती लिहितों. एके दिवशीं त्याच्या दोन मुली फ्रेंच ग्रंथ वाचीत होत्या तें ह्यानें पाहिलें; तेव्हां त्यांतून एकीला ती जें वाक्य वाचीत होती त्याचें रूसचे भाषेंत भाषांतर करूं सांगितलें; मग तिनें तें लगलेंच केलें, असें पाहून त्यास मोठें आश्चर्य वाटलें, आणि तो म्हणाला कीं, माझ्या मुलींनो, तुम्हांला लहानपणापासून विद्याभ्यासांत घातलें त्याचें हें फळ तुम्हांस आलें, तेव्हां तुम्ही किती धन्य आहां! मला लहानपणीं मुळींच कोणीं शिकविलें नाहीं. तो वरचेवर म्हणत असे कीं, मला लहानपणीं जर चांगली शिक्षा लाविली असती, आणि त्याबद्दल माझा एक हात गेला असता, तर तें मला पुरवतें.

कोणत्याही प्रशस्त विद्येचा कोणी आला तरी त्याचा पीतर राजा चांगला सत्कार करीत असे, आणि फावे त्याप्रमाणें व संधी येई त्याप्रमाणें तिचा अभ्यास खुद्द तो करीत असे. तो बाहेर देशीं जात असे तेव्हां ज्या ठिकाणीं त्याला जायाचें असे त्याची अगोदर जितकी माहितगारी होईल तितकी करून घ्यावी अशी त्याची चाल असे; आणि अगदीं लहान खेड्यांत जरी तो गेला, तरी ह्यांत कांहीं पाहण्यासारखी चमत्कारिक वस्तु आहे काय? म्हणून विचारीत असे जर त्याच्या जवळच्या लोकांनीं, त्यांत पाहण्यासारखें कांहीं नाहीं, असें सांगितलें, तरी तो म्हणत असे कीं, कोणाला ठाऊक? जरी तुम्हांला पाहण्यासारखें कांहीं नसलें, तरी मला पाहण्यासारखें कांहीं असेल, म्हणून मला सर्व पाहूं द्या. तो असला शोध करायाला जात असे तेव्हां आपल्या हातीं लिहिण्याची सामग्री घेऊन जात असे, आणि जें जें त्याला ध्यानांत ठेवण्यासारखें वाटे तें तें तो टिपून ठेवीत असे. तो गाडींत बसून जातांना रस्त्याचे बाजूनें शेतकाम करितांना लोक दृष्टीस पडले, तर गाडींतून उतरून त्यानें त्यांशीं शेतकी प्रकरणीं बोलावें असें पुष्कळ वेळ होत असे. पण तो इतकेंच करूनही राहत नसे. तो त्यांच्या बरोबर त्यांच्या घरीं जाऊन त्यांच्या घरीं काय काय सामान

आहे तें पाहत असे, आणि त्यांच्या शेतकीच्या अउतांचीं चित्रें काढून घेत असे. ह्याप्रमाणें तो करीत असे, म्हणून त्याला बारीक बारीक गोष्टींची खरी माहितगारी झाली. त्यानें असें केलें नसतें तर त्याला दुसऱ्या रीतीनें अशी माहितगारी बहुतकरून झाली नसती. ह्या माहितगारीचा उपयोग त्यानें पुढें आपल्या राज्याची सुधारणा करण्याचे कामांत केला. त्यानें आपल्या प्रजांतील कांहीं लोकांचे जीव वांचविण्याच्या उद्योगांत आपला जीव खर्चिला, असें म्हटलें असतां चालेल. त्याचा प्रकार असा. एके दिवशीं एक गलबत बुडत आहे असें त्यानें पाहिलें, तेव्हां त्याची प्रकृति अशक्त झाली होती तरी तो लागलाच त्यांतील लोकांस मदत करायाला गेला; आणि पाण्यांत मध्यें मध्यें भाट्या पडल्या होत्या त्यामुळें आपली होडी चालत नाहीं असें पाहून त्यानें पाण्यांतून पायानें चालत जाऊन त्या गलबतांतील लोकांचे जीव वांचविले. परंतु त्याला त्यावेळीं हिंवाची हुडहुडी भरून जी त्याची प्रकृति बिघडली ती पुन्हा बरी झाली नाहीं. त्या दुखण्यानें तो इ० स० १७२५ सालीं मरण पावला; त्या वेळीं त्याचें वय ५३ वर्षांचें होतें. पीतर राजाचें चरित्र पाहिलें असतां त्यानें विद्यासंपादन करण्यास ज्या अडचणी त्याला आल्या त्या सर्व दूर करून विद्यासंपादन केलें, ह्याची मोठी मौज वाटते. अशी गोष्ट दुसऱ्याची उदाहरणार्थ घेऊं म्हटलें तर कोणाची सांपडणार नाहीं. आपण विद्या शिकून आपल्या सर्व लोकांसही ती शिकवावी, असा जो त्याचा उदार मनाचा निश्चय होता त्याप्रमाणें करण्यास त्याला पावलोपावलीं अडचणी आल्या; परंतु आपल्या मनांतला उद्देश सिद्धीस नेण्याचा त्याचा निश्चयच होता, म्हणून त्या दूर झाल्या, नाहीं तर त्या दूर झाल्या नसत्या. ह्याची बुद्धि अथवा तिजपासून जीं मोठींमोठीं कामें ह्यानें केलीं त्यांवरून ह्याची योग्यता पाहिली असतां ह्याच्यापेक्षां ग्रेत, म्हणजे मोठा, ह्या किताबास योग्य असे थोडेच राजे सांपडतील. आणि दुसरें असें आहे कीं ह्यानें जीं मोठीं कामें केलीं आहेत त्यांतलें एक देखील नाहींसें झालें नाहीं. तीं सर्व तशींच असून त्यांपासून पुढें उपयोग होत आहे. आजपर्यंत जे मोठमोठे राजे होऊन गेले, आणि ज्यांच्या मोठ्या कृत्यांची कीर्ति सर्व पृथ्वीवर पसरली आहे, त्यांच्याशीं पीतर

धि ग्रेत ह्याची ह्या गोष्टींविषयीं तुलना करून पहा, म्हणजे हा त्यांचेपेक्षां किती श्रेष्ठ आहे हें दृष्टीस पडेल. आलेक्जांदर मोठा पराक्रमी होऊन गेला, तरी त्याचा प्राण जातांच त्याचें राज्य लयास गेलें. अशीच शार्लिमेन आणि बोनापार्त ह्यांचे राज्यांची गोष्ट झाली. ह्यांनीं पुष्कळ गडबड केली, तरी मागें बहुतकरून त्यांचें कांहीं राहिलें नाहीं. आलेक्जांदर ह्याची खूण म्हटली म्हणजे आलेक्जांद्रिया शहरच काय तें आहे. तसेंच शार्लिमेन ह्याची खूण म्हणजे त्यानें विद्वानांस जो आश्रय दिला तोच होय; नापोलियनाचे कायदे म्हणून फ्रान्सदेशचा राजा बोनापार्त ह्यानें पुस्तक केलें होतें तेंच काय तें त्याच्या मागें राहिलें आहे. परंतु रूस देशचा राजा पीतर ह्यानें जें जें झाड लाविलें तें तें वाढून त्याचा उत्तरोत्तर विस्तार होत आहे, आणि त्याला दर वर्षास अधिक अधिक फळें येत चाललीं आहेत. ह्याचें कारण म्हटलें असतां असें आहे कीं दुसऱ्या राजांनीं जीं राज्यें स्थापिलीं त्यांचें संरक्षण तरवारीचे बळावर होईल असें ते समजत होते, आणि ह्यानें जें राज्य स्थापिलें तें लोकांला विद्या शिकवून आणि त्यांची सुधारणा करून स्थापिलें, म्हणून त्यानें जें केलें तें टिकलें.

---

## परोपकारी जान हावर्द ह्याची गोष्ट.

पूर्वीं इंग्लंदामध्यें जान हावर्द म्हणून एक मोठा परोपकारी पुरुष होऊन गेला. तो केवळ परोपकारार्थ देशोदेश हिंडून आपला सर्व वेळ लोकांचे कल्याणाकडे लावीत असे. त्याचा वृत्तांत येणेंप्रमाणें.

जान हावर्द साहेब इ० स० १७२६ त जन्मला. त्याच्या लहानपणच्या विद्याभ्यासाविषयीं कोठें कांहीं लिहिलें नाहीं. त्यानें लवकरच बायको केली, व ती पुढें थोड्याच काळानें मेली; तेव्हां ह्या गोष्टीमुळें त्याला अत्यंत दुःख होऊन त्याचा कोणते तरी रीतीनें विसर पडावा म्हणून त्यानें प्रवास करण्याचा निश्चय केला. त्यानें लिस्बन शहरास जावें असा बेत केला. त्या शहरांत नुकताच धरणीकंप होऊन तें अगदीं मोडकळीस आलें होतें, आणि धरणीकंपानें हजारों लोकांचा नाश झाला होता, ह्याकरितां तेथेंच जावें हें हावर्द साहेबास बरें वाटलें.

कोणास असें वाटेल कीं मोठमोठ्या इमारती पडल्या आहेत, व बहुत लोक रडत आहेत, ह्याची मौज पाहण्याकरितां हावर्द साहेबास तेथें जावेंसें वाटलें असेल; पण असें कोणीं समजूंनये. तेथें जाण्यांत हावर्द साहेबाचा मुख्य हेतु हा होता कीं तेथील लोकांस जें दुःख झालें आहे तें आपणास झालें आहे असें समजून त्याचें निवारण करण्याविषयीं आपण झटावें; व आपणास स्वतां बायको मेल्याचें दुःख झालें आहे तरी ज्यांचें दुःख आपल्या दुःखापेक्षां अधिक आहे त्यांजकडे पाहून आपलें शांतवन करावें; आणि ज्यांच्या घरचीं सर्व मनुष्यें मारीं तशीं होऊन ज्यांस अगदीं आश्रय राहिला नाहीं, त्यांस आश्रय देऊन सर्व प्रकारें साहाय्य करावें. पहा, ह्या मनुष्याचें केवढें औदार्य! त्याला स्वतां इतकें दुःख झालें असून लोकांच्या कल्याणाकडे त्याचें येवढें लक्ष होतें, हा मोठाच चमत्कार आहे. ईश्वरास सर्वांची काळजी आहे, ह्याकरितां तो अशा आपल्या कितीएक भक्तांस दुःख देऊन लोकांचें कल्याण करण्याची बुद्धि त्यांस देतो. हावर्द साहेबास ह्याप्रमाणें बुद्धि होऊन तो लोकांचें कल्याण करण्यास तयार झाला.

तो गलबतांतून लिस्बनास जाण्याकरितां निघाला; परंतु त्यानें तेवढ्या मात्र ठिकाणचे लोकांचीं संकटें दूर करावीं ह्यापेक्षां दुसरें चांगलें मोठें काम त्यानें करावें, असा ईश्वराचा संकेत होता. तो ज्या गलबतांत बसला होता तें फ्रेंच लोकांच्या गलबतानें धरिलें, तेव्हां त्या लोकांनीं त्याचे फार हाल केले. हावर्द साहेब दयेच्या कामावर चालला होता म्हणून त्याला चांगली अवस्था प्राप्त व्हावी, परंतु तशी प्राप्त झाली नाहीं. फ्रेंच लोकांनीं त्याला सुमारें चवदा प्रहरपर्यंत उपाशीं ठेवून तोंडांत पाणी देखील घालूं दिलें नाहीं, आणि मग त्याला एका घाणेरड्या तुरुंगांत कोंडून ठेविलें. त्या तुरुंगांतील हवा फार अपकारक होती, ह्यामुळें हावर्दाचे फार हाल झाले. ह्याप्रमाणें दोन तीन तुरुंगांत राहिल्यावर, पाडाव केलेल्या इंग्लिश लोकांचे हाल फ्रेंचलोक किती करितात ह्याविषयीं हावर्द साहेबाची पक्की खातरी झाली. शेवटीं फ्रेंच सरकारानें त्यास इंग्लंदास जाण्यास परवानगी दिली; पण त्यावेळेस त्याला असें कबूल करावें लागलें कीं, इंग्लिश सरकारानें माझ्या मोबदला गलबतांतील एखादा फ्रेंच अमलदार न सोडिल्यास

मी पुन्हा तुरुंगांत राहण्याकरितां परत येईन. इंग्लिश सरकारानें त्या बोलीप्रमाणें एक फ्रेंच अमलदार सोडल्यावर हावर्द साहेबाची सुटका काईम झाली. मग लागलाच तो त्या तुरुंगामध्यें जे दुसरे इंग्लिश लोक पडले होते त्यांस सोडविण्याचे उद्योगास लागला. त्याचा हेतु असा होता कीं, त्या लोकांची तुरुंगापासून सुटका आपले हातून झाली तर करावी, नाहींतर त्यांचे हाल कमी होण्याविषयीं तरी आपणाकडून होईल तितका प्रयत्न करावा. त्यानें जातीनें परदेशांतले तुरुंगांतलें दुःख भोगिलें होतें, ह्यामुळें इतर बंदिवानांचें दुःख समजून त्यांचा त्याला फार कळवळा आला, आणि तो त्यांना सोडविण्याकरितां फार झटूं लागला. आजारी पडलेले व जखमी झालेले नावाडी लोक ह्यांची देखरेख ज्या अमलदारांकडे होती त्यांजपाशीं हावर्द साहेबानें त्या बंदिवानांविषयीं अर्ज केला, तेव्हां त्यांच्या मोबदला फ्रेंच बंदीवान पाठवून देऊन त्यांनीं त्यांस सोडून इंग्लंदास आणविलें. ह्यावेळेस हावर्द साहेबानें कृपा-करून त्यांच्याकरितां इतकी खटपट केली म्हणूनच त्या बिचाऱ्यांची सुटका झाली. हावर्द साहेबानें बहुतेक आपलें पुढलें आयुष्य आजा-री बंदीवानांचे हाल कमी करण्याकडे लाविलें; व ह्याविषयीं त्यानें पुष्क-ळ श्रम केले व दुःखें भोगिलीं, हा जो त्यानें क्रम चालविला त्याचा आरंभ येथूनच झाला. हावर्द साहेबास स्वतां तुरुंगांत हाल भोगावे लागले होते, ह्यामुळें इतरांचे त्या प्रकारचे हाल निवारण्याकरितां पुष्क-ळ झटण्याची त्याला ईश्वरकृपेनें बुद्धि झाली; नाहीं तर, लोकांचे असले हाल होत आहेत, हें कोणाचे लक्षांत देखील आलें नसतें. वास्तविक पाहिलें असतां सज्जन मनुष्यांस कितीएक संकटें येवढ्याच कारणाकरितां येतात कीं तसल्या प्रकारच्या संकटांत इतर लोक पडले म्हणजे त्यांची त्यांस दया यावी.

इ० स० १७५८ त हावर्द साहेबानें दुसरी बायको केली. तिचा स्वभाव फार सौम्य होता, व तिची नवऱ्यावर फार प्रीति असे, ह्यामुळें त्यास परोपकार करण्याच्या कामांत तिनें मोठ्या आनंदानें पुष्कळ मदत केली. लग्न झाल्यावर लवकरच तिनें आपले कांहीं दागिने विकिले, आणि जो पैसा आला तो गरिबांस देण्याकरितां एका वाटव्यांत घालून ठेविला, त्या वाटव्यास धर्माचा वाटवा असें ती व तिचा नवरा

म्हणत असत. तीं दोघें सन्मार्गानें वागत असत; आणि आपल्या प्रिय बायकोला परमार्थाची आस्था आहे हें पाहून हावर्द साहेबास फार आनंद होत असे.

मग हावर्द साहेब आपल्या वतनाच्या जागीं जाऊन राहिला, आणि आपल्या कुळांचें कल्याण कोणते रीतीनें होईल, व गरीब लोकांचें दारिद्र्य कोणते रीतीनें जाईल, ह्या गोष्टींचा विचार करूं लागला. तेथें हींवतापाची सांत आली, तेव्हां कोणते तरी रीतीनें जितकें होईल तितकें तिचें निवारण करावें, म्हणून तेथील गरीब लोकांच्या रहावयाच्या सर्व झोंपड्या त्यानें पाहिल्या, आणि आंत ओल न यावी अशी तजवीज करून सुस्थळीं त्यानें नवीन झोंपड्या बांधिल्या. त्या घरांच्या सभोंवतीं बागा करण्याजोग्या जागा त्यानें ठेविल्या होत्या. ह्या बागांचा उपयोग हाच कीं त्यांतून मालकांला बटाटे वगैरे मिळावे. बहुतेक बागांमधून चांगलीं चांगलीं फुलझाडेंही लाविलीं होतीं. लोक असें सांगतात कीं, हावर्द साहेबानें एकदां आपले बायकोस कांहीं पैसा देऊन तिला म्हटलें कीं, तुला पाहिजे त्या कामाकडे ह्या पैशाचा खर्च कर; तेव्हां ती म्हणाली कीं, हा पैसा झोंपडी बांधण्याकडे जर लाविला, तर एक चांगली झोंपडी होईल; मग त्याच कामाकडे तो पैसा खर्चला. ह्याप्रमाणें दुसऱ्यांस सुख देण्यापासून ज्या लोकांस आनंद होतो ते धन्य.

ह्याप्रमाणें हावर्द साहेबानें झोंपड्या सुखावह केल्यावर उद्योगी, सुशील, आणि सदाचारी अशीं कुळें पाहून, भाडें जास्त न घेतां, त्यांस त्या रहावयास दिल्या. मग त्यांत जे लोक राहिले त्यांस फार सुख झालें. त्या झोंपड्यांमध्यें त्यानें चांगलीं कुळें मात्र ठेविलीं, तेव्हां सुखीपणा, ठाकठिकी, व्यवस्थितपणा, व सदाचार ह्यांविषयीं त्याच्या कुळांची लवकर चोहोंकडे प्रसिद्धि झाली हावर्द साहेबानें केलेल्या परोपकाराची गोडी लागून सर्व जमीनदारांनीं व वतनदारांनीं त्याचा कित्ता घेऊन त्याप्रमाणें वागावें, हें चांगलें. सर्वांनीं त्यासारखें आपापले कुळांचें कल्याण करण्याकरितां झटावें. आपण सर्वांनीं आठवण ठेवावी कीं, ईश्वरानें ज्या ज्या लोकांस संपत्ति किंवा वजनदारी दिली आहे तिच्या विनियोगाचा जाब त्यांस त्यांस ईश्वरापाशीं द्यावा लागेल. आपण त्याच्या देणग्या दुष्ट कामांकडे लाविल्या नाहींत, इतक्यानेंच

आपला निभाव होईल असें नाहीं, तर ज्यांहींकरून लोकांचें कल्याण होऊन ते ईश्वराची स्तुति करितील अशा चांगल्या कामांकडे आपण त्या लाविल्या पाहिजेत.

ह्याप्रमाणें हावर्ड साहेब गृहसुख भोगीत असतां इ० स० १७६५ त त्याची बायको मरण पावली, तेव्हां त्या सुखाचा अंत होऊन त्याला फार दुःख झालें. आतां त्याला घरीं चैन पडेना, व वतनाचें सुख वाटेना, म्हणून कांहीं दिवस प्रवास करण्याकरितां तो निघाला. पुढें इ०स० १७७३ त बेदफर्दशयर ह्या प्रांताच्या मुख्य नाझराचे जागेवर त्याची नेमणूक झाली. हें काम मोठ्या योग्यतेचें व मोजब्याचें होतें. आपले अधिकाराचें काम बजावीत असतां त्यानें त्या प्रांतांतल्या तुरुंगामध्यें कसकसी व्यवस्था आहे ह्याचा पुरतेपणीं शोध केला; मग ह्याप्रमाणें इंग्लंदांतील बहुतेक तुरुंगांत जाऊन त्यानें तशी चौकशी केली. ह्या सर्व तुरुंगांत त्यावेळेस अव्यवस्था होती. जुलूम, हेटाळणी, व हयगय ह्यांचें दुःख भोगून बंदीवान फार हाल काढीत असत. तेव्हां कोणते तरी रीतीनें ह्या गोष्टींचा बंदोबस्त करावा असा हावर्ड साहेबास मोठा आवेश आला. मग त्यानें सर्व यूरोपखंडांत आपला शोध चालविला. त्याचे मनांतला हेतु होता कीं यूरोपखंडांतील प्रत्येक तुरुंगांत जाऊन तेथें नीट व्यवस्था करवावी. हा हेतु सिद्धीस नेण्याकरितां जिवावर उदार होऊन त्यानें अचिंत्य श्रम केले व हाल भोगिले, फक्त बंदीवानांचीं संकटें दूर करण्याकरितां तो एकंदर पंचवीस तीस हजार कोस फिरला. हवा फार वाईट, रस्ते फार खडकाळ व अवघड, आणि जवळ खाण्यापिण्याची वगैरे कमताई, असें असतांही हावर्ड साहेब कधीं कधीं लोकांचें कल्याण करण्याकरितां विसावा नघेतां किती दिवसपर्यंत रात्रंदिवस एकसारखा फिरत असे. ह्या कामाकरितां प्रवास करितांना तो कोणताही अडथला मोजीत नसे. उन्हाळा असो, हिंवाळा असो, किंवा पावसाळा असो, तो फिरण्यास अनमान करीत नसे. सुखोपभोग करण्याकरितां, किंवा कौतुक पाहण्याकरितां, किंवा वाटेचें भय जाण्याची वाट पाहण्याकरितां, तो कोणतेही वेळेस, कोणत्याही ठिकाणीं, क्षणभर थांबला नाहीं. कोठें मरीची सांत आली, किंवा दुष्काळ पडला, तर नपळतां त्याची माहितगारी करून घेण्यासाठीं तो

बुद्धया राहत असे. त्याला असें वाटत असे कीं, प्राण गेला तरी जावो, पण लोकांच्या दुःखांचें व संकटांचें निवारण आपल्या हातानें होईल तितकें करावें.

कोणत्याही तुरुंगाची सरासरी पाहणी करून हावर्द साहेब कधीं समाधान पावत नसे. प्रत्येक तुरुंगांतील अंधारकोठडी पाहिल्यावांचून तो राहत नसे, म्हणून तुरुंगांत अव्यवस्था किंवा दुसरी कांहीं वाईट गोष्ट असली, तर ती बहुतकरून त्याच्या दृष्टीस पडत असे. तुरुंगामध्यें ज्या वाईट गोष्टी आढळत त्या एकसारख्या नसत, नानाप्रकारच्या असत. कितीएक ठिकाणीं इमारती वाईट असत; कितीएक ठिकाणीं तुरुंगाचा अधिकारी व हाताखालचे कामगार हे वाईट असत; आणि बहुतेक ठिकाणचे कायदे व चाली वाईट असत, ह्यामुळें बंदीवानांस फार हाल भोगावे लागत असत. कांहीं तुरुंगांमध्यें इतकी सर्द हवा असे कीं तिच्या योगानें तेथें रोगाची सांत वरचेवर उत्पन्न होत असे; मग बंदीवानांस रोग लागला म्हणजे त्यांचे हाल होत असत. त्यांना पाहिजे तें औषध मिळत नसे, आणि पथ्याचा वगैरे बंदोबस्त होत नसे, ह्यामुळें लोकांचा सप्पा उडे. कोठें कोठें मुळींच बंदीवानांस सरकारांतून पोटगी कमी मिळत असून तींतून तुरुंगाचा अधिकारी लोभानें कांहीं घेत असे, ह्यामुळें त्या गरिबांचे पोटास देखील पुरतें मिळत नसे. कितीएक ठिकाणीं महा अपराधी व अल्प अपराधी, जुनाट अपराधी व नवे अपराधी, ज्यांची चौकशी झाली व ज्यांची व्हावयाची, हे सगळे लोक एके ठिकाणीं कोंडलेले असत; व त्यांस दुसरा कांहीं उद्योग नसल्यामुळें ते एकमेकांस अधिक बिघडवीत असत. ह्या सर्व वाईट गोष्टी हावर्द साहेबाच्या लक्षांत आल्या. पुष्कळ श्रम करून त्यानें बहुतेक दुर केल्या. बंदीवानांचें कल्याण करण्याकरितां तो हरएक प्रकारचें काम करीत असे. कोणासाठीं वैद्यपणा करी, कोणासाठीं पाद्रीपणा करी, कोणावर रागें भरे, कोणाला सल्ल्याच्या चार गोष्टी सांगे, व कोणी रडत बसला तर त्याच्या दुःखानें दुःखी होऊन रडे. ज्या भयंकर ठिकाणीं जाण्यास वैद्य व पाद्री भीत असत, त्या ठिकाणीं निःशंक जाऊन तो काळाच्या दाढेंतून गरिबांस काढी. कसलेंही भय उत्पन्न झालें तरी तो परोपकाराचें कृत्य करण्याविषयीं मागें पाहत नसे.

त्यानें ईश्वरावर भरंवसा ठेविला, आणि परोपकाराचें जें काम त्यानें करावें असा ईश्वराचा संकेत होता तें काम संपेपर्यंत ईश्वरानें त्याचें रक्षण केलें.

त्यानें एकदां लोकांच्या कल्याणाकरितां कोणतें काम करावयाचें मनांत आणिलें म्हणजे तेव्हांच तो तें करण्यास लागत असे. एकदां त्याचा बेत ठरला म्हणजे पुरे; मग सुखोपभोगाकडे किंवा पैसा मिळविण्याकडे त्याचें लक्ष अगदीं लागत नसे. जो उद्देश त्यानें धरिला तो फार गंभीर व प्रगल्भ होता, व त्याचे महत्वानें त्याचें सर्व अंतःकरण अगदीं व्यापून गेलें होतें, ह्या करितां कोणत्या क्षुल्लक गोष्टी त्याचें मन आपणाकडे वळवून घेण्यास समर्थ नव्हत्या. मग अर्थातच चमत्कारिक सृष्टिजन्य पदार्थ, किंवा मनुष्यानें केलेले पदार्थ, ह्यांच्याकडे त्याचें लक्ष जात नसे. प्रवास करितांना वाटेनें चमत्कारिक गोष्टी पाहून रमण्यास त्याचे मनाला अवकाश नसे. ह्यामुळें कांहीं लोक त्याला दोष लावितात; पण केवळ जे रसिक व इंद्रियसुखासक्त लोक आहेत त्यांच्या लक्षांत हावर्दाचा हा गुण यावयाचा नाहीं.

परमेश्वराचे दूत ह्या जगांत अदृश्य असून परोपकाराचीं कामें नाना प्रकारचीं करितात; ते तसबिरा, पुतळे, किंवा मंदिरें पाहण्याची आस्था बाळगीत नसतात. त्यांप्रमाणेंच हावर्द साहेबही त्यांची आस्था बाळगीत नसे, कारण त्यानें ज्या परोपकाराच्या कृत्यांकडे आपल्या आयुष्याचा सर्व वेळ अर्पिला होता त्यांतून वेळ घेतल्यावांचून ह्या मौजा पाहणें व त्यांचा आनंद मानणें हें व्हावयाचें नव्हतें. त्यानें आपल्या दिवसाच्या सर्व घटका कामाकडे नेमिल्या होत्या, व ज्या वेळेचें काम त्या वेळेसच व्हावें ह्याविषयीं त्याचें मन नेहमीं जपत असे; म्हणून कधीं कौतुक पाहण्याची किंचित् इच्छा त्यास उत्पन्न झाली, तर कौतुक पाहण्याची हीच वेळ आहे, असें मन सांगेपर्यंत त्या इच्छेस अतृप्त रहावें लागे जशी त्याला घटका यावी तसें त्याला वाटत असावें कीं, परोपकार करावे हें काम मुख्य, व मौजा पाहणें हें काम गौण आहे. तर ह्या गोष्टीविषयीं आपण त्याला दोष द्यावा काय? इतका लोकोत्तर परिपाठ ह्यावांचून दुसरा कोणी आपणास लावून घेईल असें वाटत नाहीं. हावर्द साहेबाच्या मनांत हें पक्कें भरून गेलें होतें कीं. आपणास ह्या

जगांत एकच काम करावयाचें आहे; आणि तें काम फार मोठें असून आपलें आयुष्य फार थोडें आहे; ह्यामुळें त्या कामावर आपलें सगळें मन व आपल्या सर्व शक्ति एकाग्रतेनें लाविल्यावांचून तें व्हावयाचें नाहीं. जे तमासगीर व ज्यांच्या मनांत रमण्यांत वेळ घालवावा, किंवा कर्मणूक करीत बसावें, असें आहे, त्या लोकांस हावर्द साहेबासारखा मनुष्य विक्षिप्तच वाटावा, ह्यांत आश्चर्य नाहीं. त्यानें जो मोठा उद्देश मनांत धरिला होता त्याजवर त्याची दृष्टि अशी दृढ बसून गेली होती कीं, जरी त्या उद्देशाची सिद्धि लांब असे, तरी ती अगदीं जवळ आहे असें त्यास वाटे; आणि त्या उद्देशसिद्धीविषयीं जरी त्याला फार श्रम भोगावे लागत व खस्ता खाव्या लागत, तरी त्यास कंटाळा येत नसे. ती उद्देशसिद्धि त्याच्या दृष्टी पुढें इतकी ढळढळीत दिसत असे कीं तिचा रोख सोडून त्याचें एक पाऊलही वांकडे वाटेवर पडत नसे; आणि जितका जितका तो पुढें जाई तितकी तितकीं ती जवळ येई. ज्या उद्देशावर त्याची दृष्टि बसली होती त्यापासून ती दृष्टि काढून चालतांना आजूबाजूच्या सुंदर रमणीय फुलांकडेही लावण्यास त्याला अवकाश नव्हता. त्याचा नित्यनेम असा असे कीं, आपण जो उद्देश धरिला त्याची सिद्धि लक्षून हरएक काम करावें.

उद्देशसिद्धीचा ज्या कामाशीं व ज्या कल्पनेशीं कांहीं संबंध नाहीं तसें कोणतेंही काम तो हातीं घेत नसे, व तशी कल्पनाही मनांत आणीत नसे. हावर्द साहेबानें आपला उद्योग सतत एक सारखा झपाट्यानें चालविला होता, कधीं ढिलाईवर पडूं दिला नाहीं. ह्या रीतीनें मनुष्याच्या पराकाष्ठेच्या प्रयत्नानें फळ कोठपर्यंत साधेल, हें त्यानें करून पाहिलें. ह्यावरून, आपल्याच्यानें जें झालें नाहीं तें मानवी प्रयत्नाच्या पलीकडे आहे; ईश्वरच काय करील तें करो; असें म्हणून मन स्वस्थ करून बसण्याची योग्यता त्याला होती.

तुरुंगांची चौकशी करून त्यांची सुधारणूक करावी हा हावर्द साहेबाचा मुख्य उद्देश होता खरा, तरी दुसरीं परोपकाराचीं कृत्यें त्यानें केलीं. हास्पिताळें, दवाखाने, गरीब लोकांकरितां केलेल्या धर्मशाळा, विद्याशाळा, व रोमन काथोलिक धर्माच्या लोकांचे मठ देखील, अशा प्रकारचीं लोकोपकाराचीं स्थानें व कारखाने, ज्यांत लोकांकरितां आहेत म्हणून सहजच

अव्यवस्था असावयाची, अशा ठिकाणीं जाऊन चौकशी करी. जेथें व्यवस्था आहे असें दिसून येई, तेथें त्यांतील अधिकाऱ्यांस शाबासकी देई; आणि जेथें अव्यवस्था दृष्टीस पडे, तेथें त्यांस दोष दाखवून सुधारणा करवी.

इ० स० १७७३ आणि १७७४ ह्या वर्षांत इंग्लंद देशांतील पार्लमेंतामध्यें तुरुंगांची सुधारणा करण्याविषयीं व बंदीवानांचें आरोग्य राखण्याची तजवीज करण्याविषयीं कायदे झाले, ते हावर्द साहेबाच्या प्रयत्ना मुळें झाले. तुरुंगांची वास्तविक स्थिति कशी आहे हें समजून घेण्याकरितां पार्लमेन्त सभेनें हावर्द साहेबास बोलावून आणून सवाल केले; मग त्या हावर्द साहेबानें केवळ परहितार्थ पुष्कळ श्रम घेतले होते म्हणून त्याला शाबासकी दिली. इ० स० १७७३ त त्यानें एक लोकोपयोगी ग्रंथ करून प्रसिद्ध केला त्यांत इंग्लंद देशांतल्या व वेल्स देशांतल्या तुरुंगांच्या स्थितीचें वर्णन केलें होतें, व इतर देशांतील तुरुंगांचेंही कांहीं वर्णन केलें होतें. तो ग्रंथ सर्वांस वाचावयास सांपडावा, ह्याकरितां त्यानें त्यावर थोडीच किंमत ठेविली.

हावर्द साहेबास मोठें गृहदुःख पुन्हा झालें, ह्याकरितां फिरून प्रवास करावयास निघाला. त्याला एकुलता एक मुलगा होता तो फार दुर्व्यसनी निघाला, व त्याचा स्वभाव फार रागीट होता, ह्यामुळें त्याला वेड लागलें. हा धक्का हावर्द साहेबाच्या हृदयास बसला. ह्यानें लोकांचें कल्याण करण्याकरितां फारच श्रम घेतले होते, व हाल काढिले होते, तरी त्यांनीं त्याचें शरीर थकलें नव्हतें; पण मुलगा वाईट निघाला, व त्यास वेड लागलें, ह्या दुःखाचा जो त्याच्या मनाला धक्का बसला त्यानें तो अगदीं लंघला. ह्या दुःखाचा विसर पडावा म्हणून त्यानें चैनबाजींत वेळ घालविला, किंवा सर्व उद्योग सोडून शोक करीत बसला, असें नाहीं. सन्मार्गानें वागणें व परोपकार करणें ह्यांपासून जें समाधान होतें तें दुसरे कशापासूनही व्हावयाचें नाहीं, असा हावर्द साहेबास पक्का अनुभव मागें आला होता. मग मुलाचें वेड घालविण्याचा उपाय आतां आपले हातून होत नाहीं, अशी त्याची खातरी झाल्यावर, त्यानें असा बेत केला कीं, आतां कांहीं वर्षे परदेशांत फिरून गरीब लोकांच्या दुःखांचें निवारण करावें, आणि बंदीवानांस सोडवावें.

तो परदेशास जाण्याकरितां निघाला तेव्हां आपले जे स्नेही होते त्यांचा निरोप त्यानें घेतला, त्या वेळचे त्याचे बोलण्यावरून असें दिसून आलें कीं त्याच्या मनांत पुन्हा स्वदेशास आपलें येणें होणार नाहीं, असें आलें होतें, आणि त्यानें जातांना आपल्या वतनाची वगैरे जी व्यवस्था केली तीवरून त्या गोष्टीस बळकटी आली. त्याचा असा लेख आहे कीं, माझ्या पूर्वीच्या श्रमांचा परिणाम मी आपल्या देशावर सोंपितों, त्यानें त्याचा शेवट करावा; आतां माझ्या मनांत पुन्हा रूस, तुर्कस्थान, इत्यादि देशांत जावयाचें आहे; आणि आशियाखंडांतही जावें अशी माझी इच्छा आहे. एवढा प्रवास करितांना मला संकटें येतील हें मी समजून आहें; तर ज्या दयाळू परमेश्वरानें आजपर्यंत माझें संरक्षण केलें आहे, त्याजवर माझा पूर्ण भरंवसा आहे; त्याची बुद्धि अस्खलित आहे म्हणून तो जें योजील तें ठीकच योजील. मीं जें काम योजिलें आहे तें संपावयाचे पूर्वींच मीं मरावें, असा ईश्वरी संकेत जर असला, तर मला वेड लागलें होतें, किंवा मला दूरवर विचार नाहीं, म्हणून हें काम मीं हातीं धरिलें, असें कोणीं समजूं नये; परंतु हें मला केलेंच पाहिजे, हा माझा धर्मच होय, असा पूर्ण विचार करून माझी पक्की खातरी झाली आहे; व खेडे गांवांत राहून जो परोपकार होईल त्याहून अधिक परोपकार करावा, अशी माझी मनापासून इच्छा आहे, म्हणून मीं हें काम हातीं धरिलें आहे, असें समजावें.

काळ्या समुद्राच्या उत्तर किनाऱ्याच्या लगत्यास तार्तरी देशांतील अरण्यापर्यंत हावर्द साहेब गेला; आणि त्यानें रूस सरकाराकडील सैन्यांतल्या लोकांच्या स्थितीची सुधारणा करण्याकरितां प्रयत्न केला, पण तो निष्फळ झाला. पुढें तो खर्सन नामक गांवास गेला. तेव्हां तेथें तापाची सांथ आली होती. हावर्द साहेबानें कांहीं गरीब लोकांस औषधें दिल्यामुळें, तो वैद्यकीमध्यें हुशार आहे, आणि लोकांना बरें करण्याकरितां मनापासून झटतो, अशी त्याची कीर्ति झाली. ह्यावरून तेथील एके तरुण स्त्रीला ताप आला होता, तिच्या समाचाराला आपण यावें, असा त्याला निरोप आला होता, म्हणून तो तिजकडे गेला; तेव्हां तिच्या संसर्गानें त्याला ताप येऊन तो लवकर मरण पावला. त्याच्या पूर्वींच्या संकटांमध्यें जसा ईश्वरावर भरंवसा, धैर्य, व परोपकारबुद्धि ह्या

गुणांनीं त्याचा संभाळ केला होता, तसाच ह्या शेवटच्या संकटांत त्यांहीं करून त्याचा संभाळ झाला.

त्यानें आपल्या शेवटल्या दुखण्यांत कांहीं टिपणें करून ठेविलीं होतीं तीं येणेंप्रमाणें.

मी ह्या जगांत केवळ यात्रेकरू आहें, येथें कांहीं माझें घर नाहीं, म्हणून मजवर जीं संकटें गुदरलीं आहेत व पुढें गुदरतील त्यांजकडे मीं लक्ष देऊं नये, परंतु ईश्वरानें जे मजवर उपकार केले आहेत त्यांजकडे मीं लक्ष लावावें, आणि त्याच्या शक्तीवर व कृपेवर भरंवसा ठेवावा; कांकीं त्याचें वचन व त्याची दया हीं सर्वकाळ टिकणार आहेत. जरी माझा जीव कासावीस झाला आहे, व माझी शक्ति क्षीण झाली आहे, तरी मी सन्मार्गांत आहें; व जरी मी माझा सर्वशक्तिमान् मित्र व देव ह्याला वारंवार विसरतों, तरी मी त्याला अनुसरून आहें अशी माझी खातरी आहे.

माझ्या दयाळू आणि सत्यप्रतिज्ञ देवाची शंका मीं कां धरावी? त्यानें आपलें पुस्तकांत असें सांगितलें आहे कीं, तूं आपल्या सर्व कामांत मजकडे लक्ष ठेव, मग मी तुला वाट दाखवीन. हे देवा, माझी बुद्धि पाहिली तर केवळ मूर्खत्वाची आहे, तेवढ्या बुद्धीवर मला सोडूं नको; माझी शक्ति केवळ अशक्तिरूप आहे, तेवढ्या शक्तीवर मला सोडूं नको. ह्या पृथ्वीवर तुला मोठेपणा यावा असें मीं वर्तावें, आणि जें काम तूं मला करावयास देतोस तें मीं संपवावें, ह्याविषयीं तूं मला सहाय हो; ह्या गोष्टीची स्तुति तुलाच मिळावी.

एका पुस्तकाच्या मळपृष्ठाच्या आंतल्या बाजूवर हावर्द साहेबानें एक वाक्य लिहून ठेविलें आहे. तें वाक्य त्याचें शेवटचें लिहिलेलें आहे, म्हणून तें वाक्य पाहण्याविषयीं लोकांस फार उत्कंठा होते. तें वाक्य हें, माझ्या जगण्यानें किंवा मरण्यानें ख्रीस्तास मोठेपणा यावा ही माझी इच्छा आहे.

ह्याप्रमाणें हावर्द साहेब इ० स० १७९० त जानेवारीचे २० वे तारखेस, आपल्या घरापासून ७५० कोसांवर, तार्तरी देशामध्यें मरण पावून जें आयुष्य त्यानें सर्व जगांतील लोकांचें कल्याण करण्याकडे लाविलें होतें त्याची समाप्ति झाली. तो परदेशांत मरण पावला,

आणि त्यावेळीं त्याचे कोणी संबंधी जवळ नव्हते, तरी प्रत्येक देशांत जे सुजन होते ते त्याचे मित्र होते. ज्यांस त्याचे मरणाची बातमी समजली होती ते लहान मोठे सर्व पदवीचे लोक त्यास मूठमाती देण्याचा समारंभ चांगल्या रीतीनें करण्यास झटले; व बडे लोक होते त्यांनीं त्याला पुरण्याच्या समारंभास पुष्कळ खर्च करून, आपण त्याची योग्यता जाणत होतों, असें दर्शविलें. गरीब लोकांनीं तर ह्याहून अधिक केलें. ज्या गरीब रयत लोकांचा तो मित्र व वैद्य झाला होता, व ज्या नावाडी लोकांचा व शिपाई लोकांचा कैवार मोठ्या कळकळीनें त्यानें घेतला होता, व ज्या गरीब गुलामांच्या सांखळ्या तोडावयाची इच्छा त्यानें धरिली होती, त्या लोकांपैकीं हजारों मनुष्यें, सर्वांचा खेद एकच आहे, व सर्वांची सारखी-च हानि झाली आहे, असें समजून त्याच्या थडग्याजवळ जमून त्यावर अश्रूंच्या धारा त्यांनीं सोडिल्या. त्यानें आपणास पुरण्याकरितां खर्सन गांवापासून चार कोसांवर एकांतस्थळीं एक जागा नेमिली होती, तेथें लोकांनीं त्याला पुरिलें; आणि इंग्लंद देशांतील लोकांवर त्याचे फार उपकार होते ह्याकरितां त्यांनीं ते स्मरून त्याची आठवण राहण्याकरितां सेंतपाल नामक देवळांत त्याचें कांहीं स्मारक चिन्ह करून ठेविलें.

एका प्रसिद्ध ग्रंथकारानें असें लिहिलें आहे कीं, हावर्द साहेबानें जे श्रम केले व जे ग्रंथ लिहिले ते मनुष्यांचे डोळे उघडण्यास आणि त्यांच्या हृदयांत द्रव आणण्यास फार उपयोगीं पडले आहेत. तो यूरोपखंडभर हिंडला; पण मोठमोठाले वाडे किंवा देवालयें पहावीं, जुन्या इमारतींचीं लांबी रुंदी मोजावी, जुनीं नाणीं मिळवावीं, जुने लेख मिळवून त्यांची तपासणी करावी, असा कांहीं त्याचा हेतु नव्हता. त्याचा हेतु फारच निराळा होता. तुरुंगांतील अगदीं तळच्या अंधार-कोठडींत शिरून पहावें; रोगग्रस्तांचे संसर्गास नभितां हास्पितळांत जाऊन पहावें; खेद व वेदना ह्यांच्या मंदिरांची पहाणी करावी; गरिबांची विपत्ति, दुःख, आणि तिरस्कार ह्यांची इयत्ता करावी; विस्मृतांचें स्मरण करावें; उपेक्षितांची शुश्रूषा करावी; वर्जितांचें दर्शन घ्यावें; आणि सर्व देशांतील सर्व मनुष्यांचे क्लेश ताडून पहावे; हा त्याचा हेतु होता. त्यानें जो हा उद्देश धरिला तो दुसऱ्यांच्या देखोदेखीनें धरिला असें नाहीं, ही त्याचीच मूळची कल्पना होती. त्याचा उद्देश दयेनें जसा

परिपूर्ण होता तसा बुद्धिवैभवानेंही परिपूर्ण होता. त्यानें जे श्रम केले त्यांचा उपयोग हरएक देशांत थोडा बहुत झाल्यावांचून राहिला नाहीं. त्याच्या श्रमांचें फळ परलोकीं त्याला प्राप्त होईल.

---

## बेंजामिन् फ्रांक्लिन् ह्याची गोष्ट.

कित्येक वर्षांपूर्वी अमेरिका खंडामध्यें बेंजामिन् फ्रांक्लिन् म्हणून एक मोठा उद्योगी पुरुष होऊन गेला. तो केवळ आपल्याच प्रयत्नानें मोठ्या योग्यतेस चढला. त्याची पहिली स्थिति व शेवटची स्थिति ह्या दोन आपण ताडून पाहिल्या, तर भिकारी देखील उद्योगाचे बळानें श्रीमंत होईल अशी आपली खातरी होईल. पहिल्यानें जीं जीं त्याला संकटें पडलीं त्यांतून तो कोणत्या रीतीनें पार पडला, तो अगदीं दरिद्री असून मोठा संपत्तिमान् कसा झाला, त्याची कीर्ति लोकांमध्यें कसकशी होऊं लागली, आणि त्याला कोणी शिक्षक नसतां व विद्या संपादण्याचीं नेहमींचीं साधनें त्याजपाशीं नसतां तो एवढा मोठा विद्वान् कशानें झाला, ह्या सर्व गोष्टींचा विचार केला म्हणजे सुज्ञांस असें वाटेल कीं, आपण त्याचा कित्ता घेऊन त्याच्याप्रमाणें उद्योग करावा. तो सर्व प्रकारच्या विद्येमध्यें इतका प्रवीण झाला होता कीं केवळ तिचेच योगानें त्याचें आयुष्य सुखांत गेलें, आणि त्याच्या वेळचे मोठमोठाले विद्वान् व ग्रंथकर्ते ह्यांच्यामध्यें त्याचें नांव पडलें. त्याचा वृत्तांत येणेंप्रमाणें.

इ० स० १७०६ चे जान्युवारी महिन्याचे १७ वे तारखेस उत्तर अमेरिकेंतील बास्तन नामक शहरांत फ्रांक्लिन् हा जन्मला. त्यावेळेच्या पूर्वी सुमारें वीस वर्षें त्याचा बाप इंग्लंदाहून जाऊन अमेरिकेंत राहिला होता. तो मोठा बुद्धिमान्, विचारी, आणि उद्योगी होता, आणि तो बेताबातानें खर्च करीत असे. त्याचें कुटुंब मोठें होतें ह्यामुळें खर्च फार लागल्यानें तो गरिबींतच होता, तरी त्या गांवचे संभावित लोकांत त्याची गणना होत असे. आपलीं मुलें विद्या शिकवून शहाणीं करण्याच्या कामांत तो फार कुशल होता. बापाच्या शिक्षेमध्यें असतां मला नीतीचें वगैरे पुष्कळ ज्ञान झालें, ह्यामुळें मी त्याचा फार आभारी आहें, असा फ्रांक्लिनाचा पुष्कळ ठिकाणीं लेख आहे. फ्रांक्-

लिनाचा एके ठिकाणीं लेख आहे तो वाचून मोठमोठ्या कुटुंबांचे धन्यांनीं व त्यांतील मनुष्यांनीं त्याजपासून ज्ञान प्राप्त करून घ्यावें असा आहे. तो लेख येणेंप्रमाणें.

माझा बाप आपले पंक्तीस भोजन करण्याकरितां वरचेवर शहाणे व समजदार अशा लोकांस बोलावीत असे, आणि आम्हां मुलांस शहाणें करण्याजोग्या चांगल्या विषयांवर संभाषण तो जेवतांना चालवीत असे; ह्यामुळें चांगलें कोणतें, वाईट कोणतें, आपण शहाणे कोणते रीतीनें होऊं, आणि आपलें कल्याण कसें होईल, हें सर्व आम्हांस लहानपणींच समजूं लागलें. खाण्याचे पदार्थांविषयीं तो कधीं बोलत नसे. अमुक पक्वान्न चांगलें साधलें आहे, अमुक वाईट झालें आहे, अमुकाची रुचि चांगली आहे, अमुकाची वाईट आहे, हें पक्वान्न अमक्यापेक्षां चांगलें आहे किंवा वाईट, ह्यांविषयीं तो कधींही गोष्टी काढीत नसे. ह्याप्रकारें लहानपणापासून असल्या गोष्टींकडे माझें दुर्लक्ष्य असल्यामुळें माझ्या पात्रांत कोणताही पदार्थ असला तरी मला चालतो.

फ्रांक्लिनाला चांगले गुण लागण्यास त्याचा बापच पुष्कळ अंशीं कारण झालासें वाटतें. बाप लोकांमध्यें नेकीनें वागतो हें पाहून मुलगा त्याच्याच वळणावर गेला. सुरस ग्रंथ लिहिण्याचें चांगलें कौशल्य यावें ह्याकरितां ह्या कामांत पुष्कळ श्रम घेण्याविषयीं त्याचा बाप त्याला वरचेवर उपदेश करीत असे. बाप गरिबींत होता ह्यामुळें आपल्या अबरूस धक्का लागूं न देतां तो उद्योग करून पोटास मिळवीत असे, तो त्याचा कित्ता मुलानें घेतला.

बेंजामिन् बारा वर्षांचा झाला तेव्हां त्याचा एक वडील भाऊ छापखान्याचा मालक होता; त्याजपाशीं करार करून तें काम शिकण्याकरितां बापानें त्यास ठेविलें. त्याचे बापानें त्यास हें काम शिकण्यास घातलें ह्याचें एक मुख्य कारण हेंच कीं, लहानपणापासून त्याला पुस्तकें वाचण्याचें फार व्यसन होतें. त्याला जितका पैसा मिळे तितका तो पुस्तकें विकत घेण्याकडे लावी. तो छापखान्याच्या कारखान्यांत होता ह्यामुळें पुस्तकें विकणाऱ्या पुष्कळ दुकानदारांच्या गुमास्त्यांची व त्याची ओळख झाली. तो नेहमीं संध्याकाळीं त्यांजपासून पुस्तकें मागून आणून रात्रीं फार वेळ जागून तीं वाचीत असे, आणि सकाळीं परत देत असे,

ह्या योगानें त्याचें ज्ञान पुष्कळ वाढलें. ह्याप्रमाणें एकांतीं अभ्यास चालवून आपले कामामध्येंही तो हुशार झाला, आणि वरचेवर अधिक अधिक आपले भावाचे उपयोगीं पडूं लागला. पुढें असें झालें कीं, एका उदार व्यापाऱ्यापाशीं बराच पुस्तकसंग्रह होता, त्यानें फ्रांक्लिनाचा उद्योग व बुद्धि पाहून त्यास एके दिवशीं आपलीं पुस्तकें पाहण्याकरितां बोलावून नेलें, आणि, तुम्हांस आजपासून जीं पुस्तकें लागतील तीं वाचावयास घेऊन जात जा, असें त्यानें फ्रांक्लिनास सांगितलें. ह्या रीतीनें त्याला पुष्कळ पुस्तकें वाचावयास मिळूं लागलीं.

दुसऱ्या कोणत्याही गोष्टीकडे लक्ष न देतां आपल्या हातून होईल तितकें करून आपली बुद्धि वाढवून ज्ञानाचें संपादन करावें हा बेंजामिन फ्रांक्लिनाचा मुख्य उद्देश होता. लहान वयांत असतांनाही हें कार्य सिद्धीस नेण्याकरितां तो एकसारखा उद्योग करीत असे. तो सोळा वर्षांच्या वयाचा होता तेव्हां एक पुस्तक त्याच्या दृष्टीस पडलें, त्यांत असें लिहिलें होतें कीं वनस्पतींचें म्हणजे धान्यादिकांचें खाणें चांगलें आहे. असल्या खाण्याला पैसा फार लागत नाहीं, व ह्यापासून अनेक प्रकारें नफा होतो, असें त्यास वाटून पुढें ह्याप्रकारें आपली उपजीविका करावी, असा त्यानें निश्चय केला. मग त्यानें आपले भावाला सांगितलें कीं, हल्लीं माझ्या भोजनखर्चास जो पैसा लागतो त्याच्या निमे पैसा द्या म्हणजे मी आजपासून तितक्यांत आपला निर्वाह करीन.

ही गोष्ट त्याचे भावानें मान्य केल्यावर ह्याप्रमाणें क्रम चालत असतां त्याला जो पैसा मिळत असे त्यांतला अर्धा शिलकेस राहूं लागला. त्यानें एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं, ह्या युक्तीनें पुस्तकें विकत घेण्यास मला पुष्कळ पैसा राहूं लागला, आणि दुसऱ्या प्रकारेंही माझें पुष्कळ कल्याण झालें. माझा भाऊ आणि त्याच्या हाताखालचे लोक जेवायाला जात असत तेव्हां मी छापखान्यांतच राहत असें, आणि आपलें गरिबीचें जेवण जेवून ते परत येत तोंपर्यंत बाकीचा वेळ मी अभ्यासाकडे लावीत असें. मग माझी बुद्धि चांगली चालूं लागली, आणि मला पुष्कळ विद्या प्राप्त झाली, ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं, कारण खाण्यापिण्याचे बेताबाताचें विद्यासंपादन हेंच फळ होय.

एखाद्या वेळेस जर त्याला कोणती विद्या प्राप्त करून घेण्याची गरज पडली, तर तो मोठ्या नेटानें तिचे पाठीस लागून तिचें संपादन करीत असे. एके दिवशीं हिशोबाचें काम त्याला पडलें असतां तें त्याला करितां आलें नाहीं, ह्यामुळें त्याची फार अप्रतिष्ठा झाली; तव्हां त्यानें अंकगणिताचें एक पुस्तक मिळविलें, आणि त्याची चांगली माहिती होई तोंपर्यंत तो दुसरे कोणतेही कामाला लागला नाहीं.

फ्रांक्लिनाचा भाऊ त्याला कडकपणानें वागवीत असे, ह्यामुळें तो त्याची चाकरी सोडून रोजगार मिळविण्याकरितां फिलादेल्फिया येथें गेला. तेथें गेला त्यावेळेस त्याजपाशीं अगदीं थोडा पैसा होता, ह्यामुळें रात्रीची रात्र राहण्याकरितां देखील जागा मिळण्यास त्याला श्रम पडले. मग कीमर ह्या नांवाच्या एका मनुष्याच्या छापखान्यांत कांहीं दिवस चाकरीस राहून पुढें तो लंदनास गेला. तेथें तो आपले धंद्याचें काम मोठी मेहनत घेऊन करीत असे. ज्या गुणांविषयीं त्याची पुढें फार ख्याति झाली ते गुण तो लंदनांत असतांही त्याच्या आंगीं दृष्टीस पडले. ते गुण कोणते, तर खाण्यापिण्याचा नेमस्तपणा, उद्योगीपणा, आत्मसंयमन, आणि खर्चाचा बेतबात. आपणास दारिद्र्यांतून काढण्याचा जो सतत उद्योग फ्रांक्लिनानें चालविला तो सिद्धीस जाण्यास हे गुण बहुत अंशीं कारण झाले. त्याच्या धन्याच्या पदरचे इतर लोक आपल्या पगारापैकीं पुष्कळ पैका दारू पिण्याकडे उडवीत असत, पण फ्रांक्लिन पाणी मात्र पीत असे; तरी त्यांच्यापेक्षां ह्याचे आंगीं बळ अधिक असे, व त्यांच्यापेक्षां ह्याची बुद्धिही चांगली चालत असे तो वेळेस हजीर होऊन आपलें काम एकसारखें लक्ष लावून करीत असे, ह्यामुळें त्याच्या धन्याची त्याजवर मर्जी बसली; आणि तो ठसे फारच जलद जोडीत असे, ह्यामुळें निकडीचीं कामें आलीं तर तीं त्याचा धनी त्यासच सांगत असे. अशा कामाला पैसा जास्ती मिळतो ह्यामुळें, आणि खर्च बाताबेताचा होता ह्यामुळें, अर्थातच लवकरच त्याजपाशीं पुष्कळ पैसा जमला.

लंदनांत सुमारें दीड वर्ष राहून मग तो फिलादेल्फिया येथें परत गेला, आणि पुन्हा त्यानें कीमर ह्याची कांहीं दिवस चाकरी केली. त्यानें पुढें एकसारखा उद्योग चालविल्यानें त्याजपाशीं बराच पुष्कळ पैसा झाला; मग एक नवीन छापखाना सुरू करून त्यानें जातीनेंच एक

वर्तमानपत्र काढिलें. ह्या विलक्षण पुरुषाचा मोठा चमत्कार वाटतो. कसा म्हणाल, तर ज्या गांवांत सात वर्षांच्या पूर्वी दारिद्र्यावस्थेंत असून तो आला होता त्याच गांवीं तो आपले वयाच्या चोविसावे वर्षी चढत्या कळेचा व्यापारी झाला आहे, ह्याचें वर्तमानपत्र चोहोंकडे खपत आहे, आणि सर्व लोकांमध्यें ह्याची मोठी प्रतिष्ठा झाली आहे, अशी त्याची स्थिति झाली. हें जें त्याचें यश झालें तें त्याची चांगली वर्तणूक, त्याचा मोठा धीर, आणि त्याचा खर्चाचा बातबेत, ह्यांच्या योगानें झालें तो मातबर झाल्यावर देखील त्याची वृत्ति कांहीं पालटली नाहीं. जीं मनुष्यें पराक्रम करून आपणांस नीच अवस्थेंतून काढून प्रतिष्ठा मिळवितात त्यांस बहुतकरून मोठा गर्व होऊन तीं लोकांस तुच्छ मानूं लागतात; ह्यामुळें त्यांची नाचक्की होते. परंतु फ्रांक्लिनाचें मन त्याच्या स्वाधीन होतें, ह्याकरितां त्याची तशी अवस्था झाली नाहीं; उलटें असें झालें कीं तो पूर्वीपेक्षां साधा पोषाख करूं लागला, आणि अधिक नम्रतेनें वागूं लागला. तो इतका निरभिमान असे कीं कधीं कधीं बाजारांत विकत घेतलेले कागद एकचाकी गाडींत घालून ती गाडी आपण जातीनें ढकलीत ढकलीत घरीं येत असे.

पुढें फ्रांक्लिनानें संपत्ति मिळविण्याकरितां व घरचा सुखी होण्याकरितां जे यत्न केले ते उत्तम प्रकारें सिद्धीस गेले, आणि त्याची जी पाहिली वृद्धि होती ती तशीच राहिली. लहानपणापासून शेवटपर्यंत त्याची हुशारी व ज्ञानसंपादनाची हौस एकसारखी होती; आणि नेहमीं एकसारखा तो नीतीनें वागत असे. त्यानें कागद शाई वगैरे जिनसांचें दुकान घातलें, आणि मग लवकरच आपलें लग्न केलें. त्यानें जी बायको केली ती चांगलीच होती; व तिजकडून त्याला फार सुख झालें, असा त्याचा लेख आहे. त्यानें एक पुस्तकगृहाची स्थापना केली, त्यांतून वर्गणीदार लोकांस पुस्तकें वाचावयास मिळत असत. असलें पुस्तकगृह पूर्वी अमेरिकेंत नव्हतें. त्यानें एक ग्रंथ केला, त्याचें नांव धी वे टु वेल्थ, म्हणजे संपत्तीचा मार्ग, असें होतें. अमेरिकेंतील लोकांमध्यें त्या ग्रंथाची इतकी प्रतिष्ठा झाली कीं, अद्यापि त्याच्या प्रती संभावित लोकांच्या घरीं टांगलेल्या आढळतात. इ० स० १७३६ ह्या वर्षापासून तो गांवकीच्या कामाकडे पुष्कळ मन लावूं लागला. गांवां-

तील पोलीसच्या खात्यामध्यें फार अव्यवस्था होती, ह्याकरितां पहिल्यानें तिकडे लक्ष लावून त्यानें त्या खात्यांत चांगली व्यवस्था केली. त्यानें आगीच्या नुकसानाचे विम्याची मंडळी स्थापण्याची सूचना केली; आणि पुष्कळ श्रम करून त्यानें तत्वज्ञानाचा विचार करण्याकरितां विद्वान् लोकांचे मंडळीची स्थापना केली; त्यानें तरुण लोकांस शिकण्याकरितां एक शाळा स्थापिली; आणि त्या प्रांताचें संरक्षण करण्याकरितां शिबंदी ठेवविली. ह्याप्रकारें प्रत्येक सरकारी खात्यांत त्याला कांहीं तरी काम होतेंच. ह्याविषयीं त्याचा लेख येणेंप्रमाणें आहे.

मला हे अधिकार मिळाले ह्यामुळें आपण मोठें व्हावें अशी जी माझी इच्छा आहे ती कांहींच तृप्त झाली नाहीं, असें मी म्हणत नाहीं. ती कांहीं तृप्त होऊन मला खरोखरी आनंद झाला, कारण जो मी पहिल्यानें अगदीं नीच अवस्थेंत होतों त्या मला अधिकार मिळाला, तेव्हां मला आनंद झाल्याखेरीज कसा राहील? आणि अशी माझी प्रतिष्ठा होऊन मला अधिकार मिळाला, तेव्हां अर्थातच लोकांची मजवर प्रीति आहे असें दिसून आलें, व लोकांचें कल्याण करण्याची सोय मला अधिक झाली, ह्यामुळें तर मला फारच आनंद झाला. वास्तविक पाहिलें असतां ह्या जगांत मोठेपणा मिळविण्याची इच्छा करण्याचा मुख्य हेतु हाच असावा, हें चांगलें.

ह्याच वेळेच्या सुमारास फ्रांक्लिन् हा पदार्थविज्ञानशास्त्राकडे आपलें मन लावूं लागला. त्यानें विशेषेंकरून विद्युल्लतेविषयीं बराच विचार केला. कृत्रिम वीज, म्हणजे जी कांहीं पदार्थांच्या घर्षणापासून उत्पन्न करितां येते, व सांसिद्धिक वीज, म्हणजे जी आकाशांतून पडते, ह्या भिन्न नसतील, एकच असतील, अशी त्याच्या मनांत कल्पना आली. मग ह्या गोष्टीचा निश्चय करण्याकरितां त्यानें रेशमी पतंग करून उडविला, आणि त्या पतंगावरून ढगांतून वीज आणून मनाची खातरी केली. मग लोखंडाची तार लावून, तिनें ती आपले घरीं नेऊन, फावल्यावेळीं कृत्रिम विजेच्या योगानें जितकीं कार्यें होतात तितकीं ह्या विजेच्या योगानें तो करून पाहत असे. इतकेंच करून तो स्वस्थ बसला नाहीं. त्याचें मन फार हव्यासी होतें, व त्याला कांहीं चांगली कल्पना सुचली असतां तिचा उपयोगी कामाकडे प्रयोग केल्यावांचून

त्याच्यानें स्वस्थ राहवत नसे. कृत्रिम वीज व सांसिद्धिक वीज ह्या एक आहेत, व सांसिद्धिक वीज खालीं आणितां येते, ही जी गोष्ट त्याला माहीत झाली, ह्या गोष्टीनें त्याला विजेपासून इमारतींचें रक्षण करण्याची युक्ति सुचली. ती युक्ति फार सोपी असून ती करण्यास खर्च लागत नाहीं, आणि काम तर चांगल्या रीतीनें होतें. ती युक्ति अशी. इमारतीला एक लोखंडी, किंवा कोणते तरी धातूचा, गज लावावा; त्याचें वरलें टोंक इमारती पेक्षां उंच असावें, व खालचें टोंक जमिनीपर्यंत पोहोंचावें. असें केल्यानें वीज ह्या गजाचे आसपास किंवा जवळचे इमारतीवर न पडतां गजावर पडते, आणि कांहीं उपद्रव नकरितां ती त्या गजांतून जमिनींत जाते.

त्या वेळच्या कोणत्याही विद्वानाची फ्रांक्लिनाच्यापेक्षां अधिक प्रतिष्ठा झाली नाहीं हा अलौकिक मनुष्य पहिल्यानें अगदीं अप्रसिद्ध असून विद्येच्याच योगानें येवढ्या योग्यतेस व प्रतिष्ठेस चढला; व ही विद्या त्यानें इतरांचे साह्याशिवाय प्राप्त करून घेतली होती. फ्रांक्लिनाची ही गोष्ट कोणीं पूर्वापर वाचिली, तर त्याची अशी खातरी होईल कीं विद्याभ्यासाचा दृढ निश्चय हेंच विद्या प्राप्त करून घेण्याचें मुख्य साधन होय. आपली बुद्धि व आपलें ज्ञान वाढविण्याकडे ह्या मनुष्याचें लक्ष नेहमीं सारखें लागत असे. तो फार गरीब होता तरी तो आपल्या भोजनखर्चांतील कांहीं पैसा वाचण्यासाठीं पुस्तकें विकत घेण्याकडे खर्च करीत असे. जीं पुस्तकें विकत घेण्याचें त्यास सामर्थ्य नव्हतें तीं तो भाड्यानें आणीत असे. त्याला दिवसास फार कष्ट करावे लागत असत, तरी तो मध्यरात्रपर्यंत जागून अभ्यास करीत असे. ह्यामुळें ह्या मनुष्याची इतकी बुद्धि वाढून व त्याला इतकें ज्ञान प्राप्त होऊन लोकांमध्यें त्याची फार प्रतिष्ठा झाली. त्याची मुळची बुद्धि व धारणा इतरांस नसोत; पण त्याचा उद्योग, त्याचा दृढ निश्चय, आणि त्याचें आत्मसंयमन, ह्यांचा सर्वांनीं कित्ता घ्यावा. त्याच्यासारखे नव्या गोष्टींचे शोध करून कीर्त्ति मिळविणारे असे थोडकेच निघतील, तरी त्याचा वृत्तांत वाचून सर्वांनीं त्याच्या सारखा उद्योग करण्याची उमेद बाळगावी.

हा मोठा विद्वान् म्हणून जशी फ्रांक्लिनाची कीर्त्ति झाली तशी, हा स्वदेशाभिमानी व स्वदेशकल्याणकर्त्ता म्हणूनही, त्याची कीर्त्ति झाली.

तो मुळचा फार गरीब व अप्रसिद्ध असतां तो पुढें मोठ्याच योग्यतेस चढला, व राजांच्या जवळचे मोठमोठाले दरबारी लोकांची व ह्याची एकसारखी योग्यता झाली. हा त्यांच्या मांडीशीं मांडी लावून तहाविषयीं किंवा लढाईविषयीं मसलत करीत असे. इंग्लंदाकडील अमेरिकेंतील संस्थानी लोकांनीं स्वतंत्र होण्याकरितां लढाई सुरू केली त्यावेळीं त्यांनीं फ्रांक्लिन् हा फ्रान्स देशचे दरबारीं वकील पाठविला. तेव्हां त्यानें आपले लोक व फ्रेंच लोक ह्यांचा सख्यसंबंध केला, त्यामुळें लागलीच फ्रेंच व इंग्लिश ह्यांच्यामध्यें लढाई सुरू झाली. इ० स० १७८८ त इंग्लिश लोक व अमेरिकेंतील त्यांचे फितलेले लोक ह्यांच्यामध्यें तह ठरला, त्यांत इंग्लिशांनीं त्या लोकांचें स्वातंत्र्य कबूल केलें; ह्यावेळेसही युनैतेदस्तेत्स ह्यांच्या तर्फे, म्हणजे अमेरिकेंतील फितलेल्या लोकांच्या तर्फे, फ्रांक्लिन् ह्यानें त्या तहनाम्यावर सही केली. पुढें दोन वर्षांनीं तो आपले देशास परत गेला, तेव्हां ह्यानें आपले देशचे लोकांवर उपकार केले होते म्हणून त्यांनीं ह्याची वाहवा करून त्याचा मोठा आदरसत्कार केला; आणि त्याला सुप्रीम कौन्सिलाचा मुख्य अधिकारी नेमिलें. हा उद्योगी व प्रतिष्ठित मनुष्य इ० स० १७९० त एप्रिलचे १७ वे तारखेस मरण पावला, तेव्हां त्याचें वय ८५ वर्षांचें होतें.

फ्रांक्लिन् पारिस शहरामध्यें होता तेव्हां ऐर्लंद देशचा कोणी एक मनुष्य त्या शहरांत राहत होता, तो मोठ्या संकटांत असतां, आपण माझे संकटाचें निवारण करावें, म्हणून त्यानें फ्रांक्लिनाची प्रार्थना केली; तेव्हां फ्रांक्लिनानें त्याला उत्तर लिहिलें त्याचें भाषांतर येणेंप्रमाणें आहे.

ह्या पत्राबरोबर तुम्हांकडे दहा मोहरांची हुंडी पाठविली आहे. ह्या मोहरा तुम्हांस अगदीं दिल्या असें मी म्हणत नाहीं; ह्या तुम्हांस उसनवार दिल्या आहेत असें तुम्हीं समजावें. तुम्हीं स्वदेशास परत जाल तेव्हां कांहीं तरी रोजगार लागेल, तेणेंकरून आपलें कर्ज फेडण्याचें सामर्थ्य तुम्हांस येईलच. असें झाल्यास, तुमची हल्लीं जशी अवस्था आहे, तशा संकटावस्थेंत कोणी तरी सज्जन मनुष्य तुम्हांस आढळेलच असा मनुष्य तुम्हांस आढळला म्हणजे त्याला तुम्हीं इतक्या मोहरा द्याव्या,

आणि त्याला ह्याप्रमाणेंच सांगावें, म्हणजे माझें उसनें फेडल्यासारखेंच होईल. माझी इच्छा आहे कीं ह्याप्रमाणें ही रकम पुष्कळांचे हातीं जावी, आणि तिला मध्यें कोणी लबाड मनुष्य भेटूं नये. थोडक्या पैशानें पुष्कळ लोकांचें कल्याण करण्याकरितां ही मीं युक्ति काढिली आहे. मजपाशीं पुष्कळ पैसा नाहीं, ह्याकरितां थोडक्याच पैशानें जें होईल तें करावें ह्यास्तव असल्या युक्ति काढणें मला प्राप्त पडतें. मुकाम पारिस, तारीख २२ एप्रिल सन १७८४ इसवी.

ही गोष्ट नेद म्हणून एक मनुष्य होता त्याच्या गोष्टी सारखी आहे. हा मनुष्य नीग्रो जातीचा असून अमेरिकेजवळच्या एका बेटांत गुलाम होऊन राहिला होता. तेथील एक युरोपियन शिपाई त्याशीं असें बोलला कीं, तुला वाचावयास शिकविण्याचें माझ्या मनांत आहे, पण तूं एखाद्या दुसऱ्या मनुष्यास शिकविण्याचें कबूल करशील तर मी तुला शिकवीन. नेद ह्यानें ती गोष्ट पतकरून शिकावयास प्रारंभ केला. तो मूळाक्षरें शिकतांच दुसऱ्या एका नीग्रोस शिकवूं लागला, आणि त्याजपासूनही तिसऱ्यास शिकविण्याचें कबूल करून घेतलें. ह्याप्रमाणें पुष्कळ नीग्रो लोक वाचावयास शिकले. तेथील धनी होते त्यांस हें कळतांच त्यांनीं हें बंद करण्याचा निश्चय केला. हें सर्व नेद ह्याचें कृत्य आहे, असें त्यांस समजतांच त्यांनीं त्याला पुष्कळ मार दिला. त्याच्या आंगावरचे वळ नाहींतसे होतांच तो पुन्हा नीग्रो लोकांस वाचावयास शिकवूं लागला; मग त्याला पूर्वीपेक्षां अधिक मार बसला; तरी त्यानें शिकवावयाचें सोडून दिलें नाहीं. मग तेथील धन्यांस वाटलें कीं, आतां ह्याच्या पुढें कांहीं आपला उपाय चालत नाहीं; मग त्यांनीं त्याला दुसरे ठिकाणीं पाठवून दिलें. तेथेंही त्यानें आपलें काम चालू केलें, आणि तेथील नीग्रो लोक वाचायास शिकले.

इंग्लिश लोकांनीं गुलाम विकत घेऊन सोडून दिले तेव्हां ज्या ज्या नीग्रोस वाचावयास येतें त्यास त्यास एकेक तेस्तमेंत, म्हणजे बैबलाचा उत्तरभाग, द्यावें असा निश्चय *बैबल प्रसिद्ध करणाऱ्या मंडळीनें केला; तेव्हां ज्या लोकांस नेद ह्यानें वाचावयास शिकविलें होतें त्यांस एकंदर ६०० पुस्तकें लागलीं.

* म्हणजे खिस्ती लोकांचें धर्मपुस्तक.

फ्रांक्लिन्, युरोपियन शिपाई, व नेद ह्यांच्या प्रमाणें सर्वांनीं कोणते तरी रीतीनें लोकांचें कल्याण करण्याकरितां झटत असावें; नेद ह्या बिचाऱ्यानें लोकांच्या कल्याणाकरितां फार हाल सोसून इतका उद्योग केला, त्याप्रमाणें आपण कां करूं नये ?

---

## माथ्यू हेल उत्तम न्यायाधीश ह्याची गोष्ट.

ज्या ठिकाणीं अनेक लोक असतात त्या ठिकाणीं देणें घेणें वगैरे अनेक व्यापार होतात. त्या संबंधानें लोकांचे तंटे होतात ते तोडून न्याय करण्यासाठीं तेथें न्यायाधीश असावा हें अवश्य आहे. तो न्यायाधीश शहाणा, हुशार, विचारी, निर्लोभ, व निष्पक्षपात असा असला पाहिजे, तरच त्याच्या हातून न्यायाचें काम यथार्थ होऊन सर्व लोकांस सुख होईल. हे गुण त्याच्या आंगीं नसल्यास, त्याच्या हातून न्याय न होतां उलटें अन्याय होऊन लोकांचें नुकसान होईल. वर सांगितल्याप्रमाणें न्यायाधीशाच्या आंगीं जे जे गुण असावे ते ते सर्व माथ्यू हेल म्हणून इंग्लंदांत मोठा नामांकित न्यायाधीश होऊन गेला त्याच्या आंगीं होते. त्याचा हा वृत्तांत पुढें लिहितों.

इंग्लंद देशामध्यें ग्लास्तरशायर ह्या प्रांतांत अल्दरली म्हणून गांव आहे, तेथें इ० स० १६०९ ह्या सालीं माथ्यू हेल हा जन्मला. त्याचा बाप कायदे वगैरे शिकून वकिलीच्या कामांत तयार झाला होता; पण पुढें त्यानें तो धंदा सोडून दिला; कारण, आपण जो पक्ष घ्यावा त्याला बळकटी आणणारीं जीं प्रमाणें असतील तीं, दुसऱ्यांस खरीं वाटायाजोगें बनावून बोलणें म्हणजे खोटें बोलण्याप्रमाणेंच आहे, असें त्यास वाटूं लागलें होतें. माथ्यू हेल लहान असतां त्याचे आईबाप वारले, तेव्हां *प्यूरितन पंथांतील कोणी एक मनुष्य त्याचा संबंधी होता त्यानें त्याचें पालन पोषण करून त्यास वाढविलें. ह्या माथ्यू हेलाचे आंगीं धर्मनिष्ठा व न्यायनिष्ठा हे गुण येऊन पुढें फार प्रसिद्धीस आले, ह्यांचें बीजारोपण त्या धर्मनिष्ठ पुरुषाच्या सहवासानें व उपदेशानें झालें असावें असें वाटतें. वयाच्या सतराव्या वर्षी आक्सफोर्द शहरांतील माग्दलनहाल

---

* प्यूरितन पंथाचे लोक धर्मनिष्ठ असत.

ह्या नांवाच्या विद्यालयांत विद्याभ्यास करूं लागून त्यानें पूर्वी शाळेंत कीर्त्ति मिळविली होती तशी ह्या ठिकाणींही हा विद्येंत निपुण झाला आहे अशी कीर्त्ति मिळविली.

इ० स० १६२९ त लिंकोल्न्सइन ह्या नांवाच्या विद्यालयांत जाऊन कायदे शिकूं लागला. त्यानें तेथें श्रमपूर्वक फार चांगल्या रीतीनें अभ्यास केला. तो असा कीं श्रम वायां न जातां त्या विद्येंत आपली तयारी व्हावीच व्हावी. विद्यार्थिदशेंत जसा पोषाख असावा तसा अगदीं साधा पोषाख तो करीत असे. कितीएक वर्षेपर्यंत तो प्रतिदिवशीं सुमारें सोळा तास अभ्यास करीत असे. मंडळीमध्यें मेजवान्या होत त्या मेजवान्यांस जाण्याचा नाद त्याला असे, म्हणून तिकडे मात्र तो कधीं कधीं अभ्यास सोडून जात असे. पुढें कांहींएक गोष्ट घडली तिजवरून तो त्याचा नाद अगदीं सुटला. ती गोष्ट अशी कीं, एके दिवशीं मेजवानी झाली तींत सर्व लोक शराब फार प्याले, त्यांपैकीं एक असामी बेशुद्ध होऊन पुढें तो वांचतो किंवा मरतो कोण जाणे, अशी सर्वांस मोठी भीति पडली. तें पाहून माथ्यू हेलाच्या मनाला मोठा चटका बसला, आणि तो दुसऱ्या खोलींत जाऊन मनोभावानें ईश्वरास शरण गेला, आणि म्हणाला, माझ्या मित्रास उतार पडूं दे, व मी अशा मेजवानीच्या कृत्यांत पडलों ह्याविषयीं मला क्षमा कर. आणि मी आजपासून यावज्जीव अशा प्रकारें बेताबाहेर दारू कधींही पिणार नाहीं, अशी त्यानें खडखडीत शपथ वाहिली. कोणती एखादी गोष्ट करून ती पक्की आंगावर आली म्हणजे त्यावेळेस मनाला फार पश्चात्ताप होऊन, अशा प्रकारची गोष्ट पुन्हा आपण करायाची नाहीं, असा बळकट निश्चय करावा अशी बहुतेक मनुष्यांची चाल आहे; परंतु त्यांच्या निश्चयामध्यें व माथ्यू हेल ह्याच्या निश्चयामध्यें भेद इतकाच कीं, कांहीं काळ गेल्यानंतर त्या प्रसंगाचें स्मरण कमी झालें, व दुसऱ्या कांहीं गोष्टी मनास आनंदप्रद झाल्या, म्हणजे त्यांचा निश्चय ढळतो, आणि माथ्यू हेल ह्यानें आपला निश्चय यावज्जीव चालविला. एक प्राचीन ग्रंथकर्त्ता असें म्हणतो कीं, आपण दुखण्यास पडलों असतां आपण पुढें वागण्याचा जसा निश्चय करितों, त्याप्रमाणें बरें झाल्यावर वागलों तर आपलें फार कल्याण होईल.

माथ्यू हेल हा चांगला बुद्धिमान् व मेहनती होता, त्यामुळें तो लवकरच उदयास येऊन सेलदन म्हणून एक मोठा विद्वान् गृहस्थ होता त्याशीं त्याचा स्नेह पडला. सेलदन हा अनेक विद्यांत निष्णात व ह्याचें केवळ संभाषण देखील बोधप्रद असे, ह्यामुळें त्याच्या सहवासानें माथ्यू हेलास विद्या व शास्त्रीयविषय शिकण्याची वासना झाली. त्यानें गणितविद्येचे मोठे भाग व पदार्थविज्ञान ह्या विषयांत चांगले परिश्रम केले. वैद्यक, शारीर, प्राचीन काळचा इतिहास, व कालगणनविद्या, ह्यांतही त्यानें चांगला अभ्यास केला. परंतु इतके विषय झाले तरी त्याच्या आवडीचा विषय म्हटला म्हणजे परमार्थज्ञान हा होय. हे इतके विषय सांगितले ह्यांपैकीं कोणताही एक विषय आणि त्यांत अभ्यास करणारा सामान्य प्रतीचा बुद्धिमान् असे घेतले असतां त्यास तो विषय शिकून दुसरा एखादा विषय शिकण्यास वेळ होणार नाहीं. परंतु माथ्यू हेल हा कायद्यांचा व्यासंग करितांना कंटाळला म्हणजे मनोरंजनार्थ जसे अनेक खेळ खेळावे तसा ह्या विषयांत तो खेळत असे. तो हे विषय म्हणजे खेळच मानीत असे. त्याला ही गोष्ट उत्कृष्ट साधली होती कीं मनामध्यें व्यग्रता उत्पन्न न होतां अनेक विषयांकडे तें लावितां यावें. तो इतका जबरदस्त व्यासंगी कीं त्यानें केलेल्या किती एक मोठाल्या गोष्टी सांगितल्या असतां आळशी लोकांस निखालस खोट्या वाटतील.

तो पहांटेस उठे, व तो रिकाम्या लोकांशीं गप्पा मारण्यांत अथवा एखाद्यास निरर्थक पत्रें लिहिण्यांत वेळ अगदीं घालवीत नसे, ह्यामुळें कायद्यांची उपस्थिति चांगली राखून दुसऱ्या विषयांचा व्यासंग करण्यास त्याला वेळ पुष्कळ सांपडे. त्याचें खाणें पिणें फार बेताचें असे ह्यामुळें त्यास व्यासंग करण्यास ठीक पडे; जेवण होत असतां मात्र काय खंड पडे तो पडे; जेवण होतांच सुस्ती वगैरे कांहीं त्यास न येऊन त्यानें पुन्हा व्यासंगास बसावें. त्याच्या व्यासंगाचे विषय पडले अनेक व त्यांपैकीं प्रत्येकाचा चमत्कार निराळाच तेव्हां एका विषयांत कंटाळा आला तर दुसरा विषय काढावा ह्याप्रमाणें निरनिराळे विषय काढून पाहणें म्हणजे त्यास बहुतेक विश्रांतीप्रमाणेंच होतें; आणि विश्रांति घेतल्यानें जशी चित्तास स्वस्थता, शांति, वगैरे येतात तशीच ह्या विषयांच्या अदलाबदलीपासून

त्याच्या चित्तास होत असे. ह्यापासून मोठा फायदा हा कीं त्याला उपयोगी अनेक विषयांचें ज्ञान फार झालें.

माथ्यू हेलास वकिलीची सनद मिळाली तेव्हां इंग्लंदांत राजाचे आणि पार्लमेंताचे आपसांत तंटे चालले होते. ह्या तंट्यांत तो पडला नाहीं. त्याला दोहों पक्षांच्या मनुष्यांची दया येऊन तो त्यांचा समाचार घेत असे. त्याच्या ह्या उदासीनतेमुळें व सर्व लोकांत त्याची मान्यता होती ह्यामुळें त्या वेळेस राजा आणि प्रजा ह्यांच्यामध्यें जीं मोठमोठीं खटलीं कोर्तांत उपस्थित झालीं त्यांत ह्याला कोणाकडून तरी वकिलाचें काम मिळत असे. एके प्रसंगीं त्यास कोणीं अशी धमकी दिली कीं, सरकारास विरुद्ध जो पक्ष तो घेऊन तुम्ही भांडतां हें फार वाईट आहे. त्यानें उत्तर केलें कीं, जे कायदे आम्ही चालवूं व शाबूत राखूं असें सरकारानेंच प्रतिज्ञापूर्वक सांगितलें आहे त्याच कायद्यांच्या रक्षणार्थ भांडून मी आपल्या यजमानाची कामगिरी बजावीत आहें सबब असल्या धमकीला मी भिणार नाहीं.

पहिला चार्लस राजा ह्याचा शिरच्छेद केल्यानंतर क्राम्वेल हा प्रोतेक्तर, म्हणजे राज्य संभाळणारा, हा किताब घेऊन राज्याचा अधिकारी झाला, त्यानें माथ्यू हेलास न्यायाधीशीचें काम दिलें. हें काम त्यानें फारच रास्त रीतीनें व इमानानें बजाविलें. ह्यामुळें क्राम्वेल मेल्यानंतर पहिल्या राजाचा पुत्र, दुसरा चार्लस, ह्यास गादी मिळाली तेव्हां त्यानें माथ्यू हेलास एका कोर्तांत मुख्य न्यायाधीशाचें काम दिलें. लार्ड क्लारेंदन जो दुसऱ्या चार्लस राजाचा प्रधान होता त्यानें त्या जाग्याची सनद देते वेळेस, आपणांस आम्ही फार मानितों, असें बोलून दाखविलें; आणि तो म्हणाला कीं, ह्या कामाला तुम्हांपेक्षां अधिक योग्य व अधिक प्रामाणिक असा मनुष्य राजाला आढळता, तर त्यानें तुम्हांस हें काम दिलें नसतें. परंतु तुम्हांप्रमाणें योग्य असा दुसरा कोणी आढळलाच नाहीं, म्हणून राजानें हें काम तुम्हांस दिलें आहे.

हा मोठा अधिकार मिळाला तेव्हां माथ्यू हेलानें आपला अधिकार चालविण्याविषयीं कांहीं नियम करून ठेविले, त्यांवरून स्पष्ट दिसतें कीं, त्यानें हा अधिकार पत्करिला तो केवळ द्रव्य व प्रतिष्ठा ह्यांच्या लोभानें पत्करिला नाहीं. ते नियम येणेंप्रमाणें.

## सर्वकाळ स्मरणांत ठेवण्याच्या गोष्टी.

१ मला न्याय करण्याचें काम मिळालें आहे, त्यांत ईश्वराचा पक्ष, राजाचा पक्ष, आणि रयतेचा पक्ष हे मला संभाळले पाहिजेत.

२ ह्यास्तव न्याय करणें तो प्रामाणिकपणानें, विचारानें, आणि दृढ निश्चयानेंच केला पाहिजे.

३ ह्या कामांत मीं आपल्याच बुद्धीवर अगर शक्तीवर भरंवसा ठेवूं नये. परंतु ईश्वराची प्रार्थना करून त्यानें दिलेल्या बुद्धीवर व शक्तीवर भरंवसा ठेवावा.

४ ह्या कामांत काम, क्रोध, लोभ, इत्यादि मनोवृत्ति माझेठायीं कारणवशात् कितीही खवळल्या तरी त्या दाखवूं नयेत, व त्यांचा अमल तिळप्राय चालूं देऊं नये.

५ न्याय करण्याचें जें काम हातीं धरीन तें तत्पर होऊन एकाग्रचित्तानें म्यां करावें, आणि सर्व दुसऱ्या गोष्टींची काळजी व दुसरे विचार हीं अप्रासंगिक व ह्या कामांत विघ्नभूत आहेत असें समजून एकीकडे ठेवावीं.

६ सगळा खटला ऐकून घेऊन दोन्ही पक्षकारांचें बोलणें ऐकिल्याशिवाय कोणत्याच पक्षाविषयीं खरेपणाचा अगर खोटेपणाचा ग्रह धरूंनये.

७ ज्या अपराधांबद्दल देहांत शिक्षा आहे अशा अपराधाच्या खटल्यांत अपराध्याविषयीं जरी स्वभावतः माझ्या मनांत दया उत्पन्न झाली, तरी, देशावरही दया केली पाहिजे, असा विचार करावा.

८ ज्या गोष्टींविषयीं खटला आहे त्या गोष्टी धर्माच्या समजुतीच्या असून मानसिक आहेत, त्यांपासून कोणाचें नुकसान होत नाहीं, मतभेद मात्र आहे, तर अशा खटल्यांत फार कडकपणा करूं नये.

९ न्यायाच्या कामांत गरिबाची दया आली म्हणून त्याचा पक्ष धरूं नये, व श्रीमंताची मर्जी संपादण्याकरितां त्याचाही पक्ष धरूं नये.

१० आपण न्यायाच्या मार्गानें बरोबर चालत असलों, तर लोकांच्या मनांत आपणाविषयीं काय येईल व ते आपणास काय म्हणतील ह्या गोष्टीची काळजी आपण अगदीं करूं नये.

११ ज्या खटल्यांत गुन्हा केल्याचा व न केल्याचा संशय बहुतेक अंशीं सारखाच आहे अशा खटल्यांत गुन्हेगारावर दया करणें आणि अपराध शाबूत नाहीं असें मानणें इकडे आपलें मन वळवें; परंतु खटला खुनाचा असून पुरावा पक्का मिळाला, तर त्या खटल्यांत कडक शिक्षा करणें हाच न्याय होय.

१२ कोर्टात जे खटले चालू असतील त्यांच्या निवाड्याविषयीं कोणीं कसेंही आर्जव केलें तरी त्याचा तिरस्कार करावा.

१३ कोणत्याही खटल्यामध्यें रदबदली करूं नये, कोणत्याही कारणा-बद्दल कायद्यानें ठरविल्यापेक्षां जास्ती फी लोकांपासून घेऊंनये, क्रमानें ज्या वेळेस खटला निघावयाचा त्यावेळेच्या अगोदर तो खटला काढूंनये, व आपण होऊन वकिलाविषयीं शिफारस करूंनये, अशी हाताखालच्या लोकांस सक्त ताकीद द्यावी.

१४ मला काम करण्याविषयीं सुस्ती न यावी म्हणून म्यां आहार बेताचाच करावा, आणि तो करितांना वेळ लावूं नये.

न्यायाधीशाच्या नात्यानें हा पुरुष पाहिला असतां मोठा गंभीर, क्षमाशील, आणि दयाळू असा होता. केवळ मनुष्याच्या आणि खिस्तीच्या नात्यानें पाहिला असतांही आम्हांस तो अत्यंत मान्य आहे. त्याचा जन्म दुसऱ्याचें बरें करण्यांत गेला. मेजवानी द्यावयाची झाली तर तो गरीब लोकांस देत असे, आणि आपण स्वतः त्यांच्या मंडळींत बसून त्यांबरोबर भोजन करीत असे. तो आपल्या सर्व प्राप्तीचा दशांश गरिबांस देण्याकरितां निराळा काढून ठेवीत असे. तो न्यायाधीश झाल्या-नंतर पगाराखेरीज फीचा जो पैसा मिळे त्यांतून पुष्कळ पैसा ऋणामुळें जे गरीब लोक तुरुंगांत असत त्यांस सोडविण्याकरितां देत असे. तो अशा रीतीनें कीं आपणांस सोडविण्यासाठीं पैसा कोणीं दिला हें त्या कैदी लोकांस कधीं कळूं नये. तो आपल्या जनावरांवर देखील फार दया करी. त्याचे घोडे अशक्त झाले म्हणजे त्यांस तो आपल्या कुरणांत चरण्याकरितां मोकळे ठेववी, आणि कामास लावणें झालें तर अगदीं हलक्या कामास मात्र लाववी. त्याच्या कुत्र्यांची जतन ह्याप्र-माणेंच होत असे. रविवारचा दिवस घालविण्याची त्याची रीत फार

चांगली आणि ध्यानांत धरण्यासारखी आहे. ह्या वारीं काम धंदा वगैरे नसल्यामुळें हा पुष्कळ लोक कंटाळवाणी मानितात, आणि आळसांत अथवा एखाद्या क्षुल्लक कामांत घालवितात. माथ्यू हेल तसें नकरितां भक्तिपुरःसर देवळांत प्रार्थनेसाठीं जात असे; मग घरीं आल्यावर तो आपल्या कुटुंबांतल्या मनुष्यांस उपदेश करीत असे; आणि संध्याकाळीं अगदीं एकांतीं बसून विचार करीत असे. त्या विचारांत ज्या गोष्टी सुचत त्या पुढें कधीं लागतील ह्याकरितां, व कुटुंबांतल्या मनुष्यांस सांगण्याला उपयोगीं पडतील ह्याकरितां, त्यांचें टांचण करून ठेवीत असे.

इ० स० १६७१ ह्या सालीं माथ्यू हेलास मुख्य कोर्टाच्या मुख्य न्यायाधीशाच्या जाग्यावर सरकारानें नेमिलें. कांहीं थोडे दिवस ह्या ठिकाणीं काम केल्यावर त्याची प्रकृति बिघडत चालली, आणि तें काम करण्यास जितकी पाहिजे तितकी कुवत त्याच्या आंगीं उरली नाहीं. तेव्हां त्यानें काम सोडण्याची परवानगी मिळण्याविषयीं अर्ज केला. परंतु त्याची न्यायाचें काम करण्याची रीति सर्व लोक व राजा ह्यांस फारच पसंत होती, ह्यामुळें राजानें त्या अर्जास अनुमोदन देण्याविषयीं बुद्धया विलंब लाविला. शेवटीं सन १६७५ त फेब्रुवारीच्या विसाव्या तारखेस त्यानें राजाकडे आपण जातीनें जाऊन आपलें काम खुद्द राजाच्या स्वाधीन केलें, नंतर राजानें त्याचा मोठा सन्मान करून त्यास रजा दिली.

अशा रीतीनें वृद्धापकाळीं स्वस्थपणानें सुखाचे दिवस घालवावे म्हणून माथ्यू हेलानें रजा घेतली; परंतु दम्याच्या व जलोदराच्या उपद्रवापासून त्याचे फार हाल झाले. शेवटीं त्याच रोगांनीं सन १६७६ त दिसेंबरच्या २५ व्या तारखेस, म्हणजे नाताळाच्या दिवशीं, तो मरण पावला. प्रेतें देवळांत पुरण्याची चाल त्यास अगदीं आवडत नसे, ह्यामुळें मरणाच्या अगोदर त्यानें सांगून ठेविलें होतें कीं, माझें प्रेत स्मशानांत पुरावें, त्याप्रमाणें तें पुरिलें. तो असें म्हणत असे कीं, देवळें हीं जिवंत लोकांकरितां आहेत, व स्मशानें हीं मेलेल्या लोकांकरितां आहेत.

---

## कविता.

### सुबोध आर्या.

प्रातः काळीं शयना वरुनि उठावें सदा शुची व्हावें ॥
ध्यावें देवातें मग कर जोडुनियां तयास विनवावें ॥ १ ॥
देवा परमसमर्था दीनदयाळा प्रभो जगन्नाथा ॥
आलों शरण तुला मी दीन तुझ्या ठेवितों पदीं माथा ॥ २ ॥
सृष्टिस्थितिलयकर्ता देवा आहेस तूं जगद्भर्ता ॥
निजदासदुःखहर्ता कोणी नाहींच बा तुझ्या वर्ता ॥ ३ ॥
ही अद्भुत सृष्टि तुवां देवा केव्हां कधीं कशी केली ॥
याविषयींची आम्हा जीवांची कल्पना विरुनि गेली ॥ ४ ॥
गगनभवनांत रविशशि अद्भुत हे दीप निर्मिले असती ॥
सारित दूर तमाला तेजांचे पुंज काय हे दिसती ॥ ५ ॥
जैसे रविशशि केले लीलेनें त्वां तसेच हे तारे ॥
केले अनंत तुजविण कोणाला मणवतील बा सारे ॥ ६ ॥
रविशशिनक्षत्रांहीं कैसें आकाशसदन शोभविलें ॥
सौंदर्य हें पहाया जीवांचें नयनवृंद लोभविलें ॥ ७ ॥
हीं पंच महाभूतें त्वां कोठुनि आणिलीं जगामाजी ॥
अद्भुतशक्ति तुझी बा पाहुनि आम्ही तुला असों राजी ॥ ८ ॥
देह अवयवां सुद्धां देवा त्वां अर्पिला अम्हां जीवां ॥
पोषिसि सुखविशि त्यांतें देवा तूं अर्क जेंवि राजीवां ॥ ९ ॥
मन बुद्धि इंद्रियें हीं देवा आम्हांस अर्पिलीं बरवीं ॥
चाळक तूंच तयांचा सत्कार्यें त्यांकडून तूं करवीं ॥ १० ॥
सुविचार मज कळेना माझें मूर्खत्व कळवितों मीच ॥
अतिमंदबुद्धि हा मी देवा आहें तुझ्या पुढें नीच ॥ ११ ॥
रचितों अपराध सदा आहें मी सर्वथैव अपराधी ॥
बालक म्हणोनि सोशीं त्रिजगज्जनका करीं न अपरा धी ॥ १२ ॥
दुर्वासनामळाचा लागूं देऊं नको मला लेश ॥
अनिवार इंद्रियें हीं नच द्यावा मन्मना तिहीं क्लेश ॥ १३ ॥
देवा तव सेवेचा सद्विद्येचा असो मला छंद ॥
कीं साधुसंगतीचा यांतचि वाटो मनासि आनंद ॥ १४ ॥

गर्व मनांत नसांवा हेवा कोणासवेंहि न घडावा ॥
अन्यायपथीं माझा देवा केव्हांहि पाय न पडावा ॥ १५ ॥
गुरुचा कीं वडिलांचा न घडावा मजकडून अवमान ॥
चित्तीं खेद नसो जरि न मिळे इतराकडून लेंवे मान ॥१६॥
आत्मस्तुति परनिंदा मिथ्याभाषण कधीं न यो वदना ॥
तैसा नकार त्यांना येती मागावयास जे सदना ॥१७॥
कामक्रोधादिक जे षड्रिपु त्यांचा विनाश तूंच करीं ॥
जिंकावयास त्यांना मी किति आहे तुझ्याच शक्ति करीं ॥ १८ ॥
श्रद्धा सद्धर्मावर सच्छास्त्रावर सदा दृढ असावी ॥
पाखंडवाद नास्तिकपण यांची अभिरुची मनिं नसावी ॥ १९ ॥
तूंच मनोरथपूरक आहेस म्हणोन याचना करितों ॥
इच्छा दासाची तूं पुरविशिल अशीच आस मी धरितों ॥ २० ॥
मी दीन दीनबंधू तूं तुजवांचोनि कोण दीनांतें ॥
सांभाळील पहा हें तुजशीं माझें असेंच कीं नातें ॥ २१ ॥
प्रार्थुनि असें प्रभूला त्याचें साहाय्य त्यास मागावें ॥
मग विद्याभ्यासादिक निजकर्म करावयास लागावें ॥ २२ ॥
कर्तव्य कर्म अपुलें काय असे हें विचारुनि मनांत ॥
तें तें करुनि यथाविधि संपादावें भलेपण जनांत ॥ २३ ॥
कर्तव्य कर्म पहिलें ईश्वरभक्ती मनांत बाणांवी ॥
तैशीच योग्यताही देवाची निरुपमेय जाणावी ॥ २४ ॥
देव अनादि अनंत ब्रह्मांडांचा धनीच हा आहे ॥
निजशक्तिनेंचि सारें विश्व व्यापूनि एकला राहे ॥ २५ ॥
मोठा पराक्रमी तो परमन्यायी दयालुहि तसाच ॥
सत्यत्वशुचित्वादिक जे सद्गुण त्यांत वसति ते साच ॥ २६ ॥
निजसत्तासूत्रानें हीं ब्रह्मांडें अनंत तो रचितो ॥
संरक्षितो विघडितो[३२४] म्हणती यावरुनि फार थोरचि तो ॥ २७ ॥
त्या परम समर्थानें आम्हां दीनांस नित्य रक्षावें ॥
त्या मातेनें आम्हां बाळांस दया करोनि लक्षावें ॥ २८ ॥
हें अनुसंधान मनीं नित्य असावें कधीं न विसरावें ॥
भव त्याचेंच धरावें चित्तीं कर्तव्य तें मग करावें ॥ २९ ॥

कोणाच्या आत्म्याची वित्तांची तशिच हानि देहाची ॥
कीर्तीचीहि करुंनये करितां ती हानि आपली साची ॥ ३० ॥
अन्याचें मन दुखवी वाइट कामें करावया शिकवी ॥
तो त्याच्या आत्म्याची हानिच करितो असें म्हणति सुकवी ॥ ३१ ॥
चौर्यानें शौर्यानें कपटानें परधनास जे हरिती ॥
ते त्याच्या वित्ताच्या कवि म्हणती उघड हानितें करिती ॥ ३२ ॥
जीवित्वनाश करणें कीं करणें छिन्न भिन्न देहाला ॥
या कर्मे अन्याच्या देहाचा नाश म्हणति कवि झाला ॥ ३३ ॥
लोकांमध्यें निंदा किंवा अपमान इतर पुरुषाचा ॥
केल्यास म्हणति त्याच्या कीर्तीचा नाश होतसे साचा ॥ ३४ ॥
ऐशी हानि चतुर्विध न घडावी हें सदा मनीं ठेवा ॥
घडतां स्वहानि मोठी आहे कीं हें न आवडे देवा ॥ ३५ ॥
अन्यायानें परधन हरितां चित्तांत लाज वाटावी ॥
दुग्ध दधि सुघृत लोणी असतां विष्ठा कशास चाटावी ॥ ३६ ॥
न्यायोपार्जित धन तें बहुकाळ टिकोनि फार सुख देतें ॥
अन्यायोपार्जित तें सत्वर नासुनि सुखा लयां नेतें ॥ ३७ ॥
कापट्यें परवंचन करितां चौर्यांत काय भेद असे ॥
विश्वासघात न बरा ऐशा करण्यांत पुण्य कीर्ति नसे ॥ ३८ ॥
अन्यायोपार्जित तें परधन वमनासमान मानावें ॥
तद्रोगीं रोग केवळ दुःखद हीं भिन्न मात्र यां नांवें ॥ ३९ ॥
न्यायें धन मिळवावें त्याचा न्यायेंचि खर्चहि करावा ॥
वित्ताचा लोभ मनीं अन्यायानें कदापि न धरावा ॥ ४० ॥
परधनपरस्त्रियेचा चित्तीं अभिलाष तूं नकोचि धरूं ॥
अल्पसुखाच्या लाभाकरितां अन्याय बा नकोचि करूं ॥ ४१ ॥
स्वस्त्रीवांचुनि इतर स्त्री ती माता स्वसा सुता मान ॥
न करीं स्पृहा तियेची करितां यमदूत कापितिल मान ॥ ४२ ॥
कोणासहि योग्य नसे भोगाया परकलत्र परवित्त ॥
चित्त न द्यावें तिकडे चढतें साधूंस पाहतां पित्त ॥ ४३ ॥
मित्र जयास म्हणविलें सुज्ञें त्याशीं करूंनये कपट ॥
मन दुखवितां तयाचें होइल कीं नाश आपुला निपट ॥ ४४ ॥

इतर न कोणी येतो मित्र असा संकटांत कामास ॥
मित्रोपकार न फिटे देहाचें नित्य झिजवितां मास ॥ ४५ ॥
मित्र सुखाचा दाता देतो चित्तास नित्य विश्रांती ॥
समयीं चित्त भ्रमेतां बोध करुनियां निवारितो भ्रांती ॥ ४६ ॥
सन्मित्र करी जें हित कोणाच्यानेंहि तें न करवेल ॥
साह्य कराया दुर्घट समयीं अन्या न धीर धरवेल ॥४७॥
जे साधु संत सज्जन त्यांशीं मैत्री अवश्य जोडावी ॥
जे खल कपटी दुर्जन त्यांची संगति सदैव सोडावी ॥ ४८ ॥
जीवन यौवन चंचल चित्त तसें वित्तही सदा आहे ॥
सत्कीर्ति एक अचला दुसरी अपकीर्तिही तशी राहे ॥ ४९ ॥
दुःख परासि न द्यावें सत्य वदावें क्षमा न सोडावी ॥
जोडावी कीर्ति जगीं नयमर्यादा कदा न मोडावी ॥ ५० ॥

---

## मयूर कविकृत.

### सीतारामायण.

आर्या.

श्रीजनकसुता सीता– प्रभृति सुखें भेटल्या स्वसा जीवा ॥
तत्संवाद वदावा सज्जन पावुनि महं स्व साजावा ॥१॥

अनुष्टुप्.

भरताची मांडवी स्त्री लक्ष्मणाची हि उर्मिळा ॥
श्रुतकीर्ति रिपुघ्नाची जगीं यत्कीर्ति दुर्मिळा ॥२॥

आर्या.

पडुनि गळां गहिंवरल्या सीतेच्या कन्यका तशा गमल्या ॥
श्रमल्या विरहें श्रीनें भेटुनि कुरवाळितां करें शमल्या ॥३॥

मालिनीछंद.

म्हणति सुदिन भाग्यें आजि हें प्राप्त आलें ॥
अमृत परमरंगणा वांचवायास आलें ॥
सुभगिनि चवदा कीं कल्पसे अब्द गेले ॥
स्वसम सखि निजेनें निष्ठुरें स्वप्न केले ॥४॥

रथोद्धताछंद.

वृत्त सर्व सखि सांग आपलें ॥ सूक्तिनें निविव चित्त तापलें ॥
दर्शनें पुरलि सर्व कामना ॥ या नसो श्रवणकाम का मना ॥५॥

आर्या.

आलिंगुनि कुरवाळुनि हुंगुनि शिर पुसुनि लोचनें पदरें ॥
श्री सांगे निजवृत्त श्रवणीं ज्यांच्या उरोंनयेचि दरें ॥६॥

स्रग्धराछंद.

भावोजी चित्रकूटीं परतुनि नगरा न्यावया शीघ्र आले ॥
माझे डोळे तुम्हातें निरखुनि बहु हे तेधवां तृप्त झाले ॥
स्वामीच्या पादुकातें वरुनि परतले बोध मानुनि मार्गे ॥
विप्रांच्या मानिले हो परम सुख अविघ्नत्व पावोनि यागें ॥७॥

आर्या.

देउनि अभय मुनीतें आशीर्वाद प्रसाद जोडून ॥
अत्र्याश्रमासि गेले स्वामी तो चित्रकूट सोडून ॥८॥

---

चालति माझ्या मागें लक्ष्मणजी काननीं पुढें स्वामी ॥
धर्मी वशीच हर्षे चालें पाहोनि आपल्या स्वामी ॥९॥

---

जैसे वासिष्ठ गाधिज जेंवि भरद्वाजगुरु तैसे अत्री ॥
नमिले शमिले खर्षभ जे सुधवळ मानसीं जसे पत्री ॥१०॥

---

जेंवि भरद्वाज तसे द्रवले पाहोनि तेहि मामाजी ॥
झाले अतितरें सुखकर कर जैसे भानुचे हिमांमाजी ॥११॥

---

तद्भार्या अनुसूया मजवरि करि सासुमायसी माया ॥
स्वकरेंचि अलंकारी आहे प्रेमासि काय सीमा या ॥१२॥

---

शार्दूलविक्रीडित छंद.

वेणी घालुनि लोचनीं निजकरें ती लेववी कज्जळ ॥
लावी चंदनें सुव्रता मज गमे गंगाचि तें तज्जळ ॥
गुंफी सत्कुसुमें शिरीं सुरुचिरा माळा गळां अर्पुनी ॥
प्रेमें धर्म कथी सुधाधिकरसें सूक्तें मला तर्पुनी ॥ १३ ॥

आर्या.

तैसाचि भालललाटीं साध्वी सिंदूर तिलक जो लावी ॥
तोहि अंगतसार सदा केशी तत्सुकृतसिद्धि बोलावी ॥ १४ ॥

वसंततिलकावृत्त.

तो अंगराग चिरकाळ तसाचि ओला ॥
यत्सौरभीं भ्रमरपंक्ति सदैव लोलों ॥
घ्राणेक्षणांसि म्हणती कुसुमेंहि डोला ॥
वेणी नवीच न सतीयश शक्य बोलों ॥ १५ ॥

आर्या.

ऊर्णा डटी[४१०] हिमीं ती ऊर्णांही सर्वकाळ परम हिमीं ॥
वृष्टि न मंदातिक्रम करि साध्वीचा नवदवेचि पर महिमा ॥ १६ ॥

शार्दूलवि० छंद.

वत्से मांडवि महिवाहचरित प्रेमें पुसे ती संती ॥
सांगावी मज लागली निजमुखें सर्वा कथा तीस ती ॥
आशीर्वाद बहू प्रसन्नहृदया दे मायसी लोभवी ॥
त्या आर्यांसि तसेंच हीसहि महावात्सल्य हें शोभवी ॥ १७ ॥

हरिणीप्लुताछंद.

मग तेथुनि ऊर्मिळे निघाले ॥ प्रभु जों दंडककाननीं रिघाले ॥
धरि राक्षस तो शरीर हातें ॥ नच हें हे नसतां शरीरी रहातें ॥१८॥

रथोद्धता छंद.

स्वामिनीं वधुनि तापसारिला ॥ त्या क्षणें सकळ ताप सारिला ॥
हा विराध सुरमान्य तारिला ॥ तुंबुरुप्रबळशाप वारिला ॥ १९ ॥

स्रग्धरावृत्त.

लोपामुद्रापति श्रीघटज मुनि जिहीं प्राशिला सिंधु अन्या ॥
सांगावी ख्याति काय त्रिभुवनमहितीं सत्तपःसिद्धिजन्या ॥
प्रेमें मानूनि पुत्रापरि रघुवर हे मानिली [४२८]हेहि कन्या ॥
दिव्यें शस्त्रें दिलीं हो म्हणुनि वरि जयश्री दुजी कीर्ति धन्या ॥२०॥

आर्या.

त्यावरि मामाजींचे [४२९]गृध्रेंद्र सखे जटायु या नांवें ॥
मोहाब्धि भेटले हो त्यांचें साधुत्व काय वानावें ॥ २१ ॥

शार्दूलवि. वृत्त.

आम्हां ते वदले स्वतातसदना आलां सुखें या वनीं ॥
वर्तो पंचवटीस्थळीं मुनिनुतीं गोदातटीं पावनीं ॥
मत्स्वामी विनयें असें विनविती बा हे स्नुषा आपली ॥
रक्षावी समयीं निवो मति इची सौंदर्शनें तापली ॥ २२ ॥

शालिनीवृत्त.

स्वामी मातें नेति गोदावरीतें ॥ यैद्वातेंही चित्त मोदीं वरीतें ॥
भावोजीनीं निर्मिली पर्णशाला ॥ तैसें दे ना रत्न वा स्वर्ण शैला ॥ २३ ॥

आर्या.

निववी मज मातासी श्रीमत्र्यंबकजटोद्भवा गंगी ॥
स्मरणें स्तवनें स्नानें शुचि करिती विश्वचित्तेवागंगा ॥ २४ ॥

ये म्हणवाया भेदुनि शोकधनें वत्सें हीं तदा विवशी ॥
स्वाम्याज्ञेनें तीतें हा लक्ष्मण वत्स होतें दावि वशी ॥ २५ ॥

स्रग्धरावृत्त.

श्रीसीतेतें तिचीही पुसाति सुभगिनी प्रेमळा जेंवि आली ॥
कोणाची कोण गे ती मळेंमाति विवशी सांग कोठून आली ॥
दुष्टेनें काय केलें सुमुखि सकळही वृत्त तें आयकोंदे ॥
बाई दुःखें सुखेंही चरित परिसतां आमुचा कोंयं कोंदे ॥ २६ ॥

शार्दूल वि०

सांगे भूमिसुता दशास्यभगिनी मांसाशनें मातली ॥
नामें शूर्पणखा कुबुद्धि विधवा नक्तंचरी पातली ॥
मायारूपवती प्रभूसि भुलली मोहीं स्मरें घातली ॥
ती त्यांच्याहि गळां पडे मति तुझी ज्यांच्या पदीं रातली ॥ २७ ॥

शिखरिणीछंद.

मला आहे स्त्री, हो मदनुजनिसौमित्रिदयिता ॥
वधू तूं योग्या त्या सुमुखि गुणरूपातिशयिता ॥
असें स्वामी तीतें कथिति, हित ती मानुनि, भजा ॥
म्हणे मातें त्यातें, तिस म्हणति ते, भानुनिभ जो ॥ २८ ॥

स्रग्धरावृत्त.

या आर्यांच्या पदांचा सुदति सतत मी दास तूं काय दासी ॥
होसी मत्स्वामिनी हो सुमुखि भज तया मानदा कार्यदासी ॥
ऐसें जें ऊर्मिळे त्वत्प्रियतम वदला ये पुन्हा तन्मना तें ॥
लावूं पाहे प्रभूंशीं समुचित नसतां सर्वशा जन्म मातें ॥ २९ ॥

पृथ्वीछंद.

प्रभूंसि कळली खरप्रकृति रम्यकोषीं सुरी ॥
तशी वरि बरी जशी रुचिर मूर्ति योषीं सुरी ॥
गमे मजहि धी गुणीं जरिहि रंगली लाज न ॥
त्यजी सुकुलज स्वयें नृपांडि अंगलीला जन ॥ ३० ॥

भुजंगप्रयात.

प्रभूतें म्हणे हें पहा आंग लीलीं—वती मी वरावें मला चांगलीला ॥
स्तवी दाखवी ती सये आस्य काय ॥ स्वयें तें पहातां नये हास्य काय ॥३१॥

आर्या.

कृत्यांशीं क्रुद्धा ती माझ्या मंदेंहि केलि गे हास्यें ॥
प्रभुदेखतांहि धांवे मज खाया भीतिकेलिगेहास्यें ॥३२॥

---

ध्यालें मी स्वामींनीं हूं म्हणतां क्रोधमंद तिचा मथिला ॥
लक्ष्मण भावोजींनीं केला जो दंड तो तुम्हां कथिला ॥ ३३ ॥

भुजंगप्रयात.

कथूं दुर्दशा ती तिची काय गे हा ॥ वदे स्वापराधें कुधी जाय गेहा ॥
खरा बंधुला अन्यथा आरडोनी ॥ स्वयें ताप सांगे करी आ रडोनी ॥३४॥

---

बनस्थानवासी खर क्रूरकर्मा ॥ न पाहे नया जो विचारी न शर्मा ॥
स्वसैन्यासि आज्ञा कुधी दे वधाया ॥ प्रभू सिद्ध झाले यशें देव धाया ॥३५॥

शार्दूलविक्रीडित.

प्रेमें लक्ष्मणजींस सांगति रणारंभींच मद्रक्षण ॥
स्वामी लाविति न द्विषद्बळवधें व्हायासि भद्रें क्षण ॥
हे तार्क्ष्य प्रभु ते चतुर्दशसहस्त्र क्रव्यभोक्ते अही ॥
बाई देखिलिं दूरुनी हि रुधिरें धाली निवाली मही ॥३६॥

पुष्पिताग्राछंद.

स्वमुख अवदसा तसेंहि दावी ॥ न धरुनि लाज कलागतीस लावी ॥
प्रकटुनि बळ [५५८] पुष्कराक्ष साचें ॥ करिति भयें मुख शुष्क राक्षसाचें ॥३७॥

वसंततिलकाछंद.

[५५९] मीया सुवर्णमृग [५६०] राक्षस त्या [५६१] खळानें ॥
जो धाडिला परमरम्य [५६२] विशृंखळानें ॥
तो वाटला निरखितां मजला धरावा ॥
न्यावा पुरा स्वजन सर्व सुखी करावा ॥३८॥

स्वगताछंद.

द्या म्हणे सुरुचिरा हरिणा मी ॥ बाइ दृष्टि न दिली परिणामीं ॥
सोडिली निपट भीड सतीहो ॥ आग्रहें तिपट [५६३] भी डसती हो ॥ ३९॥

आर्या.

देऊनि चापभाते वदल्यें लांबेल मृग धरा जा च ॥
ठेवुनि लक्ष्मणजींतें गेले स्त्रीचा नव्हे बरा [५६४] जाचें ॥४०॥

पृथ्वीछंद.

पळे मृग कळे [५६५] छळ प्रभु तया शरें ताडिती ॥
हरूनि [५६६] असु काननीं अरिस बाइ हो पाडिती ॥
तशांत खळ हाक दे प्रभुवर[५६७]स्वरां सारखी ॥
खरेंचि म्हणती [५६८] श्रुती मनहि जें बरें [५६९] पारखी ॥४१॥

शालिनीछंद.

हा सीते हा लक्ष्मणा यापरीची ॥ दीना वाणी ऐकिली म्यां अरीची ॥
बाई हो ती मद्विचारासि मोडी॥ धैर्या सोडी शोक चित्तांत जोडी ॥४२॥

आर्या.

वदल्यें मी लक्ष्मणजी [५६९] स्वाम्यें सुसंरक्षणार्थ धांवा हो ॥
धांवा हो [५७०] विपदोघीं म्हणतां सर्वस्व [५७१] भव्य कां वाहो ॥४३॥

---

तों भावोजी वदले आहे हें स्पष्ट राक्षस[५७२]छद्म ॥
[५७३] पद्मछंदाक्ष आहे विजय[५७४]श्री नित्यकेलिचें सद्म ॥४४॥

---

[५७५] गमलें लक्ष्मणजींचें वच कटु मधुरहि असत्य सत्यहि तें ॥
त्यांतें वदल्यें वचनें हृदय विदारावयासि [५७६] अंत्यहितें ॥ ४५ ॥

स्वागताछंद.

वर्ततो मदभिलाष मनांत ॥ तूं तरींच शिरलास वनांत ॥
जींत उग्रतरता असिवाणी ॥ मन्मुखांतुनि निघे असि वाणी ॥४६॥

आर्या.

क्रोधें केलें छिन्न प्रेम हृदय दुष्टवाक्शरें भिन्न ॥
त्रासें झाले खिन्नस्वांतें महीसाधु कंपित स्विन्न ॥ ४७ ॥

शार्दूल विक्रीडित.

गेले लक्ष्मणजी त्यजूनि उटजा जों तोंचि ओकां यंती ॥
तैसा ये दशकंठ दाखवि तनू जी उग्र तो काय ती ॥
सांगावी भयदा तरी न वदल्यें पावोनि मी कांप हा ॥
मंदावो परि तेज सोडिल निज ज्वाला हिमीं कां पहा ॥ ४८ ॥

आर्या.

लंघुनि बहुनगगहनें जलनिधि सोडूनि मरणशंकेला ॥
लंकेला खळ गेला वेगें घेउनि मला विपंकेलीं ॥ ४९ ॥

---

स्वामींचा मज न कळे माझा स्वामींसही समाचार ॥
सोसित होतें सत्वें अहितांचे मी महीसमा चार ॥५०॥

शार्दूलविक्रीडित.

सुज्ञाना सरमा बिभीषणवधू विद्याचि माना कळा ॥
तत्कन्या त्रिजटाहि रंजवि जशी गानाभिधाना कळा ॥
चिंतीं लक्ष्मणजीसमेत सतत स्वामींस मी चातकी ॥
जैशी जीवनदासि बाइ तिळही तो न द्रवे पातकी ॥ ५१ ॥

मंदाक्रांता.

मामाजींचे शतमख सखे धाडिती अन्नपात्र ॥
स्वामींतें मी स्मरत कंवळीं तत्प्रिया ग्रासमात्र ॥
केलें देहावन मुनिसतीनिर्मितें अंगरागें ॥
चिंती चित्त प्रभुजय सदा शत्रुचा भंग रागें ॥५२॥

# हिंदुस्थानांतील कांहीं लोकांच्या गोष्टी.

## पद्मिनीची गोष्ट.

विक्रम शक १३३१, म्हणजे इसवी सन १२७५ ह्या वर्षी राणा लक्ष्मणसिंग हा मेवाडची राजधानी चितूर एथें गादीवर बसला. तो वयानें लहान होता म्हणून त्याचा चुलता भीमसिंग ह्यानें राज्याची वहिवाट चालविली. त्या भीमसिंगानें सिंहलद्वीपच्या रावाची कन्या बायको केली होती. ती रूपानें फारच सुंदर होती म्हणून तिला पद्मिनी असें नांव दिलें होतें. तिचें सौंदर्य, तिचे गुण, तिचा महिमा, व तिचा शेवट, ह्यांचें वर्णन भाट कवींनीं मोठें रसभरित केलें आहे. त्यांतील एक कवि म्हणतो, दिल्लीचा बादशाह पठाण अल्लाउद्दीन ह्यानें चितुरावर स्वारी केली, ती केवळ कीर्तीच्या लोभानें किंवा देशाच्या लोभानें केली, असें नाहीं; तर पद्मिनीच्या लोभानें केली, हें खचीत. कारण कीं, पद्मिनी माझ्या स्वाधीन करा, असा निरोप पाठवून त्यानें शहरास वेढा घातला. शहर हस्तगत होईना तेव्हां त्यानें निरोप पाठविला कीं, पद्मिनी माझ्या स्वाधीन न कराल तर न करा; परंतु ती एकवेळ माझ्या दृष्टीस तरी पडूं द्या, म्हणजे पुरे. मग भीमसिंग ह्यानें बादशाहास सांगून पाठविलें कीं, तुम्हांस तिचें प्रत्यक्ष दर्शन तर होणार नाहींच; परंतु आरसा ठेवून त्यांत तिचें रूप दाखवूं. हें बोलणें कबूल करून, व रजपुतांवर विश्वास ठेवून, अल्लाउद्दीन, हा थोडक्या लोकांनिशीं चितूर शहरांत गेला. आणि पद्मिनीचें रूप पाहण्याची आपली इच्छा पुरवून परत जावयास निघाला. तेव्हां बादशाहानें आपणावर विश्वास ठेविला त्यापक्षीं आपणही त्यावर विश्वास ठेवण्यास मागें पुढें पाहूंनये, असें मनांत आणून राणा भीमसिंग हा बादशाहा बरोबर किल्ल्याच्या खालपर्यंत त्याला पोहोंचवावयास चालला. खालीं उतरतांना आपला निष्कपटपणा दाखविण्याकरितां बादशाह भीमसिंगास वारंवार म्हणे कीं, तुम्ही मजकारितां श्रम करून इतके लांब कशाला येतां? जा आतां माघारे. तरी भीमसिंग त्याजबराबर खालीं उतरला. अल्लाउद्दीन हा मोठा कपटी, त्यास ठाऊक होतें कीं, आपण रजपुतांवर विश्वास ठेविला तर दगा व्हावयाचा नाहीं. ते सत्यवचनी

आहेत, बोलल्याप्रमाणें करतील. आणि आपण त्यांवर विश्वास ठेवून गेलों तर भीमसिंगही मजवर विश्वास ठेवून मला पोहोंचवावयास खालपर्यंत येईल, ह्यांत संशय नाहीं. अशा भरंवशानें कांहीं शिपाई लोक त्याला धरण्याकरितां पूर्वीच दबा धरून बसविले होते. भीमसिंग खालीं येतांच त्या लोकांनीं त्यास धरून झडकर अल्लाउद्दीन ह्याच्या लष्करांत नेलें. भीमसिंग कैदेंत सांपडल्यावर अल्लाउद्दीन ह्यानें त्यास सांगितलें कीं, पद्मिनी माझ्या स्वाधीन करशील तरच मी तुला सोडीन.

हें अनर्थाचें वर्तमान चितूर शहरांतील लोकांस समजल्यावर मोठा आकांत झाला. आणि भीमसिंगास सोडविण्याकरितां बादशाहास पद्मिनी द्यावी कीं न द्यावी ह्याविषयीं मोठा विचार पडला. हें पद्मिनीला समजतांच ती म्हणाली, तुम्ही काळजी कां करितां? मी तिकडे जाण्यास कबूल आहें. असें म्हणून आपल्या अब्रूचें संरक्षण करण्याचें कांहीं साधन जवळ घेऊन ती जाण्यास सिद्ध झाली. इतक्यांत सिंहलद्वीपाहून तिच्या बरोबर आलेले दोन सरदार, एक तिचा चुलता गोरा आणि त्याचा पुतण्या बादल, ह्या दोघांनीं तिच्याशीं मसलत करून, तिच्या जिवास किंवा अब्रूस धक्का न बसतां भीमसिंगाची सुटका व्हावी अशी युक्ति काढिली. ती अशी. त्यांनीं अल्लाउद्दीनास सांगून पाठविलें कीं, तुम्हीं शहराचा वेढा उठवावा, म्हणजे आम्ही पद्मिनी तुम्हांकडे पाठवून देऊं. पण ती एकटी सडी पाठविणार नाहीं. तिच्या मोठेपणास व तुमच्या मोठेपणास शोभेल अशा रीतीचा इतमाम बरोबर देऊन पाठवूं. इतमाम हाच कीं तिच्या बरोबर दासी पुष्कळ येतील त्यांपैकीं कांहीं पद्मिनीबरोबर दिल्लीपर्यंत जातील, व कांहीं तिला तुमच्या गोटापर्यंत पोहोंचवून परत येतील. बायकांची पडदपोशी राखण्याकरितां, त्यांजकडे कोणी डोकावून पाहूंनये, अशी तुम्हीं आपल्या सर्व लोकांस ताकीद द्यावी. हें सर्व बोलणें अल्लाउद्दीनानें कबूल केल्यावर नेमलेल्या दिवशीं सातशें बुरख्याच्या पालख्या अल्लाउद्दीनाच्या गोटाकडेस जावयास निघाल्या. ह्यांनीं कोणास कळूं नदेतां दर एक पालखींत एक एक शूर शिपाई हत्यारबंद बसविला. आणि दर पालखीस सहा सहा शिपाई हत्यारें छपवून भोयांच्या वेषानें

उचलावयास लाविले होते. ही मोठी स्वारी झपाट्यानें गोटांत गेल्यावर, जेथें भीमसिंगाचा डेरा होता तेथें जाऊन, डेऱ्या भोंवतीं कनाथ लाविली होती त्या कनाथीच्या आंत सर्व पालख्या उतरल्या. तेव्हां अल्लाउद्दीन ह्यास खचीत वाटलें कीं, पद्मिनी आपल्या लष्करांत आली. त्या आनंदानें त्यानें भीमसिंगास पद्मिनीची शेवटली भेट घेण्याकरितां तिजकडे जाण्यास अर्ध्या तासाची परवानगी दिली. पद्मिनी हस्तगत झाली तरी भीमसिंगाला सोडूं नये, असें बादशाहाच्या मनांत होतें. परंतु भीमसिंग हा पद्मिनीच्या भेटीकरितां म्हणून डेऱ्यांतून जो निघाला तो एका पालखींत बसून, कांहीं दासी परत पोहोंचविण्याच्या बहाण्यानें ज्या पालख्या निघाल्या त्यांजबरोबर लष्करा बाहेर पडून, त्यासाठीं जो एक घोडा तेथें उभा केला होता त्याजवर बसून, दौडत दौडत शहरांत जाऊन पोहोंचला. इकडे अल्लाउद्दीनानें, भेटीस किती उशीर हा, लवकर अटपा, अशी घाई केली, तों दासींच्या बहाण्यानें पालख्यांतून बसलेले शिपाई एकदम बाहेर पडले, आणि अल्लाउद्दीनावर चालून गेले. अल्लाउद्दीन हा बेफाम नव्हता, तो बंदोबस्तानेंच होता. त्यानें, दगारे दगा म्हणून, आपल्या लोकांस हुकूम करून त्या सर्वांची कत्तल उडविली. आणि जे भीमसिंगाला घेऊन गेले त्यांचा पाठलाग करण्याकरितां कांहीं फौज पाठविली. तिकडे पाठलाग करणाऱ्याबरोबर युद्ध करण्याकरितां गोरा आणि बादल हे दोघे सरदार आपली फौज घेऊन बाहेर निघाले. त्यांचें तुंबळ युद्ध होऊन गोरा पडला, आणि बादल जखमी होऊन परत गेला. मग आपलें कार्य सिद्धीस गेलें नाहीं, व आपले शिपाई लोक फार मेले, असें पाहून अल्लाउद्दीन आपली फौज घेऊन निघून गेला. ह्याप्रमाणें ह्यावेळेस चितूर शहराचा बचाव झाला. पण पुढें कांहीं वर्षांनीं बादशाहानें तें शहर घेतलें. ह्याची गोष्ट वेगळी लिहिली आहे.

---

## ताराबाईची गोष्ट.

ताराबाई ही बेदनूरचा ठाकूर, रावसूरथान, ह्याची कन्या होती. हा रावसूरथान सोळंकी कुळांतला होता, आणि अन्हलवाडा येथें जे बल्हारे नांवाचे राजे प्राचीनकाळीं राज्य करीत होते त्यांच्या वंशांतला होता.

दिल्लीचा बादशाह अल्लाउद्दीन, ह्यानें सोळांकी लोकांस त्या देशांतून काढून लाविल्यामुळें ते राजपुतान्यांत जाऊन राहिले. तेथें त्यांनीं ठंकथोदा शहर व त्याच्या खालचा प्रांत मिळविला. पुढें एका अफगाण सरदारानें रावसूरथान ह्यास थोदा येथून काढून लाविल्यावर तो अरवली डोंगरांच्या पायाशीं, मेवाडच्या शिंवेच्या आंत, बेदनूर गांव आहे तेथें जाऊन राहिला. त्याची कन्या ताराबाई हिनें आपल्या कुळाचा मोठेपणा गेला होता तो फिरून मिळविण्याची आशा धरून, स्त्री जातीचा वेष व धंदा तुच्छ करून, पुरुषाचा वेष व पुरुषाचा धंदा स्वीकारिला. लढाऊ खंद्या घोड्यावर बसण्याचा, व भरधांव पळणाऱ्या घोड्यावरून निशाण मारण्याचा, व तिरंदाजी करण्याचा तिनें चांगला अभ्यास केला. अफगाणापासून आपलें थोदा शहर परत घेण्याकरितां जेव्हां सूरथानाची फौज निघाली, तेव्हां तिजबरोबर ही ताराबाई, काठेवाडच्या एका खंद्या घोड्यावर बसून, हातीं तीरकमठा घेऊन, गेली. तो उद्योग त्यावेळीं सफळ झाला नाहीं. पुढें एके दिवशीं मेवाडचा राणा रायमल्ल ह्याचा तिसरा पुत्र जयमल्ल हा स्वतां ताराबाईकडे जाऊन म्हणाला कीं, तूं माझी बायको हो. त्यावर तिनें उत्तर केलें कीं, थोदा शहर परत मिळवून माझ्या बापाला देशील तर मी तुझी बायको होईन. त्यानें हें तिचें बोलणें कबूल केलें, परंतु थोदा मिळविण्याच्या अगोदरच तिचा स्वीकार करावा ह्या हेतूनें तिच्याकडे जाऊन बळेंच तिला स्पर्श केला. हें तिच्या बापाला वाईट वाटून त्यानें त्यास जिवें मारिलें. त्याचा बाप राणा रायमल्ल ह्यास लोकांनीं सांगितलें कीं, पुत्राच्या मरणाचा सूड उगवावा. परंतु तो म्हणाला, माझ्या पुत्रानें चांगलें काम केलें नाहीं. मोठा अब्रूदार मनुष्य विपत्तींत असतां त्याच्या अब्रूस बट्टा लावावयाची इच्छा त्यानें धरिली, त्याचें फळ त्याला योग्यच मिळालें. त्यानें आणखी विशेष असें केलें कीं, पुत्राचें कृत्य आपणास आवडलें नाहीं हें दाखविण्याकरितां बेदनूरचा प्रांत सोळांकी लोकांस दिला. ही गोष्ट घडली त्यावेळेस राणा रायमल्ल ह्याचा दुसरा पुत्र, पृथुराज, हा मारवाड देशांत होता; कां कीं बापानें रागें भरून त्याला दूरदेशीं घालविलें होतें, परंतु पृथुराज ह्यानें तरवार गाजवून मोठ्या शौर्यानें गोदवाडप्रांत मिळवून बापास दिला, आणि त्याचा राग दूर केला. आपला भाऊ, जयमल्ल,

ह्यानें ताराबाईपाशीं जी प्रतिज्ञा केली ती आपण शेवटास न्यावी म्हणून तो ताराबाईकडे गेला. पृथुराजाची कीर्त्ति फार पसरली होती, म्हणून तो पुढें सरला हें पाहून ताराबाईस मोठा आनंद झाला. बापाचा हुकूम घेऊन तिनें पृथुराजास सांगितलें कीं, थोदाशहर घेऊन तुम्हांस देईन, न दिल्यास मी जातीचा रजपूत नव्हें, असें खास वचन देशील तर मी अगोदरच तुझी बायको होईन. पृथुराजानें तें कबूल करून, वचन देऊन तिशीं लग्न लाविलें. नंतर पृथुराज निवडक पांचशें स्वार बरोबर घेऊन, मोहरमाच्या संधीस हें काम साधावें अशा बेतानें, मात करण्यास निघाला. त्याची बायको, ताराबाई, हिनें त्याजबरोबर जाण्याचा आग्रह धरिला. ती म्हणाली, तुमचें यश आणि जोखीम ह्यांत मी वांटेकरीण होईन; मी घरीं बसणार नाहीं. असें बोलून तीही बरोबर गेली. मोहरमाच्या दहावे तारखेस थोदा शहरांत लोक डोले मिरवीत मिरवीत शहरच्या चौकांत राजवाड्यापुढें नेऊन उतरतात, ह्या संधीस हे थोद्यास जाऊन पोहोंचले. सारी फौज बाहेर ठेवून, पृथुराज व त्याचा एक मित्र आणि ताराबाई अशीं तिघें जण शहरांत शिरलीं, आणि जातां जातां राजवाड्याच्या सज्जाखालीं तमासगीर मंडळी जमली होती तींत जाऊन मिसळलीं. त्यावेळेस अफगाण सरदार डोल्याबरोबर जाण्याकरितां आपला पोषाक घालीत होता. तो म्हणाला, हे परकी लोक आपल्या शहरच्या लोकांत मिसळले आहेत हे कोण? असें बोलतो इतक्यांत पृथुराजाची बरची व त्याच्या शूर बायकोचा तीर एकदम लागून त्याचा जीव गेला. हें होतांच लोकांत मोठी गलबल झाली. त्या गर्दींत तिघे जण निघून वेशीपाशीं आलीं, तों तेथें एक हत्ती उभा होता त्यामुळें बाहेर पडण्यास वाट मिळेना; म्हणून ताराबाईनें आपला निमचा उसपून त्यानें हत्तीची सोंड उतरली. तेव्हां तो चीची करीत एकीकडे सरला. मग हीं तिघें बाहेर पडून आपल्या फौजेंत मिळालीं. आणि सगळे स्वार बरोबर घेऊन त्यांनीं अफगाण लोकांवर हल्ला केला. त्यांत त्यांच्या पुढें अफगाण लोकांचा टिकाव निघाला नाहीं; कांहीं मेले व कांहीं पळून गेले. शेवटीं पृथुराजानें तें शहर हस्तगत करून घेऊन, आपल्या सासऱ्यास तेथें नेऊन त्याला त्याच्या पहिल्या गादीवर बसविलें.

---

# कृष्णाकुमारी हिची गोष्ट.

मेवाडचा राणा, भीमसिंग, हा उदेपूर येथील गादीवर विक्रम संवत् १८३४, म्हणजे इसवी सन १७७८, ह्या वर्षी बसला. त्यानें सुमारें पन्नास वर्षें राज्य चालविलें. हा राजा विचारी व दृढ निश्चयाचा नव्हता; क्षणिक बुद्धीचा व हलकट कानाचा होता. त्याला पुष्कळ मुलें होतीं, पण त्यांत एक कन्या फारच सुंदर, रूपवती, केवळ लावण्याची खाण, अशी होती. तिचें नांव कृष्णाकुमारी. तिचें सौंदर्यच तिच्या, तिच्या घराच्या, व तिला मागणारांच्या नाशास कारण झालें. तिची आई प्राचीनकाळीं अन्हलवाडा येथें जे चावरे कुळाचे राजे राज्य करीत होते त्यांच्या वंशांत उत्पन्न झाली होती. म्हणून ही कन्या हिंदुलोकांत जीं फारच उत्तम कुळें आहेत त्यांतील एका कुळांतली अशी प्रसिद्ध होती. तिचें सौंदर्य पाहिलें तर जसें मुख सुरेख तसा तिचा बांधाही सुरेख होता. तिच्या बोलण्याचालण्याची ढब फारच मनोहर होती. सारांश ती सर्व गोष्टींनीं दुसऱ्याचें मन वेधणारी होती. सर्व लोक म्हणत कीं, ही कन्या आपल्या देशाला भूषविणारें रत्नच आहे.

विक्रम संवत् १८६२, म्हणजे इसवी सन १८०६, ह्या वर्षी कृष्णाकुमारीला सोळावें वर्ष लागलें. तेव्हां विवाहासाठीं तिचें मागणें दोन राजांनीं केलें. त्यावेळेस राजपुतान्यांत फार गडबड चालली होती. होळकर आणि शिंदा ह्यांनीं राजपुतान्यावर स्वाऱ्या करून करून, व खंडण्या घेऊन घेऊन, रजपूत लोकांस फारच त्रास दिला होता. आणि त्या उभयतांची इंग्रेजांशीं लढाई चालली होती त्या प्रकरणांत रजपूत राजांस गुंतवावें असाही त्यांचा प्रयत्न चालला होता. अशा संधीस जयपूरचा राजा जगत्सिंग ह्यानें तीन हजार शिपाई लोक बरोबर देऊन राणा भीमसिंग ह्याची कन्या कृष्णाकुमारी मागावयास एक वकील पाठविला. चालीप्रमाणें पोशाख व दागिनेही त्याजबरोबर पाठविले. त्या लोकांनीं उदेपुराजवळ जाऊन तळ दिला. राणा भीमसिंग ह्यानें जयपूरच्या राजाचें मागणें मान्य करून, तुम्हांस मी आपली कन्या कृष्णाकुमारी द्यावयास कबूल आहें, असें सांगून पाठविलें. तो निरोप घेऊन जे लोक जयपुराकडे गेले ते शाहापुरापर्यंत पोहोंचले अस-

तील, इतक्यांत मारवाडचा राजा मानसिंग ह्यानें सांगून पाठविलें कीं, तुमची कन्या कृष्णाकुमारी ती तुम्हीं मला दिली पाहिजे. कारण माझ्या पूर्वी जो ह्या गादीवर होता त्याला तुम्हीं देऊं केली होती. तो जरी गेला तरी ती गोष्ट राहिली असें नाहीं. हा संबंध पुरुषाला लक्षून नाहीं, गादीला लक्षून आहे, ती गादी मला प्राप्त झाली, म्हणून कन्या मलाच दिली पाहिजे. जर मला न देतां दुसऱ्यास द्याल, तर मी उगाच बसणार नाहीं; ह्या गोष्टीचा सूड घेण्यासाठीं मी तुमचा नाश करीन.

शिंद्यानें जयपूरवाल्यापाशीं कांहीं पैका मागितला होता, तो त्यानें दिला नाहीं, म्हणून शिंद्याच्या मनांत जयपूरवाल्याविषयीं वांकडें आलें होतें. तेंच मनावर धरून शिंद्यानें राणा भीमसिंग ह्यास सांगून पाठविलें कीं, तुम्हीं जयपूरच्या राजास आपली कन्या परिछिन्न देऊंनये. त्याचे लोक कन्या न्यावयास आले आहेत ते परत लावून द्यावे, आणि ती कन्या राजा मानसिंग ह्यास द्यावी. हा सिंद्याचा निरोप भीमसिंगानें मान्य केला नाहीं. ह्यामुळें शिंद्यास राग येऊन त्यानें तोफांसुद्धां आपली फौज उदेपुरावर पाठविली. हें भीमसिंगास कळतांच त्यानें आपली फौज व जयपूरवाल्याकडचे तीन हजार लोक शिंद्याच्या फौजेच्या तोंडावर पाठविले. शिंद्याच्या फौजेस बारीच्या आंत येऊं देऊंनये म्हणून उदेपूरच्या लोकांनीं फार प्रयत्न केला; परंतु शिंद्याच्या फौजेनें त्यांचा पराभव केला. मग शिंद्यानें येऊन वरकड फौज डोंगराच्या पायथ्याशीं ठेवून आठ हजार लोकांनिशीं आपण पुढें जाऊन उदेपुराजवळ तळ दिला. तेव्हां भीमसिंग ह्यास जयपूरच्या लोकांस परत पाठविणें व शिंदा सांगेल तें ऐकणें भाग पडलें. शिंदा एक महिनापर्यंत तेथें होता. त्याची व भीमशिंगाची भेट एकलिंगाच्या देवळांत झाली.

जयपूरचा राजा जगत्सिंग ह्यानें, आपला अपमान झाला व आशेचा भंग झाला ही गोष्ट चांगली झाली नाहीं, ह्या गोष्टीचा सूड उगविला पाहिजे, असें मनांत आणून राजा मानसिंग ह्याशीं लढाई करण्याकरितां मोठी फौज मिळविली. तिकडे मानसिंग ह्यानेंही जयपूराच्या राजास जिंकण्याची प्रतिज्ञा करून मोठ्या फौजेनिशीं चाल केली. त्या दोघांच्या फौजांची गांठ मारवाड व जयपूर ह्यांच्या मधल्या शिवेच्या डोंगरांत पर्वतशीर येथें पडली. त्यांची लढाई फार वेळ चालली नाहीं,

लवकरच आटपली, कांकीं, दोहोंकडच्या तोफा सुरू झाल्यावर लवकरच मारवाडच्या राजाच्या पदरीं जे ठाकूर लोक होते त्यांतून बहुतेक राजाचा पक्ष सोडून निराळे झाले. तेव्हां सहजच जयपूरच्या राजास जय मिळाला. आपला पराभव झाला हें वाईट वाटून राजा मानसिंग हा मेणांतून खंजीर काढून आपल्या पोटांत खुपसण्याच्या बेतांत होता, परंतु त्याचाच पक्ष धरून राहिलेले जे ठाकूर त्याजपाशीं होते त्यांनीं राजाच्या हातांतील खंजीर ओढून घेऊन त्याला युक्तीनें रणांगणांतून काढून दिलें. मग तो पळून आपली राजधानी जोतपूर येथें गेला. जयपूरवाल्यांनींही तेथपर्यंत त्याचा पाठलाग केला, आणि जोतपुरास वेढा घातला. जोतपूरच्या लोकांनीं मोठी मेहनत करून सहा महिनेपर्यंत आपला बचाव केला; पुढें यत्न चालेना. शेवटीं जयपूरवाल्यांनीं जोतपूर घेऊन लुटिलें, तरी जोतपूरचा किल्ला त्यांच्या हस्तगत झाला नाहीं. जोतपूरच्या आसपास वीस वीस कोसपर्यंत देश ओसाड पाडिला होता, ह्यामुळें जयपूरच्या लोकांस कांहीं दिवसांनीं अन्न मिळेनासें झालें, व त्या फौजेंत फंद फितूरही होऊं लागले. ह्या कारणांनीं जगत्सिंगास वाटलें कीं, वेढा उठवून आपणास जावें लागेल; तर जी लूट मिळाली तेवढी तरी पदरीं पाडून घ्यावी. असें मनांत आणून पर्वतशीरच्या लढाईत व जोतपूरच्या हल्ल्यांत जी लूट मिळाली होती ती कांहीं फौज बरोबर देऊन जयपुराकडे रवाना केली. परंतु ती जयपुरास पोहोंचली नाहीं; कारण, मारवाडच्या ठाकुरांनीं स्वामिभक्तीचा कंटाळा करून जरी राजा मानसिंग ह्याचा पक्ष सोडिला होता, तरी आपल्या देशाचा व जातीचा अभिमान सोडिला नव्हता, ह्यामुळें त्यांनीं मनांत आणिलें कीं, आम्हां राहाटोरांची लूट ह्या कच्छवाह लोकांनीं आम्हांदेखत आपल्या देशास न्यावी हें आम्हांस लांछन आहे. तर ही गोष्ट आपण होऊं देऊं नये. असा विचार करून त्या मारवाडच्या राहाटोर ठाकुरांनीं लागलाच पाठलाग करून ती सर्व लूट त्यांपासून परत आणिली. हिकडे आपल्या फौजेच्या बारा वाटा झाल्या, असें पाहून तो जगत्सिंग मुकाट्यानें निघून गेला. तो संकटानें असातसा आपल्या जयपुरास जाऊन पोहोंचला.

जे ठाकूर मानसिंगाचा पक्ष सोडून निराळे झाले होते, त्यांनीं एक तोतया राजा उभा केला होता, आणि त्याला मारवाडची गादी द्यावी असा त्यांचा बेत होता. परंतु त्या तोतयाचा व त्याच्या पक्षाच्या लोकांचा घात नबाब अमीरखान पठाण ह्याजकडून मानसिंगानें करविला. हा अमीरखान पैशाच्या लोभानें कोणतेंही दुष्ट कर्म करण्यास मागें पुढें पाहत नसे. तोच होऊन मानसिंगाकडे येऊन म्हणाला, मला अमुक द्रव्य द्याल तर मी तोतया व त्याच्या पक्षाचे ठाकूर ह्यांचा नाश करीन. तें त्याचें बोलणें मानसिंगानें कबूल केल्यावर अमीरखान ह्यानें कपटानें तोतयाची चाकरी धरिली. आणि त्याला विश्वास येण्याकरितां मुसलमान लोकांच्या एका मशिदींत जाऊन तोतया व त्याचे ठाकूर ह्यांशीं आपल्या पागोट्यांची अदलाबदल केली. मग हा मोठा बलिष्ठ सरदार आपणाकडे आला, हें पाहून त्या लोकांस मोठा आनंद झाला. पुढें एके दिवशीं सर्व लोक आपल्या डेऱ्यांत मेजवान्या, नाच, रंग, गाणें, बजावणें ह्यांच्या आनंदांत गुंतले असतां अमीरखानानें एकाएकीं डेऱ्यांच्या दोऱ्या कापून डेरे त्यांच्या आंगावर पाडिले. मग ते लोक गोफाट्यांत सांपडले असतां त्यांजवर तोफांचा मार करून सर्वांचा जीव घेतला. ह्या विश्वासघाताच्या युक्तीनें त्या तोतयाचा शेवट झाला.

इतका जरी अनर्थ झाला तरी देशाला स्वस्थपणा मिळाला नाहीं. कारण कीं, युद्धाचें जें मूळचें कारण, कृष्णाकुमारी, तें कायमच होतें. तिला मागणारे जे दोघे राजे त्यांतून एकही आपलें मागणें सोडीना. तेव्हां तो दुष्ट अमीरखान पठाण ह्याच्या मनांत कल्पना आली कीं, ह्या कुमारीच्या जिवाचा बळी देऊन युद्धाचें मूळ काढून टाकावें. मग त्या खानानें उदेपुरास जाऊन अजितसिंग ह्याच्याद्वारें राणा भीमसिंग ह्याशीं बोलणें लाविलें कीं, मुलगी राजा मानसिंग ह्यास द्यावी; नाहीं तर तिचा जीव घेऊन लढाईचें प्रकरण मिटवावें. अजितसिंगाच्या ह्या बोलण्यावरून भीमसिंगाच्या मनांत आलें कीं, आपली आवडती कन्या राहाटोर राजास द्यावी हें मला बरें वाटत नाहीं, आणि त्याला न दिली तर हा दुष्ट पठाण सूड घेतल्यावांचून राहणार नाहीं. हा आमच्या राजवाड्यावर हल्ला करून मुलीची व सर्व राणी लोकांची अब्रू घेईल, ह्यांत संशय नाहीं. इतकें संकट आणून घ्यावें त्यापेक्षां

मुलीचाच जीव घ्यावा हें बरें, असें मनांत भरल्यावरून मुलीचा जीव घ्याव-याचा त्यानें निश्चय केला. हें कृत्य पुरुषाच्या हातानें करवावें असें पहिल्यानें योजिलें होतें, आणि तें हलक्या पुरुषाच्या हातून करवूं नये म्हणून राण्याच्या घराण्यांतला राणा दौलतसिंग म्हणून त्याचा भाऊ-बंद होता, त्याजपाशीं अजितसिंगानें गोष्ट काढिली कीं, उदेपूरची अब्रू राखण्याकरितां हें कृत्य आपल्या हातून झालें पाहिजे. हें ऐकून राणा दौलतसिंग ह्याच्या आंगावर रोमांच उभे राहिले, आणि तो आवेशानें म्हणाला, ज्या जिभेनें ही आज्ञा होते ती जीभ झडो, आणि ह्या रीतीनें जर माझी स्वामिभक्ति खरी होणार, तर ती जळो स्वामिभक्ति! मला कांहीं गरज नाहीं. ह्याप्रमाणें दौलतसिंग पत्करीना, तेव्हां हें काम कोणास सांगावें, असा विचार पडला. मग राण्याच्याच घराण्यांत महाराज जोबन-दास म्हणून लेंकवळ्यांतला कोणी होता, त्याजपाशीं अजितसिंगानें गोष्ट काढिली कीं, हें काम तर झालेंच पाहिजे, हें हलक्या मनुष्याच्या हातानें व्हावयाचें नाहीं, आपल्या हातून होईल, ह्याजकरितां आपण मनावर घेऊन हें काम केलें पाहिजे. असें बोलून ह्यानें त्याचें मन वळविलें. मग तो हातीं खंजीर घेऊन कृष्णाकुमारीच्या महालांत गेला. कृष्णाकुमारी त्याच्या दृष्टीस पडली तेव्हां तिचें तारुण्य व सौंदर्य पाहून त्याच्या मनाला मोठा धक्का बसला, तेणेंकरून त्याच्या हातांतला खंजीर खालीं पडला. आणि फार दुःखी होऊन तो तेथून निघून गेला. तिची आई जवळ होती तिला तो खंजीर पाहतांच समजलें कीं, हा खंजीर माझ्या मुलीचा जीव घेण्यासाठीं येथें आला. मग तिनें जो रडून आकांत केला तेणेंकरून राजवाडा दणाणून गेला. तिनें अनेकवेळां किंकाळ्या फोडिल्या, राण्यास व त्या मसलतींत जे होते त्यांस नानाप्रकारचे वाईट शाप दिले; आणि, अहो कोणी दया करा, अहो कोणी माझ्या मुलीचें रक्षण करा, अहो कोणी माझ्या मुलीचा प्राण वांचवा, असें ज्याला त्याला म्हणूं लागली. इतकें झालें तरी ती कुमारी गडबडली नाहीं. ह्यावेळेस ह्या रीतीनें तिचें मरण तहकूब झालें, परंतु अगदीं बंद झालें नाहीं. नंतर हें काम पुरुषाच्या हातून होत नाहीं, तर बायकांच्या हातून करवावें; खंजीर रद्द झाला तर विषाचा पेला तयार करावा, असें अजितसिंगानें ठरविलें. मग बायकांच्या हातानें विषाचा पेला तयार करवून राण्याच्या

नांवानें कृष्णाकुमारीला निरोप धाडला कीं, हा पेला प्यावा. तेव्हां तिनें बापाचा निरोप ऐकून निरोप सांगणारणीच्या हातून तो पेला आपल्या हातीं घेऊन तेथूनच बापास वंदन केलें, आणि आपल्या बापाचें आयुष्य दीर्घ व्हावें व यश वाढावें ह्याविषयीं देवास प्रार्थना करून, नानू नकरितां ती विषाचा पेला प्याली. तिची आई जवळ होती तिनें हें कृत्य पाहून कावरीबावरी होऊन राण्यावर शिव्यांचा वर्षाव केला, व रडण्याचा आकांत मांडिला. परंतु कृष्णाकुमारीच्या डोळ्यांतून किंचितही असूं निघालें नाहीं. तिनें उलटें आईचें समाधान केलें. ती म्हणाली, अगे आई, तूं आपणास इतकें कां दुःख देतेस? माझ्या दुःखाचा शेवट होतो हें तूं जाणत असतां इतका आकांत कशाला करितेस! मला मरायाचें कांहीं वाईट वाटत नाहीं. मी रजपुताची बेटी तुझ्या पोटीं झालें आहेंना? मीं कां मरणाला भ्यावें? रजपुतांच्या मुली जन्मास आल्या कीं मरण जवळच असतें. माझ्या बापानें इतके दिवस मला वांचूं दिलें हाच त्याचा मजवर उपकार आहे. अशा समाधानाच्या गोष्टी आईशीं बोलत आहे तों प्यालेलें विष पोटांत न राहतां उमळून वर आलें, आणि ओकून पडलें. मग दुसरा विषाचा पेला तयार करून आणिला तो ती प्याली. पण तोही ओकून पडला. त्यावर तिसरा पेला तयार झाला, तोही ती पिऊन गेली; परंतु तें विष पोटांत राहिलें नाहीं, तेंही लागलेंच ओकून पडलें. ह्याप्रमाणें तीन वेळ झालें तरी ह्या क्रूर कामाचे प्रवर्तक जे पठाण व अजितसिंग ह्यांस तें काम शेवटास नेल्यावांचून राहवेना. म्हणून त्यांनीं शेवटचा उपाय हा केला कीं, कुसुंब्याचा काढा करून त्यांत अफूचा अर्क घालून पेला तयार करविला. तो पेला येतांच कृष्णाकुमारीनें हातीं घेऊन हास्यवदन करून, ह्याचा तरी परिणाम लवकर होवो, असें बोलून तो झटकर पिऊन टाकिला. ह्या चवथ्या पेल्यानें त्या पाषाणहृदय लोकांचा बेत सिद्धीस गेला. तिला लवकरच झोंप लागली, ती निजली ती पुन्हा उठली नाहीं. तिची आई कन्येच्या शोकानें अन्न सोडून थोडक्याच दिवसांनीं मरण पावली.

कृष्णाकुमारीचें मरण ऐकून कोणाच्या डोळ्यांतून पाणी निघाल्यावांचून राहिलें नाहीं. जेव्हां अजितसिंगानें अमीरखानास जाऊन कळविलें कीं, तुमचा बेत सिद्धीस नेला, तेव्हां तो खान पाषाणहृदयाचा

दुष्ट, व क्रूर असतांही त्यास वाईट वाटून त्यानें अजितसिंगाचा धिक्कार केला, आणि त्याची निर्भर्त्सना करून, नीच माझ्याबद्दल, तोंड दाखवूं नको; रजपुतांचें हेंच काय काम, आणि हेंच काय शौर्य! भा, भा, भ्र, असें म्हणून त्यास घालवून दिलें.

हें दुष्ट व घोर कर्म अजितसिगानें केलें त्याचें फळ देवानें ह्या लोकीं देखील त्यास लवकरच दिलें. एका महिन्याच्या आंत त्याची बायको व दोन पुत्र मरण पावले. त्या दुःखानें तो भ्रमिष्ठ होऊन हातीं जपमाळ घेऊन देवळोदेवळीं हिंडूं लागला.

असें सांगतात कीं राणा भीमसिंग ह्यास पंचाण्णव मुलें होतीं. त्यांतून एक पुत्र व दोन कन्या अशीं तीन मात्र राहिलीं; बाकींचीं सारीं त्याच्या देखत मरण पावलीं.

---

## अहल्याबाई होळकरीण.

### इ० स० १८००

अहल्या बाई होळकरीण हिचा लौकिक सगळ्या हिंदुस्थानांत आहे. ह्या साध्वीचें नांव ज्यास ठाऊक नाहीं असा मनुष्य विरळा. तिच्या औदार्याचें, भूतदयेचें, व धार्मिकतेचें कांहींच चिन्ह जेथें नाहीं, असा तर हिंदुस्थानाचा कोणताच भाग नाहीं. दक्षिणेस रामेश्वरापासून तों तहत उत्तरेस बदरीकेदारापर्यंत जीं जीं प्रसिद्ध क्षेत्रें व पुण्यस्थानें आहेत त्या त्या ठिकाणीं अहल्याबाईचें कांहींना कांहीं कृत्य किंवा देणें आहेच. कोठें देवालयें, कोठें धर्मशाळा, कोठें तलाव इत्यादि धर्मकृत्यें केलीं आहेत. कोठें तिनें अन्नसत्रें व सदावर्तें घातलीं आहेत. कोठें कोठें देवस्थानांस इनामें वगैरे दिलीं आहेत. तेव्हां इतकी प्रसिद्ध जी स्त्री तिच्या गुणांचें वर्णन करणें योग्य आहे.

अहल्याबाई ही मल्हारराव होळकराचा मुलगा जो खंडेराव त्याची बायको होय. ती सुमारें एकवीस वर्षांची असतां तिचा नवरा निवर्तला. तिला मालीराव म्हणून एक न्नात्य मुलगा होता. तो एका भांड्यात कांहीं द्रव्य व विंचू घालून, लोभी गरीब अशा ब्राह्मणांस आंतील द्रव्य ध्यावयास सांगे. त्यांनीं आंत हात घातला म्हणजे त्यांस

विंचू नांगी मारी. आणि त्यामुळें त्यांस वेदना होऊं लागल्या म्हणजे, तो दुष्ट पोर हांसून त्यांची मौज पाही. अहल्याबाई तर, ब्राह्मणांस फारच पूज्य मानीत असे. ती आपल्या मुलास त्याच्या कर्मावरून राक्षस म्हणे. हा मुलगा फार दिवस वांचला नाहीं.

एके वेळीं असें झालें कीं, मालीरावाच्या बायकोस दत्तक पुत्र देण्याच्या कामीं अभिमानीं पडून, राघोबादादा पेशव्यानें अहल्याबाईवर स्वारी करण्याचा निश्चय केला. हें तिला समजलें. परंतु ती मोठी धिराची व निश्चयाची बायको होती. तिनें न घाबरतां राघोबादादास असें सांगून पाठविलें कीं, आपण मजवर चालून येण्यापूर्वीं पुरता विचार करावा; स्वारी करून आपण माझा पराभव केला, तर त्या विषयीं मला कांहीं वाईट वाटावयाचें नाहीं, कारण, मी बोलून चालून बायको आहें; आणि स्त्रीचा पराभव करण्यांत आपणासारिख्या शूर सरदारांस मोठें भूषण आहे, असें नाहीं; परंतु दैववशात् जर माझे सेनेनें आपला मोड केला, तर मात्र जन काय म्हणतील, ह्याचा विचार करा. हें उत्तर ऐकून राघोबानें स्वारीचा बेत रहित केला.

अहल्याबाई आपल्या रयतेपासून वसूल नेमस्त घेई, व वतनदारांच्या हक्कांस फार जपत असे. लोकांच्या फिर्यादी स्वतः ऐके. निवाडा करण्याचें काम तिनें पंचांकडे सोपविलें होतें. तिची गांठ घेण्यास कोणालाही आडकाठी नसे. न्यायकरणें हें आपलें कर्त्तव्य कर्म आहे; अन्याय केला तर आपणास पाप लागेल, असें ती पक्कें समजत असे, आणि त्याप्रमाणें नित्य वागत असे.

राज्यकारभाराचें काम आटपून जो वेळ सांपडे, तो ती साध्वी ईश्वर भजनांत व पुण्यकर्मांत घालवी. ती वारंवार म्हणे कीं, मी अधिकाराच्या बळानें जें कृत्य करितें, त्याचा हिशेब मला देवापुढें दिला पाहिजे. कोण्या अपराध्यास देहान्त शासन करण्याविषयीं तिच्या मंत्र्यांनीं तिला सांगितलें, तर ती त्यांस उत्तर देई कीं, बाबांनो आपण स्वतः मनुष्यें आहों, आपणांस मरावयाचें आहे, तेव्हां ईश्वरानें घडलेल्या प्राण्यांचा जीव आपण एकाएकीं कसा घ्यावा बरें!

अहल्याबाई पहांटेच्या दोन घटिका रात्रीं उठून नामस्मरण करी. नंतर स्नान करून देवधर्म करी. मग पुराण ऐकावयास बसे. त्यानंतर

ती ब्राह्मणांस नित्यदानें व शिधे देई. इतकें आटोपल्यावर तिनें भोजन करावें. ती जातीची शूद्र होती, तरी मद्य मांस खात नसे. जेवण झाल्यावर कांहीं स्तोत्रें म्हणून ती थोडा वेळ निजे. नंतर उठून पोषाक करून ती कचेरीस जाई. तेथें ती सूर्यास्तापर्यंत कामकाज पाहत बसत असे. नंतर प्रहर रात्र होई तोंपर्यंत ती आपला संध्याकाळचा देवदेव व फराळ हीं कामें आटोपी; आणि पुनः कारभार पहावयास लागे, ती सुमारें मध्य रात्री पर्यंत तिकडे गुंतलेली असे. नंतर निजावयास जाई. ह्याप्रमाणें तिनें तीस वर्षे घालविलीं. ती उपास, व्रतें, देवाचे उत्साह, इत्यादि अनेक पुण्यकर्मे करी. तिच्या दरबारांत गोविंदपंत गानू म्हणून एक चांगला शहाणा व प्रामाणिक कारभारी होता.

इंदूर हें मूळचें लहान खेडें होतें, त्याचें अहल्याबाईनें मोठें शहर केलें. ह्या शहरावर तिची फार कृपा असे. त्यांतील लोकांवर ती पोटच्या पोरांप्रमाणें माया करी. त्या शहरांतला कोणी देवीचंद म्हणून श्रीमान् सावकार मरण पावला. तेव्हां त्याच्या संपत्तीचा कांहीं अंश अहल्याबाईचा मानिलेला पुत्र तुकोजी, ह्यानें आपणाकडे घेण्याचा यत्न चालविला. हें वर्त्तमान त्या सावकाराच्या बायकोनें महेश्वरीं जाऊन अहल्याबाईस कळविलें, तेव्हां तीस दया येऊन तिनें तुकोजीस सांगून पाठविलें कीं, आमच्या शहरच्या लोकांच्या दौलतीवर तुम्ही डोळा कधींही ठेवूं नये.

अहल्याबाईवर एका मागून एक असे दुःखाचे पर्वत कोसळले. तिचा भ्रतार लहानपणींच वारला. पुढें दोन वर्षांनीं तिला पुत्रशोक झाला, हें मागें सांगितलेंच आहे. तिला मंचाबाई म्हणून एक मुलगी होती, तिला एक पुत्र झाल्यावर तिचा नवरा कैलासवासी झाला. तेव्हां मंचाबाई सती जाण्यास निघाली. तिला, तूं सती जाऊं नको, असा अहल्याबाईनें पुष्कळ आग्रह केला; परंतु ती कांहीं एक ऐकेना. शेवटीं तिनें पतीशीं सहगमन केलें. तेणेंकरून अहल्याबाईस अतिशयित दुःख झालें.

अहल्याबाई साठ वर्षांची होऊन मरण पावली. ती फार उंच नव्हती व ठेंगणीही नव्हती. शरीरानें ती सडपातळ असे. ती म्हणण्यासारखी सुंदर नव्हती, तरी तिची मुखचर्या फार तेजःपुंज दिसे. ती पोषाक अगदीं साधा करी. एकदां रागावली, म्हणजे

तिजपुढें कोणाच्यानें एक शब्द सुद्धां बोलवत नसे. नवरा मेल्यापासून ती पांढरीं वस्त्रें नेसे. रंगाचें पांघरूण तिनें तेव्हांपासूनच अगदीं वर्जिलें होतें. ती संस्कृत पुराणें वाची, व त्यांचा तिला चांगला अर्थ कळत असे. तिची कोणीं स्तुति केली, तर ती तिला अगदीं आवडत नसे. तारुण्याची भरज्वानी, अमर्याद ऐश्वर्य व सत्ता, ह्या गोष्टी अनुकूल असून, नवरा गत झाला असतांही तिचें पातिव्रत्य तिळभर चळलें नाहीं, अशी जी पुण्यवती सती अहल्याबाई होळकरीण, तिची जितकी स्तुति करावी, तितकी थोडीच वाटते.

आधीं दुनियेमध्यें चांगलीं माणसें थोडीं निपजतात; त्यांत राजे रजवाड्यांच्या कुळांत तर फारच कमी. इतिहासाकडे पहावें तों, क्रूर, दुष्ट, दुराचारी, मत्सरी, लोभी, अशा पुरुषांच्या झुंडीच्या झुंडी दृष्टीस पडतात. समुद्राच्या काळ्या रेतीच्या अफाट मैदानामध्यें जशीं पांच चार मोत्यें मध्येंच चमकावीं, तशीं चांगलीं व थोर माणसें ह्या पृथ्वीमध्यें क्वचित् आढळतात. त्यां पैकीं हें एक मोतीं परमेश्वराच्या कृपेनें आमचे हिंदुस्थान देशांत पैदा झालें होतें, व त्याच्या नांवानें आमच्या देशाच्या इतिहासास शोभा आली आहे, हें पाहून, कोणाही स्वदेशाभिमानी पुरुषास अत्यानंद झाल्यावांचून राहणार नाहीं.

---

## शिवाजी.

### जन्म इ० स० १६२७—मृत्यु इ० स० १६८०.

हा महान पराक्रमी पुरुष ह्या महाराष्ट्र देशामध्यें होऊन गेला. ह्याजविषयीं इतर देशच्या लोकांचे अभिप्राय कसेही असोत; त्यांजकडे आम्हांस लक्ष द्यावयाचें नाहीं, परंतु ह्यानें आम्हां महाराष्ट्र देशांतील लोकांचें नांव गाजविलें; आम्हांमध्यें शौर्य, धैर्य, इत्यादि गुण आहेत, हें सर्व जगास दाखविलें; आमच्या लोकांचें राज्य स्थापिलें; आणि आम्हांस अगदी रानटी स्थितींतून काढून बऱ्याच योग्यतेस चढविलें; ह्या गोष्टी आमचे मनांत येऊन, आमचे ठायीं त्याजविषयीं पूज्य भाव उत्पन्न होतो, आणि असा पुरुष पूर्वी एका काळीं आमच्या देशांत होऊन गेला म्हणून आम्हांस मोठा गर्व वाटतो, ह्यांत काय नवल आहे? म्हणून त्याचें चरित्र आम्ही येथें थोडक्यांत लिहितों.

आधीं प्रथम शिवाजीच्या पूर्वजांची हकीकत सांगितली पाहिजे. दौलताबादेजवळ वेरूळ म्हणून एक गांव आहे, तेथें भोंसले ह्या आडनांवाचे मराठे राहत असत. त्यांजकडे वेरूळ वगैरे कितीएक गांवांची पाटीलकी होती. पहिला प्रसिद्ध भोंसला बाबजी. त्याला विठोजी व मालोजी असे दोन मुलगे झाले. त्यांपैकीं मालोजीस, जगपाळराव नाईक निंबाळकर फलटणचे देशमुख ह्याची बहीण दिपाबाई ही दिली होती. मालोजी पंचवीस वर्षांचा झाला तेव्हां त्यानें अहमदनगराच्या राज्यांत लुखजी जाधव म्हणून एक प्रतिष्ठित सरदार होता त्याच्या आश्रयानें त्या सरकारची चाकरी धरिली. हें वर्तमान इ० स० १५७७ त घडलें. मालोजीस पुत्र होत नव्हता, म्हणून त्यानें, अहमदनगरांत शाहसरीफ नामें मोठा अवलिया होता, त्याची प्रार्थना केली. त्यानें मालोजीस वर दिला. तदनंतर कांहीं दिवसांनीं मालोजीस पुत्र झाला. तो आपणास शाहसरीफाच्या प्रसादानें झाला असें समजून मालोजीनें त्याचें नांव शाहाजी असें ठेविलें, नंतर दुसरे वर्षी त्यास दुसरा पुत्र झाला. त्याचें नांव त्यानें सरीफजी असें ठेविलें.

मालोजी, सरकारचीं कितीएक चांगलीं चांगलीं कामें बजावून, बऱ्याच योग्यतेस चढला. लुखजी जाधव त्याजवर कृपा करूं लागला. शाहाजी हा रूपानें फार चांगला होता. तो इ० स० १५९९ त पांच वर्षांचा असतां, त्यास, त्याचा बाप मालोजी ह्यानें, शिमग्यामध्यें जाधवरावाकडे भेटण्यास नेलें. तेव्हां लुखजी त्या मुलास पाहून फार खुष झाला. आणि त्यास जवळ बोलावून, त्याची मुलगी जिजाबाई त्याच्या मांडीवर बसली होती तीस विनोदानें म्हणाला, मुली, हा तुला नवरा पाहिजे काय? आणि मंडळी कडे पाहून तो बोलला, पहाहो, हा जोडा कसा दिसतो तो! इतक्यांत तीं दोन्हीं मुलें एकमेकांच्या आंगांवर गुलाल उधळूं लागलीं हें पाहून सर्व मंडळीस मोठा चमत्कार वाटला, आणि ते हांसूं लागले. त्यावेळीं मालोजी भोंसला उभा राहून मोठ्या हर्षानें तेथल्या मंडळीस म्हणाला, "ऐकाहो सर्व मंडळी, आजपासून जाधवराव आमचे व्याही झाले, त्यास तुम्ही साक्ष आहांत." दुसरे दिवशीं जाधवरावानें मालोजीस भोजनास बोलाविलें. तेव्हां मालोजीनें त्यांस उत्तर दिलें कीं, तुम्ही व्याही खचीत व्हाल तर मी येईन, नाहीं तर येणार

नाहीं. त्यावेळीं हें बोलणें इतकेंच राहिलें. नंतर हें सगळें वर्त्तमान जाधवरावाच्या बायकोस कळलें. तेव्हां तिला फार राग आला; आणि, माझ्या मुलीची योग्यता केवढी, आणि तो भोंसल्याचा पोर तो काय, असें म्हणून तिनें ती सर्व गोष्ट नापसंत केली.

आपण द्रव्यहीन म्हणून ही आपली मानखंडना झाली, असें पक्कें समजून मालोजीनें नानाप्रकारचे प्रयत्न करून पुष्कळ धन मिळविलें. आणि तें चांभारगोंद्याचा सावकार शेषाप्पा नाईक ह्याजकडे ठेविलें. आणि लोकांत अशी प्रसिद्धि केली कीं, देवी प्रसन्न होऊन आम्हांस तिनें वर दिला आहे; त्यांत असें आहे कीं, थोडक्याच दिवसांमध्यें आमच्या कुळांत एक मोठा पराक्रमी राजा उत्पन्न होईल; तो शंकरा प्रमाणें गुणवान् निघेल; तो गोब्राह्मणांचें चांगलें पालन करील; आणि त्या पुरुषापासून पुढें सत्तावीस पिढ्यांपर्यंत तें राज्य निर्बाध चालेल. ह्या प्रकारच्या गोष्टी लोकांच्या मनांत भरवून, त्याच्या पुष्टीकरणार्थ त्यानें अनेक देवालयें बांधिलीं. आणि अशा प्रकारें आपलें महत्व लोकांमध्यें बरेंच वाढविलें. ह्याच सुमारास तेथच्या, म्हणजे अहमदनगरच्या, दरबारांत पुष्कळ बखेडे होऊन त्यास उतरती कळा लागली होती. ही संधी साधून मालोजीनें दरबारच्या लोकांस लांच वगैरे देऊन बादशाहापासून पांचहजार स्वारांची सरदारी, आणि मालोजी राजे हें नांव अशा दोन मोठ्या गोष्टी संपादिल्या. शिवाय शिवनेरी व चाकण हे दोन किल्ले व त्यांचे खालचा मुलूख ह्याची मामलत हीं त्यानें आपणाकडे करून घेतलीं. आणखी त्यास पुणें व सुपें हे दोन परगणे जहागीर मिळाले. एवढी योग्यता मालोजीस प्राप्त झाल्यावर बादशाहाच्या आज्ञेनें जाधवराव व भोंसले ह्यांचें सोयरेपण जमून, शाहाजी व जिजाबाई ह्यांचें लग्न मोठ्या टोलेजंग समारंभानें झालें.

अकबर बादशाहानें दक्षिणेंत स्वारी केल्यापासून अहमदनगरचे राज्यास उतरती कळा लागली होती. आणि तशांत शाहाजहानानें स्वारी केली तेव्हां तर तें अगदींच मोडकळीस आलें. त्यास कोणी त्राता नाहींसा झाला. मोंगलांचे सरदार प्रबल होऊन देशास त्रास देऊं लागले अशा प्रसंगीं अहमदनगरच्या दरबारास धरून राहून उपयोग नाहीं, असें मनांत आणून शाहाजी शाहाजहानास मिळाला. त्याचा त्यानें बहुमान केला. हें वर्तमान इ० स० १६२९ त घडलें.

शाहाजी मोंगलांकडे गेला तेव्हां त्या बादशाहानें त्यास कांहीं इनाम दिलें होतें, तें फतेखान नामक सरदारानें कपटें करून त्याजकडून काढून आपणाकडे घेतलें. ह्याचें शाहाजीस फार वाईट वाटून तो तें सरकार सोडून विजापूरकरांच्या नौकरीस राहिला. नंतर अहमदनगरचें राज्य आपलें मूळचें धनी तें बुडत आहे तें आपण चालवावें, असें शाहाजीच्या मनांत आलें. त्या प्रमाणें नवा बादशाह गादीवर बसवून व कांहीं शहाणे ब्राह्मण लोक मदतीस घेऊन, त्याचा कारभार त्यानें कांहीं दिवसपर्यंत हांकिला. पुढें तो विजापूरकरांच्या आश्रयानें देशामध्यें लुटालूट करीत असे. त्याचा बंदोबस्त मोंगलांच्या लोकांनीं केला. असो.

ह्या लेखाचा मुख्य विषय शाहाजीचा पुत्र शिवाजी, हा, इ० स० १६२७ ह्या वर्षीं शिवनेरी किल्ल्यांत जिजाबाईचे पोटीं जन्मला. त्यास लहानपणीं शाहाजीनें आपला विश्वासू कारकून दादोजी कोंडदेव ह्याजपाशीं पुणें येथें आपले जहागिरींत ठेविलें. तो कारकून शाहाजीच्या मुलुखाच्या वसुलाचें काम पाहत असे. शिवाजीस लिहिणें वाचणें कोणीं शिकविलें नाहीं. घोड्यावर बसणें, नेम मारणें, दांड, पट्टा, इत्यादि शौर्याच्या कला त्यास चांगल्या पढविल्या होत्या. भारत भागवतांतील युद्धकथांची त्यास फार आवड असे. तो जरासा मोठ्या वयांत आल्या बरोबर उनाड व दांडग्या लोकांच्या संगतीस लागला. आणि तो पुढें लवकरच स्वेच्छाचारी होणार, असें दादोजीस दिसून आलें. त्याच्या जहागिरींत डोंगरांमध्यें राहणारे मावळे म्हणून रानटी, धीट, व एकदा धनी म्हटला म्हणजे त्याच्या कार्यार्थ केवळ जीव देणारे असे लोक पुष्कळ असत. त्यांना सर्व चोरवाटा ठाऊक होत्या. तेणेंकरून ते शिवाजीस शिकारीच्या कामीं उपयोगीं पडत असत. त्यामुळें शिवाजीची मर्जी त्यांजवर बसली, व तेही त्यास एकनिष्ठपणें भजूं लागले. इतके कीं, त्यानें एखादें काम सांगितलें तर ते तें जिवाची देखील पर्वा न धरितां करीत. आणि त्या लोकांचा जमावही बराच होता. तेणेंकरून शिवाजीच्या मनांत असें आलें कीं, आपण एक स्वतंत्र किल्ला मिळवावा. ह्या कामास त्याचे तीन मित्र त्यास सहाय झाले; येसाजी कंक, तानाजी मालुसरे, आणि बाजी फसलकर.

त्यांनीं इ० स० १६४६ त त्यास तोरणा किल्ला हस्तगत करून दिला. हाच शिवाजीच्या राजकीय कारकिर्दीचा आरंभ म्हटला पाहिजे.

हा तोरणा किल्ला विजापूरच्या बादशाहाच्या ताब्यांत होता. त्यास शिवाजीनें असें कळविलें कीं, " मीं जो हा किल्ला घेतला आहे, तो आपल्या राजधानीपासून फार दूर आहे. येथचे लोक फार द्वाड आहेत, ह्या-स्तव ही जागा विश्वासू सेवकाच्या हातीं असली तरच देशाची व्यवस्था बरोबर राहणार आहे. असें मनांत आणून ही तजवीज केली आहे." ह्या त्याच्या बोलण्यावरून किल्ला त्याजकडे रहावा अशी जरी बादशा-हाची आज्ञा झाली नाहीं तरी त्यानें दरबारच्या लोकांस गुप्तपणें पुष्कळ लांच दिल्यावरून, तेथें ही गोष्ट पुनः कोणीं काढिली नाहीं. आणि तो किल्ला तसाच शिवाजी कडे राहिला. नंतर त्यानें मावळे लोक चाकरीस ठेवून त्यांचे हातून त्याची चांगली दुरुस्ती केली. पुढें एके दिवशीं किल्ल्या मध्यें खणीत असतां त्यास एक मोठा थोरला मोहरांचा हांडा सांपडला. तेव्हां त्यानें लोकांत अशी प्रसिद्धि केली कीं, मला देवी प्रसन्न आहे. ती पाहिजे तितकें द्रव्य देते. हें बोलणें त्या देव-भोळ्या भावार्थी लोकांस खरें वाटलें, आणि तेणेंकरून त्यास ते सर्व फार भजूं लागले.

नंतर शिवाजीनें दारू गोळा वगैरे युद्धोपयोगी सामान बरेंच जमवून ठेविलें. आणि इ० स० १६४७ ह्या वर्षी तोरणा किल्ल्याच्या आग्नेयी दिशेस दीड कोसावर मोरबद पर्वतावर एक किल्ला बांधिला. आणि त्याचें नांव त्यानें राजगड असें ठेविलें.

हें सर्व वर्तमान विजापूरच्या बादशाहास समजलें. राजगड किल्ला बांधण्यास शिवाजीनें आरंभ केल्यावर, त्यास त्या बादशाहानें मनाईचें पत्र पाठविलें होतें. परंतु त्यानें त्यास जुमानिलें नाहीं. तेव्हां हा मजकूर त्या बादशाहानें शाहाजी कर्नाटकांत गेला होता त्यास कळविला. त्यावर त्यानें उत्तर दिलें कीं, हा माझा अपराध नव्हे; ज्याचें त्यास पुसावें. परंतु माझा पुत्र सरकारचा विश्वासू नौकर आहे; तो सरका-रचें हित पाहिल्यावांचून कोणतीही गोष्ट करावयाचा नाहीं.

पुढें लवकरच दादोजी कोंडदेव मरण पावला. प्राण सोडिते वेळीं त्यानें शिवाजीस सांगितलें कीं, तूं आपल्या पराक्रमें करून गोब्राह्मणाचें

पालन पोषण कर, आणि माझ्या मुलां माणसांस संभाळ, एवढेंच तुजपाशीं मागणें आहे. दादोजीच्या मागें जहागिरीचें काम शिवाजी जातीनें पाहूं लागला. परंतु उत्पन्नाचा ऐवज मागण्या करितां जेव्हां शाहाजी कडचे लोक त्याजकडे आले, तेव्हां, येथचा पैसा येथेंच पुरत नाहीं, तिकडे पाठवावें काय, असें सांगून त्यानें त्यांस परत पाठविलें.

चाकणचा किल्लेकरी, फिरंगोजी नरसाळा, आणि सुपें परगण्याचा मामलतदार, बाजी मोहिते, हे दोघे शाहाजीचे नौकर होते. त्यां पैकीं फिरंगोजी हा शिवाजीनें वकील पाठवून वश करून घेतला; आणि त्याला अमल्याची सनद दिली. परंतु दुसरा, बाजी मोहिते, त्यास अनुकूल होईना. म्हणून तीनशें मावळे स्वारांसहवर्तमान शिवाजीनें सुप्यांत शिरून बाजीस व त्याच्या मुख्य कारभाऱ्यांस कैद केलें. ह्या प्रमाणें चाकणचा किल्ला व सुपें परगणा हे शिवाजीनें मिळविले. ह्याखेरीज कोंडाणें किल्ल्याचे मुसलमानानें शिवाजीपासून पुष्कळ लांच घेऊन तो त्याचे स्वाधीन केला. ह्या किल्ल्यास शिवाजीनें सिंहगड असें नांव ठेविलें.

दादोजी कोंडदेव मरण पावला, त्याच सुमारास पुरंदर किल्ल्याचा कारभारी, नीळकंठराव, हा निवर्तला, आणि त्याचे तिघे पुत्र त्याच्या अधिकारासाठीं एकमेकांशीं भांडूं लागले. त्यांपैकीं धाकट्या दोघांनीं ह्या तंटा मोडण्याविषयीं शिवाजीस विनंती केली. तीस तो मान्य झाला. आणि मावळे लोक बरोबर घेऊन जाऊन सदरहू किल्ल्याच्या पायथ्याशीं उतरला. तेव्हां त्या भावांनीं त्यास वर बोलाविलें. तो रात्रीं थोडे लोकांनिशीं वर जाऊन तिघां भावांशीं बोलत बसला. रात्र बरीच झाल्यावर झोंप येऊं लागली म्हणून थोरला भाऊ उठून निजावयास गेला. तेव्हां शिवाजीनें धाकट्या दोघांस अशी मसलत सांगितली कीं, तुम्ही ह्यावेळेस ह्यास कैद करा; आणि जर कदाचित् ह्याचे लोक दंगा करूं लागले, तर मी आपले मावळे आणून त्यांचा बंदोबस्त करितों, म्हणजे तुमचा अर्थ साधेल. तीस ते दोघे मान्य झाले. शिवाजीनें आपले मावळे लोक तत्काळ वर आणिले, आणि त्यांज करवीं त्या तिघांही भावांस प्रतिबंधांत ठेवून, किल्ल्याचा सर्व अधिकार आपणाकडे घेतला. आणि त्या तिघांस नेमणुका ठरवून देऊन स्वस्थ बसविलें.

ह्या प्रकारें करून, एकही मनुष्य न मरतां, शिवाजीनें चाकणचा किल्ला व नीरा नदी ह्यांच्या मधला मुलूख घेतला.

कल्याणी परगण्याचा सुभेदार, मुलाना आमेद, हा मोठा खजीना विजापुरास पाठवीत होता, ही खबर शिवाजीला समजली. तेव्हां त्यानें सुपें परगण्यांतले ३०० घोडे घेऊन त्यांजवर आपले विश्वासूक बारगीर बसवून, त्यांसहवर्तमान त्या खजीन्यावर छापा घातला, आणि त्यांतला सर्व पैसा मोठ्या त्वरेनें राजगडास नेला. इतकें करून तो स्वस्थ राहिला नाहीं. त्यानें कांगोरी, तुंग, तिकोना, कुंवारी, लोहगड, भोरप, आणि राजमाची, हे सात किल्ले बलात्कारें घेतले. आणिखी शिवाय त्याच्या लोकांनीं तळें, घोसाळें, आणि रेडी हे किल्ले काबीज केले, व मावळे लोकांनीं कितीएक मोठमोठीं गांवें लुटिलीं.

इकडे शिवाजीनें अशी बंडाळी मांडिली; आणि तिकडे शाहाजीचें वैभव कर्नाटकांत फार वाढलें; असें विजापूरचा बादशाह जो अहमद आदिलशाह त्यास दिसून येतांच त्यास खचीत असें वाटलें कीं, हें बंड शाहाजीच्या अनुकूलते खेरीज शिवाजीनें केलें नाहीं. म्हणून बाजी घोरपडा मुधोळकर ह्या नांवाचा एक सरदार शाहाजी बरोबर असे, त्यास त्यानें असें सांगून पाठविलें कीं, तुम्हीं युक्ति प्रयुक्तीनें शाहाजीस कैद करावें. त्या प्रमाणें त्यानें त्यास भोजनाच्या मिषानें आपले येथें बोलावून आणून प्रतिबंधांत ठेविलें.

नंतर इ० स० १६४९ त शाहाजीस विजापुरीं बादशाहा कडे नेलें. त्यानें त्यास बंड मोडावयास सांगितलें. त्यावर शाहाजीनें असें उत्तर केलें कीं, शिवाजी माझा पुत्र खरा, परंतु तो आतां मला मुळींच जुमानीत नाहीं; तेथें माझा काय उपाय ? हें त्याचें म्हणणें बादशाहास खोटें वाटून अतिशयित कोप आला. आणि त्यानें शाहाजीस एका चिरेबंदी मजबूद कोठडींत कोंडून ठेविलें. तिला हवा आंत जाण्यास एक मात्र लहानसें छिद्र होतें. त्याविषयीं देखील बादशाहानें शाहाजीस सांगितलें कीं, अमुक मुदतींत जर तुझा मुलगा क्षमा मागावयास आला नाहीं, तर हेंही बंद करून टाकूं. हें सर्व वर्तमान शिवाजीस कळलें. व त्यास असेंही वाटलें कीं, आपल्या पित्याची सुटका होण्यास आपण क्षमा मागावयास जावें हें बरें. परंतु त्याची बायको, सईबाई, हिनें त्याला

असें सांगितलें कीं, विजापूरसरकार अविश्वासास्पद आहे, आपण त्यावर विश्वास ठेवूं नये. त्या मसलतीस तो मान्य होऊन, त्यानें दिल्लीचा बादशाह, शाहाजहान ह्याजकडे संधान बांधिलें. आणि त्याजकडून-विजापूरकरांस पत्र लिहिवून, आपले पित्याचा प्रतिबंध कमी केला. त्यांत, मी दिल्लीच्या बादशाहाचा नौकर आहें, असें त्यास कबूल करावें लागलें. तथापि त्या प्रमाणें तो फार दिवस वागला नाहीं.

इ० स० १६५५ त दिल्लीच्या शाहाजहान बादशाहाचा पुत्र औरंगजेब दक्षिणेंत येऊन विजापूरकरांशीं लढूं लागला. त्यास नम्रता दाखवून शिवाजीनें इतकें वश करून घेतलें कीं, हा आपला ५००० स्वारांचा एक बलिष्ठ सरदार आहे, असें तो त्यास मानूं लागला, व त्यानें जो मुलूख जिंकिला होता, तो त्याजकडेसच रहावा, असें त्यानें ठरविलें. इतक्यांत शाहाजहान आजारी पडल्याची बातमी त्यास समजली; म्हणून तो दिल्लीस निघून गेला. तेव्हां इकडे शिवाजीचें सहजच साधलें. त्यानें पुनः विजापूरच्या राज्यांत यथेच्छ धामधूम मांडिली. त्या दरबारांतून अफजुलखान नामक गर्विष्ठ मुसलमान सरदार आपले फौजेसहवर्तमान त्याजवर आला. परंतु शिवाजी किती वस्ताद ! गर्विष्ठ पुरुष चढवावा तसा हरभऱ्याच्या झाडावर चढतो, हें पक्कें मनांत आणून, त्यानें अफजुलखानास इतकें महत्त्व दिलें व आपणाकडे अगदीं इतकें लघुत्व घेतलें कीं तेणेंकरून खानसाहेब अगदीं खुलून गेले. आणि फक्त एका हुजऱ्यानिशीं शिवाजीची गांठ एकांतीं घेण्यास ते तत्काळ कबूल झाले.

भेटीची वेळ जवळ आली. अफजुलखान एक हत्यारबंद शिपाई बरोबर घेऊन नियमित स्थलीं प्राप्त झाला. इकडे शिवाजी, आंगांत चिलखत, वर आंगरखा, उजव्या हाताच्या अस्तनींत गुप्त बिचवा, आणि डाव्या हाताच्या अस्तनींत *वाघनख, अशा तयारीनें त्याजकडे जावयास निघाला. तेव्हां बाह्यात्कारें त्यानें आपला भितरेपणा इतका दाखविला कीं, हत्यारबंद शिपायाचें मला भय वाटतें, असें सांगून पाठवून त्यानें खानाचा शिपाई तेथून जरा दूर करविला. नंतर जवळ येऊन त्यास भेटत असतां, त्यानें त्या खानाच्या पोटांत तें वाघनख व

* हें वाघनख सांप्रत विलायतेंत महाराणीच्या पदार्थसंग्रहालयांत आहे.

छातींत तो बिचवा खुपसून त्याचा प्राण घेतला. त्या समयीं तानाजी मालुसरा त्याचे बरोबर होता. सरदार पडल्यावर मग सैन्याचें काय पुसावें! शिवाजीनें अफज़ुलखानाच्या सैन्यास जिंकून टाकून त्याचा अगदीं विध्वंस केला. त्यावेळीं शिवाजीस पुष्कळ युद्धोपयोगी सामान सांपडलें. हें वर्तमान इ० स० १६५९ त घडलें. त्याच वर्षी शहाजहान ह्यास पदच्युत करून औरंगजेबानें दिल्लीची गादी बळकाविली. पुढें तिकडे त्याच्या व त्याच्या भावांच्या लढाया चालल्या. तेणें करून शिवाजीला इकडे चांगलेंच फावलें. इ० स० १६६२ ह्या वर्षी गोंव्यापासून मुंबई पर्यंत सुमारें १२५ कोसांची समुद्रकांठची कोंकणपट्टी, आणि देशावर पुण्यापासून मिरजे पर्यंत सुमारें ७५ कोस प्रांत, इतका मुलूख शिवाजीच्या अमलांत होता. तितक्याच्या उत्पन्नावर व लुटीच्या प्राप्तीवर, तो ५०००० पायदळ व ७००० स्वार, इतकी फौज बाळगून असे.

औरंगजेबास दिल्लीची गादी प्राप्त झाल्यावर त्यानें आपला मामा षाहिस्तेखान ह्यास दक्षिणचा सुभेदार नेमलें. तो इ० स० १६६२ त औरंगाबाद येथें येऊन राहिला. तेव्हां शिवाजी मोंगलांच्या मुलखांत लूट करीत होता म्हणून त्या सुभेदारानें त्याजवर आपलें सैन्य रवाना केलें. त्यानें मराठ्यांस पिटाळून लावून पुणें घेतलें. त्यापूर्वीच शिवाजी तेथून निघून सिंहगडास गेला होता. पुण्यांत ज्या वाड्यांत लहानपणीं शिवाजी राहत असे त्याच वाड्यांत षाहिस्तेखान जाऊन उतरला. हें वर्तमान शिवाजीस समजलें. खान आपले कडून मोठा बंदोबस्त करून सावधगिरीनें तेथें राहिला होता. तरी शिवाजी महा धीट, तो कांहीं निवडक लोकांसहवर्तमान त्या वाड्यांत शिरला, आणि ज्या दिवाणखान्यांत खान निजला होता तेथें गेला. तेव्हां तो जागा होऊन उठून पळूं लागला. तथापि तो खिडकींतून उडी टाकितो आहे, इतक्यांत त्याचीं दोन बोटें शिवाजीनें आपल्या तरवारीनें छाटिलीं. तो निसटून गेला, तरी त्याचा एक पुत्र व त्याचे कितीएक सरदार ह्यांची मराठे लोकांनीं कत्तल उडविली. ह्या पराभवाचें अपेश षाहिस्तेखान व त्याचे मदतीस बादशाहा कडून आलेला यशवंत शिंग हे एकमेकांवर लोटूं लागले. तेणें करून दोघांचें वैमनस्य पडलें. युद्ध मंदावलें; आणि

सैन्यांत मेळ नाहींसा झाला. तेव्हां औरंगजेबानें षाहिस्तेखानाची बदली बंगाल्यावर करून, आपला पुत्र मोअज्जीम ह्यास शिवाजीवर योजिलें. नंतर मोंगलांच्या सैन्यानें सिंहगडावर हल्ला केला; परंतु त्याचा सर्व प्रयत्न व्यर्थ गेला. पुढें शिवाजीनें मोअज्जिमाच्या सैन्यास हिकडे तिकडे जाण्याच्या हुलकावण्या दाखवून, तो एकाएकीं, इ०स० १६६४ च्या जानेवारी महिन्यांत ४०००स्वार बरोबर घेऊन सुरतेवर उतरला. आणि तें शहर तो ६ दिवस पर्यंत लुटीत होता.

पुढें थोडक्याच दिवसांनीं शिवाजीचा बाप शाहाजी हा शिकारीस गेला असतां घोड्यावरून पडून मरण पावला. तेव्हां शिवाजी हा आपणास राजा म्हणवूं लागला, व त्यानें आपल्या नांवाचें नाणेंही पाडिलें. नंतर त्यानें ८७ जहाजांचें आरमार तयार केलें. त्याजवर एकंदर ४००० लोक ठेविले होते. ह्या आरमाराच्या साहाय्यानें शिवाजी विजापूरकरांच्या समुद्रकांठच्या गांवांवर हल्ला करी, व तीं लुटीत असे. मोंगलांचीं पुष्कळ गलबतेंही त्यानें धरिलीं, हें पाहून औरंगजेब बादशाहानें जयशिंग हा सरदार मोठ्या सैन्या सहवर्तमान त्याजवर पाठविला. त्याशीं शिवाजी पुष्कळ धैर्यानें लढला; परंतु शेवटीं तो अगदीं जेरीस आला. त्यानें आपण होऊन जयशिंगाच्या छावणींत जाऊन नम्रपणानें तहाचें बोलणें लाविलें. मजपाशीं एकंदर ३२ किल्ले आहेत; त्यां पैकीं २० त्यांच्या खालच्यामुलुखा सुद्धां मी दिल्लीच्या बादशाहास देतों; आणि बाकीचे बारा किल्ले व आणखी थोडीसीं ठाणीं आहेत, तीं दिल्लीच्या बादशाहा पासून मला जाहागीर मिळालीं, असें मानून स्वस्थ राहतों; असें त्यानें कबूल केलें.

ह्या प्रसंगीं जयशिंगानें शिवाजीस फार मान दिला, व औरंगजेब बादशाहानेंही त्यास मोठ्या गौरवाचीं दोन पत्रें लिहिलीं. तेणेंकरून आपण कोणी फार मोठे आहों व दिल्लीच्या दरबारीं आपलें चांगलें वजन पडेल असें मनांत आणून तो आपला पुत्र संभाजी ह्या सहवर्तमान दिल्लीस गेला. तेथच्या बादशाहानें त्यास नुसतें विचारिलें देखील नाहीं, तेणेंकरून त्यास अतिशयित क्रोध आला, आणि, ह्याचा सूड मी घेईन, असा त्यानें तेथें निश्चय केला. परंतु त्या बादशाहानें त्या उभयतांस कैद करून ठेविलें. त्यामुळें त्याचा इलाज प्रथम चालेना

परंतु थोडक्याच दिवसांनीं त्यानें तेथल्या कामदार लोकांत ओळख पाडिली; आणि त्यांचा लोभ संपादिला. नंतर त्यानें दुखणेकऱ्याचें मिष केलें. कांहीं कारणावरून कोणास कांहीं कोणास कांहीं, असें वांटूं लागला. तें सामान तो कधींकधीं पेटाऱ्यांतून पाठवीत असे. ती वहिवाट त्यानें इतकी पाडिली कीं, पेटाऱ्यांत कांहीं लबाडी असेल असें रखवालदारांच्या मनांत देखील येईना. असा विश्वास संपादून, एके दिवशीं रात्रीं ते बाप लेंक दोघे दोन पेटाऱ्यांत बसून प्रतिबंधांतून पार झाले. त्यांजविषयीं दिल्लीकरांनीं लागलाच पुष्कळ तपास केला; परंतु शिवाजी त्यांचे हातीं लागला नाहीं. तो पुढें नऊ महिन्यांनीं बैराग्याच्या वेषानें येऊन आपले लोकांस मिळाला.

ह्या कृत्यावरून औरंगजेब बादशाहा शिवाजीवर अगदीं क्रोधायमान होऊन गेला होता. परंतु त्याचा दक्षिणचा नवा सुभेदार सुलतान मोअज्जीम हा शिवाजीनें लांच देऊन इतका वश करून घेतला कीं, त्याचे शिफारशीवरून, त्या बादशाहानें शिवाजीस राजा हें पद, आणि पुणें, चाकण, व सुपें हे परगणे जहागीर दिले. व त्याचा पुत्र संभाजी ह्यास जी ५००० स्वारांची मनसब पूर्वीं दिली होती ती त्याजकडे काइम केली. ह्या देणगीचा मतलब असा होता कीं, अशा पर्यायें करून शिवाजीला चढवून थापा देऊन पुनः एक वेळ दिल्लीस आणावें, आणि मग एकदम पुनः न सुटे अशा प्रतिबंधांत अडकवून टाकावें; परंतु बादशाहाचा हा बेत मनच्या मनांतच राहिला.

पुढें शिवाजीची शक्ति इतकी वाढली कीं, मोठमोठे राजे देखील त्याचा वचक बाळगून त्यास खंडणी देण्यास कबूल झाले. विजापूरकर त्यास दरसाल तीन लक्ष रुपये व गोवळकोंडेकर पांच लक्ष रुपये खंडणी देत असत. पहा! शिवाजी हा यःकश्चित एका पाटलाचा पोर असून केवढ्या महत्वास चढला तो!

औरंगजेबाचा स्वभाव फार कपटी व संशयी असे. त्याला नेहमीं असें वाटे कीं, मीं आपल्या मुलांस जर कोणतेंही एखादें काम मुखत्यारीनें करावयास सांगितलें तर ते बेफाम होऊन, शाहाजहानाला जसें मीं पदच्युत केलें तसें हे एखादे वेळीं मला करतील. म्हणून दक्षिणेमध्यें मराठ्यांशीं लढण्यास त्यानें आपला पुत्र मोअज्जीम हा पूर्वीं पाठविला

असतांही, मोहबतखान नामक दुसऱ्या सरदारा बरोबर ४०००० फौज देऊन त्यास स्वतंत्र अधिकारी म्हणून इकडे रवाना केलें; त्याजवर मोअज्जीम ह्याचा हुकूम चालेना. तेव्हां अर्थातच त्याचें वजन कमी होत चाललें. इ० स० १६७२ त मोहबतखानाच्या सैन्याची व शिवाजीच्या सैन्याची मोठी लढाई झाली. तींत, शिवाजीच्या मसलतीवरून, मराठे लोकांनीं मोंगलांचें सैन्य इतकें आपले आंगावर पडूं दिलें कीं, ते बेसावध होऊन धूम करीत चालले; त्या बरोबर मराठ्यांनीं मागें फिरून त्यांशीं युद्ध मांडिलें. ते त्या समयीं इतक्या निकरानें लढले कीं, त्यांनीं मोंगलांच्या सैन्याचा अगदीं पराभव करून टाकिला. समरांगणामध्यें मराठे लोकांस मोंगल सैन्यावर हाच मोठा जय प्रथम मिळाला.

ह्यानंतर शिवाजीनें आणखी कितीएक किल्ले घेतले. व त्याचें वजनही फार वाढलें. त्यानें आपणास इ० स० १६७४ च्या जून महिन्याचे सहावे तारखेस काशीकर गागा भट्टा करवीं रायगडावर राज्याभिषेक करविला. नंतर त्यानें आपली सुवर्ण तुला केली. आणि आपले नांवास श्रीमन्महाराज छत्रपति इत्यादि पदवी जोडिली. त्यानें वर्धनगड, भूषणगड, सदाशिवगड, व मछिंद्रगड हे किल्ले नवीन बांधिले.

शिवाजीचा सावत्रभाऊ व्यंकोजी हा कर्नाटकांत शाहाजीची तिकडची जहागीर उपभोगीत होता. तिचा आपण हिसा घ्यावा, अशा हेतूनें तिकडे स्वारी करण्याचा विचार शिवाजीनें मनांत आणिला. परंतु, वाटेंत गोवळकोंड्याच्या राजाचा मुलूख आहे, त्यांतून आपल्या लष्करास सुरक्षित वाट कशी मिळते, हा त्यास विचार पडला तेव्हां त्यानें आपण होऊन त्याशीं तह ठरविला. नंतर तो ३०००० स्वार व ४०००० पायदळ इतक्या सैन्यासहवर्तमान तिकडे जावयास निघाला. वाटेंत जातांना त्यानें विजापूरकरांचा जिंजी किल्ला, किल्लेदारास लांच देऊन, हस्तगत करून घेतला. नंतर तो आपल्या वडिलोपार्जित जहागिरींत येऊन, त्यानें आपल्या भावापाशीं तिचा अंश मागितला. परंतु तो देईना; म्हणून त्यानें ती सगळीच जहागीर सक्तीनें आपले ताब्यांत घेतली. तथापि, ही वडिलोपार्जित जहागीर, हिचा अंश आपले भावास मिळणें योग्य आहे, असें मनांत आणून शिवाजीनें निम्मे जहागीर पुनः त्याजकडे परत दिली,

पुढें विजापूरचें राज्य बुडविण्याकरितां मोंगलांनीं दिलीरखान नामें मोठा सरदार पाठविला. तेव्हां विजापूरकरांनीं शिवाजीचें साहाय्य मागितलें; परंतु ह्या संधीस त्याचा पुत्र संभाजी, जो कांहीं गैर वर्त्तणुकेवरून प्रतिबंधांत ठेविला होता, तो पळून दिलीरखानास जाऊन मिळाला. हें वर्तमान शिवाजीस कळलें, तेव्हां तो जरासा खिन्न झाला, तरी तें दुःख एकीकडे ठेवून त्यानें मोठ्या शौर्यानें विजापूरकरांस मदत केली, आणि तेणेंकरून त्यांचा चांगला बचाव झाला. ह्या कामगिरी बद्दल शिवाजीस कृष्णा व तुंगभद्रा ह्या नद्यांच्या मधील मुलूख त्या सरकारांतून बक्षीस मिळाला.

इतकें झाल्यावर शिवाजी रायगडास गेला. तेथें त्यास गुडघी म्हणून रोग झाला. तोच दिवसेंदिवस बळावत जाऊन त्याच्याच योगानें तो इ० स० १६८० च्या एप्रिल महिन्याच्या पांचव्या तारखेस मरण पावला. तेव्हां तो ५३ वर्षांचा होता.

ह्या प्रमाणें शिवाजीचें चरित्र आहे. ह्या वरून त्याच्या विलक्षण स्वभावाचें अनुमान करितां येईल. शिवाजी शेताच्या उत्पन्नाचे पांच भाग करून, रयते पासून दोन भाग आपण घेऊन, बाकी तीन भाग तिजकडेसच राखीत असे. नवीन देश घेतला म्हणजे त्यांतील लोकांवर जो भारी कर पूर्वी बसलेला असेल तो बंद करावा, असा त्याचा पाठ होता. तो मक्तयाच्या मामलती कधींही देत नसे. लष्करास खर्चाची नेमणूक परभारी गांवगन्ना करून द्यावी असें त्याच्या मानकऱ्यांच्या मनांत असे. परंतु त्या व्यवस्थेनें रयतेस त्रास होईल हें मनांत आणून, तो विचार शिवाजीनें अगदीं मोडून टाकिला. जो किल्ला लष्कर ठेवण्यास उपयोगी नाहीं, तो तो तात्काळ खणवून टाकवीत असे. नवीन घेतलेल्या मुलुखांत पूर्वींचीं दिलेलीं जीं वर्षासनें वगैरे असत, तींही तो चालवी. ह्याचे राज्यांत जमीन व द्रव्य ह्यांसंबंधीं फिर्यादींचे निकाल पंचांच्या अनुमताप्रमाणें होत असत. आणि इतर न्याय हिंदुशास्त्रा प्रमाणें करीत. अशी शिवाजीची राज्यरीति होती.

शिवाजीचे आंगीं शौर्य, साहस, आणि समयसूचकता हे गुण पूर्ण वसत होते, असें म्हटल्यास चिंता नाहीं. आपण सामान्य पाटलाचा मुलगा असून, मावळे लोक, म्हणजे ज्यांस पुरतें वस्त्र मिळेना व नेसतां

येईना अशा लोकांस वश करून घेऊन, त्यांच्या साहाय्यानें त्यांनें औरंगजेबासारख्यास दाद न देतां आपलें राज्य स्थापिलें, ही गोष्ट मनांत आली, म्हणजे शिवाजी महाराजाची स्तुति केल्याशिवाय आमच्यानें राहवत नाहीं.

---

## कविता.

### ओंव्या मुक्तेश्वरी.

### जरासंधवधप्रकरणीं.

(कृष्ण धर्मराजास म्हणतो.)

मागधराजा आपले मोठी ॥ सप्तद्वीपसमुद्रथडी ॥
जिंकोनि राजे लक्षकोडी ॥ कारागृहीं कोंडिले ॥ १ ॥
तो हा जरासंध रणा ॥ बेळें दळें नावरे कोणा ॥
हा काळवरी कुरुनंदना ॥ म्यां उपेक्षिलें तयातें ॥ २ ॥
यश आयुष्य झालें पूर्ण ॥ बाहुयुद्धें शस्त्रावीण ॥
करावें मागधाचें कंदन ॥ इच्छा मातें उदेली ॥ ३ ॥
असो आतां शब्दरचना ॥ जाणें असे मागधहनना ॥
आज्ञा देई भीमार्जुना ॥ दोघां जावया मजसवें ॥ ४ ॥
जातां बळिष्ठ शत्रूच्या कदना ॥ यश अपयश नेणवे कोणा ॥
परि कुशीळ असो भीमसेना ॥ ऐसें मनीं चिंतीं तूं ॥ ५ ॥
आम्ही दोघे साक्षिभूत ॥ भीमहस्तें शत्रूचा निःपात ॥
होईल ऐसा निश्चितार्थ ॥ धर्मराजा जाण पां ॥ ६ ॥
धर्म म्हणे गा पुरुषोत्तमा ॥ तुझी कृपा कवचें आम्हां ॥
पांडवरक्षिता हा महिमा ॥ लोकत्रयीं प्रसिद्ध ॥ ७ ॥
करावया मागधकदन ॥ सवें निघाले तिघेजण ॥
भीमाआंगीं आवेश दारुण ॥ बाहुस्फुरण होतसे ॥ ८ ॥
असो हे तिघे पुरुषव्याघ्र ॥ तया नगरा पातले शीघ्र ॥
राजगृहीं जावया व्यग्र ॥ द्वारमाथां वळघले ॥ ९ ॥
स्नान करोनि श्वेतवसनी ॥ चंदन चर्चूनि माळा घालुनी ॥
मार्ग सोडोनि राजसदनीं ॥ अमार्गेचि प्रवेशले ॥ १० ॥

कुंजरें[६२५]वनामाजि [६२६]केसरी ॥ कीं [६२७]गोठणीं प्रवेशिजे व्याघ्रीं ॥
तैसे तिघे होमीं[६२८]गारीं ॥ जरासंधें देखिले ॥ ११ ॥
न बोलतां आशीर्वचनीं ॥ स्तंभ[६२९]प्राय उभे [६३०]मौनी ॥
रायें देखोनि सन्मानीं ॥ प्रत्युत्थानीं गौरविले ॥ १२ ॥
कोठोनि येणें कोठवरी ॥ इच्छा केउ[६३१]ती असे पुढारीं ॥
मानसीं असेल ती उत्तरीं ॥ प्रकट केली पाहिजे ॥ १३ ॥
न पाहतां तुमचे गुणागुण ॥ मागाल तें देईन दान ॥
या निश्चयें स्वस्थ मन ॥ करूनि बोला याचक हो ॥ १४ ॥
कृष्ण म्हणे ऐक वचन ॥ [६३२]वैरासि करणें नलगे यत्न ॥
दुष्ट जयाचें आचरण ॥ तोचि वैरी आमुचा ॥ १५ ॥
राजे धरूनि लक्षावधी ॥ बद्ध करूनि [६३३]सूदिले बंदी ॥
त्यांचा होम मा[६३३]रणविधी ॥ करूं पाहासी काय तूं ॥ १६ ॥
आतां राजे करीं मु[६३४]क्ति ॥ हेंच मागणें आमचें येथ ॥
नाहीं म्हणसी तरी अनर्थ ॥ येचिकाळीं पाहशिल ॥ १७ ॥
राजे सोडविलियाविणें ॥ आम्हांसि सहसा नाहीं जाणें ॥
पैजेनें प्राण देणें घेणें ॥ द्यूत खेळणें हें येथें ॥१८॥
[६३५]हांव न धरिशी संग्रामीं ॥ तरि बळात्कारें उठवूं आम्ही ॥
ऐसें बोलतां पराक्रमी ॥ जरासंध क्षोभ[६३६]ला ॥ १९ ॥
पुसोनियां उभयनेत्र ॥ न्यहाळूनि पाहे तयांचें व[६३७]क्त्र ॥
म्हणे हा पांडवांचा मि[६३८]त्र ॥ होय सत्य कीं विचारें ॥ २० ॥
जो अ[६३९]टीव जेठि[६४०]यां ऐसा ॥ चढततेज मुखप्रकाशा ॥
भीमा ऐसा आंगठ[६४१]सा ॥ माझे दृष्टी दिसतसे ॥ २१ ॥
तिसरा जो का आ[६४२]जानुबाहो ॥ तो द्रौपदीचा तिसरा ना[६४३]हो ॥
जेणें करूनि खांडव दाहो ॥ तोषविलें त्रिपा[६४४]दातें ॥ २२ ॥
जरासंध असतां [६४५]जीत ॥ नरेंद्र[६४६]मोचनाची मी[६४७]त ॥
करी ऐसा [६४८]वीरश्रीकांत ॥ भुवनत्रयीं असेना ॥ २३ ॥
ख[६४९]द्योत उ[६५०]जाळी रविमंडळा ॥ मुंगी उचली ब्रह्मांडगोळा ॥
तेंवि तुझें बोलणें ब[६५१]रळा ॥ शक्तीहूनि अ[६५२]चाट ॥ २४ ॥
अवलोकूनि आपणाकडे ॥ शक्ती सारखें बोलिजे थोडें ॥
या[६५३]चकजीविकेचेनि पाडें ॥ मागूं येतां मागावें ॥ २५ ॥

कंसारी संसारगजकेसरी ॥ हांसोनि बोले कृष्णशौरी ॥
पांडुकुमार हे निर्धारीं ॥ भीमार्जुन जाणपां ॥ २६ ॥
मागां अपराध केले क्षमा ॥ ते कार्याकारणें पुरुषाधमा ॥
लोटली मर्यादेची सीमा ॥ शेवटील फळ भोगिजे ॥ २७ ॥
सरला सुकृताचा तंतू ॥ आयुष्यतैला झाला अंतू ॥
माझिये हस्तीं व्यंजनवातू भीमरूपें उदेला ॥ २८ ॥
तो झडपतां सत्वरगती ॥ प्राणदीपपंचज्योती ॥
मालवोनि पडेल क्षिती ॥ गात्रपात्र पालथें ॥ २९ ॥
असेल वांचावयाची आर्ती ॥ तरी करीं बंधमुक्ती ॥
मग आम्हां तुम्हां अर्थाअर्थी ॥ वैरसंबंध असेना ॥ ३० ॥
करीं राजयांचें मोचन ॥ कीं उठीं युद्धा नलगतां क्षण ॥
या वेगळा विचार आन ॥ करणें आतां घडेना ॥ ३१ ॥
आतां बोलिलासि वचन ॥ मागाल तें देईन दान ॥
न करितां नृपांचें मोचनें ॥ ऊठ वेगीं संग्रामा ॥ ३२ ॥
तिघांमाजि जो आवडे ॥ त्यासीं भिडें वाडें कोडें ॥
मागध म्हणे मृषा तोंडें ॥ जल्पना करिसी वाजटा ॥ ३३ ॥
तूं बहुरूपें दाविशी सोंगें ॥ कोणतें युद्ध जिंकिलें आंगें ॥
वेडीं बागडीं भाविकें भणंगें ॥ तुझें शूरत्व त्यांमाजी ॥ ३४ ॥
पार्थ पृथेचें सुकुमार बाळ ॥ शास्त्राभ्यासें क्रमीत काळ ॥
मजसीं अयोग्य परी अळुमाळ ॥ भीम कांहीं दिसतसे ॥ ३५ ॥
तोही मंद जड आळशी ॥ आहार निद्रा बहुत याशी ॥
आयुष्य पुरलें म्हणूनि ऐशी ॥ बुद्धि उपजली तुम्हांतें ॥ ३६ ॥
तिघांतें हाणोनि चडकणा ॥ क्षणांत मेळवीन मरणा ॥
बळें सर्पाचिया सदना ॥ मंडूकें वस्ती पावलां ॥ ३७ ॥
कृष्ण म्हणे बोलसी निधडें ॥ मंडूक किंवा तिघे गरुड ॥
आतांचि होईल हा निर्वाड ॥ समय प्राप्त झालिया ॥ ३८ ॥
ऐसें बोलोनि वीररमणी ॥ उभे ठेले समरांगणीं ॥
जरासंधें राज्यासनीं ॥ अभिषेकिलें पुत्रासी ॥ ३९ ॥
सरसावूनि वीरगुंठी ॥ भीम लक्षिला दारुणदृष्टी ॥
जैसा मदोन्मत्त करटी ॥ मृगेश्वरें लक्षावा ॥ ४० ॥

भीमा आंगीं वीरश्रीलोटू ॥ धरितां नधरवे अतिउद्भटू ॥
अगस्ती धांवे समुद्र घोटूं ॥ तैसा तगटे पुढारां ॥४१॥
दोघांनीं पिटिलीं पाणितळें ॥ जानुमूळें बाहुमूळें ॥
महीं ताडितां पादतळें ॥ शैलमौली थरकती ॥४२॥
धांवोनि भीमाची वीरगुंठी ॥ मागधें कवळोनियां मुष्टी ॥
दक्षिणहस्त सूदला कंठीं ॥ काळपाशा सारिखा ॥४३॥
दांत चावोनि करकराटी ॥ गुडघा ताडिला हृदयपुटीं ॥
सावध म्हणती कृष्णकिरीटी ॥ बापा भीमा बळिष्ठा ॥४४॥
भीमें भैरवाकार दृष्टी ॥ हृदयीं हाणोनि वज्रमुष्टी ॥
सोडवोनि मगरामिठी ॥ झिंजाडोनि लोटिला ॥४५॥
तेणें मागुती विकळ ॥ पाडिला जैसा विशाळ तौळ ॥
पुढती उठोनि उतावेळ ॥ भीमेंमध्य कवळिला ॥४६॥
दोन्ही कोंपर दोन्ही मुष्टी ॥ चारी आघात ओपिले पृष्ठीं ॥
मागधें क्षोभोनि उल्हाटी ॥ हुमणी हाणीतली मस्तकीं ॥४७॥
झोंबी सोडवोनि तबकें ॥ मस्तकें मस्तका देती थडकें ॥
सहस्रसंख्या होतां भडके ॥ अग्निंद्वाचे लोटती ॥४८॥
हस्त ओढिती तोडावया ॥ पाय कवळिती मोडावया ॥
डोळे पाहती फोडावया ॥ पाडावया दशनांतें ॥४९॥
कूर्परप्रहार लत्ताप्रहार ॥ मुष्टिप्रहार मस्तकप्रहार ॥
मोजोनि मारिती शत सहस्र ॥ उसणें घेघे म्हणोनी ॥५०॥
बाहु गदा बाहु मुसळें ॥ बाहु कांतियां करवोळें ॥
बाहु मुद्गर बाहु त्रिशूळें ॥ भावोनियां मारिती ॥५१॥
नगरनारी नागरिक ॥ पाहती दोघांचें युद्धकौतुक ॥
विमानयानीं वृंदारक ॥ जय इच्छिती भीमाचा ॥५२॥
निराहार निरुदक ॥ विसांवा न घेतां पळ एक ॥
तेरा दिवस पर्यंत देख ॥ युद्ध चाललें दोघांचें ॥५३॥
चवदावे दिवसाचे अंतीं ॥ मूर्छा पावला मागधनृपती ॥
तैं संकेतें दावी हातीं ॥ पांडवातें माधव ॥५४॥
पाय कवळोनि करतळीं ॥ चिरोनि कसवा दोन्ही फाळीं ॥
जरेनें सांधिला तो उखळीं ॥ सांधा वेगे बळिष्ठा ॥५५॥

यावेगळा उपाय आन ॥ करितां मागध न पावे मरण ॥
आतांचि होऊनि सावधान ॥ युद्ध करील मागुती ॥५६॥
भीमें रगडोनि दाढा ॥ मध्यभागीं कर्षिला गोंढा ॥
माथां वाहोनियां भोंवंडा ॥ चक्राकार दीधला ॥५७॥
तेथूनि टाकिला भूतळीं ॥ लात वोपिली वक्षस्थळीं ॥
वज्रें तोडोनियां मौळी ॥ शक्रें जेवी पर्वता ॥५८॥
तेंवी पाडोनि उताणा ॥ वामपायें दक्षिणचरणा ॥
रगडोनि सव्यपाय आणा ॥ उभयहस्तें कवळिला ॥५९॥
आसडोनि कोलोढूटें ॥ मध्यें उतटिला तटाटें ॥
अशुद्धनदी खळखळाटें ॥ रंगभूमिके लोटली ॥६०॥
भीमसेने आपल्याहातीं ॥ करोनि शकलें सांडिलीं क्षिती ।
जरासंधा दीधली मुक्ती ॥ कुंती कुमारें यापरी ॥६१॥

---

## आर्या मोरोपंती.

### विराट पर्वांतील.

उत्तरगोग्रहण प्रकरण.

मत्स्यपुरोत्तरभागीं प्रातःकाळींच ये सुयोधन हो ॥
ज्यासि जयप्राप्ति मनीं म्हणती भीष्मादिही सुयोध न हो ॥१॥
सहसा व्रजांत गांठुनि बहु ताडुनि करुनि बद्धभुज गवळी ॥
षष्टिसहस्र सुगोधन तो कुरुकुळचंदनद्रुभुजग वळी ॥ २ ॥
गोपाध्यक्ष रथावरि बैसुनि धांवे नृपासि सांगाया ॥
चित्तीं म्हणे बुडाया कुधर्मा हरिसि धेनु कां गा या ॥ ३ ॥
तो राजगृहीं जाउनि रायाच्या उत्तराख्य तनयातें ॥
नमुनि म्हणे हो नेतो दुर्योधन धेनु करुनि अनयातें ॥ ४ ॥
उत्तर म्हणे असें जरि मी एकाकी लहान परि सवतें ॥
यश जोडितोंचि असता सारथि तरि कथन मज न परिसवतें ॥ ५ ॥
मिळवा कोणी तरि हो धैर्याचा मात्र उदधि सारथि जो ॥
कुरुभटसमूह पाहुनि मज जेंवि हिमास सुदधिसार थिजो ॥६॥
उत्तर म्हणे कुरुकटक नपशूंस यशासही स्वसे नेतें ॥
अवकाश पळहि नाहीं कळवाया वृत्त हें स्वसेनेतें ॥ ७ ॥

माझें सारथ्य करूं तुझिया वचनें बृहन्नडा गमला ॥
हाचि सदुपाय वत्से लागो अपकीर्तिचा न डाग मला ॥ ८ ॥
ती धांवत जाय म्हणे गानादिक हें बृहन्नडे राहो ॥
समयीं सारथ्यगुणा नुघडूनि कंदर्पुचा न डेरा हो ॥ ९ ॥
वाद्य असो नृत्य असो हो अभिनय किमपि गीत अथवा हो ॥
बाणोनि करें म्हणतां समरांत बृहन्नडाचि रथ वाहो ॥ १० ॥
वैराटि म्हणे नर्तक हो कीं वादक तथैव गायन हो ॥
सारथि हो या समयीं एकहि वंशी कौरवांसि गाय नहो ॥ ११ ॥
सत्वर बृहन्नडा नृपसुतरथ नेऊनि जाय बाहेर ॥
त्यासि म्हणे हेरावें म्हणसी कुरुकटक काय बा हेर ॥ १२ ॥
कुरुकटकासि पहातां तो उत्तर बाळ फार गडबडला ॥
स्वपर बलाबळ नेणुनि बालिश बहु बायकांत बडबडला ॥१३॥
बोले बृहन्नडे हें कुरुबळ कल्पांतसिंधुसें गमतें ॥
ने रथ पुरांत माझें मन नयनहि पाहतां बहु भ्रमतें ॥ १४ ॥
पार्थ म्हणे राजसुता आतां वदतोस हें अहा काय ॥
शय्येवर न पडाया योग्य रणक्षितिवरीच हा काय ॥ १५ ॥
तेव्हां स्त्रियांत तैसें बोलुनि आतां असें कसें वदसी ॥
एकहि बाण न सुटला नाहीं अद्यापि झळकला संदसी ॥ १६ ॥
ऐसें पार्थ वदे तों भिउनि कटकबागुलासि पोर पळे ॥
शत्रुसंतापदावज्वालांनीं तो कुरंग होरपळे ॥ १७ ॥
कुरवाळोनि म्हणे गा राजसुता योग्य तूं न कांपालों ॥
मृदुलत्व म्लानत्वें स्वीकारुनि जाहलासि कां पाला ॥ १८ ॥
तुज उत्साह नसे तरि करितों घेऊन धनुसें मी रणें हो ॥
मज मेघासि कराया शरवृष्टि सहाय तूं समीरण हो ॥ १९ ॥
बैस रथीं तूं माझा सारथि हो तरणिचा जसा अरुण ॥
न्यावा चमूवरि तुवां रथ तरुणीप्रति जसा स्मरें तरुण ॥ २० ॥
आतां सोडवितों पशु खलबळ पळ न लगतांचि पळवीतों ॥
मी विजयें असें तुजचि न सकळांही कौरवांसि कळवीतों ॥२१॥
जातां कुरुकटकावरि वाजविला दिव्य देवदत्त दरें ॥
तो होय जना जैसा कल्पांतीं इंद्रदेव दत्तदर ॥ २२ ॥

भ्याला उत्तर स्योतें जिष्णु म्हणे पावलासि कांप दरें ॥
अद्यापि बांधिलेंसे तुझिया मतिनें अधैर्य कां पदरें ॥ २३ ॥
पार्थ म्हणे वैराटे रथ कुरुकटका समीप राहूंदे ॥
गोधन हरावयास्तव आले भेटे कोण कोण पाहूंदे ॥ २४ ॥
तो गुरु तो गुरुनंदन तो कृप तो कर्ण तो पितामह रे ॥
यांहीं गाइ वळाव्या शिवशिव गोपाळ रामकृष्ण हरे ॥ २५ ॥
रे उत्तरा शकुनिचा या व्यूहांत न दिसे मला भांचा ॥
त्या वांचुनि यांशीं जो करणें संग्राम तो न लाभाचा ॥ २६ ॥
हें कटक सोड तिकडे चाल तुझ्या हरुनि गोधना खळ तो ॥
प्राणत्राणपरायण जिकडे निरपत्रपाग्रणी पळतो ॥ २७ ॥
उत्तर निजतुरंगातें धाया अरुणासि कौतुक पिटाळी ॥
तों गर्जोनि कुरुकटककर्णीं बसवी ध्वजस्थ कपि टोळी ॥ २८ ॥
कोठें जाल उभे रे मत्स्येश्वरधेनुपश्यतोहर हो ॥
सोडा गोधन नाहींतरि वधिन तुम्हांसि वश्य तो हर हो ॥ २९ ॥
येतांचि विक्रमलवें श्रीहरिचा दयित दास वीर गंडी ॥
हरि करिघटेसि जैसा त्या कुरुसेनेसि वांसवी रंगडी ॥ ३० ॥
खळबळजळनिधिमग्ना धेनु उसळल्या अलाबु जाल्या हो ॥
हांसुनि विजय मनिं म्हणे कां गोपसखा मला बुजाल्या हो ॥ ३१ ॥
गेल्या पळोनि गाई पृष्ठावरि पुच्छभार वाहोनी ॥
राहोनि निश्चळ क्षण विजय निवे त्यांकडेच पाहोनी ॥ ३२ ॥

---

## ताजमहाल.

आपल्या मागें आपलें नांव रहावें ही इच्छा मनुष्य मात्राचे ठायीं असते; व ह्या इच्छेच्या योगानें कितीएक मनुष्यें आपल्या सामर्थ्यानुरूप व बुद्धयनुरूप अनेक प्रकारचीं कामें करून आपलें नांव आपल्या मागें ठेवितात. कोणी थडगीं, छत्र्या, देवालयें, घाट, धर्मशाला, विहिरी, पूल, वगैरे इमारती बांधितात; कोणी पुतळे करवितात, व तजाबिरी काढवितात ; कोणी ग्रंथ लिहितात. मनुष्याच्या आंगची ही इच्छा वास्तविक पाहतां फार चांगली आहे. हिजपासून जगांत अनेक प्रकारचीं उत्तम कार्यें होतात ; परंतु त्या कार्यांचें वर्णन ह्या स्थलीं कर्तव्य नाहीं,

ह्याकरितां तें करीत नाहीं. लोकांनीं आपली आठवण पुढें रहावी ह्या बुद्धीनें बांधून ठेविलेल्या इमारती अनेक देशांत सांपडतात. मिसर देशांतल्या प्राचीन राजांनीं त्या देशांत मोठमोठ्या इमारती बांधून ठेविल्या आहेत. त्या इमारतींस इंग्रेजी भार्षेत "पिरामिद" म्हणतात. ह्या इमारती बांधून किती वर्षें झालीं आहेत, ह्याचा बरोबर शोध हल्लीं लागत नाहीं. निदान पक्षीं त्यांस तीन साडे तीन हजार वर्षें तरी झालीं असावीं; व त्या इमारती फारच मोठ्या आहेत, व फारच उंच आहेत, म्हणून सांगतात. तसेंच आपल्या ह्या देशांत पुष्कळ ठिकाणीं डोंगरांत खडक खोदून कामें केलीं आहेत, त्यांस लेणीं किंवा पांडवकृत्यें असें म्हणतात. हीं कामें फार प्राचीन व उत्तम प्रकारचीं आहेत. असो. असें मुसलमान लोकांनीं ह्या देशांत पुष्कळ उत्तम इमारती बांधिल्या आहेत. विजापुरास इब्राहीम आदिलशाह ह्याची मोठी मसीद आहे, व औरंगाबादेस मुकुरबा म्हणून मोठी व शोभायमान मसीद आहे, पण असल्या इमारती उत्तर हिंदुस्थानांत फारच नामी आहेत. दिल्लीच्या मोंगल बादशाहांच्या हातीं जेवढा अंमल होता व त्यांच्या पदरीं जेवढें ऐश्वर्य होतें, तेवढा अंमल व तेवढें ऐश्वर्य अनुभवणारे राजे फारच थोडे झाले असतील. त्या बादशाहांच्या कारकीर्दींत कांहीं फारच उत्तम इमारती झाल्या आहेत, आणि त्या सर्वांत ताजमहालासारखी इमारत तर दुसरी झाली नाहीं. त्या ताजमहालाचें येथें थोडेंसें वर्णन करितों. हें वर्णन मी इंग्रेजी ग्रंथांच्या आधारानें करितों.

ताजमहाल ही इमारत आग्रा नामें शहरापासून दीड कोशावर यमुना नदीच्या पश्चिम तीरावर आहे. त्या इमारतीपेक्षां विशेष शोभायमान, विशेष भव्य, व विशेष सुंदर इमारत सर्व पृथ्वीवर दुसरी कोठेंही नाहीं. ही इमारत फार मोठी आहे, असें नाहीं; पण तिचें सौंदर्य, तिच्या निरनिराळ्या अवयवांचें यथायोग्य परिमाण, त्या प्रत्येक अवयवाच्या बांधणींत व्यक्त झालेलें बांधणाऱ्याचें अनुपमेय कसब, व एकंदर इमारतीचा अलौकिक व नाजूक घाट इत्यादि गोष्टी पाहिल्या असतां, पाहणारा आश्चर्यानें अगदीं थक होऊन जातो, व आनंद त्याचे मनांत मावेनासा होतो. ही मसीद बांधून सुमारें दोनशांपेक्षां अधिक वर्षें होऊन गेलीं आहेत, तरी ती जशी काल बांधावी, अशी नवीन व नाजूक अद्यापि दिसते, असें

सांगतात. ही सर्व इमारत पांढऱ्या संगमरवरी दगडांची आहे. हे दगड पांढरे असून त्यांत किंचित् काळसर रंगाची झांक मारिते, तेणेंकरून ते फारच शानदार दिसतात. ही इमारत संगमरवरी दगडांच्या चौथऱ्यावर आहे, व त्या चौथऱ्याच्या चार कोंपऱ्यांवर चार त्याच जातीच्या दगडांचे मनोरे आहेत, व एकंदर सर्व इमारतीवर आंतून व बाहेरून उत्तम प्रकारची नक्षी खोदिली आहे. पांढऱ्या भुईवर नाना प्रकारच्या चित्रविचित्र रंगाचे खडे बसवून भिंतींवर वगैरे फारच सुबक वेलबुट्टी काढिली आहे. दारांच्या व खिडक्यांच्या मेहिरपांवरून पांढऱ्या दगडांत काळे खडे बसवून, शाईनें पांढऱ्या कागदावर लिहिल्यासारखीं, अरबी लिपींतलीं अक्षरें दाखविलीं आहेत, व त्या अक्षरांनीं कुराणांतलीं वाक्यें लिहिलीं आहेत, असें म्हणतात. मशीदीचें मुख्य घुमट, व चार लहान घुमटें, व त्या सर्वांवरचे कळस ह्यांवरही उत्तम प्रकारची नक्षी खोदिली आहे, व नाना प्रकारच्या रंगांचे खडे बसवून चमत्कारिक फुलें दाखविलीं आहेत. घुमटाचा आकार अंड्या सारखा लांबट व वाटोळा आहे; व हा आकार शिल्पशास्त्र जाणते व मार्मिक पुरुष फार चाहतात.

ही मसीद शाहाजहान बादशाहानें आपली राणी अर्जमंदबानू हिचें नांव राहण्याकरितां बांधिली. पुढें शाहाजहान बादशाह मरण पावल्यावर त्याचा पुत्र जो औरंगजेब बादशाह ह्यानें त्यास ह्याच इमारतींत बानूच्या शेजारीं उजवीकडे पुरून तिच्या थडग्या शेजारीं त्याचें थडगें बांधिलें आहे. ही मसीद बांधितांना राणी करितां मात्र बांधिली होती; ह्यास्तव मुख्य गाभाऱ्याच्या मध्यभागीं तिचें मात्र थडगें केलें आहे; व त्याच्या शेजारीं दुसरें थडगें केल्यामुळें तीं दोन्ही थडगीं मधोमध नसल्यामुळें मूळची शोभा कांहीं कमी झाली आहे. मुळीं राणीच्या थडग्या भोंवतालीं सोन्याचें व रुप्याचें जाळीदार मखर होतें. शाहाजहानास पुरल्यावर औरंगजेबानें तें मखर काढून दोन्ही थडग्यां भोंवतालीं संगमरवरी दगडांचें अष्टकोण मखर केलें आहे. ह्या मखरावरच्या जाळ्या व नक्षी हीं फारच सुरेख आहेत. मखराच्या आठ बाजूंपैकीं प्रत्येक बाजूचे तीन भाग करून त्या प्रत्येक भागांत जाळ्या खोदिल्या आहेत; त्या जाळ्या शुभ्र हस्तिदंती जाळ्यां सारख्या सुरेख व नाजूक दिसतात. प्रत्येक भागाच्या

कडांवर नाना प्रकारचे खडे बसवून फुलें व वेल दाखविले आहेत. एकेका फुलांत बाहत्तर खडे आहेत. थडग्यांवरही अशाच प्रकारची नक्षी केली आहे, व मध्यभागीं काळ्या खड्यांनीं अरबी लिपींतलीं अक्षरें दाखविलीं आहेत.

ह्या मसीदींत शिरल्या बरोबर तेथील अंधक उजेड पाहून व गंभीर प्रतिध्वनि ऐकून मनुष्याच्या मनांत एकदम कांहींएक चमत्कारिक वृत्ति उत्पन्न होते. जसें एखाद्या देवळांतल्या गाभाऱ्यांत शिरावें, आणि तेथें कांहीं थोडा उजेड व थोडा अंधकार असावा, व कितीएक तपस्वी लोक गंभीर मुद्रेनें ध्यान करिताहेत, कितीएक भजन पूजनांत गुंतले आहेत, असें दृष्टीस पडावें, आणि तें सर्व पाहून अंतःकरणांत कांहीं भय, कांहीं पूज्यबुद्धि, असा कांहीं चमत्कारिक भाव उत्पन्न होतो, व संसारांतले विचारांची विस्मृति पडते, तसें ह्या मसीदींत गेलें असतां चित्ताची भावना कांहीं वेळ होते. ह्या ठिकाणीं जें बोलावें, तेंच तो गाभारा उलटून बोलतो, असें वाटतें. व ह्या प्रतिध्वनीचा आवाज मेघगर्जनें सारिखा गंभीर ऐकूं येतो.

प्रत्येक कमाणीला खिडकी आहे, व त्यांच्या चवकटी संगमरवरी दगडांच्या आहेत. मुख्य गाभाऱ्यांत बादशाह व राणी ह्यांचीं थडगीं आहेत म्हणून सांगितलें; पण हीं थडगीं वास्तविक नव्हत, तर ह्या गभाऱ्याखालीं एक तळघर आहे, त्यांत ह्या दोघांच्या कपणी पुरून त्यांचीं वास्तविक थडगीं तेथें खालीं आहेत, व वरच्या महालांतलीं थडगीं दर्शनी मात्र होत. मुसलमान लोकांत खालीं व वर अशा दोन ठिकाणीं थडगीं करण्याची चाल आहे. असो, हें तळघर चौकोनी आहे, व संगमरवरी दगडांचें बांधिलें नाहीं. ह्या तळघरांत जाण्याकरितां पूर्वीं रुप्याचा दरवाजा होता; हल्लीं तो दरवाजा लांकडी आहे.

ही इमारत चौकोनी आहे, म्हणून वर सांगितलें आहे. हिच्या प्रत्येक बाजूस मध्यें एक मोठी कमाण व दोहों आंगास दोन लहान लाहान कमाणी, अशा तीन कमाणी आहेत, व कोंपरे छाटून घेऊन चार कोंपऱ्यांस चार लहान लहान कमाणी आहेत. ह्या कोंपऱ्यांतल्या कमाणी ज्या बाजू समोर आपण उभें रहावें, त्या बाजूच्या आहेत, असें वाटतें, व मधल्या गाभाऱ्याच्या सभोंवतीं मुख्य चार दिशांस चार चौकोनी जागा,

व चार कोपऱ्यांस चार अष्टकोणी जागा, अशा आठ जागा आहेत, व ह्या सर्व जागा फारच मनोहर आहेत. दुसऱ्या मजल्यावरही अशाच आठ जागा आहेत.

ही इमारत ज्या संगमरवरी चौथऱ्यावर आहे, त्याचें क्षेत्र तीनशें पन्नास फूट आहे, व त्याची उंची वीस फुटां पेक्षां अधिक आहे. ह्या चौथऱ्याच्या चारी कोंपऱ्यांवर चार मनोरे आहेत. ह्या मनोऱ्यांच्या बैठकी अष्टकोणी आहेत, व त्यांचा घेर ऐशीं फूट आहे. प्रत्येक मनोऱ्याच्या सोटाचा व्यास मुळाशीं वीस फूट आहे, व एकंदर मनोऱ्याची उंची सुमारें दीडशें फूट आहे. हे मनोरे पांढऱ्या संगमरवरी दगडांचे असून त्यांवर चित्र विचित्र रंगांचे खडे बसवून मोठी रमणीय नक्षी केली आहे, व त्यांची बांधणी फारच सुंदर व नाजूक आहे. ह्या चौथऱ्या खालीं साध्या दगडांची चिरेबंदी आहे. तिचें एकंदर क्षेत्र सुमारें नऊशें फूट असेल, असें वाटतें. त्या चिरेबंदीच्या चोहीं बाजूंस चार मसीदी आहेत, व चार कोंपऱ्यांस चार अष्टकोणी शानदार बुरूज आहेत.

ताजमहाला भोंवतालीं मोठी विस्तृत बाग आहे. तींत नाना प्रकारच्या उत्तम झाडांचे ताटवेचे ताटवे लागून गेले आहेत, व त्या झाडांवर चित्रविचित्र अनेक रंगांचीं फुलें विकसलीं म्हणजे फारच मौज दिसते. तेथें गगनचुंबित असे मोठमोठे जुनाट वृक्षही पुष्कळ आहेत. ह्या बागेंत मुख्य थोरल्या दरवाज्यापासून ताजमहाला पर्यंत दोन्ही बाजूंनीं झाडें व मध्यें कारंज्यांची एकसारखी एक लांब रांग लागलेली आहे. थोरल्या दरवाज्याचें कामही फारच शानदार आहे, व त्यावरही नाना तऱ्हेची वेलबुट्टी काढिली आहे. ह्या दरवाज्यावर घुमटें आहेत. त्यांत उभें राहून बागेकडे पाहिलें असतां, देखावा अत्यंत रमणीय दिसतो, बागेंतलीं कारंजीं उडत असतात, व भोंवतालच्या फुलांचा मधुर सुगंध पसरत असतो, व चोहींकडे नाना प्रकारचे सुंदर व नाजूक रंग दिसत असतात, व पक्ष्यांचे मंजूळ शब्द कानीं पडत असतात, त्या वेळेस मनुष्यास, जसें काय आपण इंद्राच्या नंदनवनांतच उभे आहों, असें वाटतें. ह्या बागेच्या भोंवतालीं एक मोठा व उंच तांबूस दगडांचा तट आहे, व ह्या तटाच्या एका बाजूस यमुना नदीचा प्रवाह वाहत आहे.

हें वर जें ह्या स्थलाचें वर्णन केलें, हें कोणास अत्युक्ति वाटेल; पण ह्यांत अत्युक्ति अगदीं नाहीं. ह्या स्थलाच्या वास्तविक सौंदर्याच्या शतांशाचें सुद्धां वर्णन झालें नाहीं. अशीं स्थळें डोळ्यांनीं साक्षात पाहिल्यावांचून त्यांचें वास्तविक ऐश्वर्य मनांत येत नाहीं. जसें ज्यानें हत्ती जन्मांत पाहिला नाहीं, त्यानें हत्तीचें कितीही वर्णन वाचिलें, तरी त्या वर्णनावरून, डोळ्यांनीं तें जनावर पाहून जी कल्पना येते, ती कदापि यावयाची नाहीं; ह्या प्रमाणें मोठाल्या सुंदर इमारतींची गोष्ट आहे. ताजमहालासारखीं अलौकिक कामें जगांत थोडींच आहेत. कोणत्या देशचा मनुष्य असो, त्यानें ही इमारत पाहिली असतां, तो आश्चर्यानें थक्क होऊन तोंडांत बोट घालून पाहत राहतो. पुष्कळ कुशल व मार्मिक पुरुषांनीं हें काम पाहिलें आहे; पण त्यांस ह्यांत दोष आढळला नाहीं; व ते जसजसे बारीक दृष्टीनें पाहत गेले, तसतसा त्यांस अधिक आनंदच होत गेला. ज्यांनीं पुष्कळ देश पाहिले आहेत व पुष्कळ उत्तम व भव्य इमारती पाहिल्या आहेत, त्यांचें सुद्धां असें म्हणणें आहे कीं. ह्या इमारती पेक्षां अधिक सुरेख व भव्य इमारत आमच्या दृष्टीस कोठेंही पडली नाहीं.

ज्या वेळेस ही इमारत बांधिली, त्या वेळेच्या एका ग्रंथकाराचा लेख असा आहे कीं, इमारत बांधण्याच्या कामाकडे वीस हजार मनुष्यें बावीस वर्षें खपत होतीं; ही व हिच्या भोंवतालच्या इमारती सर्वांस मिळून एकंदर तीन कोट सतरा लक्ष अठ्ठे चाळीस हजार सव्वीस इतके रुपये लागले. ह्या कामाचे नकाशे वगैरे करणारा मुख्य शिल्पी आस्तिन म्हणून कोणी एक फ्रान्स देशचा मनुष्य होता. ह्या चतुर पुरुषास शाहाजहान बादशाहानें आपल्या पदरीं बाळगिलें होतें, व त्यावर तो फार विश्वास ठेवी व लोभ करी, असा लेख आहे. शाहाजहानानें आपल्या राणीकरितां हा महाल बांधून आपल्या करितां ह्याच सारखा व त्याच्या समोर यमुनेच्या दुसऱ्या तिरीं महाल बांधण्याचा बेत केला होता, व दोन इमारतींच्या मध्यें नदीवर एक पूल तो बांधणार होता. ह्या दुसऱ्या इमारतीच्या कामास आरंभ सुद्धां झाला होता; पण पुढें लवकरच त्याचा पुत्र औरंगजेब ह्यानें त्यास कैदेंत ठेविलें, व तो कैदेंतच मरण पावला; ह्यास्तव तें काम तसेंच पडलें, पुढें चाललें नाहीं.

त्या दुसऱ्या इमारतीच्या पायाचा कांहीं भाग अद्यापि यमुनेच्या दुसऱ्या तिरीं दृष्टीस पडतो.

---

## वेरुळाजवळचीं लेणीं.

मुसलमान लोकांनीं स्वाऱ्या करून ह्या देशांत आपला अंमल बसविण्याच्या पूर्वीं ह्या हिंदुस्थान देशाची स्थिति पुष्कळ अंशीं फार चांगली होती, असें अनेक गोष्टींवरून सिद्ध होतें. प्राचीन काळचे जे कांहीं ग्रंथ राहिले आहेत त्यांवरून, त्या काळच्या व्यापारावरून, त्या काळीं ह्या देशांत अपार संपत्ति होती, असे जे यवनलोकांत लेख आहेत त्यांवरून, व त्या कालच्या ज्या कांहीं थोड्या इमारती काळचक्राच्या व दुरभिमानी क्रूर शत्रूंच्या झपाट्यांतून उरल्या आहेत त्यांवरून, वर सांगितलेलें अनुमान सिद्ध होतें. हिंदुस्थानाच्या अनेक भागीं व विशेषतः दक्षिणेंत पुष्कळ ठिकाणीं डोंगरांतले खडक कोरून मोठमोठीं देवळें तयार केलेलीं हल्लीं आढळतात, व हीं देवळें अप्रसिद्ध ठिकाणीं व निवाऱ्याच्या जागीं असल्यामुळें त्यांस हिंदुधर्मद्वेष्टे, क्रूर, अज्ञान, अशा मुसलमान अंमलदारांपासून व वारा, ऊन, पाऊस, ह्यांपासूनही फारसा उपद्रव झाला नाहीं, तेणेंकरून आजपर्यंत तीं टिकलीं आहेत. हीं देवळें कधीं व कोणीं बांधिलीं, ह्याचा अद्यापि चांगला शोध लागला नाहीं. ह्यांस लेणीं असें म्हणतात. साधारण लोकांत दंतकथा अशी आहे कीं हीं देवळें पांडव अज्ञात वासांत होते त्या वेळेस त्यांनीं कोरलीं आहेत, व ह्या दंतकथेवरून त्यांस पांडवकृत्यें असेंही एक नांव पडलें आहे. आतां ह्या इमारती पांडवांनीं कोरल्या नाहींत, हें सिद्ध करणें अगदीं कठीण नाहीं. ह्या दंतकथेस पहिलें विरुद्ध प्रमाण हें कीं भारत नामक ज्या पुराणांत पांडवांच्या गोष्टी लिहिल्या आहेत, त्या पुराणांत त्या राजपुत्रांनीं हीं देवळें कोरल्याची गोष्ट मुळींच नाहीं; व त्या पुराणावरून पाहिलें असतां पांडव दक्षिणेंत आले होते, असेंही अनुमान होत नाहीं. तसें ह्या कोरींव देवळांपैकीं कांहीं देवळें ब्राह्मणांच्या देवांचीं आहेत, व कांहीं जैनांच्या व बौद्धांच्या देवांचीं आहेत; ह्यावरून तीं भिन्न लोकांनीं, व बहुतकरून भिन्नकाळीं, बांधिलीं असावीं असें सिद्ध होतें. ह्या प्रकारचीं देवळें घारापुरी, कान्हेरी, कारलें, वेरूळ,

जुन्नर, इत्यादि बहुत ठिकाणीं आहेत; परंतु त्या सर्वांत वेरुळा जवळचीं लेणीं पुष्कळ व फारच मोठीं, व सुरेख आहेत, असें पाहून आलेले बहुत लोक सांगतात. ह्या स्थलाचें वर्णन कितीएक साहेब लोकांनीं इंग्रेजी भाषेंत लिहून ठेविलें आहे, त्यापैकीं एक दोन ग्रंथांच्या आधारानें हें पुढील संक्षिप्त वर्णन मराठी वाचणाऱ्यां करितां ह्या ग्रंथांत केलें आहे.

दक्षिणेंत पूर्वी देवगड म्हणून मोठें नामांकित नगर होतें, ज्यास हल्लीं दौलताबाद असें म्हणतात. त्या शहराच्या जवळच वेरूळ म्हणून एक लहान खेडे गांव आहे. त्यापासून पूर्वेच्या बाजूस सुमारें अर्धकोशावर अर्धचंद्राकृति एक डोंगर आहे. ह्या डोंगराचा प्रसार दक्षिणोत्तर आहे, व त्याचीं दोहों बाजूंचीं टोकें मध्यापेक्षां बरींच विशेष उंच आहेत. उत्तरेच्या टोंकाच्या शेवटास "पारसनाथाची सभा" ह्या नांवाचें लेणें आहे, व दक्षिणेच्या टोंकाच्या शेवटास जें लेणें आहे, त्यास धेडवाडा म्हणतात, व तें ठिकाण विटाळाचें समजून हिंदुलोक तें पाहण्यास जात नाहींत. पण तें लेणें पाहण्यासारखें सुरेख आहे. असो, बाकीचीं ह्या दोन लेण्यांच्या मध्यभागीं आहेत, तीं सर्व सारख्या उंचीवर नाहींत, व तीं एक मेकांपासून सारख्या अंतरांवरही नाहींत. खोदणाऱ्यांस भिंतीसारखा खडक जेथें जेथें सांपडला, त्याप्रमाणें त्यांनीं त्यात्या ठिकाणीं देवळें कोरलीं.

एक इंग्रेज ग्रंथकार ह्या लेण्यांविषयीं असें लिहितो कीं, ह्या भयाण इमारती प्रथम दर्शनीं मोठ्या भव्य दिसतात, व त्या पाहून मन थक्क आणि उदास होतें. ह्या देवळांची संख्या, त्यांची शोभा, व कांहीं-कांची विस्तीर्णता व उंची, कांहींकांतलें अनेक प्रकारचें नक्षीचें काम, त्यां-वरील नानाप्रकारची व चमत्कारिक वेलबुट्टी, त्यांच्या खांबांवरचें उत्तम प्रकारचें खोदींव काम, अनेक प्रकारचीं भिंतींवर कोरलेलीं चित्रें, व मोठमोठ्या विशाळमूर्ति, इत्यादि सर्व विषय दृष्टीस पडले म्हणजे पाह-णाऱ्याचे चित्तास मोठें आश्चर्य वाटतें, आणि मन व्यग्र होतें. ह्या इमारती पुष्कळ आहेत, व त्यांत पुष्कळ तऱ्हा आहेत, तेणेंकरून त्यां-ची एकवटीनें कल्पना मनांत आणितां येत नाहीं. ह्यांच्या प्रथमदर्शनीं अंतःकरणांत ज्या भावना होतात, म्हणून वर सांगितलें, त्या लवकरच जाऊन मनांत असा विचार उद्भवतो कीं, हीं एवढीं अचाट कामें ज्या

लोकांनीं बांधिलीं, व त्यांकरितां ज्यांनीं इतका श्रम केला, व त्यांवर इतकें कौशल्य प्रगट केलें, ते लोक अडाणी तर खचीत नव्हते; पण ते कोण होते, कोणत्या काळीं ते एवढ्या वैभवास चढले, व त्यांचें पुढें काय झालें, ह्याविषयीं कांहींच मागमूस राहिला नाहीं, हें कसें? असा विचार मनांत येऊन फारच आश्चर्य वाटतें. ह्या देवळांपैकीं कितीएक देवळें बौद्धधर्माचीं आहेत. तो बौद्धधर्म त्या धर्माच्या लोकांच्या राज्या-सारखा ह्या देशांतून नाहींसा झाला. आणि येवढी उलथापालथ झाली असतां ती विषयीं लेख अगदीं कोठेंही आढळत नाहीं, ह्याचेंही कारण काय असेल तें असो.

ह्या डोंगरावर बहुत लेणीं आहेत व त्यांमध्यें इंद्रसभा वगैरे कांहीं फारच उत्कृष्ट व मोठीं आहेत, त्या सर्वांचें वर्णन करूं लागल्यास फार विस्तार होईल; तो न व्हावा म्हणून त्यांमध्यें कैलास म्हणून जें सर्वोत्कृष्ट देवालय आहे, त्याचें थोडेंसें येथें वर्णन करितों.

हें देऊळ भोंवतालून खडक फोडून काढून, मध्यें कोरून, तयार केलें आहे. ह्याचा आंत जावयाचा थोरला दरवाजा जो आहे, तो फारच सुरेख व भव्य आहे. त्याच्या दोन्ही बाजूंस बहुत नक्षी व कोरींव काम आहे. हा दरवाजा फार मोठा आहे, व त्याच्या दोन्हींकडे देवड्या आहेत. दरवाज्यावर मोठें दालन आहे. ही नगारखान्याची जागा असावी असें वाटतें. ह्या नगारखान्याचे पुढले खांब फार शोभायमान आहेत. दरवाज्यांतून आंत जातांना दोहों बाजूंस बहुत कोरींव काम आहे. त्यामध्यें उजव्या बाजूस अष्टभुजाभवानीचें चित्र आहे, व डाव्या बाजूस गणपतीचें चित्र आहे. आंत गेलें म्हणजे मोठें विस्तीर्ण पटांगण दिसतें; हें सर्व खडक वरून फोडीत आणून केलें आहे, व त्या पटांगणांत मध्यें खडक राखून त्यांतून कांहींसें शंकाकृति असें मोठें देवालय कोरिलें आहे. ह्या देवळाची रचना, व त्यावर जें तऱ्हेतऱ्हेचें बारीक व मनस्वी कोरींव सुरेख काम आहे, तें, ह्याचें कितीही वर्णन केलें तरी पुरावयाचें नाहीं. हें मुख्य देऊळ व दरवाज्यावरचा मजला हीं पुलानें जोडिलेलीं आहेत. हा पूल इमारत खोदितांना मधला खडक राखून केला आहे. ह्या पुलाखालीं दरवाज्याच्या समोरासमोर शेवटीं कमळावर बसलेली भवानीची मूर्ति आहे, तिच्या दोन्ही बाजूंस दोन हत्ती आहेत.

व त्यांनीं आपल्या सोंडा उचलून देवीच्या वर एक मेकीस लाविल्या आहेत. दरवाज्यांतून आंत जातांना दोन्ही बाजूस हत्ती आहेत, ते छिन्न भिन्न झाले आहेत. हत्तींच्या मागें दोन्ही बाजूंस दालनें आहेत, व त्यांमध्यें डाव्या बाजूचीं फारच सुरेख आहेत; व त्यांत पुष्कळ कोरींव काम आहे. पटांगणांत गेलें म्हणजे दोन्ही बाजूंस दोन चौकोनी सुटे खांब आहेत, व ह्या खांबांच्या शिखरांवर कोरींव काम असेल असें वाटतें; परंतु हल्लीं तीं शिखरें मोडून गेलीं आहेत. त्या शिखरांवर एकेक सिंहाचें चित्र असेल असें डाव्या हातच्या खांबाच्या शिखरावर जो कांहीं मोडका भाग राहिला आहे, त्यावरून अनुमान होतें.

थोरल्या दरवाज्या वरचा नगारखाना व मुख्य देऊळ ह्यांच्यामध्यें पूल आहे, म्हणून सांगितलें; त्या पुलाच्या सुमारें मध्यभागीं नंदीचें चतुष्कोण देऊळ आहे. ह्या देवळाच्या दोन्ही बाजूंस दोन खिडक्या आहेत, व त्या खिडक्यांच्या समोरासमोर वर सांगितलेले दोन चौकोनी सुटे खांब आहेत. नंदीच्या देवळांतून निघून पुलावरून पुढें गेलें म्हणजे मुख्य देवळाचें पुढलें उघडें दालन लागतें. तें पुलापेक्षां उंच आहे. हें दालन फारच सुरेख आहे. ह्या दालनास दोन शानदार खांब आहेत, व त्या खांबांवर पुढल्या बाजूंस दोन सिंह आहेत, व आंतल्या आंगांत दुसरीं चित्रें आहेत. ह्या उघड्या दालनांतून मुख्य देवळाच्या मुख्य सभामंडपांत जावयाचा जो दरवाजा आहे तो फारच सुंदर आहे, व त्याच्या दोन्ही बाजूंस मोठमोठीं चित्रें कोरिलीं आहेत. ह्या उघड्या दालनांत खालच्या पटांगणांतून यावयास दोहों बाजूंस पायऱ्या आहेत. मुख्य देवळाचा चौथरा सुमारें एक मजला उंच आहे. त्याच्या दोहों बाजूंस बाहेरच्या आंगांवर एकीकडे रामरावणांची व एकीकडे कौरव पांडवांची अशा लढाया कोरिल्या आहेत, व ह्या चित्रांच्या मध्यें मध्यें हत्ती, सिंह, वाघ, वगैरे प्राण्यांचीं डोकीं कोरून त्यांवर मुख्य देऊळ आहे असें दाखविलें आहे.

उघड्या दालनांतून सभामंडपांत जावें. ह्या मंडपास दोहों बाजूंस खांबांच्या दोन दोन ओळी आहेत. सभामंडपाचें मधलें दालन चौकोनी आहे. ह्या मंडपांत एकंदर सोळा खांब आहेत. ह्या मंडपाच्या शेवटच्या बाजूस गाभारा आहे, त्यांत शिवाचें लिंग आहे. गाभा-

ऱ्याच्या दाराच्या दोहों बाजूंस पुष्कळ कोरींव सुरेख काम आहे. सभामंडपाच्या मध्यभागीं उभें राहिलें असतां दोहों बाजूंस दोन दारें आहेत, व त्यांच्या बाहेर दोन उघडीं दालनें आहेत. ह्या दालनांच्या ठिकाणीं देवळाचा चौथरा दोहों बाजूंस बराच पुढें गेला आहे. ह्या दालनांपैकीं उजव्या हाताकडलें दालन व त्याच्या समोरचा म्हणजे पटांगणांतला उजव्या हाताकडला सोपा ह्यांच्यामध्यें पूर्वी पूल होता, तो सुमारें शंभर वर्षांपूर्वी पडला. तसेंच मुख्य गाभाऱ्याच्या तिन्ही बाजूंस मोकळा चौथरा आहे. त्या चौथऱ्यावर सभामंडपांतून जाण्याकरितां मुख्य गाभाऱ्याच्या दोहों बाजूंस दोन दारें आहेत. ह्या प्रमाणें सभामंडपांत येण्यास पांच दारें आहेत. तसें ह्या उघड्या चौथऱ्यावर मुख्य गाभाऱ्याच्या दोहों बाजूंस दोन, व मागल्या बाजूस तीन, अशीं पांच देवळें आहेत. त्यांवर नक्षीचें काम व कोरींव चित्रें बहुत आहेत, व त्या देवळांत देवांच्या मूर्ति नाहींत.

पटांगणांत मुख्य देवळाच्या दोहों बाजूंस व मागल्या बाजूस असे मोठ मोठे सोपे आहेत. ही इमारत बहुतकरून दुमजली आहे. उत्तरेकडील सोप्याच्या दुसऱ्या मजल्यावर मोठें दालन कोरिलें आहे, ह्याचे खांब फार नक्षीचे व सुरेख आहेत, व दालनाच्या मध्यभागीं ब्रह्मा, विष्णु, आणि महेश्वर, ह्यांच्या मूर्ति शेजारीं शेजारीं आहेत. ह्यांखेरीज तेथें दुसरीं पुष्कळ कोरींव चित्रें आहेत, व त्यांपैकीं कांहीं फारच उत्कृष्ट आहेत. ह्या भागाच्या शेवटीं गाभाऱ्यांत शिवाचें लिंग आहे; व जिन्याचे वरच्या दाराजवळ नंदी आहे. दक्षिणेकडल्या बाजूस जो सोपा आहे, तो तिमजली आहे. ह्यांतही अनेक प्रकारचीं चित्रें आहेत. ह्या सोप्यांत मुख्य देवळाच्या सभामंडपांतून जावयास एक पूल राखिला होता, तो शंभर वर्षां पूर्वी पडला म्हणून वर सांगितलेंच आहे. त्या सोप्यांत हल्लीं शिडी लाविल्यावांचून जातां येत नाहीं. औरंगजेब बादशाहानें व दुसऱ्या मुसलमान राजांनीं ह्या देवळाची बहुत खराबी केली, व पुष्कळ मूर्ति छिन्नभिन्न करून टाकिल्या आहेत.

कैलास हें देऊळ बाहेरून पाहिलें असतां तटाच्या भिंतीसारखें सरासरी भिकार दिसतें; परंतु आंत जाऊन तेथलें मुळापासून शिखरापर्यंत कोरींव कामानें भरलेलें मुख्य देऊळ व भोंवतालचे सोपे व सुटे

खांब व हत्ती व दुसरीं हजारों चित्रें हें सर्व जेव्हां दृष्टीस पडतें, तेव्हां चित्तास फारच चमत्कार वाटतो. ह्या एवढ्या अफाट कामाचा नकाशा पूर्वी मनांत आणून तें तयार ज्यांनीं केलें असेल, ते लोक मोठे कल्पक, मोठे सामर्थ्यवान्, व दृढनिश्चयी असले पाहिजेत, व हे गुण हल्लींच्या हिंदु लोकांत त्या लोकांच्या शतांश किंवा लक्षांश सुद्धां उरले नाहींत. वर कैलासाचें जें वर्णन केलें आहे, तें अगदीं संक्षिप्त व फार कोतें आहे. एक इंग्रेजग्रंथकार म्हणतो कीं, ह्या स्थलाचें वर्णन करून पुरावयाचें नाहीं. त्याची वास्तविक कल्पना मनांत यावयास तें स्थल स्वतः डोळ्यांनींच पाहिलें पाहिजे.

---

## डोळ्याच्या रचनेविषयीं देवाचें चातुर्य.

कोणी एक विद्वान् होता तो असें म्हणत असे कीं, नेत्रनिरीक्षण नास्तिक्यभंजन, म्हणजे डोळ्याच्या रचनेची पाहणी नास्तिकपणाची भंजक होय. डोळ्याच्या रचनेसंबंधी जितक्या गोष्टी आहेत तितक्यांत कर्त्याची सावधगिरी दिसून येते; आणि डोळ्याचें रक्षण चांगलें व्हावें ह्याविषयीं त्याची काळजीही दिसून येते. डोळ्याची योग्यता व नाजूकपणा पाहिला असतां इतकी काळजी असावीच असें वाटतें. त्याला बळकट व खोलगट असें एक हाडाचें घर असतें. हें घर शेवटास पोंखरलेलीं अशीं सात हाडें जुळून त्याचें केलेलें आहे. ह्या घराच्या आंत डोळा मांद्यांत बसविलेला असतो. सर्व प्राण्यंगांमध्यें, म्हणजे धातूंमध्यें, मांदें डोळ्याच्या स्थिरतेला व चलनाला फार सोईचें आहे.

डोळ्याला भिंवईचा आश्रय आहे. भिंवई म्हणजे केसांची कमान, ती छपरी पडवीसारखी आहे; ती आहे म्हणून कपाळाचा घाम आणि कपाळावरचें पाणी डोळ्यांत जात नाहीं. पापण्या तर भिंवईपेक्षां त्याचें अधिक रक्षण करितात. पापण्या डोळ्याचें रक्षण करितात, डोळ्याला पुसितात, आणि झोंप लागते तेव्हां त्याला झांकितात.

ह्या इंद्रियाच्या द्वारानें जीं कामें होतात तीं कर्त्याच्या उद्देशाप्रमाणें होतात, हें स्पष्ट दिसतें. ह्यांतल्या उद्देशापेक्षां कोणत्याही कौशल्याच्या करामतींत कर्त्याचा उद्देश अधिक स्पष्ट दिसून येतोसें वाटत नाहीं, किंवा ह्या इंद्रियाच्या कामास जीं योग्य साधनें आहेत त्यांहून योग्य

अशीं साधनें कोणत्याही कामाला आहेत असें वाटत नाहीं. जर करितां डोळ्याच्या साधनांची योग्यता सृष्टीचे शोधकांनीं मनांत आणिली नसली, तर, हें काम नित्याचें पाहाण्यांतलें आहे व उघड वाटेवरचें पडलें, म्हणून मात्र मनांत आणिली नसावी. जी गोष्ट नित्याच्या पाहण्यांतली असते तिची उपेक्षा सहजच होते. ती शोधकांनीं होऊं देऊं नये. एखाद्या गोष्टीचीं उदाहरणें आपण पाहत असतां, विरळ आणि चमत्कारिक अशांच्या शोधास लागून, जीं उदाहरणें फारच उघड असतात तीं आपण वगळतों, ह्या मनोवृत्तीनें जीं उदाहरणें अवश्य मनांत आणायाजोगीं असतात त्यांचीही कधीं कधीं उपेक्षा होते.

डोळा चकचकीत राहून त्याचा व्यापार चांगला चालावा म्हणून त्यास ओलसरपणा आणि स्वच्छपणा हे गुण नेहमीं असले पाहिजेत. हे गुण त्याला पुरवायाकरितां ह्याच कामासाठीं रक्तापासून झालेलें पाणी शिरेच्या द्वारानें त्यास नेहमीं मिळतें. ह्या कामास पुरून जें जास्त पाणी राहतें तें क्षाराच्या रूपानें मोठ्या पांखराच्या पिसाच्या नळी एवढें हाडांस एक भोंक आहे त्यांतून नाकांत जातें. नाकांत तें पाणी शिरल्यावर नाकपुडीच्या आंतल्या बाजूवर पसरतें; आणि श्वासोच्छास होत असतां जो उष्णवायु त्यावरून सतत जातो, त्याच्या योगानें तें वाफ होऊन निघून जातें. कापड रंगविण्याच्या कारखान्यांत किंवा कलालाच्या कारखान्यांत राबाचें पाणी जाण्याकरितां ज्या नळ्या किंवा मोऱ्या केलेल्या असतात त्या ह्या पेक्षां अधिक कौशल्यानें केलेल्या असतात असें नाहीं.

मासे ज्या द्रव्यांत राहतात त्याजकडून, म्हणजे पाण्याकडून, नेहमीं त्यांच्या डोळ्यांस धुवणी मिळतें, म्हणून त्यांला ह्या पाण्याच्या पुराव्याची तरदूत नसते. ही गोष्ट लक्षांत ठेवावयाजोगी आहे.

---

## समुद्रांतील प्रवालकोटक.

### म्हणजे पोंवळीं करणारे किडे.

हे किडे समुद्रांत असतात. मुख्यत्वेंकरून दोहों अयनवृत्तांच्या मध्यें जो प्रदेश आहे त्यांत फार आहेत. हे आकारानें लहान मोठे

असतात; जे फार लहान ते टांचणीच्या डोक्या येवढे असतात, आणि जे फार मोठे ते वाटाण्याहून कांहींसे मोठे असतात. ह्यांची कृति फार चमत्कारिक आहे. हे जीव इतके क्षुल्लक आहेत तरी हे लक्षोपलक्ष एकत्र जमून, युगानुयुग आपला उद्योग सतत चालवून मोठमोठे खडप रचितात. प्रवालभूमिका म्हणून जे समुद्रामध्यें पोंवळ्यांचे खडप आढळतात ते हेच.

ह्या किड्यांनीं केलेला न्युहालंदाचा जो मोठा खडप तो एकटा हजार मैल लांब भरतो; आणि त्याची उंची तर एक हजार फुटांपासून दोनहजार फुटांपर्यंत भरते. हा खडप डोंगरांची एक ओळ आहे; ती लांबीला इंग्लंद देशाच्या ह्या टोंकापासून त्या टोंकापर्यंत जी लांबी तिच्या तिप्पट आहे; आणि उंचीला तर इंगलबरो म्हणून एक डोंगर आहे तितका, किंवा स्कातलंदांतील जे साधारण डोंगर आहेत तितका आहे: आणि हें एवढें मोठें काम घरांतील माशांपेक्षांही लहान किड्यांनीं केलेलें आहे!

हें तर कांहींच नाहीं. पासिफिक् नामक जो महासागर तो ह्याच प्रकारच्या रचनेच्या, व ह्याच क्षुल्लक शिल्प्यांनीं केलेल्या बेटांनीं सारा व्यापलेला आहे. ज्यास प्राण आहे नाहीं अशा प्रकारचे हे प्राणी लहानशा घरांत कोंडून ठेविलेले, व दोन दिवसांच्या आयुष्याचे, असे असून, मनुष्यें, जनावरें, व वनस्पति ह्यांच्या राहण्याच्या जागा दिवसान दिवस व तासानतास उत्पन्न करीत आहेत! जणो, हे नवीन द्वीपच करीत आहेत! किंबहुना हे नवीन जग रचीत आहेत! परमेश्वराच्या परमसमर्थ हाताच्या करणीच्या कौतुकांतील हें एक कौतुक आहे. लोकांचें कल्याण म्हणून जो आशय त्यानें दयाबुद्धीनें धरिला, तो सिद्धीस नेण्याकरितां जीं साधनें त्यानें योजिलीं आहेत त्यांतील हें एक साधन आहे, असें म्हणण्यास चिंता नाहीं.

हे किडे नवें द्वीप उत्पन्न करीत आहेत, असें जें आम्हीं म्हटलें, हें वायफळ नव्हे, यथार्थच बोलणें आहे. नावाडी लोकांस आतां समजलें आहे कीं दक्षिण महासागर ह्या अशा बेटांनीं भरून जाऊन पाण्याखालीं त्याच जातीचे खडपही पुष्कळ झाले आहेत. ते पाण्याच्या पृष्ठभागाकडे लवकर वाढत चालले आहेत. ते पुढें पाण्याच्या

वरतीं येऊन, त्यांजवर मनुष्यांची वस्ती होऊन त्यांनीं आपलें राज्य वाढवावें, अशी ईश्वराची योजना आहे. हे खडप वाढतां वाढतां एकमेकांस जडून त्यांचीं मंडळें व रांगा होतात; पुढें आणखी वाढतां वाढतां त्यांचे मोठे विस्ताराचे माळ होऊन जातात. हा कार्यक्रम तांबडा समुद्र, म्हणजे अरबी समुद्र, ह्यांतही दिसण्यांत येतो. त्यांत प्रवालकीटकांनीं केलेले खडप फार वाढल्यामुळें दिवसानदिवस जहाजांच्या जाण्यायेण्यास फार अडचणी होत चालल्या आहेत; आणि नजाणो कदाचित् पुढें असा समय येईल कीं मिसर देश आणि अरबस्तान, हीं त्या समुद्राच्या कांठांवर समोरासमोर आहेत, ह्यांस जोडणारें असें एक मैदान मध्यें उत्पन्न होईल.

ह्या किड्यांनीं जें काम आरंभिलें तें पूर्ण करण्यासाठीं जी तजवीज परमेश्वरानें जमिनीच्या पोटांत करून ठेविली आहे ती आपण मनांत आणिली असतां आपणास चमत्कार व संतोष वाटल्यावांचून राहणार नाहीं. ती तजवीज कोणती म्हटली, तर जमिनीच्या पोटांत ज्वालामुखी व भूमिकंप ह्यांचें बीज ठेविलें आहे; ह्याच्या योगानें प्रसंगानुसार ज्वालामुखी व भूमिकंप होऊन त्यांच्या द्वारा डोंगर व खोरीं उत्पन्न होतात, आणि समशीतोष्ण कटिबंधांतील हवा विषुववृत्ताच्या जवळील प्रदेशांत येते. ह्या रीतीनें त्या किड्यांनीं आरंभिलेलें काम शेवटास जातें, आणि जेणेंकरून पृथ्वीला सुपीक करावयाकरितां मेघ जमावयाचे, व झरे फुटावयाचे, व नद्या वहावयाच्या, असें मोठें जलयंत्र त्याच द्वारानें उत्पन्न होतें. हें सर्व काम लहानशा एका तासांत होऊन जातें. प्रवालकीटक हे परमेश्वरानें निरर्थक केले नाहींत, तसेंच ज्वालामुखी व भूमिकंप हींही लोकांच्या नाशाकरितां केलीं नाहींत; तर हीं साधनें जरी विपरीत दिसतात तरी यांपासून एकच कार्य निष्पन्न होतें; तें कार्य कोणतें तर मनुष्यांचें कल्याण.

---

## स्नायूंची शक्ति.

प्राण्यांच्या आंगीं बळ म्हणून जें आहे तें स्नायूंवर आहे. सर्वांच्या स्नायूंची शक्ति सारखी नसते; कोणाची फार, कोणाची थोडी असते. ओझें वाहणारे, कुस्ती करणारे, वगैरे लोक अभ्यासानें आपल्या स्नायूंची शक्ति वाढवितात.

लंदन शहरांतील जे मोठे ताठर ओझेकरी असतात ते अजमासें दोनशें पौंद, म्हणजे सुमारें अडीच मण, ओझें वाहतात. तुर्क देशांत तर असे ओझेकरी आहेत म्हणून ऐकितों कीं ते लहानपणापासून ओझें वाहण्याचा अभ्यास करितात, ह्यामुळें त्यांस सातशें पौंदांपासून नऊशें पौंदांपर्यंत ओझें वाहण्याचें सामर्थ्य येतें. सर्वांहून जो निर्बल मनुष्य त्याला सवाशें पौंद वजनाचें ओझें हातानें भुइसांड करितां येतें; आणि बळकट आहे त्याला तर चारशें पौंदांचें ओझें भुइसांड करितां येतें.

तोफम नामें एक सुतार इंग्लंदांत होता त्याला आठशें पौंद वजनाचें ओझें भुइसांड करितां येत असे. एक वेळ त्यानें छप्पन पौंदांचें वजन सहा फूट लांबीच्या एका चौरंगाच्या शेवटास लावून तो चौरंग आपल्या दांतांनीं व गुढघ्यांनीं उचलिला होता. एकदां त्यानें तीन तसू घेराची लोखंडी पहार आपल्या डाव्या मणगटावर मारून गुण्यासारखी वांकविली; आणि तशीच एक दुसरी पहार मानेवर दाबून वळविली, आणि पुन्हा ती सरळ केली. आणि दोन बोटां इतका जाड तागाचा दोर त्यानें तटातट तोडिला.

इंग्लंदांतील आक्सफोर्द नांवाच्या शहरांत कांहीं वर्षांमागें एक मनुष्य राहत असे तो करांगुळीस छप्पन पौंदांचें ओझें अडकवून अर्ध मिनित म्हणजे सव्वापळपर्यंत हात लांब करून धरीत असे. तसेंच कोणा एका मनुष्याची गोष्ट अशी ऐकिली आहे कीं तो ओणवा होऊन, शरीराची कमान करून, दोन तीन हजार पौंद वजनाची तोफ पाठीवर संभाळून धरीत असे.

थोडीं वर्षें झालीं, बेलजोनी ह्या नांवाचा प्रख्यात पुरुष होता, तो पहिल्यानें लंदन शहरांतील नाटकशाळांमध्यें तमाशा दाखवूं लागला. तेव्हां त्याचें आंगबळ इतकें होतें कीं दहा बारा मनुष्यांचा मनोरा करून त्याजवर आणखी दोन तीन मुलें ठेवून, तेवढा तो मनोरा उचलून घेऊन रंगभूमीवर इकडून तिकडे खेपा करीत असे. त्या सर्वांचें वजन दोन हजार पौंदांहून फारसें कमी नसे.

मनुष्यांच्या स्नायूंच्या शक्तीनें जीं हीं विलक्षण कृत्यें झालीं आहेत, ह्यांचा विचार आपण केला असतां दुसऱ्या प्राण्यांच्या स्नायूंच्या मोठ्या

शक्तीनें जीं कृत्यें होतात तीं पाहून आपणांस फारसें आश्चर्य वाटणार नाहीं.

हत्तीची शक्ति इतकी आहे कीं तीन चार हजार पौंदांचें ओझें तो सहज पाठीवर वाहून नेतो. त्याच्या सोंडेची शक्तिही चमत्कारिक आहे. त्याच्या सोंडेमध्यें तीन हजार स्नायु निरनिराळे असतात, अशी कोणीं गणना केली आहे. ह्या विलक्षण सोंडेनें तो मोठमोठ्या वृक्षांच्या फार बळकट खांद्या पटकन मोडून टाकितो, आणि आपल्या दांतांनीं ते वृक्ष देखील उपटून टाकितो.

सिंहाच्या स्नायूंचे ठायीं शक्तीचा केवढा संचय असतो! तो आपल्या पायाच्या एकाच तडाक्यानें घोड्याच्या पाठीचा कणा मोडून टाकितो; आणि आपल्या जाभाडांत म्हसरूं धरून भरधांव पळत सुटतो. तो आपल्या दांतांच्या मध्यें त्याचीं हाडें चुरडितो, आणि तीं आपल्या आहारांतलीं आहेत म्हणून गिळून टाकितो.

स्नायूंस बहुतकरून हाडांचा नेटावा पाहिजे, तरी हाडांच्या आश्रयावांचूनही स्नायूंला बळ असतें. व्हेल नांवाच्या प्राण्याचें शेपूट केवळ स्नायूंचेंच असतें, तरी व्हेलाचें मुख्य आणि मोठें जबरदस्त शस्त्र म्हटलें तर तें शेपूटच होय. हें शस्त्र त्याजपाशीं असतां त्याला कोणाचें भय नाहीं. त्याला मोठीही नाव कसपटाप्रमाणें आहे; कांतर शेपटाच्या एका तडाक्यानें तिचे तुकडे तुकडे करून टाकायाजोगें त्याच्या आंगीं सामर्थ्य आहे. शार्क म्हणजे तंतु ह्या नांवाचा जो मासा त्याचा सांगाडा केवळ मऊ मऊ हाडांचा, म्हणजे स्नायूंच्या जातीचा असतो, त्याला वास्तविक हाड एक देखील नसतें; तरी तो मोठा बळकट असतो, आणि समुद्रांतील सर्व प्राण्यांपेक्षां तो क्रूरकर्मा होय. जें कांहीं त्याला सांपडतें तें तो आपल्या मऊ मऊ हाडांच्या जाभाडानें धरून गटकर गिळून टाकितो. ह्या माशाची एक जात पांढरा शार्क म्हणून आहे, त्याची लांबी बहुतकरून तीस फूट असते, आणि त्याचें चार हजार पौंद वजन असतें, ह्या माशानें एका ग्रासानें मनुष्य गिळून टाकिलें अशी गोष्ट पाहण्यांत आली आहे.

---

## सृष्टिजन्य ईश्वरज्ञान.

### श्लोक.

तुझीं कृत्यें देवा अमित भुवनामाजि दिसती.
गुणी कोणी नाहीं इतर तुजवांचून सुमती.
स्वसंपत्तीनें तूं निखिल जग हें पूर्ण करिशी.
जगत्कर्ता ज्ञाता कुशल तर तूं एकचि वशी.

भिन्न भिन्न जातींचे क्षुद्र प्राणी आपलीं आंडीं कशीं ठेवितात ह्या विषयीं, आणि कसर, गोमाशी, मुंग्या, राणी मुंगी, कामकरी मुंग्या, मुंग्यांचीं पोरें, मुंग्यांचीं आवरणयुक्त पोरें, पक्ष्यांचीं कोटीं, आणि मधमाशांचीं पोळीं, ह्यांविषयीं पुढील संभाषण आहे.

**राघोबा**—आई, एक जातीचा पतंग आहे तो आपलीं आंडीं कोबीच्या पानावर घालितो, आणि त्या आंड्यांतून जो सुरवंट निघतो, तो आपल्या उदरनिर्वाहार्थ कोबीचें पान खातो, असें त्वां सांगितलें; तर त्या सुरवंटास कोबीच्या पानाचेंच खाणें योग्य आहे हें त्या पतंगास पहिल्यानें कसें कळतें बरें?

**आई**—मुला, तुझा हा प्रश्न ऐकून मला फार संतोष झाला; कारण ह्यावरून मीं तुला जें सांगितलें आहे त्याचें तूं मनन करीत असतोस असें दिसून येतें. तर कार्यकारणभाव जाणण्यास तुझ्यानें जितका प्रयत्न करवेल तितका तूं करीत जा, म्हणजे केव्हां केव्हां तुझें तुलाच समजेल. आणि हें जितकें वारंवार तुझ्या ध्यानांत येईल तितकें चांगलें; कारण जसजसें तुझ्या ध्यानांत येत जाईल तसतसा तुला उल्हास होऊन पुन्हा प्रयत्न करण्यास तुझ्या मनास हुशारी व धैर्य येईल, आणि तूं पुन्हा जे प्रयत्न करशील तेही कदाचित् सफळ होतील.

**रा०**—आई, तो पतंग जीं पानें त्यास योग्य त्यांवरच नेहमीं आंडीं कशीं घालितो ह्याच्या कारणाचा शोध लागण्याकरितां मीं यत्न केला, परंतु लागला नाहीं, म्हणून म्यां तुला पुसिलें.

**आ०**—मुला, त्या पतंगानें नेहमीं यथायोग्य पानावरच आंडीं घालावीं, त्यांत कधीं अंतर पडूं नये, हा मोठा चमत्कार आहे. कसा म्हण-

घील, तर तो पतंग जन्मांत एक वेळ आंडीं घालितो, आणि मग लवकरच मरतो; तस्मात् तीं आंडीं उबवावयास योग्य स्थान कोणतें हें वारंवार तसें केल्यानें त्यास कळलें आहे, अशी ही गोष्ट नाहीं. आणखी तो पतंग आपण स्वतः कोबीचें पान खात नाहीं, तर पुष्पांच्या देठांतील मध चोखून आपलें पोषण करितो. तेव्हां मग आपल्या आंड्यांतून जो सुरवंट येणार त्यास मध चोखितां येणार नाहीं, व त्यास कोबीच्याच पानाचें खाणें असावें, हें त्या पतंगास कसें समजत असेल बरें?

रा०—आई, हा मोठा चमत्कार आहे, ह्याचें कांहीं कारण माझ्या लक्षांत येत नाहीं.

आ०—बाबा, जेव्हां मी ह्या गोष्टीचा विचार करितें तेव्हां मलाही मोठें आश्चर्य वाटतें. आणि ह्याविषयीं मलाही तुजपेक्षां कांहीं विशेष ठाऊक आहे असें नाहीं. हें असें आहे हें मात्र मला कळतें, परंतु असें कां होतें हें माझ्यानें सांगवत नाहीं.

निरनिराळ्या जातींचे क्षुद्रप्राणी निरनिराळ्या ठिकाणीं आपलीं आंडीं घालितात, तीं घालण्याचे प्रकारही फार निरनिराळे आहेत.

एक जातीची कसर आहे ती आपलीं आंडीं पावसाळ्यांत घालिते, तीं वसंतऋतु येई तोंपर्यंत उबत नाहींत. ती जर आंडीं पानावर घालील तर हिंवाळ्यांतील वायु त्यांस उडवून टाकील, आणि त्यांतून जो सुरवंट उत्पन्न होईल तो योग्य खाणें नमिळून उपाशी मरेल, ह्यास्तव ती कसर ज्या झाडाचीं पानें त्या सुरवंटास खाण्यास योग्य असतात त्याच झाडाच्या डहाळी सभोंवतीं आपलीं आंडीं चिकटविते. त्या आंड्यांच्या वाटोळ्या हारी असतात, आणि तीं बारीक मोत्यांसारखीं दिसतात. तीं एका जातीच्या चिकानें एकमेकांशीं डकविलेलीं असतात. तो चीक इतका चिकट असतो कीं त्याच्या योगानें तीं आंडीं वाऱ्यानें उडत नाहींत, किंवा पावसानें नाश पावत नाहींत, अथवा त्यांस एखादा किडाही खाऊं शकत नाहीं.

हें सर्व कृत्य ती कसर आपली शेप आणि मागले पाय ह्यांहीं करून युक्तीनें करिते. ती असें करिते ह्याचें कारण तिला कळतें काय?

एक लहान माशी आहे ती आपलीं आंडीं गुलाबाच्या व दुसऱ्या झाडांच्या डहाळ्यांवर घालिते. अशाकरितां कीं त्यांपासून जे सुरवंट उत्पन्न होतील त्यांनीं त्याच झाडाचीं पानें खावीं. तीं आंडीं आंत घालायास झाडाच्या डहाळ्यांस लहान भोंकें पाडिते.

अशीं भोंकें जर तुला पाडायाचीं झालीं तर तीं पाडण्यास तुला सामता घ्यावा लागेल, आणि तीं गुळगुळीत व सारखीं करण्यास तुला कानसीचाही उपयोग पडेल; परंतु ह्या लहान माशीजवळ सामता नाहीं, व कानसही नाहीं. तथापि तिला करवतासारिखेंच एक चांगलें हत्यार आहे, तें आपल्या करवतापेक्षां फार चमत्कारिक आहे, कारण जसे दोन करवत एकमेकांवर ठेविले असतां दोहों बाजूंनीं कापितां येईल, तसेच त्या हत्यारास प्रत्येक बाजूस दांते आहेत, त्यांहीं करून दोहों बाजूंनीं कापितां येतें, आणि करवत व कानस ह्या दोहों हत्यारांचीं कार्यें करितें.

आंड्यांतून जे सुरवंट निघणार ते अमुकच झाडाचीं पानें खातील हें त्या माशीला समजतें काय?

गोमाशी आपलीं आंडीं गुरांच्या कातड्याच्या उबेस घालिते. ह्या माशा गुरांच्या भोंवतालीं फिरून त्यांना उपद्रव देतांना त्वां पाहिल्या असतीलच. त्या गुरांच्या आंगास सुकुमार जागीं टोंचून पीडा करितात. झाडांच्या पानावर आपलीं आंडीं घालून उपयोग नाहीं हें त्या गोमाशीला समजतें काय? राघोबा, त्वां कधीं दुर्बीन पाहिली आहे काय?

रा० —होय आई— मामाजवळ एक आहे, ती पाहिजे तेव्हां तिच्या नळ्या ओढून लांबवितां येते. तिचें तुला स्मरण नाहीं काय?

आ०—असो, ह्या गोमाशीच्या शेपेंत चार भागांचें केलेलें एक कठीण चिवट शिंगाप्रमाणें हत्यार आहे; तें दुर्बिनीच्या नळ्यांसारखें बाहेर निघतें; त्याच्या शेवटास पांच आणीदार आंकडे आहेत, त्यांतील तीन लांबट आहेत, ते सर्व मिळून टोपणाप्रमाणें एक हत्यार झालें आहे, तेणेंकरून ती थोडक्या पळांत गुरांच्या आंगास क्षत पाडून त्यांत आंडीं घालिते.

ज्या लहान मुंग्या आपल्या वारुळांत थवा करून राहतात त्या तुला ठाऊकच असतील. त्या आपल्या आंड्यांचा संभाळ करण्यांत फार तत्पर

असतात. त्या मुंग्यांतील एक मुंगी सर्व आंडीं घालिते, तिला राणी मुंगी असें म्हणतात. ती आपलीं आंडीं नेमलेल्या ठिकाणीं घालीत नाहीं, तर मुंग्यांच्या वारुळाजवळ कोठें तरी घालिते. आणि त्यांची चौकशी ती स्वतः कांहीं ठेवीत नाहीं.

तीं आंडीं तिनें घातल्यावर लागलेंच दुसऱ्या मुंग्या, ज्यांस कामकरी मुंग्या असें म्हणतात, त्या तीं आंडीं ओलसर करण्याकरितां आपल्या तोंडांत घेऊन जिभेनें त्यांची उलथा पालथ करितात.

त्या त्या आंड्यांच्या राशी जागोजागीं करून ठेवितात, आणि तीं उबत तोंपर्यंत नेहमीं त्यांची चौकशी ठेवितात. दिवसांतून वारंवार त्या आंड्यांस जसजशी उष्णता किंवा ओलावा पाहिजे तसतसें त्या मुंग्या तीं आंडीं एके ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं नेत आणीत असतात.

थोडक्याच दिवसांत तीं आंडीं उबतात, नंतर त्यांतून जीं लहान पोरें निघतात त्यांस त्या कामकरी मुंग्या फार जपतात. त्या त्या पोरांस नेहमीं खाणें पुरवितात. आणि दररोज सूर्य अस्तास जाण्याच्या पूर्वी दोन अडीच घटका, त्यांस थंडीचा उपद्रव होऊंनये म्हणून, वारुळांतील लहान लहान खोल्यांत नेऊन ठेवितात; आणि प्रातःकाळीं पुन्हा त्यांस बाहेर आणितात. परंतु त्या वेळीं थंडी किंवा पाऊस असला, तर त्यांस वारुळांत राहूं देतात. सूर्य जसा लवकर किंवा उशिरानें उगवतो व मावळतो तसा सकाळीं सायंकाळीं त्या मुंग्या हें कृत्य लवकर किंवा उशिरानें करितात, हा मोठा चमत्कार आहे. वारुळाच्या बाह्य प्रदेशीं ऊन पडलें म्हणजे वर ज्या मुंग्या असतात त्या मोठ्या घाईनें दुसऱ्या मुंग्यांस जागृत करण्याकरितां आंत जातात, आणि त्या जागृत होऊन उतावळीनें आपलीं पोरें वारुळाच्या बाह्य प्रदेशीं आणून अर्धघटिकापर्यंत ठेवितात, नंतर त्यांना ऊन पडत नाहीं अशा जागीं नेऊन ठेवितात.

कधीं कधीं एका वारुळामध्यें मोठीं पोरें सात आठ हजार पावेतों असतात, आणि लहानही तितकींच असतात.

मोठीं पोरें पुष्कळ खातात, म्हणून त्यांस दिवसांतून पुष्कळ वेळ खाणें पुरविण्याकरितां कामकरी मुंग्यांस फार खपावें लागतें.

आणखी त्या लहान पोरांस स्वच्छ राखण्याकरितां त्या कामकरी मुंग्या फारच श्रम घेतात, आणि ह्याकरितां त्या नेहमीं त्यांस चाटीत असतात.

तीं पोरें वाढावयाचीं तितकीं वाढलीं म्हणजे आपणांस एका रेशमी आवरणांत गुंडाळून घेतात. तीं आवरणें तीं आपल्या शरीरांतून तंतु काढून करितात, तेव्हां त्यांच्या आकृति व स्वरूपें बदलूं लागतात.

ह्या रेशमी आवरणांत जीं पोरें असतात तीं जरी खात नाहींत तरी पहिल्याप्रमाणें त्यांची चौकशी ठेवावी लागते.

त्या मुंग्या आंडीं जशीं नित्य सकाळीं सायंकाळीं वारुळांत इकडून तिकडे नेतात, तशीं आवरणयुक्त पोरांसही नेतात आणितात. जर एखादे वेळीं कोणी पशु जात असतां त्याचा पाय पडून तें वारूळ चेंगरलें, तर त्या सर्व मुंग्या तीं आवरणांतील पोरें मातींतून काढण्याच्या आणि तें वारूळ पुन्हा नीट करण्याच्या उद्योगास लागतात.

तीं आवरणांतील पोरें मोठीं झालीं, आणि त्यांतून त्यांची बाहेर येण्याची वेळ आली, हें त्या कामकरी मुंग्यांस समजतें काय? बरोबर वेळ होतांच तीन चार मुंग्या त्या आवरणाच्या एका टोंकाकडून तें विरळ करण्यास तंतु ओढूं लागतात, तर तीं पोरें तें करावयास स्वतः अशक्त आहेत हें-हीं त्या कामकरी मुंग्यांस समजतें काय? त्या मुंग्या त्या आवरणास भोंकें पाडितात, आणि त्यांतील प्रत्येक दोन भोंकांमध्यें जे तंतु असतात ते एकामागून एक तोडितात, तेणेंकरून तीं पोरें बाहेर निघण्याजोगें एक मोठें भोंक होतें.

हें सर्व कृत्य त्या हळू हळू करितात, आणि मग तसेंच मोठ्या तजविजीनें त्या पोरांच्या आंगावरील जुनीं कातडीं काढितात, आणि कितीएक दिवसपर्यंत त्यांचा बंदोबस्त ठेवून त्यांस वारुळांतील सर्व ठिकाणांतून व कोंपऱ्यांतून फिरावयास शिकवितात.

जर मला अवकाश असता, तर ह्या चमत्कारिक व उद्योगी लहान प्राण्यांविषयीं, आणि दुसरे जे अनेक प्राणी भिन्न भिन्न प्रकारें आपलीं आंडीं घालितात, व त्यांस उबविण्याची तजवीज राखितात, व आंड्यांतून जे सुरवंट आणि पोरें बाहेर येतात तीं आपले आहार कोणत्या प्रकारें मिळवितात, ह्या सर्वांविषयीं मीं तुला सांगितलें असतें.

आपापलीं पोरें आणि अंडीं ह्यांचा संभाळ करण्याविषयीं जें कर्तव्य तें करावें हें त्या क्षुद्र प्राण्यांस फार चांगलें समजतें, असें वाटतें; पण तें त्यांस कसें समजतें ह्याचा शोध लागणें फार अवघड आहे.

ते प्राणी कितीएक कामें करितात तीं कशीं करावीं ह्याविषयीं त्यांस पूर्वी विचार करावा लागतो असें वाटतें. आणि पशु, पक्षी, आणि मत्स्य ह्यांसही असें करावें लागतें. परंतु हे सर्व प्राणी यत्किंचित् कल्पना किंवा विचार केल्यावांचून अनेक चमत्कारिक कामें बरोबर व्यवस्थेनें करितात.

हरएक जातीचे सर्व पक्षी वर्षोंवर्ष आपलीं कोटीं एकसारखीं बांधितात, ह्याचप्रमाणें मधमाशाही आपलीं पोळीं करितात. आणि त्या पोळ्यांतील घरें पाहिजेत तेवढीं मोठीं व इच्छ्या त्या आकृतीचीं बरोबर करितात. जसें कोणी म्हणेल कीं, घर कसें बांधावें ह्याच्या कागदावर रेघा व आकृति मनुष्य काढितो, आणि तें कसें असावें ह्याचें गणित करितो, तसें मधमाशांसही करितां येतें.

पक्षी आपलीं कोटीं कशीं बांधावीं ह्याची, आणि मधमाशा आपलीं पोळीं कशीं करावीं ह्याची, पूर्वी कल्पना करितात काय? हें कसें करावें हें थोर पक्षी व माशा आपल्या लहान पिलांस शिकवितात काय? जर असेल तर कांहीं फेरफार व अधिक उणें न करितां वर्षोंवर्ष तीं पिलें पुढें आपलीं कोटीं व पोळीं एकसारखीं बांधितात हा मोठा चमत्कार आहे.

मनुष्यास मधमाशांचें पोळें करणें झालें तर त्यास तें कसें करावें हें पुष्कळ दिवस शिकावें लागेल. पहिल्यानें त्यास नीट करितां येणार नाहीं, मग बहुत अशीं तशीं करितां करितां कदाचित् बरोबर करील.

**रा०**—होय आई, तें करावयाजोगें त्याच्या आंगीं कौशल्य आल्यावर तें कसें करावें हें दुसऱ्यास शिकविण्यास फार काळ लागेल.

**आ०**—होय, राघोबा, तूं म्हणतोस तें खरें; आणि जर त्यानें तें पोळें करण्याची विद्या शंभर मनुष्यांस सांगितली, त्यांहीं दुसऱ्यांस शिकविली, असें करितां करितां शेवटीं लक्षावधि मनुष्यें जरी शिकलीं, तरी तीं सर्व मधमाशांप्रमाणें पोळीं एकसारखीं करितील असें तुला वाटतें काय?

रा०—आई, मला तर असें वाटत नाहीं.

आ०—मुला, आणखी; एक पोळें करण्यास अनेक माशा लागतात. तथापि त्या सर्व एका बेतानें कामास प्रवर्ततात. त्या सर्व कांहीं घोळ न होतां किंवा व्यंग न पडतां एकत्र मिळून काम करितात. कितीएक एक काम करितात, कितीएक दुसरें काम करितात, तथापि पोळ्यांचें काम पूर्ण होई तों ज्या वेळीं ज्या ठिकाणीं जसें पाहिजे तसेंच नीट करितात. आणखी, त्या दरवर्षीं उन्हाळ्यांत सर्व देशीं एकसारखें करितात. जर हें सर्व कसें करावें हें मधमाशांस अगत्य शिकावें लागत असेल; जर ह्याविषयीं त्यांस विचार, मनन, व भाषण हीं अवश्य करावीं लागत असतील; जर आपलीं पोळीं त्यांत आपण रहावें व आंत मध सांठवून ठेवावी, आणि आपलें व आपलीं अंडीं व पोरें ह्यांचें संरक्षण व्हावें, ह्या संकेतें करूनच तीं पोळीं करीत असतील, आणि आपलीं पोळीं कशीं करावीं ह्याची पूर्वीं कल्पना करून मग जर कामास लागत असतील, तर मनुष्यापेक्षां त्यांचा संकेत, कल्पना, व कौशल्य, हीं अधिक असें होईल.

रा०—आई, असें जर आहे, तर जसा मनुष्य आपल्या सुखासाठीं एका चमत्कारिक वस्तूविषयीं कल्पना ध्यानांत आली म्हणजे दुसऱ्या चमत्कारिक वस्तू कशा कराव्या ह्याची सहज कल्पना काढून त्या करितो, तशा त्या मधमाशा आपल्या सुखासाठीं दुसऱ्या वस्तू करावयास कां शिकत नाहींत बरें?

आ०—मुला, मलाही असेंच वाटतें; आणि नव्या नव्या व उपयोगी कल्पना मनुष्यें वर्षोवर्ष काढीत जातात, व कितीएक देशांतील लोक दुसऱ्या देशांतील लोकांपेक्षां अधिक शहाणे व युक्तिवान् होत जातात, ह्याप्रमाणेंच मधमाशांमध्येंही घडावें असें दिसतें, परंतु असें घडत नाहीं. एका देशांत मधमाशा जशा शहाण्या व कुशळ आहेत, तशाच इतर देशांतही आहेत; व हजारों वर्षांमागें त्या जशा कुशळ व शहाण्या होत्या त्यापेक्षां अधिक कुशळ व शहाण्या झाल्या आहेत अशी गोष्ट नाहीं. सर्व जातींचे क्षुद्र प्राणी मत्स्य, पशु, पक्षी, ह्यांचाही प्रकार असाच आहे. नवे शोध करणें व नव्या वस्तूंचा संकेत करणें, वर्षोवर्ष चातुर्य व कौशल्य ह्यांची वृद्धि

करणें, ही शक्ति मनुष्यांस मात्र दिली आहे. सांप्रत मनुष्यांस पुष्कळ सोई व सुखाचीं साधनें झालीं आहेत, तीं त्यांस शेंकडों वर्षांमागें नव्हतीं.

आपण ज्यांत राहतों तो वाडा व कातकऱ्याची झोंपडी ह्या दोहोंच्या मध्यें, आणि आपण जीं वस्त्रें आंगावर घेतों तीं व कातकरी आपल्या आंगावर जीं रकटीं पांघरितो तीं ह्या दोहोंच्या मध्यें किती भेद आहे पहा बरें; परंतु देशोदेशीं मधमाशांचीं पोळीं व त्या आपल्या सुखासाठीं ज्या दुसऱ्या अनेक प्रकारच्या वस्तू करितात त्यांच्यामध्यें असा भेद नाहीं. त्या सर्वांचा राहण्याचा आणि खाण्यापिण्याचा प्रकार एकसारखा आहे.

कधीं कधीं लोक बदकांचीं आंडीं कोंबडीच्या घरट्यांत तिच्या आंड्यांबरोबर उबविण्याकरितां ठेवितात. तीं आंडीं उबलीं म्हणजे कोंबडी आपल्या पिलांप्रमाणें त्या बदकांच्या पोरांचेंही संरक्षण करिते. पुढें तीं बदकें कोठें पोहायाजोग्या खोल पाण्याजवळ गेलीं असतां कांहीं भीति न धरितां थोर बदकाप्रमाणें भराभर पोहूं लागतात; हें पाहून ती कोंबडी फार घाबरते, आणि तीं बदकाचीं पिलीं आपल्या पिलांपेक्षां फार भिन्न प्रकारचीं केलेलीं आहेत, व त्यांचे पाय पाण्यांत पोहण्या करितां निराळ्या तऱ्हेचे केलेले आहेत, व त्यांस कोंबड्यांच्या पिलांहून भिन्न रीतीनें आपलें भक्ष मिळवावें लागणार, हें त्या कोंबडीस अगदीं समजत नाहीं, असें दिसण्यांत येतें.

रा०—आई, कोंबडीच्या पिलांपेक्षां बदकाच्या पिलांची चोंच भिन्न प्रकारची आहे, हें कोंबडीला समजत नाहीं, असें त्वां मला सांगितलें होतें, त्याची तुला आठवण असेलच.

आ०—होय मुला, मला आठवण आहे. तें तूं विसरला नाहींस म्हणून मला मोठा संतोष झाला. बदकें पाण्यांत कां जातात, व आपलीं पिलें कां जात नाहींत, ह्याचें कारण कोंबडीस कांहीं समजत नाहीं. आणखी लहान बदकें इतकीं लवकर पाण्यांत कां जातात? कोणत्याही बदकानें त्यांस पोहावयास शिकविलें नसतें, व त्या बदकांनीं पाण्यांत जाऊं नये म्हणून ती कोंबडी होईल तितका प्रयत्न

करीत असते; तथापि पाणी हें आपणांस योग्य स्थळ आहे, व त्यांत आपणांस सहज पोहतां येईल, हें त्या लहान बदकांस कसें समजतें बरें?

रा०—प्राणी असे जे व्यापार करितात त्यांविषयीं, आई, तूं मला जसजसें अधिक सांगतेस तसतसा मला अधिक चमत्कार वाटतो.

आ०—होय मुला, तें मोठें चमत्कार वाटायाजोगेंच आहे. ह्या गोष्टीचें विवरण करितां येत नाहीं, इतकेंच कीं असें व्हावें ही परमेश्वराची इच्छा असें आपण समजावें.

रा०—तर, आई, माशी आपलीं आंडीं योग्य ठिकाणीं घालिते व मुंग्या आपल्या आंड्यांचें व लहान थोर पोरांचें संरक्षण करितात, पक्षी आपलीं कोटीं बांधितात, मधमाशा आपलीं पोळीं करितात, व लहान बदकें पाण्यांत पोंहतात, हें सर्व ईश्वर त्यां करवीं करवितो, असा तुझ्या म्हणण्याचा अभिप्राय आहे कीं काय?

आ०—होय मुला, माझा असाच अभिप्राय आहे. परंतु वायूस ज्या रीतीनें ईश्वर वाहवितो, व ढगांतून विद्युल्लता निघून झाडावर आघात होई असें करितो, त्या रीतीनें केवळ हें घडवीत नाहीं; ह्याचा प्रकार भिन्न आहे. असो, आज आपण फार वेळ बोललों, आतां पुरे.

---

## मोत्यांविषयीं.

मोत्यांच्या उत्पत्तीविषयीं ह्या देशांतील लोकांची समजूत अशी आहे कीं अक्तोबर महिन्याच्या विसाव्या तारिखेच्या सुमारास, म्हणजे आश्विनमाशीं, स्वाती नक्षत्रास सूर्य येतो, तो सुमारें पंधरादिवस त्या नक्षत्रावर राहतो; त्या पंधरा दिवसांत पावसाचे थेंब समुद्रांत मोठमोठाले शिंपले असतात त्यांच्या आंत शिरले असतां त्यांपासून मोत्यें उत्पन्न होतात. स्वाती नक्षत्राच्या पावसाचे थेंब त्या शिंपल्यांत शिरावे म्हणून नक्षत्र लागण्याच्या सुमारास ते आपोआप उघडतात, असें म्हणतात; परंतु ह्याविषयीं कांहीं प्रमाण नाहीं. मोत्यांच्या उत्पत्तीचा वास्तविक प्रकार निराळाच आहे, तो पुढें सांगतों.

इराणचें आखात, सिंहल द्वीपाचा किनारा, न्युहालंद बेटाजवळचा समुद्र, मेक्सिको देशाचें आखात, आणि जपान बेटांचा किनारा, इतक्या ठिकाणीं मोत्यें सांपडतात. ह्या सर्व जागा उष्ण कटिबंधांत आहेत, ह्यावरून मोत्यें उष्ण कटिबंधांतच चांगलीं होतात, दुसरे ठिकाणीं अशीं होत नाहींत, असें अनुमान होतें. त्यांतही सिंहल द्वीपांत मोत्यें काढण्याचा कारखाना मोठा चालतो; आणि तेथें ह्या व्यापाराचें उत्पन्नही फार मोठें होतें.

हा कारखाना त्या द्वीपाच्या पश्चिम किनाऱ्यावर चालतो. त्या ठिकाणीं मोठें वाळवंट आहे, व तेथें लोकांची वस्ती बारमाही नसते; पण तो कारखाना सुरू होण्याचे दिवस आले म्हणजे एकाएकीं मोठें अफाट शहर वसतें, तें असें कीं एकेक पेठ अर्धअर्ध कोस लांब असते. मोत्यांचे शिंपले सांपडण्याची जागा म्हटली म्हणजे सुमारें पंधरा कोस लांब आणि बारा कोस रुंद एवढी आहे. बहुतकरून फेब्रुआरी महिन्याच्या विसाव्या तारखेस तेथील कारखाना सुरू होतो. त्या जाग्यावर सरकारचा कर आहे. तो कर देण्याचा पत्कार कोणी तरी एक सावकार घेतो. नंतर दीडशें मचवे तीस दिवसपर्यंत तेथें घालण्याची त्यास परवानगी मिळते. त्या मचव्यांवरील नावाडी लोक व त्यांच्या हाताखालचे लोक मिळून सुमारें सहा हजार असतात.

मोत्यांचे शिंपले पुष्कळ लोकांच्या पाहण्यांत आहेत. त्या शिंपल्यांचें आंतलें आंग मोत्याप्रमाणें चकचकीत असतें. हे शिंपले दोन भाग मिळून डब्यासारखे झाले असतात. त्यांत प्राणी असतो, तो एका प्रकारचें कालव होय. गोगलगाईच्या घराप्रमाणें त्या प्राण्याचें घर जन्मापासून असतें. शिंपले चांगले किंवा वाईट असणें हें त्या त्या ठिकाणच्या जमिनीच्या गुणावर आहे; आणि ते अधिक किंवा उणे असणें हें त्या ठिकाणीं लाटा अधिक अगर उण्या जशा येतील तशावर आहे, व दुसऱ्याही कांहीं गोष्टींवर आहे. जसजशी पाण्याची खोली जास्त असते तसतशीं मोत्यें मोठीं असतात. तीं मोत्यें शिंपल्याच्या सांध्याजवळ प्राण्याच्या मांसांत असतात. कांद्याच्या पापोदऱ्यांप्रमाणें अनेक पापोदरे मिळून एक मोतीं झालें असतें. ते पापोदरे सारख्याच जाडीचे असतात. मोतीशिंपेचें मूलद्रव्य आणि मोत्यांचें मूलद्रव्य एकाच

जातीचें असतें. त्या प्राण्याचे पोटांत अनेक मांसपिंड असतात, त्यांमध्यें एका प्रकारचा रस असतो, तो मांसग्रंथींतून हळूहळू ठिबकतो, आणि मग त्याचीं मोत्यें बनतात. चांगलें, वाटोळें गरगरीत, अगदीं अलग, असें एखादें मोतीं क्वचित् सांपडतें; आणि लांबोडीं, चापट, चुरमुरेवजा, चामखिळांप्रमाणें शिंपल्यांच्या आंतल्या आंगास चिकटलेलीं अशीं शेंकडों सांपडतात. शिंपल्याच्या आंतल्या आंगास मोत्यांची कधीं कधीं अशी दाटी होते कीं त्या प्राण्याला शिंपला मिटतांच येत नाहीं, आणि तेणें-करून तो प्राणी मरून जातो. शिंपल्यामध्यें त्या प्राण्यास उपद्रव देणारा कांहीं पदार्थ असला तर त्याचा उपद्रव होऊंनये म्हणून तो प्राणी पूर्वीं सांगितल्या प्रकारच्या रसानें त्या पदार्थाचें वेष्टन करितो, त्या वेष्टनापासून मोतीं तयार होतें.

मोत्यें काढण्यासाठीं समुद्राच्या तळीं बुडी मारावी लागते. तिचें सामान येणेंप्रमाणें असतें. एक धोंडा दोराला बांधलेला असतो, त्या धोंड्याच्या वरच्या आंगास दोराला फांस केलेला असतो, त्यांत बुडी मारणाऱ्यानें आपला एक पाय ठेवावा. दुसऱ्या दोरीच्या शेवटास एक पांटी आणि जाळें अशीं गुंतविलेलीं असतात. त्या पाटींत बुडी मार-णाऱ्यानें आपला दुसरा पाय ठेवावा. अशा रीतीनें पाय ठेवून बुडी मारणारा अगदीं तयार झाला म्हणजे एका हातानें तो आपल्या नाकपुड्या दाबून धरितो, आणि थोरल्या दोराला एक सरळ फांस केलेला असतो तो दुसऱ्या हातानें धरून ओढूं लागतो. आणि असें केलें असतां तो मनुष्य लागलाच तळाशीं जाऊन पोहोंचतो. मग धोंडा बांधलेल्या दोरांतून पाय काढून घेऊन तो दोर सोडून देतो. वरच्या मचव्यांतले लोक तो दोर वर ओढून घेऊन दुसऱ्या पानबुड्याला सोडण्याची तयारी करितात. तळाशीं गेलेला पानबुड्या तेथें पालथा पडतो, आणि जें हातीं लागेल तें त्या पांटींत टाकितो. त्याची बाहेर येण्याची वेळ झाली म्हणजे पांटीच्या दोरीला तो हिसका देतो; मग वरचे लोक लाग-लेच त्यास वर ओढून घेतात. मचव्यांतील लोक दोरी वर ओढीत असतात तेव्हांही पानबुड्या आपण होऊन दोरीवर चढतच असतो, त्यामुळें पांटी वर येऊन पोहोंचण्याच्या अगोदरच तो बाहेर येतो.

पानबुड्या पाण्यांत दीड मिनित दोन मिनिटें, म्हणजे तीन चार पळें, इतका वेळ मात्र राहतो, अधिक राहत नाहीं.

मचव्यावरच्या लोकांत नक्रांला मोहविणारे असे कांहीं लोक असतात, ते ह्या वेळेस अवश्य असलेच पाहिजेत. लोकांची समजूत अशी आहे कीं ते आपल्या मंत्रसामर्थ्येंकरून नक्रांस मोह पाडितात, तेणेंकरून ते नक्र येऊन पानबुड्यांस धरीत नाहींत. पानबुड्यांचाही त्या मांत्रिकांवर पक्का भरंवसा असतो, म्हणून मांत्रिक लोक असल्या शिवाय पानबुडे समुद्रांत उतरतच नाहींत. शिंपले पुष्कळ सांपडले तर पानबुड्या एका बुडीस दीडशें शिंपले काढितो; परंतु कधीं कधीं केवळ पांच चारच सांपडतात. असें म्हणतात कीं एक पानबुड्या एका दिवसांत एक हजारांपासून चार हजारांपर्यंत शिंपले बाहेर काढितो.

दुसऱ्या कांहीं जातींच्या शिंपांतल्या किड्यांपासून मोत्यें निघतात, त्यांचे रंग पिंगट, पिस्ताई, पिंवळा, गुलाबी, निळा, असे असतात. क्वचित् काळीं मोत्यें सांपडतात त्यांस किंमत फार पडते.

---

## रसायन शास्त्रांतील कांहीं गोष्टि.

### भाग पहिला.

मुंबईत रामचंद्रपंत म्हणून एक गृहस्थ होता. त्यानें रसायनशास्त्र कांहीं पाहिलें होतें. त्याचा हरी हा मुलगा बुद्धिमान् असून उद्योगी होता. तो सरकारी शाळेंत विद्याभ्यास करीत होता. हरीचें वय लहान होतें तरी तो उद्योगी होता, त्यामुळें व रामचंद्रपंताच्या सहवासामुळें त्यास बहुत गोष्टींचें ज्ञान झालें होतें. रामचंद्रपंत फावल्या वेळेस त्यास रसायनशास्त्रांतील कांहीं सोप्या सोप्या गोष्टी सांगत असे, व किती एक चमत्कारिक गोष्टी हातानें करून दाखवीत असे. पौषमासीं एकेदिवशीं फार थंडी पडली होती, आणि रामचंद्रपंतानें हरीस कांहीं चमत्कार करून दाखविण्याकरितां कोटांतून बर्फ विकत आणिलें होतें. त्या बर्फावरून त्या उभयतांचा संवाद झाला तो येणेंप्रमाणें.

**रामचंद्रपंत**— आज फार थंडी पडली आहे. मी कोटांतून सहल करून आलों तों माझे हातपाय अगदीं कांकडले. मीं तुला चमत्कार दाखविण्यासाठीं बर्फ आणिलें आहे.

रामचंद्रपंत हरीला घेऊन बसला होता तेथें गड्यानें शेगडी पेटवून आणून दिली. रामचंद्रपंतानें बर्फाचा तुकडा शेगडी जवळ आणून ठेविल्या नंतर अमळशानें तो वितुळून त्याचें पाणी झालें.

**हरी**— असें कशानें झालें बाबा?

**रामचंद्र०**— अरे, बर्फ वितुळलें! आतां कसें वितुळलें तें तुला सांगतों. मी आलों तेव्हां माझे हात अगदीं गारठले होते; पण विस्तवाची उष्णता त्यांत शिरून ते ऊन झाले; तशीच उष्णता बर्फास लागून तें वितुळलें.

**हरी**— बाबा, तें कसें तें मला करून दाखवा.

**राम०**—(वाटींत थोडेंसें बर्फ घालून वाटी विस्तवावर ठेवितो.) हें पाहिलें, वितुळलें! विस्तवापासून उष्णता निघते ती बर्फांत शिरून त्यास वितुळविते. उष्णतेनें असे दुसरे पुष्कळ पदार्थ वितुळतात. पत्र चिकटावावयाचें असल्यास आपण लाखेची कांडी दिव्यावर धरली म्हणजे लाख वितुळते, आणि पत्रावर थेंब पडला म्हणजे आपण तें चिकटावितों. शिशाचा लहानसा तुकडा घेऊन तो मुशींत टाकावा, आणि ती विस्तवावर ठेवावी म्हणजे लागलाच शिशाचा रस होतो.

**हरी**— बाबा, ह्या उदाहरणांवरून उष्णतेच्या शक्तीची मला बरीच समजूत झाली, आणि तिनें पदार्थ कसे बदलतात हेंही ध्यानांत आलें.

**रामचंद्र०**—आतां तुला दुसरा कांहीं चमत्कार करून दाखवितों. ह्या पंचपात्रींत पावशेर पाणी घेतों आणि त्यांत दोन तोळे खडीसाखर घालितों. आतां पहा, साखर कोठें आहे? ती गेली.

**हरी**—बाबा, ती गेली नाहीं, विघरली, असें वाटतें.

**रामचंद्र०**—विघरली खरी, पण कशानें विघरली, उष्णतेनें? साखरेपेक्षां पाणी कढत होतें काय?

**हरी**—पाणी तर कढत नव्हतें.

**रामचंद्र०**—तर पाण्याच्या आंगची पहिली उष्णता साखरेच्या आंगीं आली काय?

**हरी**— बाबा, हें मला समजत नाहीं. पण उष्णतेनें जर विघरली नाहीं, तर दुसऱ्या कशानें विघरली बरें?

**राम०**—उष्णतेनें पदार्थ वितुळतात तसेच पाण्यानें विघरतात. निर-निराळ्या भांड्यांत पाणी घेऊन त्यांत मीठ, तुरटी, पापडखार, व डीक हे पदार्थ घाल, म्हणजे अमळशानें ते सर्व विघरतील. बर्फ, लाख, शिसें, वगैरे पदार्थ उष्णतेनें वितुळल्यानंतर थंडींत ठेविले असतां ते पुन्हा पूर्वीप्रमाणें कठीण होतात; त्यांचा आकार मात्र बदलतो.

**हरी**—पाण्यांत मीठ, साखर, वगैरे पदार्थ टाकून ते विरल्यानंतर पुन्हा कांहीं वेळ थंडींत ठेविले असतां जशाचे तसेच आपणांस सांपडतील?

**रामचंद्र०**—तशा रीतीनें नाहीं सांपडणार; तरी ते पदार्थ पूर्ववत् हातीं लागण्याविषयीं रसायन शास्त्रांत एक रीत आहे. दुसरी एक गोष्ट तुला सांगतों, साखर, मीठ असले पदार्थ सामान्य आगींत टाकिले असतां वितुळत नाहींत. तसेंच पाणी ऊन्हून अथवा थंड कसें असलें तरी त्यांत शिसें, लाख, वगैरे पदार्थ विघरत नाहींत.

**हरी**—बाबा, आगींत घातल्यानंतर उष्णतेनें पदार्थ वितुळतात, आणि पाण्यांत घातल्यानंतर पदार्थ विघरतात, पण ह्या दोन्ही गोष्टी सारख्या नाहींत.

**रामचंद्र०**—नाहींत खऱ्या. लाख, शिसें, वगैरे पदार्थ कठीण असतात, त्यांचा रस होतो. पण त्यावेळेस त्यांचे परमाणु वेगळे होतात, अथवा त्यांत दुसरे पदार्थ मिसळतात, असें नाहीं. आतां साखर, मीठ, वगैरे पदार्थ ह्यांचे परमाणु पाण्याच्या प्रत्येक परमाणूशीं मिळून जातात, त्यामुळें पाणी चाखलें असतां साखर अथवा मीठ जें पाण्यांत विघरलें असेल त्याची रुचि लागते. एका पदार्थाशीं दुसरा पदार्थ मिसळणें हें निराळें, आणि आगींत पदार्थ टाकून वितुळविणें हें निराळें. दोन पदार्थांच्या मिसळण्यास रसायनशास्त्रांत विरणें अथवा विक्लेदन म्हणतात. वितुळणें म्हणजे उष्णतेशिवाय दुसरा पदार्थ न मिळवितां पातळ करणें. आणि विरणें म्हटलें म्हणजे एका पदार्थाचें दुसऱ्या पदार्थांत शिरून राहणें. ज्या पाण्यांत खडी साखर अथवा मीठ विरलेलें असतें त्यास खडी साखरेचें अथवा मिठाचें विक्लेदन असें म्हणतात. त्या पदार्थास जें विरवितें त्यास विक्लेदक असें म्हणतात.

**हरी**—पाण्यांत विरणारे पदार्थ पुष्कळ आहेत. पण न विरणारे असे कांहीं पदार्थ सांगावे.

**रामचंद्र०**—होय. खडू, चिकणमाती, वाळू, लांकडाचें भूस, धोंडे, वगैरे पदार्थ पाणी ऊन असो अथवा थंड असो त्यांत विरत नाहींत. पंचपात्रींत पाणी घेऊन त्यांत खडू टाकून पहा, तो जशाचा तसाच राहील. तें पाणी तोंडांत घालून पाहिलें असतां शुद्धपाण्याची चव लागेल. खडूची भुकटी पाण्यांत टाकून तें पुष्कळ हालविलें, तर दुधासारखें पांढरें दिसतें; परंतु खडीसाखर ज्यांत विरली आहे तें पाणी पूर्वीप्रमाणें स्वच्छ दिसतें. पाण्यांत साखर टाकिली म्हणजे ती विरूं लागते. आणि खडूची भुकटी पाण्यांत टाकून अमळसें पाणी ठेविलें म्हणजे ती भुकटी जाऊन बुडाशीं बसते. साखरेचें विक्लेदन होतें आणि खडूचें मिश्रण होतें. तेल, अर्क, व आंबट रस ह्यांतही पदार्थ विरतात.

**हरी**—साखर, मीठ, वगैरे पदार्थ जितका आपण पाण्यांत घालावा तितका विरतो?

**रामचंद्र०**—नाहीं. जितक्या पदार्थांचें विक्लेदन करण्याची शक्ति पातळ पदार्थाच्या आंगीं असते तितक्यापेक्षां अधिक टाकिला असतां तो पदार्थ जसा टाकावा तसाच राहतो. अशा अवस्थेस परिपूर्ण अवस्था म्हणतात. व पाणी वगैरे पातळ पदार्थ त्या पदार्थानें परिपूरित झाले असें म्हणतात.

दुसरी गोष्ट तुला सांगतों. साखर, मीठ, वगैरे जे पदार्थ पातळ पदार्थांत विरतात, ते पदार्थ भरलेल्या भांड्यांत टाकिले असतां पातळ पदार्थ बाहेर सांडत नाहींत. पण खडू वगैरे जे पदार्थ विरत नाहींत ते टाकिले असतां पातळ पदार्थ बाहेर सांडतात. ह्यावरून रसायनशास्त्रवेत्ते असें म्हणतात कीं, आंबे वगैरे फळें पांटींत भरलीं असतां त्यांच्यामध्यें रिकामी जागा राहते, त्याप्रमाणें पातळ पदार्थांच्या परमाणूंच्या मध्यें रिकामी जागा राहते. इतकेंच कीं आंब्यांच्यामध्यें जागा फार राहते आणि पाण्याच्या परमाणूंच्या मध्यें फार थोडी राहते. आंब्यांनीं पांटी भरली असून तींत पायली दोनपायली वाळू अथवा

दळलेलें मीठ टाकिलें असतां पांटी अधिक न भरतां तें आंत गडप होतें. पातळ पदार्थांच्या परमाणूंच्यामध्यें जागा नसती, तर खडू टाकिला असतां पातळ पदार्थ वर येतो तसा साखर टाकिली असतां वर यावा; तो वर येत नाहीं.

---

## रसायन शास्त्रांतील कांहीं गोष्टी.

### भाग दुसरा.

**हरी**—बाबा, मला उष्णतेविषयीं आणखी कांहीं गोष्टी सांगा.

**रामचंद्र०**—उष्णता व उष्णतेचें बीज हे दोन पदार्थ एकमेकांपासून अगदीं निरानिराळे आहेत. ज्यापासून उष्णता उत्पन्न होते तें उष्णतेचें बीज सर्व पदार्थांत असतें. ऐन हिंवाळ्यांत ज्या दिवशीं फार थंडी असते त्या दिवशीं देखील दोन लांकडें परस्परांवर कांहीं वेळपर्यंत जोरानें आणि जलदीनें घांशिलीं असतां, अथवा गारगोटीवर पोलादाच्या पट्टीनें मारिलें असतां, विस्तव पडतो. विस्तव पडण्यापूर्वी हें उष्णतेचें बीज त्या पदार्थांत होतेंच; परंतु त्या पदार्थांपैकीं कोणत्याही पदार्थांत उष्णता होती असें शास्त्ररीत्या म्हणतां येत नाहीं.

हें उष्णतेचें बीज जगांत सर्वत्र आहे. त्याला आकार नाहीं, रंग नाहीं, वजन नाहीं, वास नाहीं, रुचि नाहीं, व काय आहे हें कोणासही समजत नाहीं; तरी आहे असें सर्वांनीं मानिलें आहे, आणि उष्णताबीज असें नांव दिलें आहे.

**हरी**—बाबा, उष्णतेचें बीज सर्वत्र आहे हें आतां माझ्या ध्यानांत आलें. मागें आपल्या घराचा कारखाना चालला होता, तेव्हां काळू सुतार वांशाला भोंकें पाडीत असतां लागलाच मीं त्याच्या सामत्याला हात लाविला तों माझ्या हाताला चांगला चटका बसला. मीं त्याचें कारण काळूला विचारिलें होतें; पण तो इतकेंच बोलला कीं, भोंकें पाडतां पाडतां सामता तापतो.

**रामचंद्र०**—खरेंच. उष्णतेचे बीजामुळेंच सामता तापतो. हें बीज मोठें चमत्कारिक आहे. भांड्यांत बर्फ घालून विस्तवावर

ठेविलें असतां त्यांत उष्णता शिरून त्याचें पाणी होतें. पण उष्णमापक यंत्रानें जर त्या पाण्याची उष्णता पाहिली, तर बर्फाच्या उष्णते इतकीच असते. म्हणजे त्या पाण्यांत हात बुडविला असतां तें बर्फाप्रमाणें थंड लागतें. त्याच पाण्याखालीं एक तासभर जाळ लाविला तर तें कढूं लागतें. म्हणजे बर्फ नुकतें विघरलें त्या वेळेस अगदीं गार होतें तें इतकें कढत होतें कीं त्यांत हात घालवत नाहीं. पुढें विस्तव तसाच ठेविला म्हणजे पाण्याची वाफ होऊन ती वर जाऊं लागते, ती पाण्याला उकळी फुटत असते तोंपर्यंत सारखी जात असते. एक दोन प्रहर असें ठेविलें असतां पाणी भांड्यांत नाहींसें होतें; म्हणजे त्याची वाफ होऊन तें हवेंत जाऊन पसरतें.

**हरी**—बाबा, प्रथम उकळी फुटते त्या वेळेस पाणी जितकें कढत असतें त्यापेक्षां एक दोन तासपर्यंत सारखी उकळी फुटत असली तर ज्यास्ती कढत होतें काय?

**रामचंद्र०**—काडीमात्र ज्यास्ती नाहीं. तितकेंच कढत असतें.

**हरी**—बरें, पाण्यापेक्षां वाफ ज्यास्ती कढत असते काय?

**रामचंद्र०**—अगदीं नाहीं. पाण्या इतकीच असते.

**हरी**—बाबा, तर इतकी उष्णता कोठें जाते बरें?

**रामचंद्र०**—ती उष्णता वाफेंत जाते. आणि अनुभवास तर मुळींच येत नाहीं. ह्यावरून ती वाफेंत अनुद्भूत असते. आतां अनुद्भूत कां होते ह्याविषयीं प्रसंगानुसार विचार करूं. सध्यां उष्णता उत्पन्न करण्याच्या रीतीविषयीं तुला सांगतों.

सूर्याच्या किरणांपासून उष्णता होते. आतां किरणांप्रमाणें उष्णता सूर्यापासूनच येते, किंवा किरण वस्तूंवर पडले म्हणजे त्यांच्या संयोगानें उत्पन्न होते, हें अद्यापि ठरलें नाहीं. सूर्याच्या किरणांपासून कशी तरी उष्णता जर नहोईल तर पृथ्वींतील सर्व पदार्थ थिजून त्याचा एक घट्ट गोळा होईल.

दोन लांकडें परस्परांवर जोरानें घांसलीं असतां तीं ऊन होतात, आणि पुढें कांहीं वेळपर्यंत तशींच घांशीत राहिलें असतां त्यांतून फटकर

ज्वाळा निघते. कितीएक अडाणी देशांतले लोक ह्या रीतीनें विस्तव पेटवितात. लांकडावर लांकूड यदृच्छेंकरून घांसतां घांसतां आग लागली अशा गोष्टी घडण्यांत पुष्कळ वेळां आल्या आहेत. गाड्याचीं चाकें घांसतां घांसतां जळालीं असेंही घडलें आहे. रानामध्यें वाळलेल्या झाडांच्या खांद्या वाऱ्यानें परस्परांवर घांसल्यानें विस्तव पडून वणवे लागावे असेंही कधीं कधीं होतें. बर्फाचे दोन तुकडे देखील परस्परांवर घांसले असतां उष्णता उत्पन्न झाल्यामुळें ते विघरूं लागतात, असें कोणी म्हणतात. कवडी अथवा सागरगोटा भुईवर घांसलाअसतां खूब ऊन होतो हें मुलांस देखील माहीत आहे. पदार्थाशीं पदार्थ घांसल्यानें जसे ते ऊन होतात, तसेच एकमेकांवर खूब जोरानें आपटले असतां होतात. उदाहरण, लोखंड हतवड्यानें ठोकितां फार तापतें, आणि त्याला हात लावण्याचा इलाज नाहींसा होतो.

रसायनशास्त्रांत, अमुक पदार्थ अमुक प्रमाणानें परस्परांशीं मिळविले असतां उष्णता उत्पन्न होते, असें सांगितलें आहे, ती रीति सर्वांत चांगली आहे. अदपाव पाणी घेऊन त्यावर तितकाच गंधकाचा अर्क ओतून एकदम ढवळलें असतां इतकी उष्णता उत्पन्न होते कीं बाहेरल्या आंगानें त्या भांड्याला हात लाववत नाहीं. दुसरें उदाहरण, चुन्याची ताजी कळी आणून तिजवर थंड पाणी ओतावें म्हणजे पुष्कळ उष्णता उत्पन्न होऊन कांहीं पाण्याची वाफ होऊन जाते, आणि कांहीं पाणी चुन्याच्या आंगीं मुरून त्याचा घट्ट गोळा होतो. पुष्कळ उष्णता पाहिजे असल्यास कोळसे, लांकडे, तेल, इत्यादि पदार्थ जाळण्यापासून ती उत्पन्न करितात, ही एक प्रसिद्ध रीति आहे. आतां जाळणें म्हटलें तरी रसायन व्यापारच आहे. म्हणजे आक्सिजन म्हणून हवेचा घटक अवयव आहे त्याचा आणि लांकडाचा, अगर तेलाचा, अगर तशा दुसऱ्या पदार्थाचा, संयोग होतो त्यापासून उष्णता उत्पन्न होते. आक्सिजनाचा संयोग न होईल तर दिवा अगर विस्तव जळत राहणार नाहीं. जेथें पुष्कळ विस्तव पेटला असतो तेथें वायूचा प्रवाह एकसारखा चालला असतो हें अनुभवास येतें.

हवेंतल्या आक्सिजनाचा संयोग होऊन दिवा व विस्तव जळत राहतात, ही गोष्ट समजल्यामुळें लोखंडी शेगड्या करण्याची एक चम-

त्कारिक रीति निघाली आहे. ती अशी कीं विस्तवाच्या खालच्या आंगानें वायूचा प्रवाह सतत चालण्याविषयीं तजवीज केली असते. कितीएक प्रकारच्या दिव्याच्या ज्योतीभोंवती एक लांब आणि लहान घेराची कांचेची नळी बसवितात, तेणेंकरून दिव्याला चोहोंकडून हवा लागत नाहीं आणि खालच्या आंगानें वायु येण्यासाठीं वाट ठेविली असते, तिनें एकसारखा झुळझुळ वायु येऊन दिव्याचा प्रकाश लखलखीत पडतो.

---

## रसायनशास्त्रांतील कांहीं गोष्टी.

### भाग तिसरा.

**रामचंद्र०**—हरी, ही मेणबत्ती पाहिली? हा पदार्थ मोठ्या मौजेचा आहे, नाहीं बरें?

**हरी**—खरेंच बाबा, ही बत्ती पांढरी स्वच्छ आणि गरगरीत वाटोळी आहे, आणि शेवटास निमुळती आहे.

**रामचंद्र०**—ह्या पदार्थाच्या कृतीविषयीं पुष्कळ चमत्कारिक गोष्टी सांगावयाजोग्या आहेत, त्या पुढें एखाद्या वेळेस सांगेन. आतां सध्यां ही मेणबत्ती लावून तिच्या जळण्याच्या संबंधानें रसायनशास्त्रांतल्या कांहीं गोष्टी सांगतों. पहा, ही ज्योत कशी संत उभी राहिली आहे. खालच्या आंगीं मोठी आहे आणि वरच्या शेंड्याशीं लेखणीच्या टोंकाप्रमाणें अगदी बारीक आहे.

**हरी**—बाबा, ह्या ज्योतीचा आकार असाच कां बरें होतो? वाटोळा, चौकोनी, लांबोडा, किंवा दुसरा एखादा आकार कां होत नाहीं?

**रामचंद्र०**—मी तुला सांगतों कां होत नाहीं तो. मनुष्य जसें हवे शिवाय वांचत नाहीं तशी मेणबत्तीही हवे शिवाय जळत राहत नाहीं. मेणबत्ती हवेशिवाय जळत राहत नाहीं ह्याविषयीं प्रमाण पाहिजे असलें तर तुला सांगतों. मेणबत्तीचा एक तसूभर लांब तुकडा घे म्हणजे पुरे. आतां तो लावून मेजावर ठेव, आणि थोरलें गलास तीवर नीट झांकण घाल. आतां पहा, ज्योत किती अंधक झाली? आतां तर अधिकच अंधक झाली, अगदीं आत आली, आतां विझाली.

**हरी**—बाबा, एक पळभर देखील जोत राहिली नाहीं!

**रामचंद्र०**—हें गलास तर सारें पावशेराचेंच आहे पण पक्या शेराचें गलास असलें तरी देखील पळभर जोत राहणार नाहीं. मीं पूर्वी हें करून पाहिलें आहे, त्यावरून माझ्या ध्यानांत आहे. दिवा जातो ह्याचें कारण हें कीं, तो अगदीं एवढ्याशा कोंडलेल्या हवेंत असतो; गलासाच्या कडा मेजाला अगदीं लागल्या असतात त्यामुळें बाहेरची हवा आंत जाऊन दिव्याला मिळत नाहीं. आतां ही दुसरी मेणबत्ती स्वस्थपणीं जळत आहे; कारण, खोलींतली चोंहोकडची हवा येऊन तिच्या जोतीला मिळत आहे. पण ह्या खोलीच्या सगळ्या खिडक्या, धारीं, जाळ्या, लहानसान चिरा, भेगा, वगैरे सर्व अगदीं बंद केल्या, तर गलासाच्या खालची मेणबत्ती जशी विझाली तशी हीही विझून जाईल. इतकेंच कीं ह्या खोलींतली हवा कोंडलेली झाली तरी पुष्कळ आहे, ह्यामुळें ही अमळशी ज्यास्ती वेळपर्यंत राहील. आतां खोलीच्या खिडक्या लाविल्या तरी दिवे जळतात, ह्याचें कारण इतकेंच कीं, दाराला चिरा, भेगा, भोंकें, वगैरे असतात त्यांतून नवी हवा सर्वदां येत असते, ती त्यांस मिळते म्हणून जळतात.

आतां ती मेणबत्ती जवळ आहे, तिचें जळतें आंग फटीसमोर कर. पहा, ती जोत उलटी तुजकडे येत आहे. ह्याचें कारण हेंच कीं त्या फटींतून हवा येत आहे तिच्या प्रवाहाचा वेग तुजकडे येण्याचा आहे.

खोलींत ज्या ठिकाणीं मेणबत्ती जळत असते त्या ठिकाणीं चोहोंकडून हवा येत असते. ती जोतीच्या संयोगानें ऊन होऊन हलकी झाली म्हणजे वर जाते. मग तिच्या जागीं नवी हवा येते. ह्या प्रमाणें जों पर्यंत मेणबत्ती जळत असते तों पर्यंत असेंच चालतें. ह्या वरून पाहतां हवेच्या वर चढण्याच्या स्थानाच्या केंद्रस्थानीं जोत असते, म्हणजे हवा वर चढते ती जोतीच्या भोंवतालून चढते, त्यामुळें जोत चोहोंकडून दाबली जाऊन तिचा आकार शंकूसारखा होतो. रसायनशास्त्रवेत्ते असें म्हणतात कीं, हवा संत असते ती जोतीच्या उष्णतेनें क्षुब्ध होते; थंड हवा वजनदार असते, आणि ऊन हवा हलकी असते,

त्यामुळें जोतीवर खालच्या थंड हवेचा दाब अधिक पडतो, आणि वरच्या ऊन हवेचा कमी पडतो, आणि तेणेंकरून शंकूसारखी आकृति जोतीस प्राप्त होते. हवेस क्षुब्ध केल्यावांचून जर दिवा जळत असला तर त्याची जोत अगदीं गोटीप्रमाणें वाटोळी होईल; कारण तिजवर हवेचा दाब चोहोंकडून एकदम सारखाच पडेल.

**हरी**—बाबा, वाटोळी जोत करण्याची कांहीं रीति आहे काय?

**रामचंद्र०**—होय, रीति पुष्कळ आहेत; पण तुला त्या सांगितल्या असतां समजणार नाहींत. त्यांतील रीति व्यवहारांत घेऊन जोत वाटोळी राखितां येईल असें तर खचीत तुला करितां येणार नाहीं. आतां मेणबत्तीची जोत सोडून दुसऱ्या एखाद्या पदार्थाच्या जोतीविषयीं तुला कांहीं सांगतों. सुताची एक गुंडी दाभणाच्या टोंकाला अडकाव, ती ब्रांदी दारूमध्यें बुडीव, आणि दाभणाचें दुसरें टोंक मेजाच्या ह्या चिरेंत नीट सरळ खोंच. आतां खिडक्या, जाळ्या अगदीं बंद करून खोलींतली हवा अगदीं संत कर. आतां मी ही गुंडी पेटवितों, आणि काय शानदार जोत होते ती तूं पहा. दाभणाच्या जवळचा जोतीचा भाग आहे त्याजवर हवेचा दाब फार आहे, आणि तो भाग किती वाटोळा दिसत आहे! पण वरच्या आंगास हवेचा दाब अगदीं कमी आहे, त्या आंगास ती अगदीं बारीक आहे. आतां तो दाभण घेऊन वांकडा तिकडा तुला पाहिजे तसा धरिला तरी जोतीची शंक्वाकृति राहीलच. जोतीचें बारकें टोंक खालच्या आंगाला कधींच होणार नाहीं. कारण हवेच्या जोरामुळें ती जोत नेहमीं वरच जाते.

**हरी**—बरें, बाबा, जोतीच्या भोंवतालच्या आंगानें हवा वर जात असते, त्यामुळें जोतीला शंकूसारखी आकृति प्राप्त होते, हें मला समजलें. पण मेणबत्तीचा जो भाग जळत असतो त्या भागीं वातीच्या भोंवतालीं वाटीसारखा लहानसा खोलगा होऊन त्यांत मेण वितुळून राहिलें आहे तें सगळें एकदम वितुळून खालीं ओघळत कां नाहीं? वातीच्या जवळचाच भाग कां वितुळतो? आणि वितुळलेलें मेण त्या वाटींतच बेतानें कसें राहतें?

रामचंद्र०—असें कां होतें ह्याचें कारण मजकडून होईल तितकें सोपें करून सांगतों. ह्या गोष्टी फार चमत्कारिक व मौजेच्या आहेत. आणि ह्यांचें कारण हवाच होय. आतां पहा, कांहीं मेण वितुळतें. मेणबत्ती जळत असते तेथें चोहोंकडच्या आंगानें हवा येत असते हें पूर्वी सांगितलेंच आहे, त्याप्रमाणें हवा येऊन तिच्या योगानें मेणबत्तीचें बाहेरचें आंग थंड राहतें, त्यामुळें सभोंवार भिंत बांधल्याप्रमाणें मेणाची आयती भिंत होते, तिच्या आंतल्या आंगास वातीच्या जवळचें वितुळलेलें मेण वाटींत रहावें, त्याप्रमाणें राहतें. ही वाटी जर मोडून टाकिली, तर मेणबत्ती चांगली जळणार नाहीं. हें पहा आतां, पळीचें तापलेलें टोंक ह्या मेणबत्तीच्या वाटीच्या बाहेरल्या आंगाला लावून धरितों. आतां पहा, मेण वितुळून खालीं ओघळत आहे, आणि जोतीला कांहीं मेण मिळत नाहीं, त्यामुळें मेणबत्ती पहिल्याप्रमाणें जळत नाहीं; ह्यावरून पहा, मेण-बत्तीच्या सभोंवतीं हवा येत असते तिजपासून काय चमत्कार होत असतो; म्हणजे एक तर तिजपासून जोत राहते, आणि दुसरें वितुळ-लेलें मेण तेथल्या तेथें राहून त्याचा उपयोग जळण्याविषयीं पडतो. मेणबत्तीचें बाहेरचें आंग हवेच्या योगानें थंड राहून वाटीप्रमाणें आकार होतो. जर तशी आकृति न झाली, तर मेणबत्ती चांगली जळणार नाहीं; म्हणजे अर्थात उजेड चांगला पडणार नाहीं. खोलींतली हवा गरम असल्यास, तिच्या योगानें मेणबत्तीच्या वाटीच्या कडा वितुळून मेण खालीं ओघळतें आणि मेणबत्ती लवकर जळते.

हरी—बाबा, वाटींत वितुळलेलें मेण असतें तें खालीं असतां जोतींत कशानें जातें?

रामचंद्र०—ठीक आहे, तुला सांगतों. मेणबत्तीच्या वातीच्या आंगीं एका जातीची आकर्षणशक्ति असते तीस केशाकर्षण म्हणतात. ह्या शब्दाचा अर्थ असा आहे कीं प्रवाही पदार्थ केशाप्रमाणें बारीक छिद्रांतून ओढून घेणें. हें आतां मी तुझ्या ध्यानांत आणून देतों. वेताच्या छडीचा हा एक तसूभर लांब तुकडा घे. पहा, ह्याच्या मधून आरपार भोंकें आहेत; ह्यांतून फुंकतां सहज येईल. आतां ह्या भोंकांस नळ्या म्हटलें तरी काय चिंता आहे. ह्या छडीच्या

तुकड्याचें एक टोंक वातींतल्या पाण्याला लावितों; आतां बारीक छिद्रांतून वातींतलें पाणी वर छडीच्या तुकड्यांत चढलें आहे. वरचें टोंक अगदीं ओलें झालें, पाहिलें ना! आतां हा छडीचा दुसरा तुकडा घेतों, आणि ह्या कांचेच्या पेल्यांत तर्पनतेल घेऊन त्याला त्याचें एक टोंक लावितों. पहा, तेल छिद्रांतून वर चढलें; आतां दुसरें टोंक पेटवितों. पहा, पेल्यांतलें सर्व तेल वर जाऊन जळून गेलें.

**हरी**—बाबा, हें समजलें. पण वातीला अशीं छिद्रें कोठें असतात?

**रामचंद्र०**—कापसाचे बारीक बारीक तंतु निरनिराळे असून ते एके ठिकाणीं जुळले गेले आहेत. तेव्हां त्यांच्या मधून थोडथोडीं अंतरें आहेतच. तीं अंतरें बारीक नळ्यां प्रमाणें होत. मेण वितुळलें म्हणजे पाणी अथवा तर्पनतेल जसें छडीच्या छिद्रांतून वर चढलें तसें त्या नळ्यांतून वर चढतें. ह्याप्रमाणें जोतीला मेण जाऊन पोहोंचतें, आणि तें तेथें जळलें म्हणजे वातीचें सत्व जाऊन तिचा कोळी होतो, त्याचा कांहीं उपयोग पडत नाहीं. मी पुढल्या प्रसंगीं जोतीचें तेज व तिच्या आंत पोकळी असते त्यांविषयीं तुला सांगेन.

---

## रसायन शास्त्रांतील कांहीं गोष्टी.

### भाग चवथा.

**रामचंद्र०**—हरी, मेणबत्तीच्या जोतीविषयीं आणखी कांहीं तुला सांगतों. आतां अगोदर तुला एकदोन गोष्टी करून दाखवितों, त्या त्वां चांगलें लक्ष देऊन पाहिल्या म्हणजे पुढें तुला मी ज्या गोष्टी सांगणार आहें त्या तुला चांगल्या समजतील. ही मेणाची गोळी दाभणाच्या टोंकाला चिकटावून मेणबत्तीच्या जोतीवर धरितों. हें मेण पहा, वितुळत आहे पण जळत नाहीं. मेणबत्ती ह्याच मेणाची केली असते, पण ती वितुळते आणि जळते.

**हरी**—बाबा, मेणबत्तीच्या मेणाप्रमाणें ह्या गोळीचें मेण कां जळत नाहीं बरें?

**रामचंद्र०**—हें समजेल तुला आतां. हें उलथनें विस्तवांत घालून थोडेंसें तापवितों. ह्याजवर थोडेंसें मेण टाक. हें पहा, वितुळलें. आतां एक कागदाचा कपटा दिव्यावर पेटवून त्या वितुळलेल्या मेणाला लावून पहावें, तें जळतें काय?

**हरी**—नाहीं, बाबा, तें मेणबत्तीच्या मेणाप्रमाणें जळत नाहीं.

**रामचंद्र०**—आतां हें उलथनें फार तापवून लाल करितों. आतां त्याजवर मेणाचा एक लहानसा तुकडा टाकून पहा. हरी, पाहिलें? मेण वितुळून त्याची पांढरी वाफ होऊन वर चालली. आतां कागदाचा एक कपटा दिव्यावर पेटवून तो चिमट्यानें ह्या वाफेंत धर. पहा, वाफेनें आग घेतली, आणि तिचा प्रकाश थेट मेणबत्तीप्रमाणें पडला आहे. ही सगळी वाफ जळून जाऊन मेणाचें कांहीं एक खालीं उरलें नाहीं.

मेण, तेल, चरबी, हे शीघ्र ज्वालाग्राही पदार्थ आहेत, ह्यांची वाफ झाल्याशिवाय हे जळतच नाहींत, असें सिद्ध झालें आहे. दिव्यावर जें मेण धरिलें होतें तें व उलथन्यावर पहिल्यानें टाकिलें होतें तें वितुळलेंमात्र, पण जळलें नाहीं. कारण कीं त्याला पुष्कळ उष्णता लागून त्याची वाफ झाली नाहीं. आणि फार तापवून लाल केलेल्या उलथन्यावर मेण टाकिलें त्याची ताबडतोब पक्की वाफ होऊन तींत पेटविलेला कागद धरिला त्याच्या योगानें तिनें आग घेतली.

**हरी**—बाबा, ह्यावरून मेण वितुळण्याला व त्याची वाफ होण्याला सारखी उष्णता लागत नाहीं, कमजास्ती लागते असें दिसतें, नाहीं बरें?

**रामचंद्र०**—होय, तें वितुळण्याला थोडकी उष्णता पुरते; पण त्याची वाफ होण्याला उष्णता फार लागते; म्हणजे जसें बर्फाचें पाणी होण्यास आपल्या हाताची ऊब देखील पुरते, पण पाण्याची वाफ होणें म्हटलें म्हणजे रगडून विस्तव पेटवून पुष्कळ उष्णता त्यांत शिरवावी तेव्हां होते, तसेंच मेणाचें आहे.

**हरी**—बाबा, मेणबत्तीच्या मेणाची वाफ कशी होते तें मला सांगा.

**रामचंद्र०**—मेणबत्ती पेटली म्हणजे वातीचें टोंक लाल होतें; टोंकाचा खालचा भाग वितुळलेलें मेण केशाकर्षणानें वर ओढून घेतो; मग तेथें पुष्कळ उष्णता लागल्यानें लाल झालेल्या उलथन्यावर टाकलेल्या मेणाची जशी वाफ झाली तशी त्याची वाफ होते. आतां वातीचें टोंक लाल होतें, आणि त्याच्या योगानें मेणाची वाफ होते, हें तुला दाखविण्यासाठीं मेणबत्ती फुंकरानें एकदम विझवितों. तो पहा, निखाऱ्याप्रमाणें लाल कोळी फुंकरानें उडाला, आणि वातीपासून वाफ वर चालली आहे. दिवा गेला ह्यामुळें ती जळाली नाहीं. आतां हा लाविलेला कांकडा मेणबत्तीच्या वातीपासून सुमारें तीन बोटें वरच्या आंगास धर. पहा, ती वाफ पेटून तिच्या योगानें जोत खालीं जाऊन मेणबत्ती लागली, म्हणजे ह्या वाफेच्या योगानें तीन बोटांच्या अंतरावरची मेणबत्ती पेटली.

**हरी**—बाबा, तुम्हीं मेणबत्ती फुंकल्यावर कांहीं घाण सुटली होती, तशीच दिवा मालविल्यावर पुष्कळ घाण सुटते, ती कशापासून सुटते?

**रामचंद्र०**—दिवा एकाएकीं घालविला तर घाण येत असते, ती मेण, तेल, चरबी, वगैरे पदार्थांची वाफ दिवा गेल्यावर वातीपासून निघत असते ती हवेंत जाऊन पसरते तिची येते. मेणबत्ती विझवावयाची असल्यास, तिच्या तोंडाच्या बेताचें झांकण केलेलें असतें तें घालून मेणबत्ती विझविली असतां वाफ आंत कोंडली जाऊन बाहेर घाण येत नाहीं. मेणाची वाटाण्या एवढी एक गोळी दाभणाच्या टोंकाला लावून ती मेणबत्ती जळत आहे तिजवर धर. आतां पहा, मेण वितुळून जोतीवर पडून त्यानें ती जोत गेली.

**हरी**—बाबा, असें कां झालें! हें मला समजत नाहीं.

**रामचंद्र०**—लाल झालेल्या वातीच्यानें जितक्या मेणाची वाफ करवली तितक्यापेक्षां अधिक मेण वितुळून वातीवर पडलें, त्यामुळें वातीची उष्णता नाहींशी होऊन जोत गेली. ह्यावरून काय चमत्कार आहे पहा, ज्या पदार्थानें दिवा जळतो त्याच पदार्थानें तो विझतो. मेण अप्रवाही म्हणजे घट्ट असतां अथवा प्रवाही म्हणजे पातळ असतां

जळतें, तर जोत गेली नसती; पण तें वाफ झाल्याशिवाय जळतच नाहीं, म्हणून वितुळलेल्या मेणानें जोत गेली असें झालें.

**हरी**—बाबा, तुम्ही मागें एकदां म्हणालां होतां कीं, जोतीचें तेज व तिच्या आंतली पोकळी ह्यांविषयीं मी तुला कांहीं सांगेन, तें आतां सांगतां?

**रामचंद्र०**—ठीक आहे. त्वां मला बरी आठवण केली, मी तुला आतां तेंच सांगतों. ही मेणबत्ती संतपणीं जळत आहे, तिच्या जोतीकडे नीट लक्ष लावून पहा. जोतीच्या मध्यभागीं वातीच्या टोंकाच्या वरच्याच आंगास काळिमा तुझ्या दृष्टीस पडत आहे काय?

**हरी**—होय, बाबा, दृष्टीस पडतो.

**रामचंद्र०**—बरें, त्याविषयीं मी तुला आतां कांहीं सांगतों. वातीच्या भोंवतालची वाफ जळत आहे; पण नीट वातीच्या टोंकावर जी वाफ जात आहे ती जळत नाहीं, कारण कीं तिच्या सभोंवतीं जोत असते तिजमुळें भोंवतालून हवा येते ती त्या जोतीनें जळून जाऊन मध्यें हवेचा प्रवेशच होत नाहीं. त्यामुळें जोतीच्या मध्यभागची वाफ जळत नाहीं, व तिचा उजेडही पडत नाहीं, आणि ती जेवढ्या जाग्यांतून वर चढत असते तेवढी जागा काळसर दिसते.

ही गोष्ट तुला चांगली समजण्याकरितां हा बदाम घेतों. ह्याची आकृति थेट जोतीच्या आकृतीसारखीच आहे. आतां ह्या बदामाचें टरफल हें जोतीच्या बाहेरच्या भागाप्रमाणें आहे; आणि त्यांतली बी ही आंतला न जळणारा जो काळसर भाग त्याप्रमाणें आहे, असें तूं मनांत आण; म्हणजे दिव्याच्या जोतीविषयीं कल्पना बरोबर तुझ्या मनांत येईल. बदाम हा जोतीचा थेट नमुना आहे.

जोतीच्या मध्यभागांतील वाफ जळत नाहीं हें तुला अगदीं स्पष्टपणें दाखविण्याकरितां आणखी एक युक्ति करितों, ती नीट लक्ष लावून पहा. हें कंदिलाचें भिंग आहे; हें मी जोतीच्या टोंकावर धरून झडकर वातीच्या टोंकापर्यंत खालीं करीन. आणि त्या भिंगाच्या वरल्या आंगानें जोतीच्या ठिकाणीं कसें दिसतें तें पहा. पण लवकर मात्र पहा; कारण खालच्या आंगानें काजळ धरल्यावर मग उपयोग नाहीं. हें पाहिलें?

मध्यें कपाळीं अक्षत लावावी तिजप्रमाणें काळा टिकला दिसतो, आणि त्याच्या भोंवतीं सोन्याच्या कड्याप्रमाणें वर्तुळ दिसत आहे.

**हरी**—बाबा, ह्या युक्तीवरून जोतीचें स्वरूप पुरतेपणें लक्षांत आलें. मधल्या आंगची वाफ जळत नाहीं अशी माझी पक्की खातरी झाली, आणि ही गोष्ट मी आतां आपल्या सोबत्यांस सिद्ध करून दाखवीन.

**रामचंद्र०**—जर सगळी वाफ जळती, तर मध्यें काळिमा मुळींच दिसताना; सगळी जोत सारखी तेजोमयच दिसती. पण जोतीच्या भोंवतालचा प्रदेश जळत असतो त्याजमधून हवा जाऊन मधल्या प्रदेशास मिळत नाहीं, त्यामुळें तेथली वाफ जळत नाहीं, हें चांगलें लक्षांत ठेव.

ह्याचविषयीं तुला आणखी प्रयोग करून दाखवावयाचा आहे. ह्या जाडी कागदाचा एक दोन तसू लांबीचा तुकडा कापून घेतला आहे, मेणबत्तीचा कोळी झाडला आहे, आणि जोत अगदीं संत जळत आहे. हा कागदाचा तुकडा जोती मध्यें वातीच्या जवळच्या आंगास अर्धपळ आडवा धरितों, आणि लागलाच बाहेर काढितों. हा कागद पहा आतां. दोहों ठिकाणीं जेथें जोतीच्या बाहेरल्या आंगाचा स्पर्श झाला तेथें जळाल्याप्रमाणें झाला आहे, परंतु मध्यें जशाचा तसाच आहे. कारण जोतीच्या मध्यभागीं तेज नाहीं, त्यामुळें कागदाचा मधला भाग स्वच्छ आहे.

मेणबत्तीच्या जोतीचें स्वरूप असें आहे. साधारण वातीच्या दिव्याच्या मध्यभागीं काळिमा असतोच; पण नळीप्रमाणें पोकळ वात करण्याची एक रीत आहे त्या प्रकारची वात पेटली म्हणजे तिजमधल्या पोकळींतून वर हवा चढते ती जोतीच्या मध्यभागीं येते, आणि जोतीच्या भोंवतालूनही हवा लागते, म्हणून सगळी वाफ जळते. जोतीच्या मध्यभागीं काळिमा मुळींच दिसत नाहीं, तर सगळी जोत सारखी तेजोमय दिसते.

---

## यंत्रांपासून फायदे.

### भाग पहिला.

अगदीं साधीं आणि नेहमीं वापरण्यांत येणारीं असलीं देखील हत्यारें तयार करण्यास चातुर्य व श्रम लागतात. तीं किती लागतात

ह्याचा विशेष विचार लोक करीत नाहींत, ह्यामुळें लोकांच्या लक्षांत येत नाहीं. येथें सुरीचें उदाहरण घेतों. सुरी करण्यास यंत्र आवश्यक आहे. ज्या अनाडी लोकांत यंत्रें नाहींत ते कपरीला, शिंपीला, किंवा हडकाला धार लावितात, आणि त्या योगानें कापण्याचें व करवतण्याचें काम होईल तसें करितात. ह्या प्रकारावर सुधारणा करण्याचा प्रथम प्रकार एवढाच कीं त्या कपरी वगैरेला लांकडाची मूठ करून दोरीनें घट्ट बांधून टाकणें.

ह्या देशांतील कोणी मनुष्यास सुरी पाहिजे असली, तर स्वतः बनवावी लागत नाहीं; तर त्यानें बोहऱ्याच्या दुकानांत जाऊन दहावीस सुऱ्या पाहून त्यांतली पाहिजे ती निवडून विकत घ्यावी. ज्यापाशीं केवळ कपरी अथवा हडूक असतें तो असली सुरी मिळविण्याकरितां महिनाभर देखील खुशीनें मेहनत करील.

पण श्रम न पडतां व विशेष खर्च न लागतां आपणांस सुरी मिळते हें कशानें होतें? तर यंत्राच्या योगानें होतें. सुरी करण्याचें जें यंत्र आहे तें चाललें असतां, अथवा ज्याशिवाय सुरी होतच नाहीं असले पदार्थ तयार करण्याचीं जीं यंत्रें आहेत तीं चाललीं असतां, आपणांस श्रम न पडतां व विशेष खर्च न लागतां सुरी मिळते.

आतां वर सांगितलेली गोष्ट मनांत धरून ज्याजपाशीं दोन हातांखेरीज दुसरें कोणतेंच साधन नाहीं त्यास सुरी कशी मिळावी ह्याचा विचार करूं.

सुरीसारखा पदार्थ श्रमावांचून आयताच तयार झालेला नसतो. तर ज्या लोखंडाची सुरी करितात तें कांहीं देशांत पुष्कळ असतें. तें तरी शुद्ध, म्हणजे लोहारानें तें घेऊन लागलींच त्याचीं हत्यारें करूं लागावें असें, नसतें. त्याची मूळ स्थिति पाहिली तर तें दुसऱ्या एखाद्या पदार्थाशीं मिश्र झालेलें असतें, त्यामुळें तें उपयोगीं पडावयासारखें नसतें. ह्या अवस्थेंत त्यास अशोधित लोह म्हणावें. तें कधीं मातीशीं मिश्र असतें, व कधीं चुन्याशीं अथवा गारेशीं मिश्र असतें. कधीं कधीं गंधकाशीं इतकें मिश्र असतें कीं, तें विस्तवांत घातलें तर विलायती कोळशाप्रमाणें जळतें. मूळस्थितींतलें लोखंड पाहिलें तर, हें रस्ता करण्याच्या, अगर भिंत बांधण्याच्या, अगर इमारतीच्या कामासाठीं चुना

करण्याच्या उपयोगीं पडेल असें वाटेल; पण सुरी करण्याच्या उपयोगीं पडेल असें वाटणार नाहीं.

बरें, ज्या मातींत अथवा दगडांत लोखंड असतें ती माती अथवा तो दगड एखाद्यास ठाऊक असला तरी तें त्यास मिळावें कसें? नुसत्या बळाचा तर उपयोग नाहीं. तर त्याचें कसें करावें, काय करावें, ह्या गोष्टींचें ज्ञानच पाहिजे; तें असल्यास कांहीं तरी होईल. लोखंडाशीं कोणता पदार्थ मिश्र झाला आहे, व तो निराळा करावा कसा, हें समजलें पाहिजे. केवळ मेहनतीनें कांहीं व्हावयाचें नाहीं. ह्या कृत्यांत अग्नीचाच आश्रय केला पाहिजे.

सैंपाक करण्याकरितां अथवा पाणी तापविण्याकरितां ज्या रीतीनें अग्नीचा प्रयोग करितात त्या रीतीनेंच ह्या कृत्यांत केला असतां काम बिघडून जाईल. अशोधित लोह धोंड्याप्रमाणें अग्नींत टाकून दिलें तर त्याचा भुगा होऊन जाईल; ह्यास्तव पूर्वी जळण तयार केलें पाहिजे. अग्नीपासून उष्णता तर फार लागावी, आणि ज्वाळा तर होऊं नये. जळणाकरितां लांकडें जाळून कोळसे केले पाहिजेत, अथवा विलायती कोळसे भाजून तयार केले पाहिजेत.

कोळसे तयार झाले म्हणजे त्यांजपासून एक तापण्याचें काम होतें, परंतु मातीशीं लोखंड मिश्र असतें तें मातीपासून निराळें करण्याचें काम होत नाहीं. नुसती माती अथवा नुसता चुना मोठ्या अग्नीमध्यें देखील जशाचा तसाच राहतो. पण तीं दोन्हीं कांहीं एका प्रमाणानें मिसळून घातलीं असतां एकाच्या योगानें दुसरें वितुळतें. ह्यास्तव कोळसे आणि अशोधित लोह व चुनखडे एके भट्टींत घालतात. भट्टीच्या खालच्या अंगचे कोळसे पेटवितात, आणि भट्टींत वारा खालूनही घालीत असतात. हा वारा मोठ्या जोराच्या यंत्रानें जर न घातला तर त्यापासून काम अगदीं कमी होईल, आणि काम करणाऱ्यास मेहनत फार पडेल. तरी काम मुळीं होणारच नाहीं असें नाहीं; पण होईल तें फार मेहनत पडून होईल.

आतां भट्टींत चुना आणि माती एकत्र मिळून त्यांचा कांचेप्रमाणें एक पदार्थ होऊन तो वर तरूं लागतो; आणि कोळशांतला व चुनखड्यांतला कार्बन लोखंडाशीं मिसळून त्यास वितुळवितो. लोखंड

भट्टींतील दुसऱ्या सर्व पदार्थांपेक्षां जड असल्यामुळें तिच्या तळाशीं जाऊन राहतें. तेथें रस जाण्याकरितां एक द्वार राखिलें असतें तें वाळूच्या दट्यानें बंद करून ठेविलें असतें. आपणास पाहिजे तितका रस तयार झाला अगर न झाला हें त्या कामगारास नेहमींच्या अभ्यासावरून कळतें. झालासें वाटलें कीं तो लोखंडाच्या गजानें वाळूचा दट्या काढितो; मग जसें दोणीचा दट्या काढिला म्हणजे पाणी बाहेर पडतें तसें वितुळलेलें लोखंड वाळवेचे मोठाले सांचे केलेले असतात. त्यांत पडून अमळशानें निवून घट्ट होतें. ह्याप्रमाणें एका आठवड्यांत एका भट्टींतून एकशें पांच खंडी लोखंड गाळिलें जातें. ह्याप्रमाणें एका वर्षांत जें लोखंड होतें त्याजपासून एका पात्याचें वजन अडीच तोळे ह्याप्रमाणें सुमारें सत्तावीस लक्ष सुऱ्यांचीं पातीं तयार होतील.

लोखंड तयार करण्याच्या कामांतला हा पहिला प्रयोग. ह्याजपासून फायदा मोठा आहे खरा, तरी हा झाल्यानें लोखंड सुऱ्या करण्याचे उपयोगाचें होतें असें नाहीं. हें ओतींव लोखंड किंवा बीड असतें तें हातवड्यानें ठोकून घडतां येत नाहीं, व त्यास धारही लावितां येत नाहीं. ह्यासाठीं तें घनवर्धनीय, म्हणजे हातवड्यानें ठोकून वाढावयाजोगें असें, केलें पाहिजे. तें आगींत घातलें तर न वितुळतां मृदु होऊन त्याचें पाहिजे तें हत्यार करितां येईल, व दोन तुकडे एकत्र सांधितां येतील, असें केलें पाहिजे.

---

## भाग दुसरा.

अशोधित लोहाचें ओतींव लोखंड करण्याची रीत सांगितली. आतां ओतींव लोखंड घनवर्धनीय करण्याची रीत सांगतों. हें करण्याच्या रीती अनेक आहेत. त्यांत सामान्य प्रकार असा आहे कीं वितुळलेलें लोखंड भट्टींतच असूं द्यावें, आणि दंताळ्यानें पुष्कळ वेळपर्यंत ढवळीत रहावें म्हणजे भट्टींत वारा येत असतो तो त्या लोखंडांतला बहुतेक कार्बन जाळून टाकितो. असें केल्यानें तें चिंवट होतें. निवूं न देतां भट्टींतून बाहेर घेऊन ताबडतोब मोठ्या घणानें वारंवार ठोकितात, अथवा मोठ्या चरकांतून काढितात, म्हणजे त्याचे पत्रे, पट्या, वगैरे पाहिजे ते पदार्थ होतात.

लोखंड ह्या स्थितींत आणण्यास फार मेहनत लागते. यंत्रांचें साह्य नसलें तर ब्रिटिश बेटांतील सर्वही लोक दुसरे सगळे धंदे सोडून केवळ लोखंडच तयार करूं लागले, तरी हल्लीं जितकें लोखंड तयार होतें तितकें त्यांच्या हातून होणार नाहीं. ह्यास्तव यंत्रांचा आश्रय केलाच पाहिजे. पाणचक्या, वाफेचीं यंत्रें, आणि सर्व प्रकारच्या यांत्रिकशक्ति, चालू होऊन हातवडे आपोआप ठोकतात, चरक फिरतात, आणि लहान मोठ्या भोंकांतून लोखंडाच्या तारा व सोट जसे बारीक अगर मोठे ज्या व्यापारास जसे पाहिजे असतील तसे निघून त्यांस मिळतात. लोखंडाच्या कारखान्यांत जीं यंत्रें चालतात तीं नसतीं, तर एक कुदळ मिळविण्यास मनुष्यास एक वर्ष मेहनत करावी लागती; गाडीच्या चाकांच्या धांवांस किंमत गाडी व बैल ह्या दोहोंपेक्षांही अधिक पडती; शेतकऱ्यास सर्व हत्यारें लांकडी करावीं लागतीं अशा स्थितींत लोकांस मेहनत पुष्कळ पडेल, परंतु लोकांची उपजीविका केवळ मेहनतीवर होत नाहीं, तर फायदा होण्याजोगी मेहनत असली तरच होते. मागें सांगितलेले सर्व संस्कार लोखंडास केले तरी तें उत्कृष्ट म्हणजे सुमारें रुपया किमतीची सुरी करण्याच्या योग्यतेचें, होत नाहीं; तरी असे देश बहुत आहेत कीं त्यांतील लोक तसल्याच लोखंडाचा लहानसा तुकडा मिळाला असतां मोठा आनंद पावतील. आणि त्या देशांत म्हटलें तर अशोधित लोह पुष्कळ असतें, परंतु त्या लोकांस लोखंड तयार करण्याची रीत माहीत नाहीं, व त्यांजमध्यें अर्थात भट्ट्या नाहींत. युरोपियन व्यापाऱ्यांचीं गलबतें पूर्वेकडील बेटांत गेलीं म्हणजे त्या बेटांतील लोक त्या लोकांपासून सोनें मागत नाहींत तर लोखंड, लोखंड! असा मोठा हाकाटा करीत असतात. आणि ज्यानें आपला उत्कृष्ट माल देऊन त्याच्या मोबदला लोखंडाचा एखादा पदार्थ मिळविला तो आपणास दैववान् असें समजतो.

बरें, हीं वरील गोष्ट अनाडी देशाविषयीं झाली. परंतु जे देश सुधारलेले आहेत, व ज्यांमध्यें कला कौशल्य बरेंच वाढलें आहे, अशा देशांतील लोकांस लोखंडाच्या सुऱ्या चांगल्या वाटत नाहींत, तर पोलादाच्या सुऱ्या पाहिजेत. कारण पोलादाचा गुण असा आहे कीं, तें मोडल्यावांचून व वांकल्यावांचून त्यापासून केलेल्या हत्यारांस पाहिजे

तशी तीक्ष्ण धार लावितां येते. तर तें पोलाद तयार करण्याकरितां पूर्वी तयार झालेल्या लोखंडास आणखी संस्कार केले पाहिजेत.

ते संस्कार कोणते व कसे करावयाचे? लोखंड जों जों तापवावें आणि ठोकावें तों तों तें मऊ होतें; आणि एकदां तापवून ठोकल्यानें त्यांतील कांहीं कार्बन बाहेर निघून गेला त्याप्रमाणेंच ठोकितां ठोकितां दरवेळेस अधिक अधिक निघून जातो, आणि त्या योगानें लोखंड मऊ होतें, तर तें कठीण करण्याकरितां त्यास कार्बन परत दिला पाहिजे.

हा देण्याची रीत अशी आहे कीं लोखंडाच्या कांबी अथवा ठोकळे आणि कोळशांचा भुगा एक्या मोठ्या पात्रांत घालून तो भुगा तापवितात, आणि ज्याप्रमाणें कमी अथवा अधिक काठिण्य पाहिजे असेल त्याप्रमाणें कमी अथवा अधिक वेळपर्यंत तो जळत ठेवितात. ओतींव लोखंडाच्या आंगीं नसतो आणि पोलादाच्या आंगीं असतो असा जो विशेषधर्म तो कोणत्या रीतीनें उत्पन्न होतो हें बारकाईनें येथें सांगण्याची जरुरी नाहीं. भुग्यांत तापविण्याचें काम फारवेळपर्यंत चाललें, अथवा उष्णता पाहिजे तीपेक्षां अधिक असली, तर त्या लोखंडाचें जें पोलाद होतें तें कडक होऊन त्यास तापवून ठोकलें असतां सांधलें जात नाहीं. परंतु तें पोलाद त्या आगींत वितुळल्याशिवाय राहिलें तर त्यास लोखंडाप्रमाणेंच हातवड्यानें ठोकितां येतें.

कसेंही झालें तरी सुरीला तीक्ष्ण धार लागण्यासाठीं पोलादाच्या आंगीं जो गुण अवश्य लागतो तो त्याच्या आंगीं येतो. आतां ज्या पोलादास ठोकिलें असतां फुटतें व ज्या पोलादास ठोकिलें असतां फुटत नाहीं ह्यांजमध्यें मुख्य भेद हाच आहे कीं, पहिल्या प्रकारच्या पोलादास फार तीक्ष्ण धार लागते पण तें ठिसूळ असतें.

वर सांगितल्या संस्कारापासून त्या नरम पोलादाच्या आंगीं हा गुण येतो कीं त्याजपासून केलेल्या हत्यारांस पाणी देतां येतें. तें पोलाद फारच तापवून थंड पाण्यांत बुडविलें, आणि अगदीं निवेपर्यंत तसेंच ठेविलें, तर तें इतकें कठीण होतें कीं तें लोखंड देखील कापील; पण फार ठिसूळ होतें. तें थंड झाल्यानंतर कामगार घांसून चकचकीत करितो, आणि तापलेल्या तव्यावर ठेवून तो तवा विस्तवावर ठेवितो. नंतर

तें तापलें म्हणजे त्यास रंग येत असतो, त्याच्या प्रकारावरून त्या कामगारास तें उपयोगी झालें किंवा नाहीं हें समजतें. रंग त्याच्या परीक्षेस उतरला म्हणजे तें हत्यार तो पुन्हा पाण्यामध्यें बुडवितो, तेणेंकरून त्याच्या अंगीं जितका कठीणपणा त्यास आवश्यक असतो तितका येतो.

---

## भाग तिसरा.

पूर्वींच्या दोन भागांत सांगितलेले सर्व संस्कार होऊन सुरी तयार झाली; व पोलादाचे सर्व गुण तिजमध्यें आले, तरी ती घांसणें व लावणें हीं कामें यंत्रानें केलीं नाहींत तर ह्यांसच यंत्रानें केलेल्या सगळ्या सुरीच्या किमतीपेक्षां अधिक किंमत पडेल. ह्या घांसण्याविषयीं व लावण्याविषयीं यंत्रें आहेत. फिरस्ता शिकलगार आपलीं चक्रें वगैरे सामग्री घेऊन फिरत असतो. ही सामग्री म्हणजे एक सामान्य प्रतीचें यंत्रच आहे. शेफिल्द म्हणून इंग्लंदांत एक गांव आहे तेथें लोखंडाचें व पोलादाचें फार सामान होतें. तेथील शस्त्रकार लोक प्रथमतः आपलीं शस्त्रें पाण्याच्या अथवा वाफेच्या योगानें मोटमोठीं चक्रें फिरत असतात त्यांजवर लावितात. तीं चक्रें इतक्या त्वरेनें फिरत असतात कीं तीं उभींच आहेत अशीं दिसतात, त्यांची गति नेत्रांनीं दिसत नाहीं. अशी सोय असल्यामुळें पहिल्या वेळच्या घांसण्याला फारसा खर्च पडत नाहीं. पण लोकांस आपलीं शस्त्रें लावणें झाल्यास फिरस्ता शिकलगार पाहून त्याजकडून लावावीं लागतात. तो फक्त सुरी पाजविण्याकरितां सुमारें एक आणा घेतो.

ज्या देशांत लोखंड पुष्कळ असतें तेथले लोक त्याविषयीं विचारच करीत नाहींत, आणि त्यांस त्याविषयीं फारसें वाटतच नाहीं. परंतु सामान्य एक चार आण्यांची सुरी उत्पन्न करण्यास पूर्वीं किती विचार व किती कल्पना काढाव्या लागल्या असतील, व किती मेहनत करावी लागली असेल, ह्याचा ठिकाणा नाहीं. आणि विचार व कल्पना हीं दोन नसतीं, तर आजपर्यंत जेवढे लोक झाले तेवढे सगळे जरी आपलें बळ खरचिते तरी सुरी होऊन मिळाली नसती. आणि श्रम वांचविणारीं यंत्रें नसतीं, तर केवळ चातुर्यापासून आतांच्या हजारपट खर्च पडूनही सुरी खास मिळतीना. ह्यावरून पहा बरें, सामान्य मनुष्यास

थोडक्या पैशांत सुरी कशानें मिळते? विचार करून पाहिलें असतां ह्याचें कारण उघड आहे. जेवढें काम यंत्रद्वारा होण्यासारखें आहे तेवढें यंत्रद्वाराच होतें. चक्राच्या एका फेऱ्यापासून, वाफेच्या यंत्राच्या एका ठोक्यापासून, चरकाच्या एका दाबापासून, अथवा रुपयाइत्यादिकांवर शिक्का मारण्याचें जें यंत्र असतें त्याच्या एका आघातापासून, जितकें काम एका पळांत होतें तितकें एका माणसाच्या हातून एका महिन्यांत देखील होणार नाहीं. यंत्राच्या कामांत दुसरा नफा असा आहे कीं त्यांत श्रमविभाग होतो. एका मनुष्यास एकच प्रकारचें काम करावें लागतें. एकच काम केल्यापासून तो कांहीं दिवसांनीं त्यांत फारच निपुण होतो, त्यामुळें तोच एकटा निरनिराळीं कामें करीत असून जितकें काम त्याच्या हातून झालें असतें त्याच्या वीसपट अधिक करितो.

यंत्रांपासून आणखी एक फायदा असा आहे कीं, बहुत लोकांस उद्योग मिळतो. यंत्रें नसतीं तर जितक्या लोकांस लोखंडाच्या व्यापारापासून अन्न मिळतें त्यांच्या शंभरपट लोकांस हल्लीं अन्नाची प्राप्ति होते. खाणींतून लोखंड काढणें वगैरे कामांत यंत्रें चालतात त्यामुळें लोखंड पुष्कळ उत्पन्न होतें, आणि तें घडण्याचे कारखानेही बहुत असतात, त्यामुळें पुष्कळ लोकांस उद्योग मिळतो. यंत्रें नसतीं तर मुळींच थोडेंच लोखंड उत्पन्न होतें, आणि अर्थात उद्योगही थोड्याच लोकांस मिळता.

ओतारी, लोहार, घिसाडी, वगैरे किती कारागीर त्या कारखान्यांवर पोटें भरीत असतात! तवे, कढया, पातेलीं, शेगड्या, नळ, वगैरे जेवढ्या लोखंडी जिनसा आपण पाहतों तेवढ्या घडण्याच्या कामांत किती लोक पोटें भरीत असतात! साक्षात् अथवा परंपरया सर्वांसच ह्या व्यापारापासून नफा आहे. लोखंडाचे पूल, लोखंडाचे रस्ते, लोखंडाच्या गाड्या, लोखंडाच्या नावा, लोखंडाचीं यंत्रें, लोखंडाचीं घरें अशीं नानाप्रकारचीं कामें होतात. फार काय सांगावें, पण लोखंड जर नाहींसें झालें तर मनुष्याचें चांगल्या रीतीनें चालावयाचेंच नाहीं.

सर्व कारागीर लोकांचीं जेवढीं हत्यारें आहेत तेवढ्यांचा काम करण्याचा जो भाग असतो तो बहुतकरून लोखंडाचा असतो. कितीएक

हत्यारें तर सबंध लोखंडाचींच असतात. आतां हीं हत्यारें जर हाता-नें केलीं असतीं, तर कारागिरांस कित्येक महिन्यांची मिळकत हत्यारें विकत घेण्यांतच घालावी लागती. आणि इतकी मिळकत देऊन तरी विकत मिळतीं अगर न मिळतीं हेंही सांगवत नाहीं. कारागिरांची उप-जीविका कायती हत्यारांवरच; त्यांवांचून त्यांचें एक दिवस चालावयाचें नाहीं. हातानें घडलेलीं हत्यारं फारच किंमत देऊन कारागिरांनीं जर घेतलीं, तर यजमानांनीं त्यांस दुप्पट रोजमुरा दिला पाहिजे असें होईल.

परंतु अशी गोष्ट झाली तर यजमानांस दुप्पट रोजमुरा देण्याचें सामर्थ्य होणार नाहीं, कारण कीं त्यांस जेवढे पदार्थ विकत घ्यावे लाग-तात तेवढ्या सर्वांस किंमत दुप्पट पडेल, त्यामुळें कारागिरांस दुप्पट रोजमुरा देऊन ठेवणें त्यांच्या हातून होणार नाहीं. वांकस, किंकरें, रंधा, गोलची, कर्वत ह्या हत्यारांनींच सुताराची सर्व मिळकत खाली जाणार; आणि ह्याप्रमाणेंच सर्व कारागिरांचें व्हावयाचें; आणि कारागिरी म्हणून नाहींशी होणार.

लोखंडाच्या कामांत यंत्रें चालतात ह्यामुळें ह्या धातूच्या जेवढ्या जिनसा आहेत तेवढ्या लोकांस स्वस्त मिळतात, इतकेंच नाहीं; तर लोखंडाच्या कारखान्यांत व दुसऱ्या सर्व कारखान्यांत सहस्रावधि लोकां-स उद्योग मिळतो, तो एरवीं मिळताना. यंत्रांच्या योगानें हत्यारें फार चांगलीं होतात, आणि त्या चांगल्या हत्यारांपासून थोड्या मेहनतीनें पुष्कळ काम होतें. आणि सर्व लोकांस सर्व प्रकारचीं पात्रें वगैरे जशीं पाहिजेत तशीं सोईचीं मिळतात, त्यामुळें त्यांस सुखही होतें. ह्या गोष्टी यंत्रें चालतात म्हणूनच घडतात. ह्या पृथ्वीच्या पाठीवर अडाणी देशांत लक्षावधि लोक असे आहेत कीं आपणांजवळची सर्व चीजवस्त देऊन त्यांस जर एक लोखंडाचा तवा, कढई, अथवा पातेलें मिळालें, तर ते आपणांस भाग्यवान् मानितील. आणि असलीं भांडीं येथें आपणांस दहा बारा आण्यांत मिळतात.

लोखंडाच्या कामांत यंत्राची योग्यता पुरती समजण्यासाठीं आणखी एकदोन गोष्टी सांगतों. इ० स० १७८८ त ब्रिटन बेटामध्यें सर्व

वर्षांत एकंदर लोखंडी काम म्हटलें तर ९८,००० खंडींचें देखील पुरतें झालें नव्हतें. आणि स्वीदन देश व रूस देश ह्या देशांतून सुमारें तितकेंच लोखंड ब्रितनांत आणिलें होतें. आणि त्या आणिलेल्या लोखंडाची किंमत अर्थात ब्रितनच्या लोकांच्या मिळकतींतूनच दिली असावी. हल्लीं दरवर्षास ब्रितन बेटांत सुमारें ८,४०,००० खंडींचें, म्हणजे पूर्वींपेक्षां सुमारें नऊपट, लोखंडी काम होऊं लागलें आहे आणखी त्या काळाला आणि ह्या काळाला अंतर पाहिलें असतां फक्त पाऊणशें ऐशी वर्षांचें आहे.

हे तिन्ही भाग ब्रितन बेटाच्या संबंधानें लिहिले आहेत.

---

## अन्योक्तिकलापांतील.

### कोकिलान्योक्ति.

ज्यांचे पूर्वी वसंतीं परिमलबहलीं आम्रवृक्षीं सुखाचे ॥
गेले गुंजारवातें दिवस परिसतां मत्तभृंगांगनांचे ॥
कैसे त्या कोकिलातें अधम करिति हे कावळे चंचुघातां ॥
कोठें थारा मिळेना गरिब पळतसे, वांकडा काळ येतां ॥१॥

---

पढोत शुक सारिका शिखि वदोत केकाध्वनी ॥
करोत कलहंसही बहुत गायनातें वनीं ॥
रसालतरुंच्या शिरीं कुसुमितीं बसोनी करी ॥
न कोकिल सुधासम स्वन वनांतरीं जो वरी ॥२॥

### चातकान्योक्ति.

झाडें पालवती, लता उगवती; वेलां फुलें शोभती ॥
मेघें वृष्टि करोनि तुष्टि दिधली सृष्टीस पुष्टीहि ती ॥
रेरे चातक काय पातक तुवां केलें न अम्हां कळे ॥
वारी वर्षुनि भारि एक कणही त्याचा न तूतें मिळे ॥३॥

---

ते अन्य मेघ तव जे हरिती तृषेतें ॥
कां व्यर्थ आरडुनि शोषविशी[८८१] जिभेतें ॥
हे चातका घने रिते शिशिरांत[८८३] येती ॥
ते गर्जती परि न वारिकणांस देती ॥४॥

मयूरान्योक्ति.

पक्षी या मर्त्यांवरी विहरतां लक्षावधी दीसती ॥
“केकी एकच धन्य त्यांत इतर क्षुद्रापरी भासती ॥
जो शब्दें अपुल्या क्षणांत पळवी सर्पा सदर्पा महा ॥
जेणें चंदन सौख्यकारक जना होती; खरा थोर हा ॥५॥

---

रत्नांचा जणु ताटवा झळकतो, मोरा, पिसारा तुजा ॥
हर्षें नाचसि तें गमे त्रिभुवनीं पक्षी न ऐसा दुजा ॥
मोठा सुंदर तूं खरा परि दया नाहींच भिल्लांस या ॥
हे घेतील तुझ्या जिवा, झडकरी सोडीं अरण्यास या ॥६॥

शुकान्योक्ति.

तुझी वाणी कोणी म्हणति गुण हा अद्भुत असे ॥
मला वाटे मोठा तुज जवळि हा दोषच वसे ॥
शुका तीच्या योगें सतत पिंजऱ्यामाजि पडसी ॥
गड्या स्वातंत्र्याचीं अनुपम सुखें सर्व मुकसी ॥७॥

---

देखोनी नारळीचा तरु शुकें भुलला एक त्याच्या फळाला ॥
साळीचें शेत मोठें झडकरि पिकलें सोडुनी तो निघाला ॥
त्यानें त्या नारळातें फिरुनि फिरुनियां फोडण्या यत्न केला ॥
आशेचाची न तेणें परि बळकट ही चंचुंचा भंग झाला ॥ ८ ॥

बकान्योक्ति.

उभा राहे एके चरणिं धरणीतें धरुनियां ॥
तपश्चर्या वाटे करित जणु डोळे मिटुनियां ॥
बका ऐशा ढोंगें तव भ्रमति मासेच ठकती ॥
परि ज्ञाते तूझें कपट लवलाहीं उमजती ॥ ९ ॥

खद्योतान्योक्ति.

गेला लोकांतरातें दिनकर सकला द्योतवी जो जगातें ॥
अस्तातें जाय तोही हिमकिरण, जया सौख्यदा विश्व गातें ॥
मेघांनीं व्याप्त ऐशा गगनिं नच दिसे एक ताराहि कोठें ॥
रे खद्योता अतां तूं चमक बहु, तुझें दैव बा फार मोठें ॥ १० ॥

सिंहान्योक्ति.

खाण्या वांचुनि रोडला जरि, जरायोगें बहू वाळला ॥
रोगानें अति पीडिला, जरि मरायातें हि कीं टेंकला ॥
उन्मत्तद्विपगंडभेदन करायाचीच इच्छा करी ॥
मानी क्षुद्रजनांवरांपरि तृणा स्पर्शेच ना [१०८]केसरी ॥ ११ ॥

आर्या.

मी रोड एकटा मी आणीं मज पाठबळ नसे कांहीं ॥
ही शंका स्वप्नींही सिंहा तुझिया मनीं वसत नाहीं ॥ १२ ॥

गजान्योक्ति.

कर्णी लोंबति चामरें चमकती माळा गळां साजिऱ्या ॥
[१०९]वेली रंगविल्या हि शोभति शिरीं सोंडेवरी गोजिऱ्या ॥
ऐसा तो नटला तरी नृपकरी पायीं बिडी वागवी ॥
कैशी त्यास मिळे स्वतंत्र वनिंच्या हत्तीपुढें [११०]थोरवी ॥ १३ ॥

---

दानैपान इच्छुनी जरि [१११]द्विरेफ पातले ॥
कर्णताडनें गजें हंकून त्यांस लाविलें ॥
त्याचिया च मस्तकास हानि भूषणाचि ही ॥
भृंग पंकजांवरी निघूनि जाति सर्व ही ॥ १४ ॥

हरिणान्योक्ति.

जाळें तोडुनियां बळें हरिण तो टाळोनि दावाग्निला ॥
व्याधाचे चुकवूनि बाणहि महावेगें पुढें चालिला ॥
तों घाईत उडी फसूनि पडला आडामधें बापडा ॥
होती सर्वहि यत्न निष्फळ जरी होई [११३]विधी वांकडा ॥ १५ ॥

वृक्षान्योक्ति.

मार्गी वाढुनि सावली पसरिसी विस्तीर्ण कां तूं अशी ?
कां होशी फलयुक्त ? होउनि तसा कां वांकशी भूमिशीं ?
तेणें ओढिति तोडिती जन तुला, पाषाणही मारिती ॥
वृक्षा सोस निमूट हाल अवघे आतां न अन्या गती ॥ १६ ॥

---

तापानें पीडिले त्यां निवविशि करिशी तृप्त त्यां जे भुकेले ॥
[११४]अर्थी देऊनियां त्वां अभि[११५]मत मनिंचें फार संतुष्ट केले ॥
ऐशी कीर्ती तुझी ही परिसुनि दुरुनी पातलों आश्रयातें ॥
कांटे झाडें अम्हां हीं अडवुनि धरिती कां? तरो [११६]वीरें यांतें ॥१७॥

चंदनान्योक्ति.

आहे एक सुगंधमात्र जवळी तो त्यास राखावया ॥
ऐसे घोर भुजंग पाळिशि, जना जे धांवती खावया ॥
[११७]येती गोड फळें फुलेंहि बरवीं दैवें तुला चंदना ॥
त्यांच्या बा करितास काय न कळे संरक्षणा योजना ॥१८॥

---

वनीं विलसती बहू विविध वृक्ष चोंहीकडे ॥
तयांत मम चंदना सम न एकही सांपडे ॥
जयास न दिलीं फळें न कुसुमें हि दैवें जरी ॥
शरीर झिजवूनि जो तरि परोपकारा करी ॥ १९ ॥

केतकी विषयीं अन्योक्ति.

दलां सर्वां कांटे असति मधुचा लेशहि नसे ॥
उडोनी नेत्रांतें रज बहुत पीडा करितसे ॥
तुझ्या पुष्पीं ऐसे अवगुण असोनी भ्रमर हा ॥
कसा एक्या गंधें भुलुनि पडला केतकि पहा ॥ २० ॥

आम्रवृक्षान्योक्ति.

पावोनी तव आश्रया द्विजकुळें लक्षावधी पोसती ॥
सारेही वनिंचे तरू तुजपुढें क्षुद्रापरी भासती ॥
ऐसा तूं गुणवंत बा असुनियां आम्रा पिकीं वायसा ॥
मध्यें जाणसि ता[११९]रतम्य न मनीं हा मो[१२०]ह बा कायसा ॥ २१ ॥

---

झाडें वनीं फुलति पालवती अनेक ॥
सर्वांत धन्य स[१२१]हकारचि जाण एक ॥
ज्याचीं फुलें करुनि बाण समर्थ झाला ॥
जिंकावया [१२२]रतिपती भुवनत्रयाला ॥ २२ ॥

वटान्योक्ति.

शाखा दूरवरी वटा पसरुनी दिग्मंडळा व्यापिशी ॥
पक्षी आश्रय देउनी जवळ तूं लक्षावधी पाळिशी ॥
गेलें मस्तक मेघ भेदुनि तुझें दृष्टी न पोंचे वरी ॥
तूतें शंभर थोर सांवरिति हे [१२३]बुंधेहि खांबांपरी ॥ २३ ॥

---

ऐसा थोर खरा नसेच दुसरा त्वत्तुल्य साऱ्या वनीं ॥
वार्ता आयकिली तुला कथितसें कोपा न आणी मनीं ॥
कोणी क्षुद्रलता मळ्यांत असते, तुंबी[१२४] जितें बोलती ॥
येती थोर फळें जिला बहुत तीं गर्वें तुला हांसती ॥ २४ ॥

बाभळीविषयीं अन्योक्ति.

काट्यांनीं भरलें शरीर अवघें छाया नसे दाटही ॥
नाहीं वास फुलांस भूक न निवे ज्याच्या फळें अल्पही ॥
नाहीं एकहि पांथ[१२५] येत जवळी तुझ्या, असो गोष्ट ही ॥
अन्यांचीं न फळें मिळोत म्हणुनी होशी तयांतें [१२६]वेंही ॥ २५ ॥

समुद्रान्योक्ति.

गर्वें गर्जसि बहु परि जिणें तुझें व्यर्थ भासतें मजला ॥
तव तीरीं तान्हेला जन सोधी कूप टाकुनी तुजला ॥ २६ ॥

---

वारी सकळजगाची तृषा तया गर्जना घना साजे ॥
ज्याच्या जळास न शिवे कोणींही तो समुद्र कां गाजे ॥ २७ ॥

सूर्यान्योक्ति.

थोडा बहू उजड पाडुनि अंधकारा ॥
कांहीं कमी करिति दीप [१२७]शशांक तारा ॥
नाशी प्रकाश अवघ्याहि तमा [१२८]जयाचा ॥
ऐसा जगीं समज एकचि [१२९]भानु साचा ॥ २८ ॥

---

होता जोंवरि अंबरीं[१३०] तपत तो चंडांशु[१३१] तेजें निजें ॥
झाला निष्प्रभ [१३१]तारकाधिपतिही, बोला कशाला दुजें ॥
राहूच्या वदनीं अजी गवसतां तो [१३३]भानु दैवें अहा ॥
कैसे क्षुद्रहि काजवे चमकती त्याच्या पुढें हें पहा ॥ २९ ॥

चंद्रान्योक्ति.

नक्षत्रें परिवार ज्यास पतिही जो ओषधींचा असे ॥
ज्यातें पाहुनि हर्षती जन सुधा ज्याच्या शरीरीं वसे ॥
होई तेज कमी तयाहि विधुचें[१३२] येतां रवीच्या[१३३] गृहीं ॥
ज्या येई लघुता[१३४] न अन्यसदनीं[१३५] ऐसा न कोणीच ही ॥३०॥

---

ज्या कांहीं तेज नाहीं परम कृशहि जो त्या बिजेच्या[१३६] शशीला ॥
मोठ्या यत्नें पहाया झटति बघुनियां वंदिती लोक त्याला ॥
वाढे तेजें कलांहीं पुढति बहु जरी मान तो त्या न राहे ॥
वस्तू वाटे नवी जों अवड बहु तिची लोकरीती अशी हे ॥३१॥

मेघान्योक्ति.

गर्वे पर्वत मस्तकीं जलधरा[१३७] धारा वृथा वर्षसी ॥
पीडा कष्ट करून नाविकजना दुष्टापरी हर्षसी ॥
पाण्यावीण लता तरू सुकति हे वृष्टी जरी यांवरीं ॥
रे मेघा करितास कीर्ति भुवनीं होती तुझी बा खरी ॥३२॥

---

हर्षे मोर समोर पाहुनि जया नाचावया लागले ॥
चित्तीं चातक तोषले बहु तृषा लागोनि जे शोषले ॥
तो वृष्ट्युन्मुख[१३८] मेघ होय इतुक्या माजी अकस्मात हा ॥
वारा उद्भवुनी कसा विखरिता झाला तयातें पहा ॥३३॥

हंसान्योक्ति.

"[१३९]होवोनी हंस येथें बक बसत असे रे मराळा कशाला ॥
या ठायीं पातलाशी ? निघुनि परत जा पाउलीं या घराला ॥
नाहीं कांहीं परीक्षा मतिरहित अशा येथल्या या जनातें ॥
मानूनी ते तुलाची बक हंसतिल कीं, जाण या निश्चयातें ॥ ३४ ॥

---

विजा चमकती न जों नभिं, न मेघ जों वर्षती ॥
जलाशय सरोवरें कलुषता न जों पावती ॥
प्रफुल्लनवपंकजीं[१४०] कमलिनी वनीं तों वरी ॥
विलास कलहंसका सकलही मनींचे करीं ॥ ३५ ॥

---

गेलें गांभीर्य सारें सकल कमलिनी वाळुनी कोळ झाल्या ॥
हर्षे झुंडी बकांच्या मिळुनि जलचरां खावयालागिं आल्या ॥
हंसा येथें कशाला बससि अजुनि तूं ऊठरे ऊठ वेगें ॥
नाहीं स्वच्छा शरीरा चिखल उडुनियां जों वरी डाग लागे ॥ ३६ ॥

भ्रमरान्योक्ति.

पुष्पितलता सहस्रावधि अनुभविल्या तुवां [१४१]रसज्ञवरें ॥
रे त्यांत [१४२]पद्मिनीपरि एक तरी देखिली हि सांग बरें ॥ ३७ ॥

---

टाकुनि [१४३]चंपककलिका कण्हेरिच्या कां फुलास भुललास ॥
अथवा नवल कशाचें ? रे तुजला हेंच योग्य [१४४]मधुपास ॥ ३८ ॥

---

आंबे चंदन चंपकादिक तरू सारेच का वाळले ? ॥
पद्मांनीं भरले जलाशय लया का सर्वही पावले ? ॥
झालीं निर्मद आणि शुष्क [१४५]कारिचीं का सांग गंडस्थलें ? ॥
रे मूढा भ्रमरा, [१४६]करीरकुसुम त्वां आज जें चाखिलें ॥ ३९ ॥

---

सुगंधें [१४७]जी टाकी सकलहि दिशा व्यापुनि निजें ॥
अपूर्वा कांतीतें निरखुनि जियेच्या मन रिझे ॥
अशी होई [१४८]भोगक्षम कमलिनी तों भ्रमर हा ॥
[१४९]विदेशातें जाई विधि[१५०] अदय कैसा तरि पहा ॥ ४० ॥

# मराठी पांचव्या पुस्तकांतील कवितांमधील कठीण शब्दांचे अर्थ क्रमानें.

१ इच्छितफळाचा.
२ वाक्यालंकार.
३ हेतु किंवा इच्छा.
४ करुणनें.
५ त्वरेनं.
६ योग्यसमय आल्या वांचून.
७ वर्णू.
८ प्रतिष्ठा.
९ कल्याणा करितां.
१० अवतार.
११ व्यापारास आश्रयभूत मूळ पुंजी.
१२ गोड भाषण किंवा उपदेश.
१३ सोसकपणा.
१४ संकटसमयीं.
१५ ज्याप्राण्याचेअंगीं
१६ शरीर.
१७ ओंवाळीन.
१८ गादी, गदेला.
१९ दुःखभोगण्याची.
२० मेल्यावर.
२१ नीच पशु.
२२ अभिमान.
२३ आज्ञावचनास
२४ अमर्याद भाषण.
२५ जें जिरलें तेंच अन्न खाल्लें म्हणावें
२६ सदोष.
२७ गरीब गुरूं.
२८ जन्ममरणाचा.
२९ मोठा विलक्षण.
३० खरा देव गुरु.
३१ सांगते.
३२ दुर्दशेतें पावो.
३३ भगवंताचा.
३४ आपल्या अनुभवावरून.
३५ उणेपणा.
३६ विघ्न.
३७ अन्या.
३८ निंदेस पात्र.
३९ अंत.
४० विपत्तिभोगणें आल्यास.
४१ संकट.
४२ वचनें.
४३ भक्ताजवळ उभा राही.
४४ निर्लज्जास.
४५ स्वामीची सेवा चुकविणारा.
४६ उद्भव.
४७ देहाभिमानाचा.
४८ व्यर्थ.
४९ अहंममतेचा अभिमान.
५० मानितसे.
५१ मनांत.
५२ प्रतिध्वनि.
५३ भाषण.
५४ स्थिराते.
५५ शून्यवत्—व्यर्थ.
५६ महाज्वर.
५७ बाहेर पडलें.
५८ नाशवंत.
५९ जाचणूक—पीडा.
६० दुर्दशा.
६१ पाहतां पाहतां.
६२ बहुत प्रकारचे.
६३ कुलपरंपरागत.
६४ काल्पित.
६५ निर्गुण ब्रह्म.
६६ थकवावें—जिंकावें.

६७ निदानीं—शेवटीं.
६८ चमत्कार.
६९ ज्या ज्या पुरुषार्थाची इच्छा.
७० भवबंधनांतुन मुक्त झाले.
७१ उत्तम लोकप्राप्ति.
७२ अभ्यंग.
७३ भक्ष्य.
७४ पशु पक्षी कीट. ह्यांचें.
७५ वैरभाव.
७६ स्वस्त्री.
७७ न स्वीकारी.
७८ सोडल्यावांचून.
७९ नासिका.
८० हात.
८१ स्त्री.
८२ अपमानी.
८३ चोरास.
८४ मिळविण्याची इच्छा.
८५ नदेई.
८६ वर्तमान.
८७ विपत्ति.
८८ नास्तिक मत.
८९ ठसे.
९० टाकण्यासाठीं.
९१ त्याचें यश.
९२ आयकिलें.
९३ कुशिक राजाचा पुत्र.
९४ गाधिनामक.
९५ कान्यकुब्जदेशाचा स्वामी.
९६ सैन्यप्रधानांसहित.
९७ आपल्या पायीं नम्र झाला जो विश्वामित्र त्यातें.
९८ घरास.
९९ रामायणांत.
१०० आश्रमांत.
१०१ विश्वामित्र.
१०२ सहसैन्य.
१०३ जेवणा करितां.
१०४ राजवाड्यानें.
१०५ भोजनसुख.
१०६ पर्णकुटीनें.
१०७ कुड्याच्या झाडानें
१०८ दुसरा प्रयत्न करणारा.
१०९ सर्व सैन्य.
११० रेशमी वस्त्रें.
१११ आश्रमांत.
११२ कामधेनूची कन्या.
११३ दहालक्ष.
११४ मोबादला.
११५ तुझा अर्थ गाय त्याहून उणा.
११६ ह्या विनिमयास.
११७ मानसिक दुःख.
११८ द्यावया जोगी.
११९ टाकावया जोगी.
१२० माझी.
१२१ आज्ञा आणि मानस ह्यांचा भंग.
१२२ कल्याण इच्छिणारे.
१२३ वेदपठण.
१२४ इतरांनीं सोसायास अशक्य.
१२५ अश्वत्थवृक्षापासून होणें.
१२६ अग्नीमध्यें.
१२७ लाखेला.
१२८ स्वाधीन.
१२९ सिंह.
१३० नखांनीं.
१३१ वसिष्ठ.
१३२ रथ, गज, अश्व, पायदळ असें चार प्रकारचें सैन्य.
१३३ बरोबर.
१३४ सेवकांस.
१३५ पश्चात्ताप.
१३६ समुदाय.
१३७ वसिष्ठ.
१३८ चाबूक.
१३९ चाबुकाच्या मारानें

१४० तोंडावाटे काढूनको.
१४१ माझ्या बुद्धिरूप गुहेंत.
१४२ कोपरूप गज.
१४३ विवेकरूप सिंह जागृत आहे.
१४४ मला नेण्या विषयीं.
१४५ गवताच्या बळानें.
१४६ अग्नि.
१४७ बांधलेला कोंडलेला.
१४८ सर्व शरीरांत फिरणारा जो व्यान संज्ञक वायु त्यानें.
१४९ ग्रीष्मऋतूंतल्या दुपारच्या सूर्यासारखा तेजस्वी.
१५० गाईच्या रूपानें.
१५१ अंधकार.
१५२ विजेच्या.
१५३ म्लेंछादिकांनीं.
१५४ गरुडाच्या पंखांनीं.
१५५ घुंगुरडें.
१५६ अंधकारातें.
१५७ कापसातें.
१५८ सूर्यप्रकाश तिमिरा.
१५९ महावायु तुळा.
१६० निरुपम.

१६१ सिंह.
१६२ मोठ्या हत्तीला.
१६३ सैन्यें.
१६४ कडीं.
१६५ यदुकुळांत श्रेष्ठ जो कृष्ण त्यानें.
१६६ युद्धसमयीं.
१६७ भगवद्भक्त.
१६८ योजिलें.
१६९ हें प्रतिज्ञेचें विशेषण.
१७० युद्ध.
१७१ देवऋषि.
१७२ भीष्म अर्जुन यांतें सम जाणून.
१७३ त्या उभयतांचें बाहुवीर्य पाहण्यांत.
१७४ शब्द—ध्वनि.
१७४॥. भयंकर.
१७५ वसुदेवाचा तनय कृष्ण.
१७६ हे अर्जुना.
१७७ कोल्हीण.
१७८ उजवी.
१७९ गर्वाचें भाषण.
१८० अर्जुन.
१८१ श्रीकृष्ण.
१८२ युद्ध.
१८३ निरुपम पराक्रमी.

१८४ नाम विशेष.
१८५ दैत्य.
१८६ गाई ब्राह्मण देव ह्यांस दुःख देणारा.
१८७ भीष्म.
१८८ हे कुंतीपुत्रा अर्जुना.
१८९ श्रीकृष्ण.
१९० रथातें.
१९१ म्हातारा.
१९२ तरणा.
१९३ मजसीं युद्ध कर.
१९३॥ हे जनमेजया.
१९४ धनुष्य.
१९५ अर्जुनानें.
१९६ ज्यानें अग्नीला खांडववन दिलें अशा, हें अर्जुनाचें विशेषण.
१९७ बाण जाळानें.
१९८ ज्या भीष्माच्या हस्तक्रियेस.
१९९ ब्रह्मांड.
२०० वर्णितें.
२०१ भीष्म.
२०२ यम.
२०३ अर्जुनातें.
२०४ अग्नि.
२०५ समूह.

२०६ अर्जुनाचा व्यापार.
२०७ भ्याला तो.
२०८ भीष्म.
२०९ पळभर.
२१० एकलहान पशु.
२११ अर्जुना सहित.
२१२ कृष्ण ही.
२१३ महावेगवान्.
२१४ भीष्म.
२१५ पंडित.
२१६ यवन लोक तोबा म्ह० हाय हाय म्हणती.
२१७ तसा बनला.
२१८ कारण.
२१९ खालीं घात लेलें.
२२० सूर्यसा.
२२१ भीष्माहून.
२२२ अर्जुनाचा.
२२३ भीष्म.
२२४ आश्रितमित्र ह्याचें अवन रक्षण न करणें.
२२५ प्राप्त व्हावयाची.
२२६ चाबूक.
२२७ कृष्ण.
२२८ रथाचें चाक.
२२९ हातीं घेई.
२३० भीष्माला.
२३१ कृष्ण.
२३२ तलवार.
२३३ नागवा.
२३४ सिंहा सारखा.
२३५ गंगा.
२३६ हरिण बालकसा.
२३७ मला खड्गानें तोडून खालीं पाड.
२३८ सभय.
२३९ महादेव.
२४० इंद्र.
२४१ खोटी.
२४२ वाणी.
२४३ कृष्णानें.
२४४ किंचित् हास्य.
२४५ अर्जुनाच्या.
२४६ यज्ञाच्या आरंभीं यजमानाच्या हातांत यज्ञदीक्षार्थ सूत्रमय कंकण बांधितात तें.
२४७ हस्तकमळाचे ठायीं.
२४८ रामचंद्रानें.
२४९ अंग पांढरें कान काळे असा घोडा.
२५० ज्या घोड्याच्या कांतिवर्णास पाहून.
२५१ सखे भाऊ भरत शत्रुघ्न.
२५२ सैन्यसमूह.
२५३ पायदळ.
२५४ सेना शुभ्र वर्ण होती म्हणून हिमालय पर्वताची जणो कांतिच काढली काय.
२५५ अग्रभागीं.
२५६ धुळोरा.
२५७ सेना.
२५८ श्यामकर्ण.
२५९ तेजःपुंज अश्व.
२६० बाळरूपानें.
२६१ त्वरेनें.
२६२ लवाजवळ.
२६३ वडील भाऊ कुश.
२६४ घोड्यास.
२६५ लवास.
२६६ कौतुक.
२६७ सोनें रत्नें ह्यांच्या अलंकारांनीं.
२६८ घोड्याच्यामस्तकीं.
२६९ चांगला.
२७० जो अश्व सोडणार नाहीं त्याच्याशीं.
२७१ शत्रुपराभव.

२७२ जानकीपुत्र लव ह्यानें.
२७३ अंगवस्त्राच्या पदरानें.
२७४ युद्धास.
२७५ उभाराहिला.
२७६ वीरश्रीचा डौल.
२७७ अश्वातें.
२७८ धनुष्य.
२७९ रडें.
२८० सीता.
२८१ दुर्बुद्धि.
२८२ माझ्या मुलास.
२८३ भुईवर.
२८४ मूर्छित.
२८५ माझ्या आईला.
२८६ धनुष्याची दोरी.
२८७ सीता.
२८८ कशाला.
२८९ लव.
२९० पराभव.
२९१ पुत्रानें.
२९२ आईस.
२९३ गज.
२९४ मुखानें.
२९५ किती एक.
२९६ चिलखतें.
२९७ उजव्या हातीं.
२९८ जसा झपाट्याचा वारा.
२९९ आटोपून.
३०० योजून.
३०१ अतिशयित.
३०२ शत्रुघ्नास.
३०३ सागर.
३०४ भुईवर.
३०५ आवाही. स्थापी.
३०६ सूर्यास्त्र.
३०७ त्यासूर्यास्त्रातें.
३०८ सूर्य.
३०९ मेघमंडळांत.
३१० कौतुक.
३११ शत्रुघ्नास.
३१२ शेवटचें अस्त्र.
३१३ नपावसी.
३१४ प्राप्त.
३१५ अज्ञान.
३१६ मल्लयुद्ध. बाहुयुद्ध.
३१७ भूमीवर.
३१८ कळ. तिडीक.
३१९ शत्रुघ्न.
३२० कमरेस विळखा घाली.
३२१ भरत शत्रुघ्न.
३२२ कृतकृत्य.
३२३ लवास.
३२४ सेनासमूह.
३२५ सीतेला.
३२६ मल्लयुद्धांत.
३२७ गेले.
३२८ ऊर.
३२९ कपाळ.
३३० सीता.
३३१ माझा मुलगा.
३३२ गाईच्या वांसरा सारखा.
३३३ चटपट.
३३४ चिंतारहित.
३३५ कुश.
३३६ आर्जव करी.
३३७ वाखाणिती.
३३८ निंदिती.
३३९ दूर जाई,
३४० शोक करी.
३४१ पाताळीं,
३४२ सर्प (पाताळांतील.)
३४३ शेषाचें मस्तक.
३४४ उलथा पालथा करितां
३४५ जिवें मारूं नको.
३४६ भरतशत्रुघ्नह्यांस.
३४७ वारा.
३४८ मेघांस.
३४९ वीरांचा गलबला.
३५० बाणाबरोबर.
३५१ दुःखसमुद्रांत.
३५२ क्षणामध्यें.
३५३ अभ्यासिलें.

३५४ नांवा सारखी करणी कर.
३५५ सहन कर.
३५६ बाण.
३५७ धनुष्य.
३५८ एक शस्त्र आहे.
३५९ हरेस (ईर्षेस.)
३६० कुशानें.
३६१ फांसाचें जाळें.
३६२ भरत शत्रुघ्न ह्या दोघांस.
३६३ श्यामकर्णा जवळ
३६४ दोघे भाऊ.
३६५ मुखकमलास.
३६६ आंथरुणावरून.
३६७ निर्मळ--शुद्ध.
३६८ प्रार्थावें.
३६९ जगाला संभाळणारा.
३७० तुझ्याहून वरिष्ठ
३७१ कुंठित झाली.
३७२ आकाश मंदिरांत.
३७३ अंधकाराला.
३७४ राशी.
३७५ नेत्रसमूह.
३७६ आसक्त केलें.
३७७ पृथ्वी, उदक, तेज, वायु, आकाश हीं पांच.
३७८ सूर्य.
३७९ कमलांस.
३८० करितों.
३८१ दुसऱ्याप्रकारची.
३८२ अन्यायमार्गांत.
३८३ थोडाही.
३८४ नाहीं असा शब्द.
३८५ सहा शत्रु.
३८६ आस्था.
३८७ वितंडवाद.
३८८ ईश्वरनाहींम्हणणें
३८९ आवड.
३९० ठसावी.
३९१ उपमारहित.
३९२ खरेपणा पवित्रपणा इत्यादिक.
३९३ आपल्या शक्तीच्या योगानें.
३९४ नाहींतशी करितो.
३९५ धनाची.
३९६ नाश--नुकसान.
३९७ न्यायानें मिळविलेलें.
३९८ नाशाप्रत.
३९९ कपटबुद्धीनें.
४०० दुसऱ्यास ठकविणें
४०१ तसल्या धनाचा उपभोग.
४०२ मानावी.
४०३ इच्छा.
४०४ पराची स्त्री.
४०५ पराचें धन.
४०६ केवळ.
४०७ भ्रांतींत पडलें असतां.
४०८ जिवंत राहणें.
४०९ तारुण्य.
४१० स्थिर किंवा चिरकाळ राहणारी.
४११ जनकराजाची कन्या.
४१२ सीताप्रमुख.
४१३ बहिणी.
४१४ दिरांच्या बायका.
४१५ बहिणी किंवा जावा त्यांचा संवाद.
४१६ आनंद.
४१७ ज्या स्त्रियांची कीर्ति.
४१८ शत्रुघ्नाची.
४१९ सीतेनें.
४२० समाधानपावल्या.
४२१ सुदैवयोगें.
४२२ आसन्नमरण रोग्याला.
४२३ कल्पासमान.
४२४ वर्षें.
४२५ झोंपेनें.
४२६ दुर्मिळ म्हणजे निद्रा नाहीं, व स्वप्नही नाहीं.

४२७ मधुर भाषणानें.
४२८ ऐकण्याची इच्छा. ह्या मना कां नसो.
४२९ श्रीसीता.
४३० आपला वनवास-संबंधी वृत्तांत.
४३१ ज्या वृत्तांताच्या श्रवणानें.
४३२ पापभयानें.
४३३ भरतराय.
४३४ अयोध्येस.
४३५ पाहून.
४३६ रामचंद्राच्या.
४३७ उपदेश.
४३८ स्वीकारून.
४३९ निर्विघ्नपण.
४४० यज्ञयागादिकर्मानें
४४१ अत्रिऋषीच्या आश्रमास.
४४२ रामचंद्र.
४४३ वनांत.
४४४ आपल्या घरांत.
४४५ निजधन रामचंद्र ह्मास.
४४६ विश्वामित्र.
४४७ हें आदरार्थी बहुवचन.
४४८ शांतचित्ततपस्वी.
४४९ स्वच्छ किंवा शुभ्र.
४५० मनांत किंवा मानस सरोवरांत.
४५१ हंसपक्षी.
४५२ सदय झाले.
४५३ अत्रिऋषि.
४५४ अत्यंत.
४५५ सूर्याचे किरण.
४५६ थंडी मध्यें.
४५७ अत्रीची स्त्री.
४५८ सासूसारखी किंवा आईसारखी.
४५९ प्रीति.
४६० भूषित करी.
४६१ ह्या प्रेमास सीमा आहे काय ?
४६२ माझ्या डोळ्यांत.
४६३ काजळ.
४६४ गंधाची उटी.
४६५ गंगेचें जळ.
४६६ पतिव्रताधर्म.
४६७ अमृतापेक्षां मधुर.
४६८ सुरस भाषणानें.
४६९ तृप्तकरून.
४७० माझ्या कपाळीं.
४७१ टिकला.
४७२ मळीण नहोणारा.
४७३ पुण्यमहिमा.
४७४ उटी.
४७५ ज्या उटीच्या सुगंधास.
४७६ लुब्ध.
४७७ नाकडोळेह्मांस.
४७८ बोलावयास;
४७९ उष्णस्पर्शयुक्त.
४८० थंडींत
४८१ उन्हांत.
४८२ अतिशीतळ.
४८३ माझी अमर्यादा
४८४ पतिव्रता.
४८५ स्नेहातें प्रसवे.
४८६ त्या अंबिकेस.
४८७ मोठेंदयालुत्व.
४८८ स्वामी.
४८९ दंडकनांवाच्या अरण्यांत.
४९० विराधनामा.
४९१ धनुष्यबाणधरणारे.
४९२ ऋषींचा शत्रु.
४९३ संपविला.
४९४ तुंबुरूनें दिलेला मोठा शाप.
४९५ अगस्ति मुनि.
४९६ पूज्या.
४९७ तपाच्या सिद्धी पासून उत्पन्न.
४९८ ही मी.
४९९ गृध्रपति.
५०० ऋषीस मान्य.
५०१ तुमची सून.

५०२ आपल्या वियोगानें.
५०३ गोदावरीच्या वाऱ्यानें.
५०४ आनंदास.
५०५ सुखाला.
५०६ गोदानदी.
५०७ लोकांचें चित्तवाक् अंग ह्यांस.
५०८ शोकरूप घणानें.
५०९ वक्षस्थळ.
५१० हाय.
५११ राक्षसी.
५१२ स्वामीरामह्याच्या आज्ञेनें.
५१३ नाक कान कापी.
५१३॥ जितेंद्रिय.
५१४ सखी.
५१५ दुष्टबुद्धि.
५१६ देह.
५१७ जानकी.
५१८ रावणाची बहीण.
५१९ राक्षसी.
५२० कपटरूप धरणारी.
५२१ मदनानें.
५२२ रमली.
५२३ माझा कनिष्ठ भाऊ लक्ष्मण त्याची स्त्री.
५२४ जाया.
५२५ गुणानें रूपानें अधिक.
५२६ सूर्या सारखा तेजस्वी लक्ष्मण.
५२७ राम सीता ह्यांच्या.
५२८ शरीर देणारा.
५२९ तुझा पति लक्ष्मण.
५३० तिच्या मनास.
५३१ उत्तम यशाला.
५३२ दुष्ट स्वभाव.
५३३ सुंदर म्यान जिला अशी सुरी.
५३४ कटार.
५३५ स्त्री.
५३६ देवाची.
५३७ सद्गुणांचे ठायीं.
५३८ उघडकरीत नाहीं.
५३९ शरीरसौंदर्य.
५४० सुंदरी.
५४१ मुख.
५४२ पिशाची.
५४३ हांसण्यानें.
५४४ भीतीचें क्रीडास्थान जें मुख त्यानें.
५४५ क्रोधासह गर्व.
५४६ दुर्बुद्धि.
५४७ भलत्या प्रकारानें.
५४८ हें नासिक क्षेत्राचें नांव.
५४९ नीतीतें.
५५० सुखातें.
५५१ तृप्त होण्यास.
५५२ शत्रु सैन्याच्या नाशानें.
५५३ क्षेम.
५५४ गरुड.
५५५ चवदा हजार.
५५६ मांसभक्षक असुर.
५५७ सर्प.
५५८ रामलक्ष्मण.
५५९ कपटाचा.
५६० मारीच राक्षस.
५६१ रावणानें.
५६२ उन्मत्त दांडगा अशा.
५६३ भय.
५६४ गांजणूक.
५६५ कपट.
५६६ प्राण.
५६७ रामचंद्राच्या हाके सारखी.
५६८ कर्ण.
५६८॥ परीक्षा करणारें.
५६९ स्वामी रामचंद्र ह्याचे असु प्राण त्यांच्या रक्षणाकरितां.

५७० संकटरूप प्रवाहांत.
५७१ कल्याण.
५७२ कपट.
५७३ कमलदलाक्षराम.
५७४ विजयलक्ष्मीचें नित्य क्रीडावयाचें गृह.
५७५ वाटलें.
५७६ अतिक्रूर.
५७७ मजविषयीं इच्छा.
५७८ अतिउग्रत्व.
५७९ शस्त्रा प्रमाणें.
५८० खेदयुक्त ज्यांचें अंतःकरण झालें असे.
५८१ मोठा साधु लक्ष्मण.
५८२ घामानें भिजलेला.
५८३ पर्णशालेला.
५८४ घरास.
५८५ संन्यासी.
५८६ मंद होवो.
५८७ थंडींत.
५८८ निष्पाप मी मला.
५८९ धैर्यानें.
५९० दुष्टांचें.
५९१ पृथ्वी सारखी सोसक.
५९२ वेडेचार—चेष्टा.
५९३ गायनकळा.
५९४ मेघास
५९५ देवेंद्र.
५९६ भक्षीत असें.
५९७ देहसंरक्षण.
५९८ जरासंध.
५९९ आपल्या सामर्थ्यानें.
६०० सात द्वीपें आणि समुद्रकिनाऱ्या पर्यंत देश.
६०१ कोटि.
६०२ बंदीशाळेंत.
६०३ घातले.
६०४ राजा.
६०५ अंगबळानें.
६०६ सैन्यबळानें.
६०७ आटोपत नाहीं.
६०८ आजपर्यंत.
६०९ हे धर्मराजा.
६१० मारण.
६११ उपजली.
६१२ फार बोलणें.
६१३ नजाणवे.
६१४ स्वस्तिक्षेम.
६१५ नाश.
६१६ चिलखत बक्तर.
६१७ कीर्ति.
६१८ बरोबर,
६१९ पुरुषश्रेष्ठ.
६२० उत्सुक.
६२१ चढले.
६२२ शुभ्र वस्त्रें नेसून.
६२३ आंगास फांसून.
६२४ राजमार्ग.
६२५ गज्याच्या अरण्यांत.
६२६ सिंह.
६२७ गुरांच्या गोठ्यांत.
६२८ होमशाळेंत.
६२९ खांबा सारखे.
६३० मुके.
६३१ कोणती आहे.
६३२ द्वेषासि
६३३ जारणमारणविधीनें.
६३४ मोकळे.
६३५ धैर्य—उत्साह.
६३६ रागावला.
६३७ मुख.
६३८ कृष्ण.
६३९ घटींव शरीराचा.
६४० मला सारखा.
६४१ आंगलोट.
६४२ गुडघ्या पर्यंत. लांब ज्याचे हात.
६४३ नवरा.
६४४ अमीतें.
६४५ जिवंत.

६४६ राजे सोडण्याची.
६४७ गोष्ट.
६४८ वीर लक्ष्मीचा नवरा.
६४९ कासवा.
६५० प्रकाशित करी.
६५१ हे वाचाळा.
६५२ अधिक.
६५३ याचकांच्या योग्यते प्रमाणें.
६५४ कंसहंता कृष्ण.
६५५ संसाररूपगजाचा सिंह म्ह० नाशक.
६५६ वसुदेवात्मज.
६५७ कांहीं कामाच्या निमित्तानें.
६५८ हे नीचा.
५६९ आयुर्मर्यादेची.
६६० पुण्याचा-पुण्यरूप
६६१ वात.
६६२ क्षय.
६६३ पंख्याचा वारा.
६६४ लागला असतां.
६६५ पांच प्राण हेच पांच दिवे त्याच्या ज्योती.
६६६ भूमीवर.
६६७ शरीर हेंच दीपपात्र.
६६८ आवड.
६६९ राजाची मोकळीक.
६७० अन्य.
६७१ सुटका.
६७२ युद्धास.
६७३ युद्धकर.
६७४ कौतुकानें.
६७५ व्यर्थ.
६७६ बडबड.
६७७ हे वाचाळा.
६७८ घालवांत.
६७९ थोडासा.
६८० भरलें.
६८१ बेडूक.
६८२ निःशंक.
६८३ निर्णय.
६८४ वीरश्रेष्ठ भीम आणि जरासंध.
६८५ गुंडाळून बांधून.
६८६ मस्तका वरील लांब केश.
६८७ अवलोकिला.
६८८ क्रोधदृष्टीनें.
६८९ गज.
६९० सिंहानें.
६९१ देखावा
६९२ वीरश्रीचा वेग.
६९३ आवरेना
६९४ अतिशयित.
६९५ प्यावयास.
६९६ धांवून जाई.
६९७ तळहात.
६९८ मांड्या.
६९९ दंड.
७०० भूमितळ.
७०१ तळपायांनीं.
७०२ पर्वतशिखरें.
७०३ ठेविला.
७०४ हृदयस्थानीं.
७०५ कृष्णार्जुन.
७०६ उग्र—भयंकर.
७०७ वज्रप्राय मूठ.
७०८ मगरा सारखी बळकट मिठी.
७०९ मोठा तालवृक्ष.
७१० त्वरेनें.
७११ भीमाची कमर.
७१२ उलटी
७१३ बुक्की.
७१४ क्रोधावेशानें.
७१५ रक्ताचे.
७१६ दंतांतें.
७१७ कोंपरखळ्या.
७१८ पोलादी.
७१९ तरवारी.
७२० मुद्गल.
७२१ आपले बाहु हींच शस्त्रें असें मानून.
७२२ देवसमूह.

७२३ भोजन केल्यावांचून.
७२४ उदक पानावांचून.
७२५ खूण.
७२६ भीमातें.
७२७ श्रीकृष्ण.
७२८ चिरफाळ्या.
७२९ धरिला.
७३० घट्ट.
७३१ फेरा.
७३२ शिखर.
७३३ इंद्र.
७३४ डाव्या पायानें.
७३५ उजवा पाय.
७३६ दाबून धरून.
७३७ डावा पाय.
७३८ काळा सारख्या भयंकर भीमानें.
७३९ चिरिला.
७४० रक्तनदी.
७४१ विराटनगराच्या उत्तर दिशेस.
८४२ दुर्योधन.
७४३ ज्या दुर्योधनास.
७४४ दुर्योधन पक्षांतील भीष्म द्रोण इत्यादिक.
७४५ योद्धे.
७४५॥ नव्हावी.
७४६ अकल्पित.
७४७ मायवाड्यांत.
७४८ ज्यांच्या मुसक्या बांधल्या असे.
७४९ साठ हजार.
७५० गाई.
७५१ कौरव कुळरूप चंदन वृक्षावरील सर्प. असा तो दुर्योधन.
७५२ हांकून नेई.
७५३ गवळ्यांचा नाईक.
७५४ विराट राजास.
७५५ हे कुरुकुळामध्यें नीचा दुर्योधना.
७५६ उत्तर ह्या नांवाच्या.
७५७ पुत्रातें.
७५८ अन्यायातें.
७५९ वेगळें.
७६० हें सांगणें.
७६१ ऐकवतेंना.
७६२ धैर्य सागर.
७६३ कौरवाच्या योध्यांचा समुदाय मला पाहून थिजो.
७६४ लोणी—तूप.
७६५ केवळ गाईसच नाहीं.
७६६ हे भगिनि उत्तरे
७६७ आपल्या सैन्यास
७६८ स्त्रीवेषधारीअर्जुन
७६९ चांगला वाटेल.
७७० उघडा न करून.
७७१ कृपणाचा.
७७२ द्रव्याची घागर.
७७३ हावभाव.
७७४ गाणें.
७७५ युद्धांगणांत.
७७६ चालवो.
७७७ विराटपुत्र उत्तर.
७७८ नाचणार.
७७९ वाद्य वाजविणार.
७८० गाणार.
७८१ हस्तगत.
७८२ पहावें.
७८३ कौरव सैन्य.
७८४ पहा.
७८५ घाबरला.
७८६ आपलें आणि दुसऱ्याचें.
७८७ बळ अबळ.
७८८ नजाणुनी.
७८९ मूर्ख.
७९० प्रळय समुद्रासारखें.
७९१ वाटतें.
७९२ घाबरतें.
७९३ बृहन्नडा.

७९४ बिछान्यावर.
७९५ रणभूमीवरच.
७९६ हा देह.
७९७ बोलसी.
७९८ तलवार.
७९९ सैन्यरूपी बागु-
लास.
८०० शत्रूचा प्रताप हा-
च वणवा त्याच्या
ज्वालांनीं.
८०१ तो उत्तर हाच
हरिण.
८०२ भाजून गेला.
८०३ गोंजारून.
८०४ आंगीं कांप ध्याव-
यास.
८०५ मऊपणा.
८०६ कोमेजलेपणा.
८०७ झाडाचा कोंवळा
पाला.
८०८ युद्ध करण्याची
हौस.
८०९ धनुष्यास.
८१० युद्ध.
८११ बाणरूप जल-
वृष्टि.
८१२ वायु हो. (जसा-
मेघास वायु तसा
तूं मला सहाय हो.
८१३ सूर्याचा.
८१४ अरुणनामक सा-
रथि.
८१५ कुरुसेनेवर.
८१६ मदनानें.
८१७ तरुण पुरुष.
८१८ गाई.
८१९ शत्रुसैन्य.
८२० अर्जुन.
८२१ उत्तम प्रकारचा.
८२२ देवदत्तनामक.
८२३ शंख.
८२४ प्रळयकाळीं.
८२५ महादेव.
८२६ भयप्रद.
८२७ शंखध्वनीतें.
८२८ अर्जुन.
८२९ शंखानें.
८३० हे उत्तरा.
८३१ योद्धे.
८३२ द्रोणाचार्य.
८३३ अश्वत्थामा.
८३४ भीष्म.
८३५ शिव शिव इत्या-
दि. आश्चर्य सू-
चन.
८३६ शकुनीचा भाचा
दुर्योधन.
८३७ सैन्यांत
८३८ निष्फळ.
८३९ सैन्य.
८४० तो दुष्ट दुर्योधन
८४१ आपल्या प्राणांचें
रक्षण करण्यावि-
षयीं तत्पर.
८४२ निर्लज्जांचा ना-
यक.
८४३ आपल्याघोड्यांतें
८४४ मारुति.
८४५ ढांपण किंवा दट्या
८४६ विराटाच्या गाई
चे चोर हो.
८४७ अनुकूळ—सहाय
८४८ सदाशिव.
८४९ थोड्याशा पराक्र
मानें.
८५० श्रीकृष्णाचा.
८५१ प्रिय.
८५२ सखा.
८५३ सिंह.
८५४ हत्तीच्या कळपा
स.
८५५ अर्जुन.
८५६ झोडी.
८५७ कौरवसैन्य.
सागरांत बुडा-
लेल्या.
८५८ बाहेर पडल्या.
८५९ भोंपळ्या सार-
ख्या झाल्या.
८६० अर्जुन.

८६१ मी कृष्णाचा मित्र असतां मला.
८६२ आपल्या स्थानाकडे गेल्या.
८६३ पुच्छाचें ओझें.
८६४ घेऊन.
८६५ ज्या कोकिलांचे.
८६६ सुगंधानें पूर्ण. हें आम्रवृक्षाचें विशेषण.
८६७ दुष्ट.
८६८ चोंचांनीं टोंचणें.
८६९ विपरीत.
८७० राघू मैना.
८७१ मयूर.
८७२ केकाशब्द.
८७३ हंसपक्षी.
८७४ आम्रवृक्षाच्या.
८७५ फुललेल्या. हें शिराचें विशेषण.
८७६ अमृतासारखा गोड.
८७७ गानशब्द.
८७८ उदक.
८७९ जलबिंदुही.
८८० दुसरे.
८८१ शुष्क करितोस.
८८२ मेघ.
८८३ शिशिरऋतूंत.
८८४ जलबिंदूस.
८८५ मलय पर्वतावर.
८८६ मयूर.
८८७ गर्वित. क्रूर.
८८८ झाडांची भिंती सारखी रचना.
८८९ बागीच्या.
८९० मोकळेपणाची.
८९१ सुखांस.
८९२ रांवा. राघु.
८९३ भाताचें.
८९४ फोडण्याविषयीं.
८९५ आपल्या चोंचेचा नाश.
८९६ भूमीतें.
८९७ बुद्धिहीन मासे.
८९८ तत्काळ.
८९९ पाताळलोकातें.
९०० सूर्य.
९०१ प्रकाशित करी.
९०२ चंद्रमा.
९०३ नक्षत्र.
९०४ हे काजव्या.
९०५ म्हातारपणामुळें.
९०३॥ माजलेल्याहत्तीच्या गंडस्थळांचें विदारण.
९०४॥ अभिमानी.
९०५॥ लहानपशुहरिणादिकांसारखा.
९०६ सिंह.
९०७ रंगविलेल्या वेली.
९०८ राजाचा हत्ती.
९०९ प्रतिष्ठा.
९१० दानोदकाचें प्राशन.
९११ भ्रमर.
९१२ कमळावर.
९१३ दैव.
९१४ याचक.
९१५ इच्छित.
९१६ दूर कर.
९१७ जर येत असतीं.
९१८ कोकिळ व कावळे ह्यामध्यें.
९१९ श्रेष्ठकानिष्ठभान.
९२० अज्ञान.
९२१ आम्रवृक्ष.
९२२ कामदेव.
९२३ भुईत गेलेल्या पारंब्या.
९२४ भोंपळी.
९२५ वाटसरू.
९२६ कुंपण.
९२७ चंद्र.
९२८ ज्याचा प्रकाश.
९२९ सूर्य.
९३० आकाशांत.
९३१ चंद्र.
९३२ चंद्राचें.
९३३ अमावास्येचे दिवशीं.

१३४ लघुत्व.
१३५ दुसऱ्याच्या घरीं.
१३६ शुक्लद्वितीयेच्या चंद्रास.
१३७ हे मेघा.
१३८ वृष्टिकरण्यास सिद्ध.
१३९ हंसाचें सोंग घेऊन.
१४० ज्यांत नवीन कमलपुष्पें फुललीं आहेत असें कमलिनीवन.
१४१ रसजाणणाऱ्यां मध्यें श्रेष्ठ अशा तुवां.
१४२ कमलिनी, पक्षीं पद्मिनी स्त्री.
१४३ चांपेकळी
१४४ पुष्परस.
१४५ गजाचीं.
१४६ नेर्मीचें फू
१४७ जी कमलि
१४८ भोगावया
१४९ दूरदेशातें.
१५० निर्दयदैव.

